स्वामी विवेकानंद शतवार्षिक जयंती
स्मारक ग्रंथ

# स्वामी विवेकानंद ग्रंथावली

## खंड दुसरा



श्रीरामकृष्ण आश्रम
नागपूर

# निवेदन

भगवान श्रीरामकृष्णचरणाश्रित पूज्यपाद स्वामी विवेकानंदांच्या शतवार्षिक जयंतीच्या महन्मंगल प्रसंगीं "स्वामी विवेकानंद ग्रंथावली"चा हा द्वितीय खंड जनताजनार्दनाच्या हातीं समर्पितांना अतिशय आनंद होत आहे.

भगवान श्रीरामकृष्णांच्या मार्गदर्शनानुसार दुश्चर साधना करीत असतां स्वामी विवेकानंदांना श्रीरामकृष्णांच्या कृपाकटाक्षाने निर्विकल्प समाधीद्वारा जगांतील आणि जीवनांतील अंतिम सत्याचा साक्षात्कार झाला. त्यानंतर त्यांनी यथाकाल समग्र भारतांत आणि जगाच्या बऱ्याचशा भागांत सुबुद्ध संचार केला. अशा रीतीने ईश्वराची आणि माणसाची प्रत्यक्ष ओळख करून घेऊन, भगवान श्रीरामकृष्णांच्या जीवनांत युगोपयोगी स्वरूपांत साकारलेल्या सनातन सत्याच्या अनुरोधाने स्वामी विवेकानंदांनी भारताला आणि समस्त जगाला प्रदान केलेल्या अखिल जीवनस्पर्शी संदेशाचा संपूर्ण, अधिकृत मराठी अनुवाद या ऐतिहासिक पुण्यप्रसंगीं वाचकांच्या हातीं देतांना कृतकृत्यता वाटत आहे. स्वामी विवेकानंदांच्या तहत आजपर्यंत प्रकाशित झालेल्या, आणि त्याचबरोबर अगदी नव्याने उपलब्ध झालेल्या व अद्याप कोणत्याहि भाषेंत अप्रकाशित अशा सर्व व्याख्यानांचा, प्रवचनांचा, ग्रंथांचा, लेखांचा, पत्रांचा, संवाद-संभाषणांचा, मुलाखतींचा, प्रश्नोत्तरांचा, कवितांचा व इतर सर्व प्रकारच्या साहित्याचा मूळ इंग्रजींतून आणि बंगालींतून केलेला अनुवाद प्रस्तुत "ग्रंथावली"च्या एकूण दहा खंडांमधे समाविष्ट करण्यांत आला आहे. स्वामी विवेकानंदांच्या आजपर्यंत उपलब्ध झालेल्या समस्त इंग्रजी व बंगाली साहित्याचा हा प्रथमच प्रसिद्ध होत असलेला अधिकृत मराठी अनुवाद होय.

आधुनिक विज्ञान, तज्जनित तांत्रिक प्रगति, औद्योगिक क्रांति प्रभृतींनी जन्म दिलेल्या भौतिक दृष्टया समृद्ध, ऐहिक सुखसोयींनी युक्त, परंतु आत्महीन, जडवादी, **भोगैकसर्वस्व** 'आधुनिकते'ने

भारताच्या आणि जगाच्या जीवनांत जी अपूरणीय आध्यात्मिक पोकळी निर्माण केली आहे ती ह्याच संदेशाने--ह्याच अभ्युदय आणि निःश्रेयस-साधक युगधर्माने भरून निघणार आहे हें त्याचें अनुशीलन केल्यास पटल्याखेरीज राहणार नाही. त्याचबरोबर त्याने शिक्षण, समाज-जीवन, राजनीति प्रभृति जीवनाच्या महत्त्वाच्या शाखा निकोप व पुष्ट होऊन व्यक्ति, कुटुंब, समाज, राष्ट्र आणि समस्त जग ह्यांच्या स्थैर्यासाठी भरभक्कम पाया लाभेल.

भगवान श्रीरामकृष्णांचे प्रधान शिष्य स्वामी विवेकानंद हे आधुनिक मानवाचे यथार्थ प्रतिनिधि होते. आधुनिक विचारप्रवाह आणि त्यांमुळे निर्माण झालेल्या समस्या, प्रश्न आणि आकांक्षा यांच्याशीं त्यांचा प्रत्यक्ष परिचय होता. ह्या सर्व आधुनिक समस्यांना आणि प्रश्नांना चिरंतन सत्याच्या अनुरोधाने स्वामी विवेकानंदांनी आधुनिक मानवाला उमजतील व पटतील अशा स्वरूपांत समर्पक आणि निर्णायक उत्तरें दिलीं आहेत.

आधुनिक मानवाच्या, आणि विशेषतः भारतीयांच्या आशा-आकांक्षा लक्षांत घेऊन उज्ज्वल भावीकाल निर्माण करण्यासाठी वर्तमानकालांत कार्यास प्रेरित करणाऱ्या ह्या ओजस्वी संदेशाला मराठी साज चढवून तो मराठी बंधु-भगिनींना सादर करण्यांत म्हणूनच कृतार्थता वाटत आहे. अस्तु.

ह्या द्वितीय खंडांतील "हिंदुधर्माचें पुनरुत्थान", "वेदान्त आणि जीवन" व "राजयोग" हे अनुवाद **स्वामी शिवतत्त्वानंद** यांनी केले आहेत. "पतंजलींचीं योगसूत्रें" हा अनुवाद **प्रा. नारायणशास्त्री द्रविड**, एम्. ए. न्यायाचार्य, विशारद, नागपूर, यांनी केला आहे. "संवाद आणि संभाषणें" हा अनुवाद **प्रा. प्र. ग. सहस्त्रबुद्धे**, एम्. ए., एल्. एल्. बी., खामगांव, यांनी केला आहे. "पत्रें" या विभागाचा अनुवाद (कै.) **श्री. वि. शं. बेनोडेकर**, एम्. ए., यांनी केला आहे.

प्रा. द्रविड आणि प्रा. सहस्त्रबुद्धे यांचे आम्ही या सहकार्याबद्दल अत्यंत आभारी आहोंत.

"स्वामी विवेकानंद ग्रंथावली"च्या ह्या व इतरहि सर्व खंडांच्या संपादनाचें कार्य स्वामी शिवतत्त्वानंद आणि स्वामी व्योमरूपानंद ह्यांनी केलें आहे.

ग्रंथाच्या शेवटीं जोडलेली सुविस्तृत सूचि अभ्यासु आणि चोखंदळ वाचकांना सोयीची आणि उपयुक्त वाटेल अशी आशा आहे.

आजकालच्या कमालीच्या महागाईच्या दिवसांत एवढें प्रचंड प्रकाशन साहजिकच फारच मोठ्या आर्थिक बलावर अवलंबून होतें. तथापि ह्या महान् कार्याचें राष्ट्राच्या नवनिर्मितींतील महत्त्व ओळखून 'भारत शासना'च्या 'वैज्ञानिक संशोधन आणि सांस्कृतिक कार्य' विभागाने, 'महाराष्ट्र राज्या'च्या 'साहित्य आणि संस्कृति मंडळा'ने, आणि इतरहि कित्येक सज्जनांनी आर्थिकदृष्ट्या हातभार लावल्यामुळेच प्रस्तुत स्वरूपांत "ग्रंथावली"चें प्रकाशन शक्य होऊं शकलें. ह्या सहृदय आणि सढळ आर्थिक सहकार्याबद्दल आम्ही उपर्युक्त सर्व साहाय्यकांना मनःपूर्वक धन्यवाद देतों.

सरतेशेवटीं त्या सर्वशक्तिमंताच्या कृपेने आणि अनेकांच्या अनेकविध सहकार्याने सिद्ध झालेल्या ह्या प्रकाशनाचें उद्दिष्ट साध्य होवो अशी त्या दयाघनाला प्रार्थना करून हा वाङ्मय-अर्घ्य प्रभुचरणीं निवेदित करतों.

**स्वामी विवेकानंद**
**शतवार्षिक जयंती**
**१७ जानेवारी १९६३**

**—प्रकाशक**

# अनुक्रमणिका

---

# हिंदुधर्माचें पुनरुत्थान

मद्रासनिवासी मित्रांनो, देशबांधवांनो आणि माझ्या स्वधर्मियांनो,–

हिंदुधर्माच्या प्रचारास्तव माझ्या हातून जी काय यःकश्चित् सेवा घडली, तिचा प्रेमाने स्वीकार करून तुम्हीं माझ्या कार्यास अनुमोदन दिलेंत हें बघून अत्यंत आल्हाद वाटत आहे. आता, मला हा आनंद, हा संतोष तुम्हीं माझी स्वतःची वा दूर विदेशी मीं केलेल्या कार्याची वैयक्तिक प्रशंसा केलीत म्हणून होत आहे अशांतला मात्र भाग नाही. मला होत असलेल्या आनंदाचें कारण निराळें आहे. अभागी भारताच्या मस्तकावरून परकीय आक्रमणांचे झंझावातांमागून झंझावात गेले आहेत. शतकानुशतकें स्वतः आम्हीं केलेली उपेक्षा आणि आमच्या विजेत्यांनी केलेली अवहेलना यांनी प्राचीन आर्यावर्ताचा महिमा मलीन झाला आहे. शतकांमागून शतकें या भूमीवर थैमान घालणाऱ्या प्रचंड लोंढ्यांनी हिंदुधर्मरूपी इमारतीचे कित्येक भव्य आधारस्तंभ, कित्येक सुंदरसुंदर कमानी, कोपऱ्यांच्या कितीतरी प्रशस्त शिळा निखळून वाहून गेल्या आहेत. हें सर्व खरें असलें तरीहि, हिंदुधर्माच्या पुनरुत्थानासाठी मीं केलेल्या यःकश्चित् कार्यामुळे तुम्हांस झालेला हर्ष हेंच दर्शवीत आहे की, एवढ्यानंतरहि या हिंदुधर्मरूपी इमारतीचा पाया होता तसाच अगदी शाबूत आहे, महत्त्वाचे जोड निखळलेले नाहीत,—ज्या आध्यात्मिक पायावर हिंदुजातीच्या ईश्वरभक्तीचा व सर्वभूतहिताकांक्षेचा वैभवशाली प्रासाद उभा आहे तो पाया होता तसाच सुदृढ आहे, त्याला कांहीच धक्का लागलेला नाही.

---

स्वामी विवेकानंदांना धर्मप्रसाराच्या कार्यांत अमेरिकेंत लाभलेलें अभूतपूर्व यश भारतवर्षांत विदित झाल्यानंतर भारतभर ठिकठिकाणीं सभा भरविण्यांत येऊन त्या सभांतर्फे स्वामीजींचे आभार मानून त्यांना अभिनंदनपत्रें पाठविण्यांत आलीं होतीं. 'हिंदुधर्माचें पुनरुत्थान' हें स्वामीजींनी मद्रास येथील हिंदूंनी पाठविलेल्या असल्या अभिनंदनपत्रास अमेरिकेहून धाडलेलें उत्तर होय.

भगवान श्रीरामकृष्ण देवांचा सर्वांत निकृष्ट, अति अपात्र दास मी, मी भारतांत आणि समस्त जगतांत त्यांचा संदेश पसरविण्याचा अधिकार प्राप्त होऊन धन्य झालों आहें. तुम्ही त्यांचा सादर स्वीकार केलांत. आपल्या स्वभावसिद्ध आध्यात्मिकतेमुळेच तुम्हीं त्यांच्यांत आणि त्यांच्या संदेशांत, लवकरच येऊं घातलेल्या आध्यात्मिकतेच्या महा-पुराचा प्रारंभींचा गर्जनध्वनि ऐकला. हा महापूर आपल्या दुर्दम्य वेगाने लवकरच भारतभर पसरणार हें अटळ विधिलिखित आहे. तो आपल्या प्रचंड प्रवाहाने भारतांत जें कांही दुर्बल असेल, जें कांही सदोष असेल तें समस्त साफ धुऊन नेईल. आणि मग, शतकानुशतकें दुःखकष्ट शांतपणें सहन केल्याबद्दल बक्षीस म्हणून अभूतपूर्व गौरव प्राप्त होऊन हिंदुजाति विधात्याने तिच्यासाठी योजून ठेवलेल्या उच्च पदीं आरूढ होईल. आणि त्याबरोबरच, मानवजातीचा आध्यात्मिक विकास साधणें हें जें तिचें अखिल मानवजातीसंबंधीचें जीवितकार्य आहे, तेंहि ती पार पाडील.

उत्तर भारतांतील रहिवासी तुम्हां दाक्षिणात्यांचे विशेष ऋणी आहेत. कारण आज भारतांत ज्या सर्व शक्ति कार्य करीत आहेत त्यांतील अधिकांश शक्तींचें उगमस्थान तुमची ही दक्षिणच होय. श्रीशंकर, रामानुज व मध्व प्रभृति महान् भाष्यकार आणि युगप्रवर्तक आचार्य या तुमच्या दक्षिणेंतच जन्मास आले होते. जगांतील प्रत्येक अद्वैतवादी ज्यांचा कायमचा ऋणी आहे ते आचार्य शंकर दक्षिणेंतच जन्मले होते. पददलित, अस्पृश्य 'परिये' ज्यांच्या दिव्य स्पर्शाने 'अलवार' भक्तांत परिणत झाले ते दीनवत्सल रामानुज ह्याच दक्षिणेंत जन्म पावले होते. समस्त भारतांत शक्तीचा संचार करणारे, उत्तर भारतांतील एकमेव महापुरुष जे चैतन्य महाप्रभु, त्यांच्या शिष्यांनीहि ज्यांचें नेतृत्व स्वीकारलें ते महात्मा मध्वहि ह्या तुमच्या दक्षिणेंतच जन्मास आले होते. पण ह्या सर्व भूतकालीन घटना होत. आजहि काशीक्षेत्राच्या गौरवांत तुम्हां दक्षिणवासियांचाच वांटा सर्वांपेक्षा अधिक आहे. तुमच्या उज्ज्वल त्यागाचा प्रभाव हिमालयाच्या दुर्गम शिखरांवरील पवित्र देवालयांवरहि दिसून येतो. म्हणून, कितीतरी महापुरुषांचें पवित्र रक्त ज्यांच्यांत खेळत आहे, आणि या अशा महान् आचार्यांच्या आशीर्वादाने ज्यांचें जीवन धन्य झालें आहे त्या तुम्हीं भगवान श्रीराम-

कृष्णांचा संदेश सर्वप्रथम समजावा व त्याचें आदरपूर्वक ग्रहण करावें यांत खरोखर आश्चर्य तें काय ?

तुमची दक्षिणच वेदविद्येचें चिरंतन आगर होय. म्हणून ही गोष्ट तुम्ही अगदी सहज समजूं शकाल की, हिंदुधर्मावर हल्ला चढविणाऱ्या अजाण टीकाकारांनी कितीहि नाकबूल केलें तरीदेखील आजहि श्रुतिच (वेदच) हिंदुधर्मांतील पंथोपपंथाचा कणा आहे.

मानववंशांचें अध्ययन करणाऱ्यांना किंवा भाषाशास्त्रज्ञांना वेदांच्या संहिता व ब्राह्मण विभागाचें कितीहि महत्त्व वाटो, 'अग्निमीळे पुरोहितम्' 'इषेत्वोर्जेत्वा' 'शन्नो देवीरभीष्टये' प्रभृति वैदिक मंत्र उच्चारीत निरनिराळ्या आकारांच्या वेदींवर नाना यज्ञांत दिलेल्या आहुतींद्वारा प्राप्त होणारीं फलें कितीहि लोभनीय असोत, तें सर्व केवळ भोगासाठी होय. त्यापासून मोक्ष लाभेल असें म्हणावयास कुणीहि कधी पुढे आलेला नाही. आणि म्हणूनच, आरण्यक अथवा श्रुतिशीर्ष म्हणून प्रसिद्ध असलेलें, व आध्यात्मिकता नि मोक्षमार्गाचें उपदेशक असें ज्ञानकांडच भारतावर नेहमी प्रभाव गाजवीत आलें आहे आणि पुढेहि सतत गाजवीत राहील.

आधुनिक हिंदु तरुणाची अवस्था मोठी केविलवाणी असते. सनातन धर्मांतील नाना मतांच्या चक्रव्यूहांत खरा रस्ता कोणता हें कळेनासें होऊन तो गोंधळून जातो. स्वतःच प्रचारिलेल्या 'अणोः अणीयान् महतो महीयान्' ('लहानांत लहान नि मोठ्यांत मोठ्या') ब्रह्माप्रमाणेच जो धर्म आपल्या लहानांत लहान नि मोठ्यांत मोठ्या अशा सर्वच अनुयायांच्या उपयोगी पडण्यासाठी नाना रूपें धारण करीत असतो त्या आपल्या धर्माचें मर्म, पूर्वग्रहांनी दूषित असल्यामुळे त्या आधुनिक हिंदु तरुणाला कळूं शकत नाही. अशा परिस्थितींत, इहलोकनिष्ठ जडवादाखेरीज आणखी कांहीच जाणत नसलेल्या पाश्चात्य देशांपासून आध्यात्मिकतेचा मिणमिणता दिवा उसना घेऊन, अंधारांत चाचपडणारा तो आधुनिक तरुण आपल्या पूर्वजांचा धर्म समजून घेणाचा निष्फळ यत्न करीत असतो. आणि त्यांत यश मिळणें साहजिकच शक्य नसल्यामुळे विफल होऊन तो एकतर घोर अज्ञेयवादी बनून जातो, किंवा आपल्या जन्मजात धार्मिक स्वभावामुळे

पशुजीवन जगणें न जमल्यामुळे अखेर भारतीय आध्यात्मिकतेचा किंचित् वास येणारा पाश्चात्य जडवादाचा रसच वेंधळेपणाने पिऊन 'अंधळयाच्या मागोमाग जाणाऱ्या अंधळयांप्रमाणे मूढ लोक इतस्ततः भटकत असतात' ही कठोपनिषदाची वाणी सार्थ करीत असतो !

ज्यांचा अंतरात्मा सद्‌गुरूंच्या संजीवक स्पर्शाने जागृत होत असतो असे केवळ मूठभर भाग्यवानच या केविलवाण्या अवस्थेपासून बचावत असतात.

भाष्यकार भगवान् शंकराचार्यांनी बरोबरच म्हटलें आहे--

"दुर्लभं त्रयमेवैतत् देवानुग्रहहेतुकम् ।
मनुष्यत्वं मुमुक्षुत्वं महापुरुषसंश्रयः ।।

--"जगांत तीन गोष्टी अत्यंत दुर्लभ असून ईशकृपेनेच लाभतात. त्या म्हणजे मनुष्यजन्म, मोक्षाची इच्छा आणि सिद्धपुरुषाचा आश्रय."

परमाणु, द्व्यणुक, त्रसरेणु प्रभृतींसंबंधीच्या अपूर्व सिद्धान्तांना जन्म देणारें वैशेषिकांचें सूक्ष्म विश्लेषण म्हणा, की नैयायिकांचें जाति-द्रव्य-गुण-समवायादि वस्तूंविषयीचें आणखीच सूक्ष्म नि अपूर्व तार्किक विश्लेषण म्हणा; परिणामवादाचे जनक जे सांख्य त्यांचा त्याहिपेक्षा अधिक प्रगत व गंभीर विचारप्रवाह म्हणा, की ह्या विभिन्न संशोधनांचें सुपक्व फलच अशीं व्यासदेवांचीं ब्रह्मसूत्रें म्हणा--मानवी मनाच्या ह्या सर्व विविध विश्लेषणांचा व संश्लेषणांचा एकमात्र पाया म्हणजे श्रुतिच होय. फार काय, पण बौद्धांच्या व जैनांच्या तात्त्विक ग्रंथांतूनहि श्रुतीचें साहाय्य झिडकारण्यांत आलेलें नाही. आणि निदान कांहीकांही बौद्धसंप्रदायांत व जैनांच्या अधिकांश ग्रंथांत श्रुतीचें प्रामाण्य पूर्णपणें स्वीकारलें गेलें आहे. आता एवढें मात्र खरें की, श्रुतीच्या कांही अंशाला ते 'हिंसक श्रुति' संबोधून अप्रमाण मानतात. कारण, हा भाग प्रक्षिप्त असून ब्राह्मणांनी मागाहून जोडून दिला असें त्यांचें म्हणणें आहे. आधुनिक कालांतील स्वर्गवासी महात्मा स्वामी दयानंदांचेंहि असेंच मत होतें.

प्राचीन म्हणा की अर्वाचीन म्हणा, भारतांतील एकूणएक सर्व विचारप्रणालींचें केंद्र कोणतें हें जर कुणी जाणूं इच्छीत असेल, नाना पंथोपपंथांत विभागलेल्या हिंदुधर्माचा मूलभूत पाया कोणता हें जर

कुणी बघूं इच्छीत असेल तर व्यासदेवांच्या ब्रह्मसूत्रांकडेच बोट दाखवावें लागेल यांत मुळीच संदेह नाही.

हिमालयाच्या निबिड अरण्यांतील हृदय स्तंभित करणाऱ्या गंभीरतेमधे सुरनदी गंगेच्या गंभीर ध्वनींत ध्वनि मिसळून गरजणाऱ्या अद्वैतकेसरीचें 'अस्ति भाति प्रिया'चें मेघगंभीर गर्जन श्रवण करा, की वृंदावनांतील मनोहर कुंजांत 'पिया पीतम्'चें कोमल कूजन श्रवण करा. वाराणसी क्षेत्रांतील मठांमठांतून साधूंच्या गाढ ध्यानांत संमीलित व्हा, की नदीयाविहारी गौरांग महाप्रभूंच्या भक्तांच्या उन्मत्त नृत्यांत भाग घ्या. बडकेले, तेनकेले आदि शाखायुक्त विशिष्टाद्वैत मताच्या आचार्यांच्या चरणांजवळ उपस्थित व्हा, अथवा माध्व संप्रदायाच्या आचार्यांचें बोधामृत श्रद्धापूर्वक पान करा. गृहस्थ शिखांची 'वाह् गुरुकी फते' ही समरवाणी ऐका, की उदासी व निर्मला पंथी-यांचीं ग्रंथसाहेबावरील प्रवचनें श्रवण करा. संत कबीरांच्या संन्यासी शिष्यांना 'सत् साहेब' म्हणून अभिवादन करा, की सखी संप्रदायाचें भजन ऐकण्याचा आनंद लुटा. राजपुतान्यांतील विख्यात सुधारक दादूच्या त्या अत्यद्भुत लिखाणाचें अध्ययन करा, की त्याचा शिष्य राजा सुंदरदास याच्या, आणि त्यानंतर पुढे जाऊन थेट, (भारतांत गेल्या तीनशे वर्षांत लिहिल्या गेलेल्या इतर कोणत्याहि ग्रंथापेक्षा जनमनावर ज्याची पकड निःसंशय अधिक आहे) त्या विचारसागर नामक ग्रंथाचा सुप्रसिद्ध प्रणेता जो निश्चलदास, त्याच्या ग्रंथांचा एकाग्रचित्ताने अभ्यास करा. फार काय, उत्तरभारतांतील भंगीमेहतरांना आपल्या लालगुरूच्या उपदेशांचें विवरण करावयास सांगा—तुम्हांला आढळून येईल की या सर्व आचार्यांच्या आणि संप्रदायांच्या मतांना आधारभूत असें एक विशिष्ट धर्ममत आहे. आणि हें मूल धर्ममत म्हणजे तेंच की श्रुति ज्याचा प्रमाणग्रंथ होय, गीता ज्याची भगवन्मुखनिःसृत टीका होय, शारीरक सूत्रें वा ब्रह्मसूत्रें ज्याचें सुसंबद्ध विवरण होय, आणि परमहंस परिव्राजकाचार्यांपासून तों लालगुरूच्या मेहतर शिष्यांपर्यंत भारतांतील विभिन्न संप्रदाय ज्याचे केवळ भिन्नभिन्न विकास होत.

म्हणून द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत मतप्रतिपादक अशीं मुख्य

आणि इतर कांही गौण भाष्यें असलेलें हें प्रस्थान-त्रयच * हिंदुधर्माचें प्रमाणभूत शास्त्र होय. प्राचीन नाराशंसीचे, म्हणजेच वेदांच्या संहिता-भागाचें अर्वाचीन रूप अशीं जीं पुराणें, तीं या हिंदुधर्माचा पौराणिक कथाभाग होत. आणि ब्राह्मणांचें, म्हणजेच वेदांच्या क्रियात्मक भागाचें आधुनिक रूप जीं तंत्रें, तीं त्याचें कर्मकांड होत.

हें प्रस्थान-त्रय सर्वच पंथांचें प्रमाणभूत शास्त्र असलें तरी प्रत्येक पंथाचीं पुराणें आणि तंत्रें मात्र वेगवेगळीं आहेत.

वर सांगितलेंच आहे की, तंत्रें हीं वैदिक कर्मकांडांचींच परिवर्तित रूपें होत. या तंत्राविषयी उगाच विकृत ग्रह करून बसण्यापूर्वी ब्राह्मणभागाबरोबर, आणि त्यांतल्या त्यांत विशेषत: अध्वर्यु ब्राह्मणाबरोबर त्यांचें अध्ययन करावें असें माझें सर्वांस सांगणें आहे. कारण, आपल्याला आढळून येईल की, या तंत्रांमधील अधिकांश मंत्र अगदी जसेच्या तसेच ब्राह्मणभागांतून घेतले आहेत. आणि या तंत्रांच्या प्रभावाविषयीच बोलावयाचें झाल्यास आपण अगदी निर्धास्तपणें म्हणूं शकतों की, श्रौत नि स्मार्त कर्में वगळल्यास, हिमालयापासून तों कन्याकुमारीपर्यंत प्रचलित असलेलीं सर्व धर्मकर्में या तंत्रांमधूनच घेतलेलीं आहेत, आणि शाक्त, शैव, वैष्णव प्रभृति सर्वच संप्रदायांच्या पूजापद्धतींवर त्यांची छाप आहे.

अर्थातच, येथे कुणीं चुकूनहि असा समज करून घेऊं नये की, सर्वच हिंदूंना स्वत:च्या धर्माच्या ह्या साऱ्या मूल आधारासंबंधी पूर्ण ज्ञान असतें असें माझें म्हणणें आहे. तसलें कांही मी सूचित देखील करूं इच्छित नाहीं. कारण पुष्कळजण, विशेषत: दक्षिण बंगालमधील अनेकजण असे आहेत की ज्यांनी ह्या साऱ्या पंथांची व प्रणालींचीं नांवेंसुद्धा ऐकलीं नसतील ! मला म्हणावयाचें आहे केवळ इतकेंच की, कळत न कळत कसेंहि का होईना, या वर उल्लेखिलेल्या प्रस्थानत्रयांतील आदेशानुसारच हिंदु आपली जीवननौका वल्हवीत असतो.

ही झाली एक बाजू. दुसरीकडे बघितल्यास दिसून येईल की जिथेजिथे म्हणून हिंदी भाषा बोलली जाते तिथेतिथे अगदी खालच्यां-

---

* उपनिषदें, गीता व ब्रह्मसूत्रें — या तिघांना मिळून प्रस्थानत्रय म्हणतात.

तील खालच्या जातींना देखील दक्षिण बंगालमधील कित्येक खूप वरच्या जातींपेक्षा वेदान्तिक धर्म अधिक अवगत आहे.

असें कां ?

मिथिलेहून नवद्वीपांत आणलें गेलेलें, शिरोमणि-गदाधर-जगदीश प्रभृति पंडितांच्या प्रतिभेने यत्नपूर्वक जोपासिलें नि वाढविलें गेलेलें, कांहीकांही बाबतींत साऱ्या जगांतील सर्व तर्कपद्धतींहून श्रेष्ठ ठरलेलें, आणि अतिशय डौलदार व वेचक शब्दांत रेखीवपणें व्यक्त झालेलें, आणि मानवी तर्कांचें अपूर्व विश्लेषण करणारें बंगालचें न्यायशास्त्र भारतांत ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत सर्वत्र श्रद्धापूर्वक अभ्यासिलें जातें खरें, परंतु अत्यंत खेदाची गोष्ट ही की वेदविद्येच्या अध्ययनाची बंगाली लोकांनी सर्वस्वी हेळसांडच केली. येथवर की, कांही थोड्याच वर्षांपूर्वीपर्यंत पतंजलींचें महाभाष्य शिकवूं शकेल असा एकदेखील पंडित तिथे मिळणें दुरापास्त होतें. केवळ एकदाच एक महान् प्रतिभा त्या 'अवच्छिन्न अवच्छेदकां'चें * जाळें फाडून बाहेर येऊं शकली होती— एकमेव चैतन्य महाप्रभुच त्या कधी न संपणाऱ्या तर्कटांचा भेद करूं शकले होते. केवळ तेव्हाच एकदा बंगालची आध्यात्मिक तंद्रा भंग पावली होती, आणि कांही दिवसांसाठी बंगाल भारतांतील इतर प्रदेशांच्या धर्मजीवनांत सहभागी झाला होता.

अमळ आश्चर्याचीच गोष्ट ही की, चैतन्यदेवांनी एका 'भारतीं'-पासून संन्यास ग्रहण केला असल्यामुळे ते स्वत: भारती असले तरी, वास्तविक माधवेंद्रपुरींचे शिष्य ईश्वरपुरी यांनीच त्यांची धर्मप्रतिभा प्रथम जागृत केली होती.

बंगालची आध्यात्मिकता जागृत करण्याचें कार्य विधात्याने जणु 'पुरी' संप्रदायासाठीच राखून ठेवलेसें दिसतें. भगवान श्रीरामकृष्ण देवांनी तोतापुरींकडूनच संन्यास-दीक्षा घेतली होती.

चैतन्यदेवांनी व्याससूत्रांवर जें भाष्य लिहिलें तें कदाचित् नष्ट झालें असेल किंवा अद्याप कुणाला गवसलें नसेल. त्यांचे शिष्य दक्षिणें-तील माध्व संप्रदायास जाऊन मिळाले. क्रमश: रूप, सनातन आणि

* न्यायदर्शनांतील दोन पारिभाषिक शब्द. अवच्छिन्न म्हणजे जें सीमित होतें तें, आणि अवच्छेदक म्हणजे जें सीमित करतें तें.

जीव गोस्वामींसारख्या महापुरुषांच्या आसनावर बाबाजींची वर्णी लागूं लागली. साहजिकच चैतन्यदेवांच्या महान् संप्रदायाला अवकळा येऊन त्याचा झपाट्याने ऱ्हास होऊं लागला होता. परंतु सांप्रत फिरून त्याच्या उत्थानाचीं चिन्हें दिसून येत् आहेत. आशा वाटते की तो लवकरच आपला लोपलेला गौरव पुन्हा एकदा प्राप्त करून घेईल.

चैतन्यदेवांचा पावन प्रभाव भारतांत सर्वत्र प्रत्ययास येतो. जिथेजिथे म्हणून भक्तिमार्ग चोखाळला जातो तिथेतिथे त्यांच्या नांवाचा आदराने उल्लेख होत असतो, त्यांच्या चरित्राचें श्रद्धापूर्वक अध्ययन होत असतें, आणि त्यांच्या व्यक्तित्वाचें प्रेमाने पूजन होत असतें. माझें तर अगदी साधार आणि ठाम मत आहे की, साराच्या सारा वल्लभाचार्यसंप्रदाय हा चैतन्यदेवांनी स्थापलेल्या संप्रदायाचीच केवळ एक विशिष्ट शाखा आहे. पण गंमत ही की, त्यांची शक्ति भारतभर आजहि असा विलक्षण प्रभाव गाजवीत आहे ह्याची बंगालमधील त्यांच्या नामधारी शिष्यांना मात्र गंधवार्ताहि नाही! आणि असणार तरी कशी? शिष्य 'गाद्या' पटकावून त्यांवर लोळत आहेत, तर स्वत: चैतन्यदेव चंडालांपर्यंत सर्वांनी भगवद्भक्त व्हावें एवढेंच मागणें मागत भारतभर दारोदार फिरत होते.

जी एक चमत्कारिक आणि अशास्त्रीय कुलगुरुप्रथा बंगालमधे, आणि विशेषेंकरून बंगालमधेच अधिक प्रचलित आहे, ती देखील भारतांतील इतर प्रांतांच्या धर्मजीवनापासून बंगालच्या अलगपणाचें एक सबळ कारण होय. परंतु बंगालच्या या अलगपणाचें सर्वांत महत्त्वाचें आणि मुख्य कारण असें की, जो संन्यासी वर्ग आजहि भारताच्या सर्वोच्च आध्यात्मिक संस्कृतीचा प्रतिनिधि व भांडारच होय त्याची संजीवक शक्ति बंगालच्या जीवनांत कधीच संचारित झाली नव्हती.

बंगालमधील उच्चवर्णीयांना त्यागाची चाड नाही, भोगाकडेच त्यांचा कल. अशा परिस्थितींत आध्यात्मिक विषयांत सखोल अंतर्दृष्टि त्यांना प्राप्त तरी कशी व्हावी? 'त्यागेन एके अमृतत्वम् आनशु:'— 'केवळ त्यागानेच मुक्ति लाभत असते' हें चिरंतन सत्य खोटें कसें ठरेल?

दुसरीकडे, हिंदी भाषा बोलली जाणाऱ्या मुलुखांत मात्र प्रभाव-

शाली, त्यागी आचार्यांच्या अखंड परंपरेने वेदान्ताचीं महान् तत्त्वें घरोघरीं पोहोचवून दिलीं आहेत. विशेषत: पंजाबकेसरी राणा रणजित-सिंहांच्या राजवटींत त्यागाला जें प्रोत्साहन मिळालें त्यायोगें अगदी खालच्यांतील खालच्या जातींना देखील वेदान्ताच्या श्रेष्ठ उपदेशवाणीचा अलभ्य लाभ झालेला आहे. "माझा चरखा देखील सारखा 'सोऽहं सोऽहं' मंत्र जपत असतो" असें पंजाबी शेतकऱ्याची मुलगी सात्त्विक गर्वानें म्हणत असते. आणि, हृषीकेशच्या जंगलांत संन्याशाचीं भगवीं वस्त्रें परिधान केलेले कितीतरी त्यागी मेहतर वेदान्ताच्या अध्ययनांत गढून गेलेले मीं स्वत: आपल्या डोळ्यांनी बघितले आहेत. आणि तेहि असे तसे नव्हत, तर कितीतरी गर्विष्ठ उच्चवर्णीय व्यक्ति त्यांच्या पायांपाशी बसण्यांत आनंद मानून त्यांचा उपदेश ऐकावयास मिळाल्याने स्वत:ला कृतार्थ समजतील, असे. आणि मी म्हणतों, असें कां न व्हावें? मनूंनी म्हटलेंच आहे ना—'अन्त्यात् अपि परो धर्म:'—'हीन व्यक्ती-पासूनहि श्रेष्ठ धर्म ग्रहण करावा.'

सारांश, उत्तर भारतांत आणि पंजाबकडे राहणारे लोक बंगाल, मुंबई वा मद्रासकडील रहिवाशांपेक्षा धर्मज्ञानाच्या बाबतींत कितीतरी पुढे गेलेले आहेत. दशनामी, बैरागी, पंथी वगैरे निरनिराळ्या संप्रदायां-तील फिरते त्यागी साधु प्रत्येकाच्या दाराशीं जाऊन धर्मभाव पसरवीत असतात. आणि हें सारें एका चतकोर भाकरीच्या मोबदल्यांत. अहाहा, त्यांच्यांतील अधिकांश किती उदार, किती नि:स्वार्थ असतात! प्रचलित कोणत्याच संप्रदायाशीं स्वत:ला निगडित न करूं चाहणाऱ्या कछुपंथी संप्रदायांतील एक संन्यासी माझ्या माहितीचे आहेत. साऱ्या राजपुताना-भर शेकडोंनी शाळा आणि हजारोंनी धर्मार्थ दवाखाने बांधण्यास हा महात्मा कारणीभूत झाला आहे. दुर्गम अरण्यांतून त्यांनी इस्पितळें उघडलीं आहेत, हिमालयांतील दुर्लंघ्य नद्यांवर लोखंडी पूल टाकले आहेत, मात्र आश्चर्य हें की स्वत: ते पैशाला अजून कधी शिवलेहि नाहीत! एक कांबळ हीच काय ती त्यांची सारी दौलत! त्यांचें मुळी नांवच पडून गेले आहे—'कंबळीवाले बाबा.' किती सार्थ नांव हें! दारोदार माधुकरी मागून तीवर ते जगतात. त्यांतहि परत आणखी एका नियमाची भर—एकाच घरून त्यांनी पुरें पोटभर अन्न मागितलेलें माझ्या कधी

ऐकण्यांत नाही. हो, न जाणो गृहस्वामीवर उगाच वाजवीपेक्षा अधिक बोजा पडावयाचा! आणि बंधूंनो ऐकून ठेवा, असे ते एकटेच साधु नाहीत, शेकडोंनी अशांची गणती करतां येण्यासारखी आहे. जोंपर्यंत हे असले भूदेव भारतांत विद्यमान असून आपल्या दैवी चारित्र्याच्या अभेद्य परकोटांनी 'सनातन धर्मा'चें संरक्षण करीत आहेत तोंपर्यंत ह्या प्राचीन धर्माचा विनाश होईल असें तुम्हांला वाटतें काय?

येथे, ह्या अमेरिकेंत, पाद्री लोकांना वर्षाकाठीं केवळ सहा महिने, आणि तेंहि फक्त रविवारीं दोन तास धर्मोपदेशाचें काम करण्याबद्दल सालिना तीस हजार, चाळीस हजार, पन्नास हजार, कधी कधी तर नव्वद हजार रुपयांपर्यंत तनखा मिळत असतो. अमेरिकेंतील प्रजाजन स्वधर्माच्या रक्षणासाठी लाखोंनी रुपये ओतीत असतात, आणि आमच्या बंगाली पोरांना शिकविण्यांत येत असतें की कंबळीबाबांसारखे हे देवतुल्य, निःस्वार्थी साधु ऐदी, रिकामटेकडे आणि उबार भटके होत! "मद्भक्तानाम् च ये भक्ताः ते मे भक्ततमाः मताः"—"माझ्या भक्तांचे जे भक्त तेच माझ्या मतें माझे उत्तम भक्त होत."

एक अगदी एका टोकाचा दृष्टान्त घ्या—समजा की एक अगदी अज्ञ बैरागी आहे. तो देखील खेड्यापाड्यांतून जिथेजिथे म्हणून जातो तिथल्यातिथल्या रहिवाशांमधे, आपल्या कुवतीप्रमाणे तुलसीदास अथवा चैतन्यचरितामृत, किंवा तो दाक्षिणात्य असल्यास अलवार संत इत्यादिकांपासून त्याला स्वतःला लाभलेलें ज्ञान पसरवीत असतो. ह्याने कांहीच का भलें होत नसेल? आणि या सगळ्याचा मोबदला काय म्हणाल, तर भाकरीचा एक तुकडा नि लंगोटीचें एक धुडकें. त्यांच्यावर निष्ठुर टीका करण्यापूर्वी, बंधूंनो, एकवार थोडा विचार तर करून बघा की, ज्यांच्यामुळे तुम्ही सुशिक्षित होऊं शकत आहांत व समाजांतील आपलें स्थान सतत उन्नत ठेवूं शकत आहांत आणि 'साधुबाबाजी म्हणजे रिकामटेकडे भटके होत' हा अमूल्य उपदेश देण्याबद्दल आपल्या शिक्षकांना योग्य वेतन देण्यासाठी ज्यांना तुम्ही बेदरद शोषून घेत आहांत त्या आपल्या गरीब स्वदेशबांधवांकरता तुम्ही स्वतः काय बरें करीत असतां?

कित्येक बंगाली बंधूंनी सध्या होत असलेल्या हिंदुधर्माच्या

पुनरुत्थानाला हिंदुधर्माचा 'नव-विकास' असें संबोधून त्यावर टीका केली आहे. त्यांना 'नव' वाटावी अशीच खरोखर ही घटना आहे. कारण हिंदुधर्म अगदी नव्यानेच आता बंगालमध्ये प्रवेश करीत आहे. आतापर्यंत तिथला धर्म म्हणजे आहार, विहार नि विवाहासंबंधी कित्येक रूढि यापलीकडे गेलाच नव्हता.

श्रीरामकृष्णांच्या शिष्यांनी हिंदुधर्माचा जो भाव समस्त भारतभर प्रचारित करण्याचें व्रत घेतलें आहे, तो शास्त्रानुमोदित आहे किंवा नाही या विस्तृत विषयाची चर्चा करण्याचें स्थान अर्थातच हें लहानसें पत्र नव्हे. तरीपण आमच्या टीकाकारांना आमचें मत समजण्यास बरेच साहाय्यभूत होतील असे कांही मुद्दे मी येथे थोडक्यांत नमूद करून ठेवतों.

प्रथमत: म्हणजे, मीं असें कधीहि प्रतिपादन केलें नाही की, कृत्तिवासाच्या नि काशीदासाच्या * ग्रंथावरून हिंदुधर्माची यथार्थ धारणा होणें शक्य आहे--मग त्यांची वाणी कितीहि "अमृतसमान" असो, किंवा ती श्रवण करणारे केवढेहि "पुण्यवान" असोत. हिंदुधर्माचें यथार्थ आकलन होण्यासाठी आपल्याला वेदांना आणि दर्शनांनाच शरण जावें लागेल, समस्त भारतांतील प्रमुख आचार्यांच्या व त्यांच्या शिष्यांच्या पायाशीं बसून त्यांचा उपदेश श्रवण करावा लागेल.

बंधूंनो, गौतमांच्या सूत्रांपासून आरंभ करा. त्यांवरील वात्स्यायनभाष्याच्या मदतीने गौतमांचें 'आप्त'†विषयक मत समजून घ्या. मग शबरप्रभृति भाष्यकारांच्या साहाय्याने मीमांसकांच्या मताचें अनुशीलन करा. म्हणजे अतींद्रिय ज्ञान व आप्त यांसंबंधी त्यांचें काय म्हणणें आहे हें तुम्हांला कळून येईल. त्याचप्रमाणे मग, सर्वचजण 'आप्त' होऊं शकतात, असल्या 'आप्त' पुरुषांची वाणी म्हणूनच वेद हे प्रमाणभूत होत इत्यादि यांचीं मतेंहि तुम्हांला कळून येतील. आणि महीधरकृत यजुर्वेद-भाष्याची भूमिका वाचण्याची जर तुम्हांला

---

* दोन प्रसिद्ध बंगाली कवि. कृत्तिवासी रामायण व काशीदासी महाभारत बंगालमधे सुप्रसिद्ध आहे.

† ज्यांना 'लाभलें वा प्राप्त झालें' आहे, म्हणजेच ज्यांना अंतिम सत्याचा साक्षात्कार झाला आहे असे साक्षात्कारी महापुरुष.

सवड असेल तर तींतहि, वेद हे मानवाच्या आध्यात्मिक जीवनाचे त्रिकालाबाधित नियम आहेत, आणि म्हणूनच ते अनादि अनंत आहेत याविषयीचें अधिकच सुंदर नि विशद विवरण तुम्हांला आढळून येईल.

सृष्टीच्या अनादित्वासंबंधीच्या मताविषयी एवढेंच म्हणावयाचें आहे की, तें केवळ हिंदुधर्माचाच नव्हे, तर बौद्ध व जैन धर्माचाहि मुख्य आधार होय.

भारतामधील सर्व संप्रदायांना स्थूलपणें ज्ञानमार्ग आणि भक्तिमार्ग या दोन वर्गांत विभागतां येईल. तुम्ही जर श्रीमत् शंकराचार्यप्रणीत शारीरक भाष्याची भूमिका वाचाल तर तुम्हांला आढळून येईल की, तींत ज्ञानाच्या 'निरपेक्षते'ची सविस्तर चर्चा करून असा सिद्धान्त प्रस्थापित केला गेला आहे की, ब्रह्मानुभूति वा मोक्ष कसल्याहि प्रकारच्या अनुष्ठानावर, मतावर, वर्णावर, जातीवर वा संप्रदायावर अवलंबून नाही. ब्रह्मज्ञानाला या कशाचीच अपेक्षा नाही. साधनचतुष्टयसंपन्न असा कुणीहि त्याचा अधिकारी होऊं शकतो. आणि हें साधनचतुष्टय म्हणजे चित्तशुद्धि करणाऱ्या उपायांखेरीज आणखी कांहीच नाही.

आता भक्तीसंबंधी म्हणावयाचें म्हणजे भक्तिमार्गाच्या कित्येक आचार्यांनी तर मुक्तीसाठी जातीची, लिंगाची, फार काय पण मनुष्यजन्माची देखील अट घातलेली नाही हें आमच्या बंगाली टीकाकारांनासुद्धा चांगलें अवगत असावें. मुक्तीसाठी त्यांच्या मतें कशाची आवश्यकता असेल तर ती फक्त एका भक्तीचीच.

ज्ञान आणि भक्ति दोन्हीहि संपूर्ण निरपेक्ष आहेत असेंच सर्वत्र प्रतिपादिलें गेलें आहे. आणि म्हणूनच कुण्या एकाहि आचार्याचें असें म्हणणें नाही की, मुक्तिलाभाचा अधिकार केवळ एखाद्या विशिष्ट पंथाला, एखाद्या विशिष्ट वर्णाला, अथवा एखाद्या विशिष्ट जातीलाच आहे. ह्याविषयीची स्पष्ट कल्पना येण्यासाठी 'अंतरा चापि तु तद्दृष्टेः' ह्या व्यास-सूत्रावरील शंकर, रामानुज व मध्व या आचार्यांचीं भाष्यें वाचणें लाभदायक होईल.

एकामागून एक सगळीं उपनिषदें धुंडाळा, नव्हे, साऱ्याच्या साऱ्या संहिता पालथ्या घाला, कुठे म्हणून तुम्हांला इतर धर्मांसारखी मोक्षा-

विषयी संकुचित कल्पना शोधूनहि सापडणार नाही. परमतसहिष्णुतेचा आणि सहानुभूतीचा पवित्र गंध सर्वत्र दरवळत असलेला अनुभवास येईल. एवढेंच नव्हे तर, मला पुसटसें आठवतें की, अध्वर्यु वेदाच्या संहिताभागांतील चाळिसाव्या अध्यायांत तिसऱ्या की चवथ्या श्लोकाच्या प्रारंभीं आहे—'न बुद्धिभेदं जनयेत् अज्ञानां कर्मसंगिनाम्'* हा भाव हिंदुधर्मांत सर्वत्र ओतप्रोत भरलेला आहे. सामाजिक विधिनिषेध सांभाळून चालत आहे तोंवर, आपल्या विशिष्ट इष्टदेवतेच्या निवडी-करता, अथवा नास्तिक किंवा अज्ञेयवादी बनला आहे म्हणून भारतांत कधी कुणाचा छळ झाल्याचें तुमच्या ऐकण्यांत आहे काय ? सामाजिक नियमाचा भंग केल्याच्या अपराधावरून हिंदुसमाज वाटेल त्या व्यक्तीला धारेवर धरूं शकेल. पण मोक्षाचें दार मात्र कुणालाहि, अति नीच, पतित व्यक्तीलाहि बंद नाही—हिंदुधर्म मोक्षापासून कुणालाच वंचित करीत नाही. तुम्ही या दोहोंची गल्लत करून गोंधळूं नका. ह्या संबंधांत एक उदाहरण देतों, ऐका. मलबारकडे उच्चवर्णाचे लोक वापरीत असलेल्या रस्त्यांवरून चंडालाला नुसतें फिरकण्याचीसुद्धा मुभा नाही. पण त्याच चंडालाला मुसलमान किंवा ख्रिस्ती होऊं द्या—बघाल, साराच रागरंग पालटेल ! आता तो वाटेल तिथे निर्बंधपणें भटकूं शकेल. आणि हा असा प्रकार एका हिंदु राजाच्या राज्यांत, एक नव्हे दोन नव्हे, तर अनेक शतकें चालत आला आहे. हें अमळ चमत्कारिक तर खरेंच, पण अत्यंत प्रतिकूल अवस्थेंतदेखील इतर धर्मांविषयी सहानुभूति-सहिष्णुतेचा भाव त्यावरून किती सुंदरपणें व्यक्त होत आहे बरें ?

जगामधील इतर सर्व धर्मांपासून हिंदु धर्म जर कोणत्या एका बाबतींत निराळा असेल, जर कोणता एकच भाव व्यक्त करण्यासाठी ऋषिमुनींनी संस्कृतांतील प्रायः सगळें शब्दभांडार रितें केलें असेल तर ती बाब किंवा तो भाव म्हणजे हाच की, माणसाने ह्याच जीवनांत ईश्वराची—आपल्या खऱ्या स्वरूपाची प्रत्यक्ष उपलब्धि करून घेतली पाहिजे. आणि अद्वैतदर्शन तर आणखी एक पाऊल पुढे जाऊन घोषणा

---

* ही ओळ गीतेंतहि आहे. गीता ३, २६ पाहा. अर्थः— जे कर्मालाच श्रेष्ठ समजून त्यांत आसक्त असतात, अशा अज्ञ लोकांना ज्ञानाच्या गोष्टी सांगून ज्ञानी व्यक्तीने त्यांची मति विचलित करूं नये.

करतें की—ब्रह्मवित् ब्रह्मैव भवति—ब्रह्म जाणणारा स्वतःच ब्रह्म होतो. आणि हें म्हणणें अगदी तर्कसंगत आहे, कारण तो स्व-रूपतः मुळी ब्रह्मच आहे.

आणि ह्या मताच्या परिणामीं दैवी स्फूर्ति वा दैवी आदेश यासंबंधी अति उदार आणि उदात्त भाव हिंदुधर्मात उदयास येऊन दृढमूल झाला. केवळ वैदिक ऋषिच म्हणत आहेत असें नव्हे, केवळ विदुर, धर्मव्याध नि इतर प्राचीन महापुरुषच म्हणत आहेत असें नव्हे, तर अगदी परवा परवा दादूपंथांतील एक महान् त्यागी साधु, निश्चलदासदेखील निःसंकोचपणें आपल्या विचारसागर ग्रंथांत घोषणा करून गेले आहेत–

"जो ब्रह्मविद् वही ब्रह्म ताको वाणी वेद ।
संस्कृत और भाषामें करत भरम का छेद ॥"

अर्थात्, "जो ब्रह्माला जाणतो तो ब्रह्मच होय. त्याची वाणी वेदच होय. तो संस्कृतांतून उपदेश देवो की लोकांच्या भाषेंत बोलो, त्याच्या शब्दांनी श्रोत्यांचें अज्ञान हें दूर झालेंच पाहिजे."

सारांश, द्वैताच्या भाषेंत बोलावयाचें म्हणजे ईश्वराचा—ब्रह्माचा—साक्षात्कार करून घेणें, अथवा अद्वैताच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे ब्रह्मस्वरूप होणें हेंच वेदांच्या समस्त आदेश-उपदेशांचें सार आणि एकमेव लक्ष्य होय. ह्याखेरीज वेदांमधे जें कांही आहे तें सर्व म्हणजे त्याच एका अंतिम लक्ष्याप्रत पोहोचण्याच्या पायऱ्याच होत. आणि धन्य होत भाष्यकार भगवान शंकराचार्य ! त्यांचा महिमा हाच की आपल्या लोकोत्तर प्रतिभेने त्यांनी व्यासदेवांच्या विचारांचें अपूर्व, सुंदर विवरण केलें आहे.

निरपेक्ष सत्याच्या दृष्टीने एकमात्र ब्रह्मच सत्य होय. सापेक्ष सत्याच्या दृष्टीने मात्र त्याच ब्रह्माच्या भिन्नभिन्न अभिव्यक्तींवर उभारलेले भारतांतील वा भारताबाहेरील समस्त धर्मसंप्रदायहि सत्यच होत. फक्त, त्यांतील कांही इतरांपेक्षा वरचे, इतकेंच काय तें. कल्पना करा की एकजण सूर्याच्या रोखाने निघाला आहे. त्या प्रवासांत सूर्याचीं सतत नवीं नवीं रूपें त्याच्या दृष्टीस पडतील. जोंपर्यंत तो प्रत्यक्ष त्या सूर्यावर जाऊन पोहोचत नाही तोंपर्यंत त्याच्या दृष्टीला त्या सूर्याचा आकार, दृश्य नि वर्ण हीं प्रतिक्षणीं नवनवीन दिसत राहतील. सुरुवा-

तीला सूर्य त्याला एखाद्या मोठ्या चेंडूप्रमाणे दिसला. त्यानंतर त्याचा आकार हळूहळू वाढत गेला. पण खरा सूर्य मात्र वास्तविक पाहतां पहिल्याप्रथम दिसलेल्या चेंडूसारखा अथवा त्यानंतर एकामागून एक दिसत गेलेल्या निरनिराळ्या आकारांचाहि कधीच नव्हता. परंतु तरीदेखील त्या व्यक्तीने पहिल्यापासून शेवटपर्यंत पाहिला असतो सूर्यच, हेंहि तितकेंच खरें नव्हे काय? ह्याच दृष्टीने समस्त संप्रदाय सत्य होत. त्यांतील एखादा त्या खऱ्या सूर्याच्या अगदी जवळ, तर दुसरा खूप खूप दूर असेल एवढाच काय तो फरक. तो खरा सूर्य म्हणजेच आपलें 'एकमेवाद्वितीयम्'.

ईश्वरविषयक इतर सर्व कल्पना ज्याचीं आंशिक नि सीमित रूपें होत त्या सत्यस्वरूप निर्विशेष ब्रह्माचा उपदेश देणारें कोणतें एकमेव शास्त्र असेल तर तें म्हणजे वेदच होत. हे वेद, ही 'सर्वलोकहितैषिणी श्रुति' साधकाचा हात धरून त्याला हळूहळू त्या निर्विशेष ब्रह्माप्रत पोहोचण्या साठी आवश्यक असलेल्या सर्व अवस्थांमधून घेऊन जाते. इतर सर्व धर्म म्हणजे ह्याच विविध अवस्थांपैकी गति खुंटलेली आणि गोठलेली एकेक अवस्था होय. आणि म्हणून जगांतील सारे धर्म त्या नामरहित, सीमारहित, नित्य वैदिक धर्मांत अंतर्भूत होतात असें म्हणणें क्रमप्राप्तच होय.

जन्मोजन्म प्रयत्न करून पाहा, युगानुयुगें आपल्या मनाचा कोपरान् कोपरा धुंडाळून काढा, पण असा एकहि उदात्त धर्मभाव तुम्ही नव्याने शोधून काढूं शकणार नाही की जो ह्या आध्यात्मिकतेच्या अनंत खाणींत (वेदांमधे) आधीचाच विद्यमान नव्हता.

हिंदूंच्या तथाकथित मूर्तिपूजेविषयी इतकेंच बजावूं इच्छितों की, आधी जाऊन समजून घ्या की ती कसकशीं भिन्नभिन्न रूपें धारण करीत आहे. आधी जाऊन बघून या की उपासक उपासना खरोखर कुठे करीत आहेत---मंदिरांत, प्रतिमेंत की स्वतःच्याच देहमंदिरांत. आधी जाऊन नक्की समजून घ्या ते काय करताहेत हें,---मूर्तिपूजेच्या निंदकांपैकी शेकडा नव्याण्णव महात्मे ह्यासंबंधी निखालस अज्ञानी असतात! आधी जाऊन हें सगळें नीट समजून घ्या, आणि मग, बंधूंनो, वेदान्तदर्शनाच्या प्रकाशांत तें सर्व आपोआप स्पष्ट होऊन जाईल.

आणि हेंहि लक्षांत ठेवा की हीं सारीं कर्मे प्रत्येकाने आचरलीं पाहिजेतच असेंहि नाही. उलट आपली मनुस्मृति उघडून बघा—तींत प्रत्येकजणाला वार्धक्यांत चतुर्थाश्रम (संन्यास) ग्रहण करण्याचा आदेश दिलेला आढळून येईल. आणि तो संन्यासी होवो अथवा न होवो, समस्त कर्मांचा त्याग तर त्याने अवश्यच करावयास हवा. पदोपदीं पुनःपुनः हेंच प्रतिपादण्यांत आलें आहे की, समस्त कर्मांची परिसमाप्ति अखेरीस ज्ञानांत होते.—"सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते."

असो तर, ह्याच साऱ्या कारणांनी इतर देशांतील अनेक सभ्य गृहस्थांपेक्षा भारतांतील एखाद्या शेतकऱ्यालादेखील धर्माचा उमज अधिक असतो. माझ्या व्याख्यानांतून युरोपीय तत्त्वज्ञानांतील आणि धर्मांतील बरेच शब्द येतात म्हणून कुण्या एका मित्राने मला बोल लावला आहे. संस्कृत शब्द वापरतां आले असते तर माझ्याइतका आनंद मलाच झाला असता. तें माझ्यापक्षीं अत्यंत सोपेंहि झालें असतें, कारण संस्कृत भाषाच धर्मभाव प्रकट करण्याला अधिक समर्थ आहे. परंतु मी पाश्चिमात्य नरनारींसमोर व्याख्यान देत होतों ह्या वस्तुस्थितीचा त्या बिचाऱ्या मित्राला अजीबात विसरच पडला असें दिसतें! आणि, 'हिंदुलोक आपल्या संस्कृत ग्रंथांचा अर्थ विसरून गेले आहेत नि वास्तविक मिशनऱ्यांनीच त्यांचा अर्थ लावला आहे' असा कुणी एक भारतीय ख्रिश्चन मिशनरी डांगोरा पिटत असला तरीहि मिशनऱ्यांच्या त्या प्रचंड समुदायांत मला पामराला असा एकहि बहाद्दर गवसला नाही की ज्याला संस्कृतभाषेंतील एकातरी ओळीचा अर्थ लागतो आहे. आणि तरीपण मजा मात्र ही की, त्यांच्यापैकी कित्येक धुरंधरांनी वेदवेदान्तावर, इतकेंच काय पण हिंदूंच्या झाडून साऱ्या पवित्र धर्मग्रंथांवर टीकेने रसरसलेले, संशोधनांनी ठासून भरलेले अकटोविकट प्रबंध खरडून ते सभांपुढे वाचूनहि दाखविले आहेत !

मी कुण्या धर्माचा विरोधी आहे असें म्हणणें धादांत खोटें होय. मी भारतामधील ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या विरुद्ध आहें हें म्हणणेंहि तितकेंच खोटें आहे. पण तरीदेखील, अमेरिकेंत वर्गणी गोळा करण्याच्या त्यांच्या कित्येक उपायांचा मी तीव्र निषेध करूं इच्छितों.

लहान मुलामुलींच्या शालेय पुस्तकांतून छापलेल्या या चित्रांचा

अर्थ काय ? चित्रांत दाखविलें आहे की, एक हिंदु आई आपल्या पोटच्या पोराला गंगेंत मगरासमोर टाकीत आहे. आई काळी आणि मूल गोरें छापलें आहे. उद्देश एवढाच की पाहणाऱ्या गोऱ्या लोकांच्या मनांत जास्त सहानुभूति उत्पन्न होऊन अधिक वर्गणी जमा व्हावी. हें काय ? आणखी एका चित्रांत असें दाखविलें आहे की, एक माणूस आपल्या बायकोला खांबाशीं बांधून आपल्या हातांनी तिला जिवंत जाळीत आहे---एवढ्याचसाठी की तिने भूत होऊन आपल्या नवऱ्याच्या वैऱ्यांना खूप छळावें ! काय होतो या चित्रांचा अर्थ ? मोठमोठे रथ हजारो माणसांना चिरडून जात आहेत—काय होतो या चित्राचा अर्थ ? परवा इथे अमेरिकेंत लहान मुलांसाठी म्हणून एक पुस्तक प्रसिद्ध करण्यांत आलें. त्यांत एक पाद्रीमहोदय आपल्या कलकत्त्याच्या प्रवासाचें वर्णन करीत आहेत. सत्यनिष्ठ पाद्रीश्रेष्ठ लिहितात, "कलकत्त्याला भर रस्त्यावर एक प्रचंड रथ कित्येक धर्मवेड्या जिवांचा चुराडा उडवीत जात असतांना मीं प्रत्यक्ष बघितला आहे !" मेम्फिस शहरीं मीं स्वत: असल्याच एका पाद्री महात्म्याला व्याख्यानसमयीं बरळतांना ऐकलें आहे की, हिंदुस्थानांत प्रत्येक खेड्यांत लहानलहान पोरांच्या हाडांनी शिगोशिग भरलेला एक एक तलाव असतो.

मला सांगा, बिचाऱ्या हिंदुलोकांनी ख्रिस्ताच्या या अनुयायांचें काय घोडें मारलें आहे की ज्याकरता हिंदूंना दुष्ट, करंटे नि पृथ्वीच्या पाठीवरील सगळ्यांत भयंकर राक्षस म्हणून संबोधण्याचें बाळकडू प्रत्येक ख्रिश्चन बालक-बालिकेला जाणूनबुजून पाजण्यांत यावें ? ख्रिश्चनांखेरीज इतर सर्वांची, आणि विशेषत: हिंदूंची घृणा करण्यास शिकविणें हें येथील मुलामुलींच्या रविवारच्या शाळांतून देण्यांत येणाऱ्या शिक्षणाचें एक अंगच होय. हेतु हा की त्यांनी लहानपणापासूनच मिशनला वर्गणीसाठी पैसे देण्याचे धडे घ्यावेत.

सत्याची चाड म्हणून जरी नाही तरी निदान आपल्याच मुलाबाळांची दानत नीट राहावी म्हणून तरी ख्रिश्चन मिशनऱ्यांनी यापुढे ह्या प्रकाराला आळा घालणेंच उचित नाही काय ? कारण असली प्रजा वयांत आल्यावर अत्यंत निर्दय व निष्ठुर निपजावी यांत नवल तें काय ?

जो प्रचारक नरकयातनेचीं चित्रें जितक्या अधिक भेसुर नि भडक तऱ्हेने रेखाटूं शकतो, तिथल्या धडधडणाऱ्या अग्नीचीं नि पेटलेल्या गंधकाचीं अंगावर कांटा उभीं करणारीं वर्णनें जितक्या अधिक निपुणतेने करूं शकतो, कट्टर ख्रिस्ती सनातनी लोक त्याचे तितक्या अधिक प्रमाणांत गोडवे गात असतात. ख्रिस्ती धर्माच्या 'पुनरुत्थान' संप्रदायाचा धर्मप्रचार श्रवण केल्यामुळे माझ्या मित्राच्या एका अल्पवयस्क मोल-करणीला पागलखान्यांत भरती करावें लागलें. नरकांतील अग्नि आणि प्रज्वलित गंधक ह्या दोहोंच्या वर्णनाच्या मात्रेचे वळसे अमळ जास्तच झाल्याने बापडीला सोसले नसावेत !

मद्रासहून प्रसिद्ध होणाऱ्या, हिंदुधर्माच्या नालस्तीने पुरेपूर भर-लेल्या पुस्तकांवरूनहि एकवार दृष्टि फिरवा. एखादा हिंदु जर ख्रिस्ती-धर्माच्या विरुद्ध असली एक ओळ जरी लिहील तर हेच आक्रस्ताळे मिशनरी नुसती आग पाखडूं लागतील आणि 'सूड सूड' म्हणून हलकल्लोळ करून आकाशपाताळ एक करून सोडतील.

माझ्या स्वदेशवासी बंधूंनो, ह्या देशांत (अमेरिकेंत) मी एका वर्षाहून अधिक राहिलों आहें. ह्यांच्या समाजाचा कोपरान् कोपरा मीं नजरेखालून घातला आहे. दोन्ही देशांची परस्पर तुलना करूनच मी तुम्हांस सांगतों की, हे मिशनरी 'हिंदुलोक दानव आहेत' म्हणून दुनिया-भर जी दवंडी पिटीत आहेत तसले दानव आम्ही नाहीं. आणि, आपण स्वत: देवता आहों म्हणून ते जे टेंभा मिरवीत आहेत तसल्या देवता पण ते नाहीत. हिंदूंच्या विवाहसंस्थेंतील दोष, भ्रूणहत्त्या, अनीति वगैरेंविषयी हे मिशनरी जितकें कमी बडबडतील तितकें श्रेयस्कर. आपल्या ह्या पृथ्वीच्या पाठीवर असले अनेक देश असतील की जेथील खऱ्याखुऱ्या चित्रांसमोर या मिशनऱ्यांनी रेखाटलेलीं हिंदुसमाजाचीं सारीं भडक काल्पनिक चित्रेंहि अगदी फिकींच ठरतील. पण पगारी निंदक बनणें माझ्या आयुष्याचें ध्येय नाही. हिंदुसमाज म्हणजे सर्वांग-संपूर्ण आणि अगदी धुतले तांदूळ आहे असें निदान मी तरी कधी चुकूनहि म्हणणार नाहीं. ह्या आमच्या समाजांत जे सारे दोष आहेत किंवा शेकडो शतकांच्या दुर्दशेने जें कांही वाईट आमच्या समाजांत फोफावलें आहे त्याची जाणीव, मला वाटतें, माझ्याइतकी आणखी

कुणालाहि नसेल. विदेशी बंधूंनो, खऱ्या सहानुभूतीने प्रेरित होऊन आम्हांला हात देण्यासाठी पुढे सरसावत असाल, तोडफोड करण्याचा तुमचा मानस नसेल तर या, तुमचें अभीष्ट सिद्ध होवो हीच परमेश्वराजवळ माझी प्रार्थना राहील. परंतु जर ह्या दु:स्थितींत सापडलेल्या जातीच्या डोक्यावर सदान् कदा, वेळींअवेळीं शिव्याशापांची लाखोली वाहून आपल्या जातीच्या नैतिक श्रेष्ठतेचा दिमाख दाखविण्याचाच जर तुमचा मतलब असेल, तर मी तुम्हांला स्पष्टच बजावून ठेवूं इच्छितों की, न्यायाची थोडीतरी चाड बाळगून तुलना केल्यास कुणालाहि असेंच म्हणावें लागेल की नीतिमत्तेच्या दृष्टीने हिंदुलोक जगांतील अन्य कोणत्याहि जातीपेक्षा कितीतरी पटीने सरस आहेत.

भारतांत धर्म कधीच संकुचित सीमेमधे डांबून ठेवण्यांत आला नाही. आपल्या मनाप्रमाणे आपली इष्टदेवता, आपला पंथ वा आपला गुरु निवडण्यांत कुणालाहि कधी कसलीच आडकाठी करण्यांत आली नाही. म्हणून धर्माची येथे जशी वाढ झाली तशी अन्यत्र कुठेहि झालेली आढळून येत नाही. उलटपक्षीं, धर्माला या नाना भावांनी विकसित होऊं देण्यासाठी एका स्थिर भूमीची आवश्यकता होती. आणि भारतांत समाजच ती स्थिर भूमि ठरविण्यांत आला. याचा परिणाम असा झाला की, समाज कठोर नियमांनी करकचून जखडला जाऊन एकप्रकारें अचलच होऊन बसला. कारण, वाढ केवळ स्वाधीनतेंतच होऊं शकते.

ह्याच्या अगदी उलट, पाश्चात्य देशांमधे समाज होता विभिन्न भावांच्या विकासाचें क्षेत्र, आणि स्थिर भूमि होती धर्म. सर्वमान्य प्रचलित चर्चशीं (धर्ममताशीं) संपूर्ण मतैक्य राखणें हाच युरोपीय धर्माचा मूलमंत्र होता, नव्हे आजहि आहे. एखाद्या संप्रदायाला प्रचलित धर्ममताहून थोडें जरी निराळें बनण्याची इच्छा झाली तरी त्या दिशेने अल्पस्वल्प यश मिळविण्यासाठीहि त्याला रक्ताच्या पाटामधूनच वाट चालावी लागत असे. परिणामीं, तिकडे एक अपूर्व, भव्योदात्त समाजसंस्था निर्माण झाली खरी, परंतु पश्चिमेचा धर्म मात्र कधी अगदी स्थूल जडवादाची सीमा ओलांडूं शकला नाही.

आज पश्चिमेला स्वत:च्या उणीवांची जाणीव होत आहे.

'मानवाचें यथार्थ स्वरूप' वा 'आत्मा' हाच सांप्रत तिकडील ईश्वर-तत्त्वान्वेषी उन्नत व्यक्तींचा मूलमंत्र होऊन बसला आहे. आता, तिकडच्या या विचारस्रोताचें उगमस्थान कोणतें, हें संस्कृत तत्त्वज्ञानाचें अध्ययन करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला पुरें ठाऊक आहे. असो, जोंवर शक्ति नव-जीवनाचा संचार करीत आहे तोंवर ती कुठूनहि का येत असेना, त्यांत एवढें कांहीच नाही.

पण त्याचबरोबर, इकडे भारतांत देखील नवीन परिस्थितीच्या संघर्षामुळे समाजव्यवस्थेची विसकटलेली घडी फिरून नीट नव्याने बसविणें अत्यंत आवश्यक झालें आहे. गेलीं पाऊणशे वर्षें भारतांत समाजसुधारकांना आणि सुधारणेचा चंग बांधणाऱ्या सभासमित्यांना नुसता ऊत येत आहे. पण काय, धड एकाचें देखील घोडें गंगेंत न्हालें नाही! साऱ्यांचेंच बोलणें वाया गेलें, डोलणें फोल ठरलें. कारण? कारण हेंच की, त्यांना समाजसुधारणेचें खरें रहस्य अवगत नव्हतें. शिकणें अत्यंत आवश्यक असा महत्त्वाचा धडा ते शिकले नाहीत. सुधारणांच्या धिसाडघाईत, समाजांतील साऱ्याच्या साऱ्याच दोषांचें खापर बेधडक बिचाऱ्या धर्माच्या बोडक्यावर फोडून ते मोकळे झाले. आणि, त्या एका गोष्टीमधील माणसाप्रमाणे मित्राच्या कपाळावरील डास मारण्याच्या हेतूने आपल्या हातांतील बडग्याचा ते असा रट्टा लगाविण्यास पुढे सरसावले होते की जेणेंकरून कपाळावरील डासाचाच काय पण त्याबरोबरच मित्राचाहि कपाळमोक्ष व्हावा! परंतु दैवाची खैरच म्हणावयाची. कारण, ह्या साऱ्या प्रकारांत, अढळ खडकांवर बेमुर्वत धडका मारतां मारतां त्यांच्या स्वतःच्याच चिंधड्या उडाल्या. चुकीच्या मार्गाने का होईना, पण प्रयत्नांची पराकाष्ठा करून विफल झालेल्या या उदार, निःस्वार्थ महात्म्यांचाहि जयजयकार असो. घोरत पडलेल्या हिंदुसमाजाच्या निद्रिस्त कुंभकर्णाला खडबडून जागें करण्यासाठी सुधारणेच्या दुर्दम्य उत्साहांत त्यांनी कडाकड उडविलेले हे कोरडेहि अत्यंत आवश्यकच होते. पण त्यांचे प्रयत्न येथून तेथवर विघातक—निव्वळ तोडाफोडीचेच झाले, घडविण्याचा विधायक यत्नच त्यांनी केला नाही. आणि म्हणून मरण त्यांच्यासाठी वाढून ठेवलें होतें व यथाकाल तें ओढविलेंहि.

असो, हें त्यांचें ऋण स्मरून त्यांचें भलें चिंतून आपण त्यांच्या अनुभवाने शहाणे होऊं या. त्यांना हें समजलें नाही की विकासाचा आरंभ आंतून होऊन बाहेर त्याची परिणति होत असते. त्यांना हें उमजलें नाही की क्रमविकास हा केवळ आधीच्या एका क्रमसंकोचाचा पुनर्विकासच असतो. त्यांना अवगत नव्हतें की बीज आपल्या भोवतालच्या सामग्रींतून सत्त्व आत्मसात् करीत असलें तरी त्याचा वृक्ष होत असतो त्याच्या स्वतःच्या प्रकृतीनुसारच. हिंदुजातीचा संपूर्ण ध्वंस होऊन तिच्या भूभीवर नवीच एखादी जात जोंवर वावरूं लागत नाही तोंवर पश्चिमेने काय किंवा पूर्वेने काय, जंगजंग पछाडलें तरी भारतीय समाजाची अशी क्रांतिमय सुधारणा होणें कदापि शक्य नाही. भारत जोंपर्यंत सजीव राहील, जोंपर्यंत त्याच्या अस्तित्वाचाच लोप होत नाही तोंपर्यंत भारताचा युरोप बनणें अगदी असंभाव्य होय.

भारताच्या अस्तित्वाचा असा लोप होईल काय ? उदात्ततेचें, नीतिमत्तेचें, आध्यात्मिकतेचें प्राचीन आदिपीठ जो भारत, त्याच्या अस्तित्वाचा असा लोप होईल काय ? शतसहस्र ऋषिमुनींच्या पावन पदरेणूंना वक्षावर धारण करून धन्य झालेल्या आपल्या भारताचा लोप होईल काय ? देवतुल्य साधुसंतांचें अजूनहि प्रिय निवासस्थान असलेल्या भारताचा लोप होईल काय ? त्या ग्रीक डायोजिनिसचा * कंदील हातीं घेऊन, बंधूंनो, ह्या विशाल पृथ्वीच्या पाठीवरील शहरांशहरांतून, खेड्यांखेड्यांतून, जंगलांजंगलांतून धांडोळा घेत तुमच्या मागोमाग येण्यास मी एका पायावर तयार आहें—दाखवा मला असली दुसरी एखादी भूमि की जिथे असे महापुरुष विचरण करीत असतात. फलांवरून वृक्षाची पारख होते असें म्हणतात. अगदी खरें. भारतांतील प्रत्येक आम्रवृक्षाखाली जा, झाडावरून खाली गळून पडलेल्या सडक्या-किडक्या, विजळलेल्या, अर्ध्याकच्च्या आंब्यांच्या टोपल्यांवर टोपल्या भरून न्या, आणि त्यांतील प्रत्येकावर खूप संशोधनात्मक पांडित्याने

* डायोजिनिस हा सिनिक (cynic) संप्रदायांतील एक थोर पुरुष होय. त्याची अशी धारणा होती की, ह्या जगांत खरे साधु अत्यंत विरळ आहेत. आपला हा मनोभाव प्रकट करण्यासाठी म्हणून तो भर दिवसा एक जळता कंदील हातीं घेऊन शहरांतून फिरत असे.

भरलेलीं पुस्तकांमागून पुस्तकें खरडून टाका, पण तरीसुद्धा तुम्हीं एकाहि आम्रवृक्षाचें बरोबर वर्णन केल्यासारखें होणार नाही. आता, परत जाऊन, जास्त नको, फक्त एकच पूर्णपक्व, सरस, मधुर आम्रफल तोडून आणा. बस्, त्या एकाच फळाचें वर्णन कराल तरी तुम्हांला त्या आम्रवृक्षाचे खरे गुण माहीत झाले असून त्याचें अगदी बरोबर वर्णन तुम्हीं केलें असें म्हणतां येईल.

तद्वत्, या देवतुल्य महापुरुषांच्या जीवनांतच आपल्याला खऱ्या हिंदुधर्माचें दर्शन घडत असतें. जो हिंदुजातीचा वृक्ष शतकानुशतकें पुष्ट होऊन वाढत आला आहे, हजारो वर्षे प्रचंड झंझावातांचे आघात सहन करूनहि जो अक्षय यौवनाच्या अखंड ओजाने आजहि गौरवाने उभा आहे, त्या जातिवृक्षाच्या खऱ्या रूपाची, बळकटीची व अंतर्गत जोमाची अटकळ ह्या देवोपम व्यक्तींच्या जीवनांवरून सहज करतां येते.

ह्या भारताचा काय नाश होईल ?

तसें झाल्यास जगांतील सारी आध्यात्मिकता अस्तास जाईल, नीतीचे सर्व महान् आदर्श लयास जातील, धर्मांविषयीचा मधुर सहानुभूतीचा भाव नाहीसा होईल, आदर्शनिष्ठा पार निमाल्यासारखी होईल. आणि त्या रित्या स्थानीं स्थापना होईल काम-देव आणि विलासिता-देवी यांच्या जोडमूर्तीची. पैसा होईल त्यांचा पुरोहित. फसवेगिरी, पाशवी बल आणि स्पर्धा हीं होतील त्यांच्या पूजेची पद्धति आणि मानवात्मा होईल त्यांचा बलि ! छे छे, असें होणें कदापि शक्य नाही. सहनशक्ति कार्यशक्तीहून अनंतपट श्रेष्ठ आहे. प्रेमशक्ति घृणाशक्तीहून अनंतपट अधिक शक्तिमान आहे. हिंदुधर्माचें सांप्रतचें पुनरुत्थान केवळ देशभक्तीच्या प्रवृत्तीचाच आविष्कार आहे असें ज्यांना वाटत असेल त्यांच्या त्या भ्रामक समजुतीची कीवच करणें योग्य.

येथे आपण या अपूर्व घटनेचें—हिंदुधर्माच्या ह्या पुनरुत्थानाचें स्वरूप समजून घेण्याचा यत्न करूं या.

आधुनिक शास्त्रीय संशोधनाच्या प्रचंड भडिमारापुढे पश्चिमेकडील स्वमतान्ध धर्मसंप्रदायांचे जुनाट किल्ले धडाधड कोसळून जमीनदोस्त होत आहेत. चर्चच्या सदस्यांच्या बहुमतावर अथवा श्रद्धेवर आधारलेलीं ठिसूळ धर्ममतें आधुनिक विज्ञानाच्या घणाखाली फुटून चक्काचूर होत

आहेत. आधुनिक विचारांच्या सतत वाढतच जाणाऱ्या लोंढ्याला तोंड कसें द्यायचें या चिंतेने पाश्चात्य धर्मपंथांची मति गुंग होऊन गेली आहे. नवमताच्या वाढत्या ससेमिऱ्यामुळे बहुतेक धर्मांच्या शास्त्रांतील वचनांना, त्यांच्या अर्थांचा अनर्थ होईपर्यंत ताणण्याची पाळी आली असून, या ओढाताणींत त्यांतील अधिकांश पोथ्या बेकाम झाल्याकारणें त्यांना अडगळीच्या खोलींत जमा व्हावें लागत आहे. पाश्चात्य देशांमधील अधिकांश विचारशील व्यक्ति चर्चशीं असलेले आपले सारे संबंध तोडून टाकून अशांतीच्या महासागरांत इतस्ततः वाहवत आहेत. अशा या परिस्थितींत, ज्यांनी ज्ञानाच्या त्या वेदरूपी मूलस्रोताचें संजीवक जल पान केलें आहे अशा केवळ हिंदुधर्माचें व बौद्धधर्माचेंच पुनरुत्थान व्हावें हें विस्मयावहच नव्हे काय ?

अशान्त पाश्चात्य नास्तिक वा अज्ञेयवादी या विफलतेंतून सुटण्यासाठी हिंदूंच्या गीतेचा किंवा बौद्धांच्या धम्मपदाचा आसरा घेऊं पाहत आहे—त्याला तेंच शांति-सुखाचें स्थान वाटत आहे.

दैवगति बदलली आहे, हिंदुजातीचें नशीब खुललें आहे. आततायी वैऱ्यांनी उठवून दिलेल्या आगीच्या डोंबाने चहूकडून वेढलें गेलेलें आपलें बहु दिवसांचें प्राचीन घर डोळ्यांसमोर धडधडतांना बघून आसवांनी अंध झालेला हताश हिंदु, आज, आधुनिक विज्ञानाच्या प्रखर झोताने धुराचे ते घनदाट लोट उधळून लावल्यावर, आनंदाश्रूंनी डबडबलेल्या नेत्रांनी एक अकल्पित दृश्य बघत आहे. बघत आहे की, फक्त त्याचें स्वतःचें घरच काय तें आपल्या आंगच्या मजबुतीमुळे सहीसलामत बचावलें असून, बाकीचीं सारीं एकतर नाहीशीं झालीं आहेत किंवा त्याच्याच घराच्या धर्तीवर परत उभारलीं जात आहेत. दोन्ही हातांनी डोळ्यांतील अश्रु पुसून तो आता बघत आहे की, जी कुऱ्हाड त्या 'ऊर्ध्वमूल अधःशाख अव्यय' अश्वत्थाला ‡ समूळ छाटून टाकायला सरसावली होती, ती उलट एखाद्या अस्त्रवैद्याची परम उपकारी सुरीच ठरली आहे.

त्याला कळून आलें आहे की, स्वधर्माचें रक्षण करण्यासाठी त्याला

---

‡ "या संसाररूपी अश्वत्थ वृक्षाचें मूळ वर (ब्रह्मांत) आणि शाखा-प्रशाखा खाली पसरलेल्या आहेत." ह्या ठिकाणीं त्याचा अर्थ 'हिंदुधर्म' असा आहे.

त्याच्या शास्त्रांच्या अर्थाची उगीच ओढाताण करण्याची मुळीच गरज नाही, अथवा दुसऱ्या कसल्या प्रकारचा अप्रामाणिकपणा करण्याचीहि जरूर नाही. केवळ इतकेंच नव्हे तर, त्याच्या शास्त्रग्रंथांत जें कांही खालच्या पातळीचें अथवा दुर्बलतेचें द्योतक आहे त्याला निष्कारण गोंडस नांवांनी संबोधण्याचीहि त्याच्या दृष्टीने कांहीच आवश्यकता नाही. त्याला तो बेलाशक खालच्या पातळीवरील वा दुर्बल म्हणूं शकतो, कारण अरुंधतीन्यायानुसार* तें सर्व खालच्या पातळीवरील किंवा दुर्बल अधिकाऱ्यासाठीच सांगितलेलें आहे. धन्य त्या प्राचीन ऋषींची की ज्यांनी असा एक व्यापक, विस्तारशील धर्म अस्तित्वांत आणला आहे की जो, भौतिक क्षेत्रांत मानवाला जें कांही ज्ञान प्राप्त झालें आहे आणि होणें शक्य आहे, त्या साऱ्याचें स्वागत करूं शकतो. त्याच्याकडे हिंदु आता नव्या दृष्टीने बघावयास शिकला आहे, नव्याने त्याची कदर करूं लागला आहे. त्याच्या लक्षांत येऊन चुकलें आहे की, हे जे सारे आधुनिक शोध इतर सर्व संकुचित धर्मसंप्रदायांना भेडसावीत आहेत, ते म्हणजे त्याच्या स्वतःच्या पूर्वजांनी अंतर्दृष्टीने, समाधिअवस्थेंत शतकांपूर्वी शोधून काढलेल्या सत्यांचा बुद्धीच्या व इंद्रियांच्या पातळी-वरील पुनराविष्कारच होत.

म्हणूनच त्याने कांहीहि झिडकारण्याची गरज नाही, किंवा कशाच्याहि शोधांत अन्यत्र कुठे भटकत फिरण्याचीहि जरूरी नाही. जें अनंत भांडार वारसा म्हणून त्याला लाभलें आहे त्यांतूनच थोडें घेऊन, तें आपल्या कामीं लावण्यानेच त्याचें भागणार आहे. तसें करावयास त्याने सुरुवात पण केली आहे, आणि उत्तरोत्तर तो तसें अधिकाधिक करीलहि. **हिंदुधर्माच्या सांप्रतच्या पुनरुत्थानाचें, आजच्या ह्या नवजागृतीचें वास्तविक हेंच खरेंखरें कारण नव्हे काय ?**

बंगाली तरुणांनो, माझें तुम्हांला कळकळीचें सांगणें आहे की, बंधूंनो, शरमेची गोष्ट असली तरी नाकबूल करतां येणार नाही की,

---

* अरुंधती हा एक अत्यंत लहान तारा आहे. एखाद्याला तो दाखवावयाचा झाल्यास प्रथम त्याच्या जवळचा एखादा मोठा तारा दाखवून, त्यावर दृष्टि स्थिर झाल्यानंतर मग तो अरुंधती तारा दाखवितात. त्याचप्रमाणे धर्माचा सूक्ष्म भाव समजूं जातां प्रथम स्थूल भावाचें साहाय्य घ्यावें लागतें.

परके लोक ज्या अनेक खऱ्याखुऱ्या दोषांसाठी हिंदुजातीला सदा बोल लावीत असतात त्यांपैकी बहुतेकांचें कारण आपणच आहोंत. यांत काडीचाहि संशय नाही. मानावेंच लागेल की, भारतांतील इतर प्रांतांच्या मस्तकावर सतत होणाऱ्या अनुचित शिव्याशापांच्या वर्षावाचें कारण आपण आहोंत. तरीपण भगवंताच्या कृपेने आपल्याला ह्या वस्तुस्थितीची पूर्ण जाणीव झाली आहे. आता त्याच्याच आशीर्वादाने आपण स्वतःची मलिनता तर धुऊन काढूंच, पण त्याबरोबरच समस्त भारतालाहि सनातन धर्मातील आदर्शानुसार जीवन घडविण्यास साहाय्य करण्याचें व्रत घेऊं. मत्सर हा गुलामांचा स्वभावसिद्ध दोष होय. दुसरें कांही करण्याच्या आधी तो कलंक आपण आपल्या जीवनांतून दूर करूं या. कुणाबद्दलहि मत्सर बाळगूं नका. सत्कार्य करणाऱ्या प्रत्येकाला मदत करण्यास सदा तत्पर असां. त्रैलोक्यांतील प्रत्येक जीवाचें कल्याण होवो अशी कामना करा.

आपल्या धर्मातील त्या मूलभूत सत्याच्या पायावर आपण उभे राहूं या. हिंदु, बौद्ध आणि जैन या तिघांनाहि त्या सत्याचा सारखाच वारसा लाभलेला आहे. तें सत्य म्हणजेच हा मानवाचा आत्मा––अज, अविनाशी, सर्वव्यापी, अनंत आत्मा. त्याचा महिमा स्वयं वेदहि वर्णूं शकत नाहीत, त्याच्या महिम्यापुढे हें सूर्यचंद्रताऱ्यांचें विश्वब्रह्मांडहि कःपदार्थच ठरतें. प्रत्येक पुरुष, प्रत्येक स्त्री, नव्हे दिव्यधामवासी देवतांपासून तों तुमच्या पायांखाली चिरडल्या जाणाऱ्या क्षुद्र कीटांपर्यंत सर्व कांही हा आत्माच होय. कुठे विकसित तर कुठे अविकसित, इतकेंच. भेद प्रकाराचा नाही तर केवळ प्रमाणाचा आहे.

आत्म्याच्या ह्या अनंत शक्तीचा प्रयोग जडावर केल्यास भौतिक अभ्युदय होतो, मनावर केल्यास बौद्धिक उन्नति साधते, आणि स्वतःवरच केल्यास नराचा नारायण बनतो.

प्रथम आपण स्वतः ब्रह्मत्व प्राप्त करून घेऊं या, आणि मग इतरांना तसें करण्यास साहाय्य करूं या. 'घडा आणि घडवा' हाच आपला मूलमंत्र राहो. माणसाला पापी म्हणूं नका. त्याला सांगा की तूं ब्रह्म आहेस. सैतान म्हणून कुणी जरी असेलहि तरी आपलें कर्तव्य आहे––ब्रह्माचेंच स्मरण करणें, सैतानाचें नव्हे.

खोलींत अंधार आहे. सारखें 'अंधार' 'अंधार' म्हणून कोकलण्याने तो कधी दूर होईल काय? नाही. तो दूर होईल--दिवा आणल्यानेच. जाणून असां की, जें कांही अभावात्मक वा निषेधात्मक आहे, जें कांही विघातक वा आधीच्या आदर्शांच्या तोडाफोडीच्याच स्वरूपाचें आहे, जें कांही केवळ दोषदर्शनात्मक, नुसत्या टीकेच्याच स्वरूपाचें आहे तें कधीच्च टिकावयाचें नाही, तें नाहीसें होणारच. जें कांही भावात्मक असतें, जें कांही विधायक वा घडविणारें असतें, एखादें सत्य प्रस्थापित करण्यांतच जें तत्पर असतें त्याला नाश नसतो, तेंच कायमचें टिकत असतें. या आपण अखंड घोष करीत राहूं या की 'आम्ही सत्-स्वरूप आहोंत, ब्रह्म सत्-स्वरूप आहे, आम्हीच ब्रह्म आहोंत, शिवोऽहम् शिवोऽहम्.' हा मंत्र जपतच आपण मार्ग आक्रमूं या. जड आपलें लक्ष्य नाही, आपलें लक्ष्य चैतन्यच. ज्या ज्या म्हणून वस्तूला नाम आणि रूप आहे, ती ती त्या नामरूपहीन सत्तेच्या अधीन असते. श्रुति सांगते की हेंच सनातन सत्य होय. दिवा आणा, अंधार आपोआप नाहीसा होईल. वेदान्तकेसरी गर्जूं द्या, कोल्हे आपआपल्या बिळामधे जाऊन दडतील. चहूकडे आदर्शांचा प्रसार करून सोडा, फळ काय व्हायचें तें होईलच. भिन्नभिन्न रासायनिक द्रव्यें एकत्र आणणें आपलें काम, स्फटिक बनण्याची क्रिया आपोआपच होईल. आत्म्याची शक्ति जागी करा, समग्र भारतभर तिचा स्रोत वाहवून द्या. जें जें आवश्यक आहे तें सगळें मग आपोआप घडून येईल.

स्वतःचा अंतरस्थ ब्रह्मभाव व्यक्त करा. मग आंतबाहेर सर्वत्र सुसंवाद निर्माण होईल. कुठेच आणि कशाशींच संघर्ष उरणार नाही. वेदामधे (छांदोग्य उपनिषदांत) वर्णिलेली ती इंद्र-विरोचनाची आख्यायिका ध्यानांत असूं द्या. त्या दोघांनाहि स्वतःच्या ब्रह्मत्वाचा बोध करण्यांत आला होता. असुर विरोचनाने आपल्या शरिरालाच ब्रह्म समजून प्रस्थान केलें. अंगीं देवत्व वसत असल्याकारणें इंद्राला मात्र उमजलें की, आपला आत्मा ब्रह्म आहे हेंच गुरुदेवांच्या उपदेशाचें रहस्य होय. बंधूंनो, तुम्ही त्या इंद्राचीच संतती आहां, तुम्ही देवाचे वंशज आहांत. जड कदापि तुमचा ईश्वर होणें शक्य नाही, देह कधीहि तुमचा ईश्वर होणें शक्य नाही.

भारत पुन्हा उठेल—संदेहच नाही. पण जडाच्या शक्तीने नव्हे, चैतन्याच्या शक्तीने. ध्वंस-विनाशाचा झेंडा नाचवून नव्हे, शांति-प्रेमाची विजयपताका फडकवीत—संन्याशाच्या काषाय वस्त्राच्या साहाय्याने. धनाच्या बलाने नव्हे, भिक्षापात्राच्या शक्तीने. म्हणूं नका की आम्ही दुर्बल आहोंत. आत्मा अनंतशक्तिमान आहे. रामकृष्णांच्या दिव्य चरणस्पर्शाने जे मूठभर तरुण घडविले गेले आहेत, एकवार त्यांच्याकडे दृष्टिक्षेप करा. आसामपासून सिंधपर्यंत आणि हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत त्यांनी त्यांच्या अमृतवाणीचा प्रचार केला आहे. वीस हजार फुटांवरून बर्फाच्छादित हिमालय पायीं ओलांडून त्यांनी तिबेटाच्या रहस्यांचा भेद केला आहे. अंगावर धड कपडे नाहीत अशा अवस्थेंत दारोदार भिक्षा मागून त्यांनी दिवस काढले आहेत. किती त्रास, किती छळ त्यांना सोसावा लागला आहे. पोलिसांनी त्यांचा पाठलाग केला आहे, त्यांना कैदेंत डांबून ठेवावयासहि कमी केलेलें नाही. अखेरीस त्यांच्या निरपराधपणाची खात्री पटल्यावर सरकारने त्यांना सोडून दिलें हें अर्थातच वेगळें.

सध्या ते वीस आहेत. उद्या त्यांची संख्या दोन हजार करून सोडा. बंगाली तरुणांनो, आज तुमच्या देशाला ह्याची आवश्यकता आहे, साऱ्या जगाला ह्याची आवश्यकता आहे. स्वतःतील अंतरस्थ ब्रह्मशक्ति जागी करा. ती तुम्हांला तहानभूक, ऊन-थंडी सर्वकांही सहन करण्यास समर्थ बनवील. विलासपूर्ण घरांत बसून, सर्वतऱ्हेच्या ऐषआरामांत आणि सुखोपभोगांत मनसोक्त लोळत राहून शौकाखातर थोडाबहुत धर्महि आचरणें इतर देशांत शोभून दिसत असेल. परंतु ह्यापेक्षा कितीतरी उच्च आणि सच्चा धर्मभाव भारताच्या रक्तांत अगदी उपजतच भिनलेला आहे. आपल्या स्वभावसिद्ध धर्मप्रवृत्तीच्या साहाय्याने या बाबतींतील सोंग वा नकल भारत चटकन् ओळखूं शकतो. बंधूंनो, तुम्हांला खरेखुरे त्यागी बनलें पाहिजे. त्यागी बना, मोठे व्हा. स्वार्थ-त्यागाखेरीज कोणतेंहि महत्कार्य होणें शक्य नाही. ह्या विश्वाचें सृजन करण्यासाठी त्या आदिपुरुषाने आत्मत्याग केला होता, स्वतःची आहुति दिली होती, आपला बळी दिला होता. आपले ऐषआराम, आपले सुखोपभोग, आपली कीर्ति, आपलें यश, उच्च पद, फार काय, प्रत्यक्ष

जीवनाचा मोहहि दूर सारा. आणि सगळे मिळून मानवीघटकांचा असा एक सेतु निर्माण करा की ज्याच्यावरून हजारो लाखो लोक ह्या जीवन-समुद्राच्या पैलतीरीं जाऊन पोहोचूं शकतील.

सर्व कल्याणकारी शक्तींना एकत्र आणा. तुम्ही कोणत्या पताके-मागे चालत आहां याकडे लक्ष देऊं नका. तुमची पताका निळ्या रंगाची आहे, की हिरव्या रंगाची आहे, की पिवळ्या रंगाची आहे इकडे मुळीच लक्ष देऊं नका. या सगळ्या रंगांना एकत्रित करून तो एकच पांढरा शुभ्र रंग—प्रेमाचा उज्ज्वल, धवल रंग निर्माण करा. आपण कार्य करीत जावयाचें, फळ व्हावयाचें तें आपोआप होईल. जर एखादा सामाजिक नियम तुमच्या ब्रह्मत्वलाभाच्या आड येत असेल तर, विश्वास ठेवा की आत्म्याच्या शक्तीपुढे तो टिकाव धरूं शकणार नाही. भविष्याच्या गर्भांत काय दडून आहे हें मला दिसायला येत नाही, आणि दिसावें असा माझा आग्रहहि नाही. परंतु एक जिवंत दृश्य मात्र माझ्या दृष्टीला दिसत आहे. तें हें की, आपली ही प्राचीन भारतमाता पुनश्च जागृत झाली आहे, नवसंजीवन लाभून पूर्वीपेक्षाहि अधिक महिमाशाली होऊन आपल्या सिंहासनावर गौरवाने अधिष्ठित झाली आहे. शांतीच्या आणि आशीर्वादांच्या शब्दांनी समस्त वसुधातलावर तिच्या शुभनामाचा जयघोष करा.

प्रेमाने आणि कर्माने तुमच्याशीं बांधलेला,<br>
सदैव तुमचाच—<br>
विवेकानंद

---

# वेदान्त आणि जीवन

## व्याख्यान पहिलें

( लंडन, १० नोव्हेंबर १८९६ )

वेदान्ताचें तत्त्वज्ञान व्यवहारांत कितपत कामीं पडूं शकेल, आपल्या दैनंदिन जीवनांत त्याचा कितपत उपयोग होऊं शकेल यासंबंधी मीं कांही बोलावें अशी पुष्कळांनी इच्छा दर्शविली आहे. मीं मागेच तुम्हांला सांगितल्याप्रमाणे, तत्त्व खूप चांगलें आहे खरें, पण प्रश्न आहे की तें प्रत्यक्ष आचरणांत कसें आणायचें? जीवनांत कसें उतरवावयाचें? कारण, आचरणांत आणणें अगदी असंभवच असेल तर कोणत्याहि तत्त्वाला, एक बौद्धिक कसरत यापरीस आणखी कांहीच मूल्य नाही. वेदान्त हा धर्म आहे. आणि त्या दृष्टीने तो सर्वतोपरीं आचरणांत आणण्याजोगा असावयासच हवा. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत तो आचरतां येणें आपल्याला शक्य झालें पाहिजे. इतकेंच नव्हे, तर, आध्यात्मिक जीवन आणि जागतिक जीवन असा जो एक काल्पनिक भेद मानण्यांत येत असतो, तोहि नाहीसा व्हावयास हवा. कारण वेदान्त आपल्याला एकत्व शिकवितो--सत्य इथूनतिथवर एकच आहे अशी वेदान्ताची शिकवण आहे. धार्मिक आदर्शांनी आपलें पुरें जीवन व्यापून टाकावयास हवें. आमच्या सर्व विचारांत शिरून ते आमच्या वागणुकींत अधिकाधिक उतरावयास हवेत. वेदान्त जीवनांत कसा उतरवावयाचा याविषयी मी यथावकाश ऊहापोह करीनच. परंतु हीं व्याख्यानें पुढील व्याख्यानांची भूमिका म्हणून द्यावयाची योजना असल्याकारणें, आधी वेदान्ताच्या अमळ तात्त्विक बाजूची चर्चा करणें अनाठायीं होणार नाही. निबिड अरण्यांत व गिरिकंदरांत जन्मलेलीं हीं गहन तत्त्वें गजबजत्या नगरनगरींच्या कोलाहलमय जीवनांत कशीं मूर्त स्वरूपास आणलीं गेलीं हें आपण समजून घ्यावयास हवें. ह्या वैदान्तिक तत्त्वांचें एक वैशिष्टय आपल्याला आढळून येईल की, त्यांतील कितीतरी सिद्धान्त अरण्यवासांत जन्मलेले नसून, ज्यांचीं जीवनें सर्वांत जास्त गडबडीचीं आणि धकाधकीचीं असणें स्वाभाविक होय अशा सिंहासनाधिष्ठित सम्राटांनी जगाला त्यांचें दान दिलेलें आहे.

श्वेतकेतु हा आरुणि ऋषींचा पुत्र. हे आरुणि ऋषि बहुधा वानप्रस्थाश्रमी असावेत. श्वेतकेतु वनांतच वाढला. एकदा तो पांचालांच्या देशांत जाऊन प्रवाहण जैवलि नामक तेथील राजाच्या दरबारांत उपस्थित झाला. राजाने श्वेतकेतूला विचारलें, "श्वेतकेतो, मरणकालीं जीव हा लोक कसा सोडतात हें तुला अवगत आहे काय ?" श्वेतकेतूने उत्तर दिलें—"नाही, महाराज." "ते फिरून या लोकीं कसे येतात हें तुला माहीत आहे काय ?" "नाही, महाराज." "तुला देवयान आणि पितृयान मार्ग ठाऊक आहेत ?" "नाही, महाराज." राजा प्रवाहणाने ऋषिकुमार श्वेतकेतूला असेच आणखीहि कांही प्रश्न विचारले. श्वेतकेतु त्यांचीं उत्तरें देऊं शकला नाही. त्यावर "तूं तर कांहीच जाणत नाहीस" असें प्रवाहणाने त्याला म्हटलें. बालक श्वेतकेतु आपल्या पित्याकडे परत आला आणि त्याला त्याने सर्व वृत्तान्त सांगितला. तें सर्व ऐकून पिता त्याला म्हणाला, "बाळ, मला स्वतःला देखील या प्रश्नांचीं उत्तरें माहीत नाहीत. एरवी मीं तुला हें सारें शिकविलें नसतें काय ? खरोखरच मलाहि ह्या प्रश्नांचीं उत्तरें अवगत नाहीत." मग श्वेतकेतु आपल्या पित्याला बरोबर घेऊन फिरून प्रवाहण राजाकडे गेला आणि त्या रहस्यांचा उलगडा करण्याची दोघांनीहि राजाला विनंती केली. राजाने त्यांना सांगितलें की हीं रहस्यें आजवर केवळ राजांनाच ज्ञात होतीं, ब्राह्मणांना तीं केव्हाच अवगत नव्हतीं. तरीपण त्या पिता-पुत्रांच्या इच्छेला मान देऊन राजाने त्यांना तद्विषयक ज्ञान दिलें.* ह्या एकाच नव्हे, तर, इतरहि कित्येक उपनिषदांतील कथांवरून आढळून येईल की, हें वेदान्तदर्शन कांही केवळ अरण्यांतील ध्यानाचेंच फळ नव्हे. तर, त्यांतील पुष्कळशा उत्कृष्ट भागाचें श्रेय जीवनाच्या दैनंदिन घडामोडींत व्यग्र असलेल्या व्यक्तींकडे जातें. लक्षावधि प्रजाजनांवर राज्य करणाऱ्या सर्वसत्ताधारी सम्राटांपेक्षा अधिक कार्यमग्न व्यक्ति कोणती असूं शकेल ? आणि तरीसुद्धा अशा राज्यकर्त्यांपैकी कित्येकजण सखोल चिंतनशील होते.

ह्या साऱ्यावरून एक गोष्ट अगदी स्पष्ट आहे की, हें वेदान्तदर्शन पूर्णपणें व्यवहार्य आहे, त्याच्या आसऱ्याने जीवन जगणें व घडविणें

* बृहदारण्यक उपनिषत्. ६, २.

शक्य आहे, अगदी शक्य आहे, तुमच्यापैकी पुष्कळांनी भगवद्गीता वाचली असेल. उपनिषदानंतरच्या काळांतील तो एक महान् ग्रंथ होय. ह्या गीतेला वेदान्त तत्त्वज्ञानावरील सर्वोत्कृष्ट भाष्य म्हणतां येईल. विस्मयाची गोष्ट म्हणजे प्रत्यक्ष रणक्षेत्रावर ती उपदेशिली गेली आहे. कुरुक्षेत्राच्या रणभूमीवर ऐन रणकंदनास तोंड लागतेवेळीं भगवान् श्रीकृष्णांनी गीतेचें तत्त्वज्ञान अर्जुनाला सांगितलें आहे. गीतेच्या पानां-पानांतून कोणतें एकच तत्त्व, कोणता एकच संदेश अगदी ठसठशीतपणें मनावर बिंबत असेल तर तो म्हणजे प्रबल कर्मशीलतेचा. परंतु या गीतोक्त कर्मशीलतेचें एक वैशिष्टच आहे. तें हें की, त्या प्रबल कर्म-शीलतेच्या अंतर्यामीं एक विराट, अनंत शांति विराजमान आहे. प्रचंड कर्मशीलता, आणि तिच्याच अंतरंगीं विशाल शांतभाव--हेंच कर्माचें रहस्य होय. ह्या असल्या अवस्थेचा लाभ करून घेणें हेंच वेदान्ताचें लक्ष्य होय. 'अकर्म' म्हणतांच साधारणपणें निष्क्रियता असा अर्थ करण्यांत येतो. ह्या अर्थानें 'अकर्म' आपलें लक्ष्य असणें कधीच शक्य नाही. एरवी, आपल्या भोवतालच्या ह्या भिंतीहि मग परम ज्ञानी ठरावयाच्या. कारण त्या तर अगदीच निष्क्रिय आहेत. मातीचीं ढेकळें, लाकडाचे ओंडके वगैरेहि मग सर्वश्रेष्ठ साधु ठरतील. कारण त्यांच्याइतके निष्क्रिय आणखी कोण असेल ?

सारांश, असली निष्क्रियता आपलें लक्ष्य होणें शक्य नाही. पण त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे की त्या तसल्या निष्क्रियतेलाच वासनांची जोड दिल्यानेहि ती 'कर्मशीलता' ठरूं शकणार नाही. वासना संचारल्याने निर्माण होणारी कर्मशीलता खरी कर्मशीलता नव्हे. वेदान्ताचें लक्ष्य असलेली खरी कर्मशीलता ही नेहमी चिरशांतीने, अखंड स्थिरत्वाने युक्त असते. ती शांति, तें स्थिरत्व कशानेहि चळत नाही, चित्ताचें तें समत्व कांहीहि घडलें तरी ढळत नाही. आणि, आपल्या आयुष्यांतील अनुभवहि हेंच सांगतो की, हातून काम होण्या-साठी ही असली मनःस्थिति अत्यंत आवश्यक आहे.

साधारणतः माणूस ज्या आवेश-अभिनिवेशाने वा नशेने काम करीत असतो, तसला आवेश-अभिनिवेश वा तसली नशा आपल्याठायीं असल्याखेरीज आपण कर्म कसें करूं शकूं, असें मला अनेकांनी अनेकदा

विचारलें आहे. आधी आधी मलाहि तसेंच वाटे. पण जसजसा मी मोठा होत आहें, दिवसानुदिवस जसजसा माझा अनुभव वाढत आहे, तसतसें मला कळून येत आहे की वस्तुस्थिति तशी नाही, माझें तें वाटणें बरोबर नव्हतें. वासना-कामनांचा आवेग जितका कमी, तितकें आपण काम अधिक चांगलें करूं शकूं. जितकें आपण शांत असूं शकूं तितकें चागलें— आपल्या स्वत:च्या पक्षीं आणि कामाच्या पक्षींहि. शांत राहण्यांत आपलें भलें तर आहेच, पण शिवाय शांत राहिल्याने आपण कामहि अधिक करूं शकूं. भावनांच्या आहारीं गेल्याने फार मोठ्या प्रमाणांत शक्तीचा निरर्थक अपव्यय होतो. मज्जातंतूंवर भलताच ताण पडून ते विदीर्ण होतात व मन क्षुब्ध, चंचल होऊन जातें. आणि या साऱ्यामुळे हातून कामहि फार थोडेंच होतें. जी शक्ति कर्माच्या रूपाने बाहेर यायची, ती नुसत्या आवेग—आवेशांतच खर्ची पडून फुकट वाया दवडली जाते. मन जेव्हा अगदी शांत नि स्थिर असतें तेव्हाच त्याची सगळी शक्ति चांगल्या कामीं खर्ची पडत असते. जगांतील मोठमोठ्या कर्मवीरांचीं चरित्रें वाचलींत तर आढळून येईल की ते सारे पराकाष्ठेचे शांत, धीर-स्थिर लोक होते. कशानेहि त्यांचा तोल सुटत नसे. म्हणूनच, जो माणूस सहजासहजीं रागावतो-गागावतो त्याच्याकडून विशेष काम होऊं शकत नाही. उलट, जो कशानेहि रागावत नाही तो कितीतरी काम सहज उरकतो. जो मनुष्य क्रोध, तिरस्कार किंवा असल्याच एखाद्या विकाराला वश होतो त्याच्या हातून काम फारसें होत नाही. असा माणूस स्वत:च स्वत:ची मोडतोड करून घेतो, प्रत्यक्ष काम असें कांही पार पाडूं शकत नाही. शांत, क्षमाशील, धीर-स्थिर, समतोल व्यक्तिच कामाचे ढीग घालूं शकते.

वेदान्त आमच्या डोळ्यांसमोर आदर्श धरीत असतो. आणि आदर्श हा वास्तवाच्या, किंवा आपण ज्याला 'व्यवहार' म्हणतों त्याच्या बराच वर असतो हें निराळें सांगावयास नकोच. मनुष्यस्वभावांत दोन प्रवृत्ति आढळून येतात. पहिली म्हणजे आदर्शच अवनत करून स्वत:च्या जीवनाच्या बेताचा करून घेणें, आणि दुसरी म्हणजे आपलें जीवनच उन्नत करून त्याला आदर्शाचा घाट देणें. आपल्या जीवनानुसार आदर्श बनविणें ही पहिली प्रवृत्ति, आणि आदर्शानुसार

आपलें जीवन घडविणें ही दुसरी प्रवृत्ति. ह्या दोन प्रवृत्तींमधला फरक जाणून घेणें फार महत्त्वाचें आहे. कारण, त्यांतील पहिल्या प्रवृत्तीला बळी पडण्याचा मोह आयुष्यामधे आपल्याला वरचेवर पडत असतो. समजा की कांही एका विशिष्ट प्रकारचें काम करणेंच मला जमतें; त्या कामाचा कदाचित् पुष्कळसा भाग वाईट असेल, अधिकांशीं क्रोध, लोभ, आपमतलबीपणा किंवा अशाच एखाद्या मनोविकारानें प्रेरित होऊनच कदाचित् मी तें करीत असेन. अशा परिस्थितींत समजा की कुणी येऊन मला एका अशा आदर्शाचा उपदेश करीत आहे की जो अमलांत आणण्यासाठी पहिल्याप्रथम म्हणजे मला माझा आपमतलबीपणा, माझें स्वार्थसुख सोडावें लागणार आहे. काय करीन मी ? त्याचा तो आदर्श अव्यवहार्य आहे, तो आचरणांत आणणें असंभव आहे असें म्हणून तो धुडकावून मोकळा होईन. पण तेंच जर कुणी दुसरा एखादा मला अशा एखाद्या आदर्शाचा उपदेश देऊं लागेल की ज्या आदर्शाचा माझ्या आपमतलबीपणाशीं मेळ बसूं शकतो, तर मात्र मला अगदी आनंदाच्या उकळ्या फुटतील. 'आदर्श असावा तर असा असावा' असें ठाम मत देऊन तो अमलांत आणण्यासाठी मी उतावीळ होऊन जाईन. 'शास्त्रोक्त' शब्दाचा जसा प्रत्येकजण स्वतःला सोईस्कर असा अर्थ करीत असतो तसेंच 'व्यवहार्यते'चेंहि आहे. "मी म्हणतों तें शास्त्रोक्त आणि तूं म्हणतोस तें पाखंड" हा जसा 'शास्त्रोक्त'च्या बाबतींत, तसाच 'व्यवहार्यते'च्या बाबतींतहि "जें मला व्यवहार्य वाटतें, तेवढेंच काय तें साऱ्या दुनियेंत व्यवहार्य होय" असा आपला खाक्या असतो. मी जर दुकानदार असेन तर दुकानदारीच माझ्या मतें दुनियेंतील एकच एक व्यवहार्य व्यवसाय ठरणार. चोराला चोरीइतकें व्यवहार्य आणखी दुसरें कांहीच वाटत नसणार. त्याच्या गणतींत बाकी सगळेंच अव्यवहार्य होय. याप्रमाणे जी गोष्ट आपल्याला आवडते आणि जी आपण करूं शकतों तीच केवळ व्यवहार्य, असें आपण धरून चलत असतों. म्हणून एक गोष्ट मी तुमच्या मनावर बिंबवूं इच्छितों की, वेदान्त हा पुरेपूर व्यवहार्य असला तरी तो या असल्या सर्वसाधारण अर्थानें नव्हे. वेदान्त व्यवहार्य आहे--ध्येय या अर्थानें, आदर्श या अर्थानें. वेदान्ताचा आदर्श कितीहि उच्च असला तरी तो अव्यवहार्य मात्र नाही. वेदान्त आमच्या-

पुढे एखादा अव्यवहार्य आदर्श ठेवीत नाही. आणि, त्याचबरोबर, शंभर टक्के व्यवहार्य असूनहि वेदान्ताचा आदर्श हा 'आदर्श' होण्याइतका उच्चहि खासच आहे. एका वाक्यांत हा वेदान्ताचा आदर्श सांगावयाचा म्हणजे 'तुम्ही स्वरूपतः ब्रह्म आहांत' — '**तत् त्वम् असि.**' 'तुम्ही ब्रह्म आहांत' हेंच वेदान्ताचें सार होय. वेदान्ताच्या समस्त पूर्वपक्ष-उत्तरपक्षांनंतर, समग्र तर्कविचारानंतर, अखेर हेंच प्रतिपादलेलें तुम्हांला आढळून येईल की मानव स्वभावतः शुद्ध नि सर्वज्ञ आहे. आत्म्याच्या बाबतींत जन्म वा मरण इत्यादि शब्द वापरणें म्हणजे शुद्ध वेडेपणा होय. आत्मा कधी जन्मत नाही, कधी मरतहि नाही. मी मरणार आहें, मला मरणाची भीति वाटते वगैरे कल्पना केवळ वेडगळ समजुती होत. मी अमुक करूं शकेन, मी तमुक करूं शकणार नाहीं वगैरे धारणाहि तसल्याच वेडगळ समजुती होत. आपण सर्वकांही करूं शकूं. वेदान्त माणसाला प्रथम स्वतःवर विश्वास ठेवायला शिकवितो. जगांतील कांही धर्मांच्या मतें स्वतःहून भिन्न अशा सगुण ईश्वरावर विश्वास न ठेवणारे लोक नास्तिक होत. वेदान्ताच्या मतें नास्तिक तो की ज्याचा स्वतःवर विश्वास नाही. स्वतःच्या आत्म्याच्या महिम्यावर विश्वास न ठेवण्यालाच वेदान्त नास्तिकता म्हणतो. पुष्कळांना ही कल्पना अर्थातच फार भयंकर वाटते. आणि आपल्यापैकी बहुतांश लोकांची अशी धारणा असते की हा आदर्श प्रत्यक्षांत येणें, खरोखरच आत्मसात् होणें कधीहि शक्य नाही. परंतु वेदान्ताचें अगदी ठाम सांगणें आहे की ह्या सत्याचा प्रत्येकालाच स्वतःच्या जीवनांत प्रत्यक्ष अनुभव येणें नितान्त शक्य आहे. ह्या आत्मसाक्षात्काराच्या लाभांत तुमचें स्त्रीत्व, तुमचें पुरुषत्व, तुमचें वय, तुमची जात, तुमचा वर्ण, कांहीहि तुम्हांला अडथळा करूं शकणार नाही, तुमचा मार्ग रोधूं शकणार नाही. आबाल-वृद्धवनिता सर्वच जण ह्या सत्याची—आत्म्याची—उपलब्धि करून घेऊं शकतील. कारण, वेदान्त घोषणा करतो की हा आत्मा मुळी आधीचाच उपलब्ध आहे, सर्वांठायी तो आधीचाच विद्यमान आहे, सर्वजण स्व-रूपतः आत्माच आहेत.

विश्वब्रह्माण्डांतील समस्त शक्ति आधीच्याच आमच्या आहेत. स्वतःच स्वतःच्या हातांनी डोळे झाकून घेऊन आम्ही अंधार अंधार

म्हणून ओरडत आहोंत. हात दूर करा, दिसेल की उजेड आधीचाच आहे, अंधार कधी नव्हताच. अंधार कधीच नव्हता, दुर्बलता कधीच नव्हती. आपण मूर्ख, म्हणूनच ओरडत आहोंत की आम्ही दुर्बल. आपण मूर्ख, म्हणूनच ओरडत आहोंत की आम्ही अपवित्र. याप्रमाणे हा आदर्श आपल्या जीवनांत उतरविणें शक्य आहे एवढेंच ठासून सांगून वेदान्त थांबत नाही, तर वेदान्त आणखी असेंहि ठासून म्हणतो की, तो आधीचाच आपल्याला उपलब्ध आहे,—आज ज्याला आपण 'आदर्श' म्हणत आहोंत, जो वस्तुतः एकमेव सत्य होय, तो आत्माच खरोखर आपलें खरेखुरें स्व-रूप आहे. त्याखेरीज बाकी जें कांही प्रत्ययास येत आहे तें सारें खोटें आहे, असत्य आहे. 'मी एक क्षुद्र, मर्त्य जीव आहे' असें जेव्हा आपण म्हणतों तेव्हा आपण खरें नाही तें बोलत असतों, स्वतःलाच फसवीत असतों, आपण वाईट, दुबळे, करंटे आहोंत अशी स्वतःच स्वतःला भुरळ पाडीत असतों.

वेदान्त म्हणतो, जगांत पाप म्हणून कांहीच नाही. आहे केवळ चूक--अज्ञान. आणि वेदान्ताच्या मतें सर्वांत मोठी चूक जर कोणती असेल तर ती म्हणजे स्वतःला दुबळे, पापी, हीन-दीन मानणें; आपल्यांत कांही शक्ति नाही, आपण हें करूं शकणार नाहीं, तें करूं शकणार नाहीं असें समजणें. जेव्हा जेव्हा असल्या विचारांना आपण थारा देतों तेव्हा तेव्हा आपण आपलें बंधन अधिकाधिक पक्कें करीत असतों, स्वतःचा संमोह अधिकाधिक वाढवीत असतों. म्हणून, जो कुणी स्वतःला दुबळा लेखीत असतो, जो कुणी स्वतःला अपवित्र लेखीत असतो तो चूक करीत असतो, तो जगांत एका अनिष्ट विचाराची भर घालीत असतो. आपण हें कदापि विसरतां कामां नये की आपल्या आजच्या जीवनाचा, आपल्या ह्या मायामय, भ्रान्त जीवनाचा, आपण जगत असलेल्या ह्या खोटया जीवनाचा आदर्शाशीं मेळ घालण्याचा वेडा प्रयत्न वेदान्त मुळीच करीत नाही. वेदान्त आपल्याला बजावून सांगतो की तुम्ही आपलें हें खोटें जीवन झिडकाराल तरच त्याच्या पश्चातीं सदा विद्यमान असलेलें तें चिरंतन, खरें जीवन प्रकट होईल, आपोआप प्रकाश पावेल. माणूस आधी थोडा पवित्र असतो आणि मग हळूहळू जास्तजास्त पवित्र होत जातो अशांतला भाग नाही. वस्तुस्थिति अशी आहे की

माणूस आधीचाच पूर्ण शुद्ध आहे. त्याचें तें नित्य पूर्णशुद्ध स्वरूप थोडेंथोडें व्यक्त होत असतें, इतकेंच. आवरण जसजसें हळूहळू सरत जातें तसतशी आत्म्याची स्वभावसिद्ध पवित्रता अधिकाधिक प्रकट होऊं लागते. अनंत पवित्रता, मुक्तस्वभाव, प्रेम, ऐश्वर्य हीं आधीचींच आपलीं आहेत.

वेदान्ताचें आपल्याला आणखीहि असें सांगणें आहे की हें सारें केवळ वनांत किंवा गिरिगुहेंतच उपलब्ध करून घेतां येणें शक्य आहे असें नव्हे. जीवनांतल्या कोणत्याहि अवस्थेंत माणूस तें उपलब्ध करून घेऊं शकतो. आपण मघाच पाहिल्याप्रमाणे, ज्यांनी हीं सत्यें शोधून काढलीं ते सगळे अरण्यांत वा गिरिकंदरांतच राहत असत किंवा तुमच्या-आमच्यासारखें क्षुल्लक, धोपट जीवन जगत असत असें नाही. तीं अत्यंत कामाचीं माणसें होतीं हें आपल्याला मानावेंच लागेल. कारण, त्यांच्या-पैकी कुणी रणकुशल सेनानी होते तर कुणी सिंहासनाधिष्ठित सम्राट होते. कुणाला मोठमोठीं सैन्यें हाताळावीं लागत तर कुणाला लक्षावधि प्रजा सांभाळावी लागे. आणि हें सारें त्या ऐन राजशाहीच्या काळांत. आजकालच्याप्रमाणे त्या काळचे राजे निव्वळ शोभेसाठीचे नव्हते. आणि तरीहि त्यांनादेखील ह्या मूलभूत जीवनसत्यांचें चिंतन करण्या-साठी, त्यांचा प्रत्यक्ष अनुभव घेण्यासाठी, तीं जीवनांत बाणविण्यासाठी, आणि जगाला त्यांचा उपदेश देण्यासाठी वेळ सापडत असे. मग, त्यांच्या तुलनेने ज्यांचीं जीवनें म्हणजे नुसती फुरसतच आहेत अशा आपल्याला हीं सारीं तत्त्वें जीवनांत आणणें किती बरें सोपें जावें ? आपल्याला काम तें किती ? त्या लोकांपेक्षा सवड किती जास्त. तरीहि आपण तीं तत्त्वें उपलब्ध करून घेऊं शकत नाहीं यापरीस शरमेची गोष्ट ती कोणती ? पूर्वीच्या एखाद्या सर्वसत्ताधारी सम्राटाच्या मानाने तुमच्याआमच्या गरजा म्हणजे काय ? कुरुक्षेत्राच्या रणमैदाना-वर कित्येक अक्षौहिणी सेनेचें नायकत्व पत्करणाऱ्या अर्जुनाच्या मानाने माझ्या गरजा, माझीं कर्तव्यें म्हणजे कोणत्या झाडाचा पाला ? आणि तरीसुद्धा, त्या भीषण रणधुमाळींतहि अर्जुनाला वेदान्ताचें हें सर्वश्रेष्ठ, गहनगंभीर तत्त्वज्ञान ऐकणें आणि आचरणांत आणणें जमूं शकलें. त्याला प्रत्यक्ष रणांगणावरील त्या भयंकर धुमश्चक्रींतहि या साऱ्यासाठी वेळ मिळूं शकला. मग त्या मानाने कितीतरी साध्या, सोप्या आणि खुशाल-

चंद जीवनांत निदान अर्जुनाइतपत तरी जमणें आपल्याला अशक्यच असावें काय? आपण समजतों त्यापेक्षा कितीतरी अधिक सवड आपल्याला आहे असें आपल्यापैकी बहुतेकांना आढळून येईल. प्रश्न वेळेचा नसतो. प्रश्न असतो वेळेचा सदुपयोग करण्याच्या इच्छेचा. खरोखरच इच्छा असेल तर आपल्याला जी सवड आहे तींत एकच काय, पण असले पंचवीस आदर्श आपण याच जीवनामधे प्रत्यक्षांत आणूं शकूं. इच्छा मात्र हवी. पण कांही झालें तरी आपण आदर्शाला खाली खेचणें मात्र उचित नाही. परंतु होतें काय की, कांही व्यक्ति आपल्याला अशा भेटतात की ज्या आमच्या चुकांना गोंडस नांवें देऊन त्यांचें समर्थन करतात, आणि आपल्या साऱ्या मूर्खपणाच्या इच्छांची नि वासनांची तरफदारी कशी करावी हें शिकवून आम्हांला चिथवून देतात. आणि या साऱ्याने मोह पडून आम्हीहि मानूं लागतों की हें म्हणतात तोच खरा आदर्श आहे, यापेक्षा अन्य आणखी कोणताहि आदर्श असणें शक्य नाही, हाच आपण आपल्यापुढे ठेवावयास हवा. परंतु हें बरोबर नाही. वेदान्ताचा याला संपूर्ण विरोध आहे, वेदान्ताची शिकवणूक अशी मुळीच नाही. जें 'आहे' त्याचा जें 'असावें' त्याच्याशीं मेळ घालावयास हवा, वास्तवाचा आदर्शाशीं मेळ घालावयास हवा. आपलें आजचें जीवन बदलून, उन्नत करून त्या अनंत जीवनाशीं जुळतें करावयास हवें. वर्तमान वा वास्तव जीवन त्या आदर्श जीवनाशीं समरूप, एकरूप करावयास हवें.

कारण आपण हें नेहमीं लक्षांत ठेवावयास हवें की एकत्व किंवा अखंडितताच वेदान्ताचा मूलमंत्र होय, वेदान्ताच्या शिकवणींचा गाभा होय. दोन कशांतहि आणि कुठेहि नाहीत. दोन जीवनें नाहीत, किंवा या लोकांतील एक आणि परलोकांतील एक असे जीवनाचे दोन प्रकारहि नाहीत. स्वर्गादि लोकांचें वर्णन वेदांमधे प्रथमप्रथम येतें खरें. परंतु पुढे, वेद ज्या वेळीं आपल्या सर्वोच्च आदर्शांविषयी बोलूं लागतात, त्या वेळीं स्वर्गादि सारें बाजूस सारलें जातें. जीवन एकच आहे, लोक एकच आहे, एकच एक सत्ता आहे. सर्वकांही तें एकच आहे -- '**सर्वं खलु इदं ब्रह्म.**' भेद जो दिसतो तो केवळ प्रमाणाचा, प्रकाराचा नव्हे---मूल सत्तेच्या केवळ कमीअधिक अभिव्यक्तीचा, मूल

सत्तेचा नव्हे. भिन्नभिन्न जीवनांमधील भेद केवळ त्या मूल सत्तेच्या अभिव्यक्तीच्या प्रमाणाचा असतो. कुठे तिचा कमी प्रकाश, कुठे जास्त. पण सर्वत्र प्रकाशत मात्र आहे ती मूल एकच सत्ता. फरक फक्त अभिव्यक्तींत असतो, मूल वस्तूंत नव्हे. पशुपक्षी मनुष्याहून संपूर्ण वेगळे असून, परमेश्वराने त्यांची उपज-निपज केवळ मनुष्याच्या खाण्याकरताच केली आहे असल्या कल्पनांचा वेदान्त स्पष्टपणें धिक्कार करतो.

कांही लोकांनी भूतदयेने प्रेरित होऊन, शास्त्रीय संशोधनासाठी होत असलेली जिवंत प्राण्यांची चिरफाड बंद करावी या उद्देशाने एक 'प्राणीविच्छेदन-निवारण संस्था' (Anti-vivisection Society) काढली. त्या संस्थेच्या एका सभासदाला मीं एकदा विचारलें की मित्रा, खाण्याकरता जनावरें मारणें जर तुम्हांला न्याय्य वाटतें तर मग शास्त्रीय प्रयोगांकरता चारदोन प्राणी मारण्यालाच तुमचा इतका विरोध कां? त्या सद्गृहस्थाने त्यावर मला उत्तर दिलें, "जिवंत जिवांची चिरफाड करणें फार भयंकर कृत्य आहे. आता खाण्यासाठी होणाऱ्या हत्येविषयी म्हणाल तर परमेश्वराने माणसाच्या खाण्यासाठीच पशुपक्षी निर्माण केले आहेत असें आमचें मत आहे." काय म्हणावें याला? एकत्व म्हणजे त्यांत सगळेच आले-- पशुपक्षी, जनावरें सुद्धा. तींहि त्या एकाच अखंड सत्तेचे अंग होत. जर मानवाचें जीवन अनंत असेल तर पशूंचेंहि तसेंच आहे. दोहोंतील फरक फक्त अभिव्यक्तीचा आहे. मूल वस्तूचा नाही. जें मी आहें, तेंच एक क्षुद्र जीवाणूहि आहे. फरक फक्त अभिव्यक्तीचा. त्या मूल, सर्वोच्च, अंतिम सत्तेकडून बघितल्यास हे सारे फरक अंतर्धान पावतात. जमिनीवरच्या माणसाला गवत आणि लहानसें झाड यांत केवढातरी फरक दिसतो. पण तोच जर खूप वर उंचीवर गेला तर मोठ्यांत मोठें झाड आणि गवत दोन्ही त्याला सारखींच दिसतील. तद्वतच, त्या अंतिम सत्तेकडून बघितल्यास एखादा तुच्छांतला तुच्छ प्राणी आणि श्रेष्ठांतला श्रेष्ठ मनुष्य दोन्ही समान होत. आणि तुमचा जर ईश्वरावर विश्वास असेल तर सर्वांत कनिष्ठ आणि सर्वश्रेष्ठ सगळेच जीव तुमच्या लेखीं समान असावयास हवेत. एरवी तुमचा ईश्वर घोर पक्षपाती ठरेल. आपणच निर्माण केलेल्या जीवांपैकी फक्त मानवांच्या बाबतींत जो इतका पक्षपाती आहे आणि

इतर जनावरांच्या बाबतींत मात्र इतका निर्दय आहे तो ईश्वर भगवान की सैतान ? नव्हे, सैतानापेक्षाहि तो निपटारा म्हणावयाचा. अशा ईश्वराची आराधना करण्याऐवजी मी तर शंभरदा मरण पत्करीन. उभा जन्म मी असल्या ईश्वराशीं दोन हात करण्यांत घालवीन. पण वस्तुस्थिति अशी नाही. श्रेष्ठ-कनिष्ठ प्राण्यांत वस्तुतः फरक नाही. आहे असें जे म्हणतात ते लोक बेजबाबदार, हृदयहीन होत. आपण काय बडबडतों आहोंत याची त्यांना कल्पना नसते. 'व्यवहार्य' शब्द चुकीच्या अर्थानें कसा वापरला जातो याचें हें एक उदाहरण आहे. समजा कीं कुणी एकजण अगदी कट्टर शाकाहारी नाही. पण म्हणून त्यानें आदर्शाला आदर्श म्हणूं नये असें मात्र नव्हे. जेव्हाजेव्हा तो मांस खाईल, तेव्हातेव्हा त्यानें जाणून असावयास हवें की आपण चूक करीत आहों. मांस खाणें भागच पडावें अशी परिस्थिति आली असेल तेव्हाहि तें निर्दयपणाचें आहे हें त्यानें समजून असावयास हवें. त्यानें आदर्शाला खाली ओढून आपल्या कमकुवतपणाचें समर्थन करण्याचा प्रयत्न करणें कदापि योग्य नव्हे. आदर्श आहे—मांस न खाणें, कोणत्याहि प्राण्याला दुःख न देणें. कारण सर्व प्राणी आपले भाऊ आहेत. तुम्ही जर जनावरांना याप्रमाणे स्वतःचे भाऊ मानूं शकाल तरच सर्व जीवांविषयी बंधुभाव तुमच्यांत थोडाफार उतरला आहे असें म्हणतां येईल. केवळ मनुष्यजातीविषयी बंधुभावाचा घोष करून हें व्हावयाचें नाही. तो तर पोरखेळ झाला. तुम्हांला बहुधा असें आढळून येईल की हा उपदेश पुष्कळांना रुचत नाही, कारण तदनुसार वागावयाचें म्हणजे त्यांना वास्तवाचा—जें 'आहे' त्याचा—त्याग करून, जीवन उन्नत बनवून आदर्शाकडे जावें लागणार. पण तेंच, त्यांच्या आजच्या वागणुकीशीं जुळेल असा एखादा सिद्धान्त तुम्ही त्यांना सांगा, 'सोळा आणे व्यवहार्य' म्हणून ते हर्षभरानें त्याचें स्वागत करतील.

आहे त्यालाच कवटाळून बसणें, तें सोडूं न इच्छिणें ही मानवी स्वभावांतील एक अत्यंत प्रबळ प्रवृत्ति आहे. एक पाऊलदेखील पुढे जाणें आपल्या जिवावर येतें. कुठेसें वाचलें होतें,—बर्फांत गोठणाऱ्या लोकांविषयी. मनुष्यजातीच्या या स्वभावाचा विचार करतांना त्या लोकांची मला आठवण होते. असें म्हणतात की बर्फांत गोठत असलेले

हे लोक झोपूं इच्छितात. त्यांना तुम्ही ओढून उठविण्याचा प्रयत्न केला तर ते म्हणूं लागतात–"अंहं, उठवूं नका, मला झोपूं द्या. बर्फांत झोपणें किती मजेदार असतें, किती छान झोप येत आहे." आणि हळूहळू त्यांना त्या बर्फांत कायमचीच झोप लागते. आपलाहि स्वभाव असाच आहे. सारा जन्म आपण असेंच वागत असतों—पायांपासून डोक्या-पर्यंत हळूहळू गोठत असतों, आणि तरी झोपूं इच्छितों. असो तर, आपण नेहमी आदर्शाकडे जाण्याची धडपड करावयास हवी. आदर्श तुमच्या पातळीवर ओढून आणणारा, सर्वोच्च आदर्शाला बगल देईल असा धर्म शिकविणारा कुणी जर तुम्हांला भेटला तर त्याच्या बडबड-ण्याकडे लक्ष देऊं नका. माझ्या मतें खराखरा अव्यवहार्य धर्म तर तोच–– हे असले लोक शिकवितात तो. सर्वोच्च आदर्श आमच्यापुढे ठेवणारा धर्म जर कुणी शिकवील तर मी त्याच्या मागे जायला एका पायावर तयार आहें. इंद्रियांच्या चोचल्यांचें, इंद्रियांच्या दुर्बलतेचें समर्थन करण्याचा जर कोणी यत्न करीत असेल तर त्या इसमापासून सावध राहा. आपण इंद्रियांचे गुलाम बनून आधीच तर स्वतःला कःपदार्थ बनवून टाकलें आहे. त्यांत जर या असल्या उपदेशाप्रमाणे आपण वागूं लागलों तर या जन्मींच काय पण जन्मजन्मांतरींहि आपली कांही प्रगति होण्याची आशा नाही. मीं हे असले प्रकार अनेक पाहिले आहेत. मीं थोडेंबहुत जग बघितलें आहे. माझ्या देशांत नवीन नवीन धर्मसंप्रदाय सारखे जन्मास येत असतात. प्रत्येक वर्षी कित्येक नव्या संप्रदायांची त्यांत भर पडत असते. त्या साऱ्यांचें नीट अवलोकन करून एक गोष्ट माझ्या मनावर ठसली आहे. ती ही की, जे संप्रदाय भोग आणि भगवान यांची सांगड घालण्याचा, त्या दोघांचा मेळ बसविण्याचा प्रयत्न कधीच करीत नाहीत, त्यांचीच उन्नति होत असते. आणि ज्या ज्या संप्रदायांत भंगुर, तुच्छ शरीरभोगांचा उच्चतम आदर्शांशीं मेळ घालण्याचा भ्रान्त प्रयत्न केला जातो, ज्या ज्या संप्रदायांत भगवान आणिभोग यांचा मिलाफ साधण्याचा वेडा प्रयत्न केला जातो त्या त्या संप्रदायांचा ऱ्हास होतो. आधीच जगाचा गुलाम असलेल्या मानवाची गुलामी आणखी वाढवून त्याचा अधिक अधःपात करण्यांत काय हशील ? त्याला वर उचलून, उन्नत करून ईश्वराप्रत

पोहोचवावयास हवें.

पण याचा अर्थ असा मात्र नव्हे की आपण दुर्बल व्यक्तींची घृणा करायची, त्यांचा तिरस्कार करायचा. आपण सर्वचजण त्या एकाच लक्ष्याकडे जात आहोंत. सबलता आणि दुर्बलता यांच्यामध्ये फरक फक्त अभिव्यक्तीचा आहे, सद्‌गुण आणि दुर्गुण यांच्यामध्ये फरक फक्त अभिव्यक्तीचा आहे, स्वर्ग आणि नरक यांच्यामध्ये फरक फक्त अभिव्यक्तीचा आहे, जीवन आणि मरण यांच्यामध्ये फरक फक्त अभिव्यक्तीचा आहे. आपल्या ह्या जगांतील सर्वच फरक केवळ अभिव्यक्तीचेच आहेत, अभिव्यक्त होणारी मूळ वस्तु सर्वठायीं सर्वत्र एकच आहे. सर्व वस्तु मुळांत एकच आहेत. '**सर्वं खल्विदं ब्रह्म.**' ती एकच सत्ता, तीच एकमेव अंतिम वस्तु नाना तऱ्हांनीं अभिव्यक्त होत आहे--विचारांच्या रूपांनी, जीवनाच्या रूपाने, जीवांच्या आत्म्यांच्या, जीवांच्या शरीरांच्या रूपांनी, नाना परींनी अभिव्यक्त होत आहे. फरक दिसतो तो केवळ त्या अभिव्यक्तींत--अभिव्यक्तीच्या श्रेष्ठ-कनिष्ठपणांत, अभिव्यक्तीच्या भलें-बुरेपणांत. वस्तुस्थिति अशी असल्यामुळे, ज्यांच्यांत त्या मूळ सत्याची अभिव्यक्ति आपल्याइतकी झालेली नाहीं, त्यांची तेवढ्याचकरता आपण घृणा बाळगणें, त्यांचा तिरस्कार करणें योग्य नव्हे. कुणाचाहि तिरस्कार करूं नका. कुणाला हात देऊन वर आणूं शकत असाल तर पाहा. तें जमत नसेल तर त्या आपल्या बांधवांचें शुभ चिंतून स्वस्थ बसा. जातील ते आपल्या मार्गानें. खाली ओढणें, तिरस्कार करणें, हा कुणाचेंहि भलें करण्याचा मार्ग नव्हे. याने कधीच कांही साधत नसतें. दुसऱ्यांचा तिरस्कार-धिक्कार करून होतो फक्त आपल्या शक्तीचा अपव्यय, आणखी कांहीच नाही. टीका आणि तिरस्कार हे आपलीच शक्ति उगाच वाया दवडविण्याचे मार्ग होत. कारण सरतेशेवटीं आपल्याला आढळून येतें की सगळ्यांच्या डोळ्यासमोर एकच गोष्ट आहे, सर्वजण कमीअधिक अंतराने एकाच लक्ष्याकडे जात आहेत, आणि आपल्यांत जे फरक आहेत ते केवळ शाब्दिक होत.

पापाचीच गोष्ट घ्या. पापासंबंधी वेदान्ताची काय धारणा आहे ती मीं तुम्हांला सांगितली. पापासंबंधी आणखी एक धारणा

अशी की मानव हा पापी आहे. आता ह्या दोन्ही धारणा वस्तुत: एकच आहेत, त्यांच्यांत मूलत: कांही फरक नाही. केवळ, एक अस्तिपक्षी आहे आणि दुसरी नास्तिपक्षी––एक, माणूस जें खरोखर आहे त्यावर आधारलेली आहे, तर दुसरी, माणूस जें खरोखर नाही त्यावर आधारलेली आहे. एक माणसाला त्याची शक्ति दाखवून देते, तर दुसरी त्याला त्याची दुर्बलता दाखवून देते. वेदान्त म्हणतो, असेल माणसांत दुर्बलता, म्हणून काय झालें? आपल्याला उन्नति करून घेऊन तिच्यावर मात करावयाची आहे. माणूस जन्माला आला तेव्हाच त्याचा रोग कळून चुकला आहे. आपला रोग काय याची प्रत्येकालाच जाणीव आहे. आपला रोग काय हें सांगायला आपल्याला दुसऱ्या कुणाची गरज नाही. पण सदासर्वदा आपल्या रोगाचाच विचार करीत बसल्याने कांही तो बरा व्हावयाचा नाही. त्यासाठी औषध घ्यावयास हवें. आपण ढोंगीपणा करून जगाला चकवूं शकूं, पण आपल्या आंतल्या आंत आपल्याला आपली दुर्बलता पुरेपूर ठाऊक असते. पण वेदान्त म्हणतो की, माणसाला उठल्याबसल्या त्याच्या दुर्बलतेची आठवण देत गेल्याने त्याचें कांही विशेष भलें होत नाही. त्याच्यांत शक्तीचा संचार करा, आणि शक्ति कांही सदासर्वकाळ आपल्या दुर्बलतेचा विचार करीत बसल्याने निर्माण होत नसते. कपाळावर हात ठेवून आपल्या दुर्बलतेबद्दल सुस्कारे टाकीत बसणें हा कांही ती दुर्बलता दूर करण्याचा उपाय नव्हे. ती दूर करण्याचा उपाय आहे––बल, शक्ति. माणसांत आर्वाचीच वसत असलेली शक्ति उद्बुद्ध होईल असें कांही करा––त्याला तिचें स्मरण द्या, तिचें ज्ञान द्या. तुम्ही पापी आहां असें आपल्याला सांगण्याऐवजी, अस्तिपक्षाचा अवलंब करून वेदान्त आपल्याला अगदी उलट उपदेश देतो की तुम्ही पूर्ण आणि पावित्र्यस्वरूप आहां––नित्य शुद्ध, नित्य मुक्त आहां. ज्याला तुम्ही पाप म्हणतां त्याचें अस्तित्व तुमच्या स्व-रूपांत नाही. पाप तुमच्या स्व-रूपाला स्पर्शू शकत नाही––तुम्ही अपापविद्ध आहां. पाप म्हणजे आत्म्याचा मंद प्रकाश,––क्षीण, हीन अभिव्यक्ति. आत्मा उज्ज्वलभावें प्रकाशूं लागेल, त्याची उच्च अभिव्यक्ति होईल असें करा. आणि लक्षांत ठेवा––हें आपण सगळेच करूं शकतो. 'अंहं, हें मला जमायचें नाही' असें कदापि

म्हणू नका कारण तुम्ही स्वरूपत: अनंत आत्मा आहां. तुमच्या अनंत-स्वरूपापुढे अनंत काल आणि अनंत अवकाशहि कांहीच नव्हत. तुम्ही कांहीहि, काय हवें तें करूं शकतां. कारण तुम्ही स्वरूपत: सर्वशक्तिमान आहांत.

• हीं झालीं वैदान्तिक नीतीचीं मूलतत्त्वें. आता आपण तत्त्वांचा विचार अमळ बाजूस सारून तपशिलांकडे वळू—हीं तत्त्वें जीवनांत कशीं आणतां येतील याचा विचार करूं. हा वेदान्त आपल्या दैनंदिन जीवनांत, आपल्या नागर जीवनांत, आपल्या ग्रामीण जीवनांत, आपल्या राष्ट्रीय जीवनांत, प्रत्येक देशांतील घरगुती जीवनांत कसा आणतां येईल हें आपण आता पाहूं. कारण, जिथे नि ज्या अवस्थेंत माणूस असेल, तिथे नि त्या अवस्थेंत जो धर्म त्याला साहाय्य करूं शकत नसेल तो धर्म विशेष कांही कामाचा आहे असें म्हणतां यावयाचें नाही. मूठ-भर लोकांच्या चिंतनाचा विषय, एवढीच मग त्याची किंमत. जो धर्म मानवजातीचें कल्याण करूं इच्छितो त्याने, मानव ज्या स्थितींत असेल त्या स्थितींत त्याला साहाय्य करण्यास तयार आणि समर्थ असावयास हवें, मग मानव गुलामींत असो की स्वतंत्र असो, अध:पाताच्या गर्तेत खितपत असो की पावित्र्याच्या शिखरावर आरूढ असो. सर्वत्र, सम-भावाने तो धर्म मानवाच्या मदतीस धावून यावयास हवा. वेदान्ताचीं तत्त्वें म्हणा, धार्मिक आदर्श म्हणा, की आणखी कांही नांव द्या त्यांना, तीं जर हें महत्कार्य करूं शकत असतील तरच तीं सार्थकीं लागलीं असें म्हणतां येईल.

आत्मविश्वास मानवजातीचें सर्वांत अधिक कल्याण करूं शकेल. ह्या आत्मविश्वासाच्या आदर्शाचा जर अधिक प्रमाणांत प्रचार झाला असता आणि तो जर अधिक प्रमाणांत आचरणांत आणला गेला असता तर आपल्यांतील बरेचसें अशुभ आणि आपलें बरेचसें दु:ख नाहीसें झालें असतें अशी माझी खात्री आहे. समग्र मानवजातीचा इतिहास वाचून बघा, तुमच्या निदर्शनास येईल की, समस्त थोर पुरुषांच्या आणि थोर स्त्रियांच्या जीवनांत सर्वांत प्रबळ जर कोणती प्रेरक शक्ति असेल तर ती म्हणजे ह्या आत्मविश्वासाची. आपण मोठे होणार, आपण थोर होणार ही जाणीव जन्मत:च त्यांच्यांत होती, आणि तदनुसार ते मोठे

झालेहि. माणसाचा कितीहि अधःपात होऊं द्या, अशी वेळ खासच येईल की जेव्हा आपल्या त्या अवस्थेचा उबग येऊन तो तींतून वर येण्यासाठी धडपडूं लागेल आणि त्या वेळीं आत्मविश्वासाचा धडा तो शिकेल. पण यापेक्षा प्रथमपासूनच तो अवगत असणें बरें नव्हे काय ? हा आत्मविश्वासाचा धडा शिकण्यासाठी ह्या इतक्या कडु अनुभवाची काय गरज ? तो टाळतां आला तर बरें नव्हे काय ? अमळ निरीक्षण केलें तर आपल्या लक्षांत येईल की हा आत्मविश्वास असण्या-नसण्यानेच माणसामाणसांत फरक पडत असतो. ह्या आत्मविश्वासाच्या बळावर माणूस काय करूं शकणार नाही ? माझ्या स्वतःच्या जीवनांत मला याचा अनुभव आला आहे, आणि अजूनहि येत आहे. आणि जसजसें माझें वय वाढत आहे तसतसा हा विश्वासहि माझ्यांत अधिकाधिक प्रबळ होत आहे. ज्याचा स्वतःवर विश्वास नाही तो नास्तिक. जुना धर्म म्हणत असे की ज्याचा ईश्वरावर विश्वास नाही तो नास्तिक. नवा धर्म म्हणतो की ज्याचा स्वतःवर विश्वास नाही तोच नास्तिक. परंतु हा आत्मविश्वास म्हणजे ह्या आपल्या क्षुद्र 'मी'वर विश्वास मात्र नव्हे. कारण वेदान्त आपल्याला ज्या आत्म्याची शिकवण देत आहे तो कांही हा 'मी', हा 'कच्चा' मी, हा तुच्छ आत्मा नव्हे, तर तो म्हणजे एकमेवाद्वितीय आत्मा--'पक्का' मी, 'विराट' मी. त्या खऱ्या आत्मविश्वासाचा अर्थ आहे, ह्या 'विराट मी'वरील विश्वास. ज्याच्या ठायीं तो आत्मविश्वास असतो त्याचा सर्वांवर विश्वास असतो, कारण तो जाणून असतो की तोच सर्व आहे. त्याचा आत्मविश्वास म्हणजे सर्वांवर विश्वास. त्याची आत्मप्रीति म्हणजे सर्वांवर प्रीति--पशुपक्षांवर प्रीति, झाडून साऱ्यांवर प्रीति, कारण हें सर्वकांही आत्माच आहे, तोच आहे. ह्या असल्या महान् विश्वासाच्या प्रभावानेच दुनिया सुधरूं शकेल, जगाची उन्नति होऊं शकेल. माझी पक्की खात्री आहे याबद्दल. 'मला माझ्याविषयी सारेंकांही माहीत आहे' असें जो खऱ्या अर्थानें म्हणू शकतो तोच सर्वश्रेष्ठ पुरुष होय. तुम्हांला अद्याप जिची जाणीव नाही अशी किती शक्ति, असें किती सामर्थ्य तुमच्या कुडीमध्ये दडलें आहे ह्याची तुम्हांला कल्पना आहे ? माणसांत जें कांही आहे त्या साऱ्याचा ठाव एका तरी शास्त्रज्ञाला लागला आहे काय ? माणसाचा ह्या पृथ्वीवर

उदय होऊन आज लाखो वर्षे लोटलीत, परंतु अजून त्याच्या शक्तीचा स्वल्पांशहि व्यक्त झालेला नाही. म्हणून, आपण दुर्बल आहों असें तुम्हीं कदापि म्हणतां कामा नये. वरवर दिसणाऱ्या ह्या अवनतीच्या पाठी-मागे काय काय दडलें आहे हें तुम्हांला कसें माहीत ? तुमच्यामधे जें आहे त्यांतील फार थोड्याचीच तुम्हांला जाणीव आहे. कारण तुमच्या अंतर्यामीं अनंत शक्तीचा आणि अनंत आनंदाचा अपरंपार ठेवा विद्यमान आहे.

"**आत्मा वा अरे श्रोतव्यः**" — ह्या आत्म्याचें स्वरूप प्रथम ऐकावें लागेल. दिवसरात्र श्रवण करा की तुम्ही तो आत्मा आहां. हें सत्य—हा स्व-स्वरूपाचा बोध—तुमच्या रोमारोमांत भिनेपर्यंत, तुमच्या रक्तांत मिसळेपर्यंत, तुमच्या हाडींमासीं खिळेपर्यंत अहर्निश सारखा अंतःकरणांत घोळवा. तुमच्या शरीराचा कणन् कण, तुमचा अणुरेणु ह्या आदर्शाने भारला जाऊं द्या की 'मी तोच जन्महीन, जरा-हीन, मरणहीन, आनंदस्वरूप, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, महिमाशाली आत्मा आहें.' रात्रंदिवस हा एकच ध्यास असूं द्या, तुमच्या जीवनाशीं तो अगदी एकरूप होईपर्यंत सतत त्याचाच ध्यास धरा. त्याचें निदिध्यासन करा, त्यावर ध्यान करा. अशा तऱ्हेने त्या बोधाने तन्मय झाल्यानेच तुम्ही कर्म यथार्थपणें करण्यास समर्थ व्हाल. "Out of the fullness of the heart the mouth speaketh"—"हृदय पूर्ण झालें म्हणजे वाणीद्वारा ती पूर्णता प्रकट होत असते," तद्वतच, हृदय पूर्ण झालें म्हणजे ती पूर्णता हातांद्वारेंहि प्रकट होऊं लागते. कर्म आपोआप होईल. आधी स्वतःला ह्या आदर्शाने भरून टाका. कांहीहि करण्यापूर्वी त्या आदर्शाचें नीट चिंतन करा. ह्या चिंतनाचा प्रभाव असा आहे की त्याने तुमच्या सर्व कर्मांचें स्वरूप बदलून जाईल, तीं प्रशस्त होतील, दैवी रूप धारण करतील. जड (matter) जर शक्तिमान असेल तर चिंतन वा विचार सर्वशक्तिमान असतात. ह्या विचारांचा, ह्या चिंतनाचा, ह्या ध्यानाचा स्वतःच्या जीवनावर असर होऊं द्या, आपलें जीवन त्याने प्रभावित होऊं द्या. स्वतःच्या सर्वशक्तिमत्वाच्या, स्वतःच्या महिम्याच्या, स्वतःच्या गौरवाच्या चिंतनाने स्वतःला भरून टाका. खुळचट समजुती तुमच्या डोक्यांत कधीच कोंबल्या न जात्या तर किती चांगलें झालें असतें!

स्वत:विषयीच्या दुर्बलतेच्या आणि नीचतेच्या कल्पना माणसाची खच्ची करून टाकतात. ह्या असल्या खचविणाऱ्या कल्पनांनी आणि खुळचट समजुतींनी आपण आजन्म कधीच घेरले गेलों नसतों तर किती छान झालें असतें ? ईश्वराची ती केवढी दया म्हणतां आली असती. हीं सारीं उच्च, उदात्त सत्यें आत्मसात् करण्याचा मानवजातीचा मार्ग जर अधिक सोपा नि सुगम असता तर फार फार छान झालें असतें. पण तसें कुठलें व्हायचें ! माणसाला ह्या साऱ्यामधूनच मार्ग काढणें भाग आहे. आपल्या मागून येणाऱ्यांचा मार्ग तुम्ही तरी निदान अधिक कठीण करूं नका.

हीं तत्त्वें पुष्कळदा लोकांना मोठीं भयंकर वाटत असतात. ह्या सर्व कल्पना ऐकून कित्येकजण कसे भयभीत होतात ह्याची मला जाणीव आहे. पण ज्यांना जीवनाची चाड आहे त्यांनी हीं प्रथम आत्म-सात् करावयास हवींत. आपण दुर्बल आहोंत हा विचार स्वत:तहि शिरूं देऊं नका, इतर कुणांतहि शिरवूं नका. शक्य असेल तर जगाचें भलें करा, पण कांही झालें तरी जगाचें निदान अनिष्ट करूं नका. आपल्या कितीतरी संकुचित कल्पना, आपलें हें काल्पनिक देवदेवतांसमोर गुढघे टेकून रडणें-भेकणें नि प्रार्थना करणें, हें सारें वेडगळ, खुळचट आहे हें तुम्हांला आंतल्या आंत पुरेपूर ठाऊक असतें. ह्या प्रार्थनांना बाहेरून उत्तर आल्याचें मला एकतरी उदाहरण सांगा. जें काय उत्तर येतें तें आंतून--स्वत:च्या हृदयांतून. भुतें नाहीत असा तुमच्यापैकी पुष्कळांचा ठाम विश्वास असतो. पण अमळ अंधारांत जातांच तुमचं अंग शहा-रायला लागतं ! ह्याचं कारण हेंच की लहानपणापासून ह्या साऱ्या भीतीच्या कल्पना आपल्या डोक्यांत कोंबण्यांत आलेल्या आहेत. म्हणून, समाजाच्या भयाने, लोकमताला भिऊन, आप्तेष्टांचा रोष ओढवेल या धास्तीने, किंवा इतक्या दिवसांच्या समजुती कशा सोडायच्या ह्या भीतीने ह्या असल्या साऱ्या गोष्टी इतरांना कदापि शिकवूं नका. ह्या साऱ्यांवर मात करा. धर्माची शिकवण धर्माची शिकवण म्हणजे आणखी काय ? ती एकच वस्तु ह्या विश्वरूपाने विराजत आहे, आणि म्हणून स्वत:वर, स्वत:च्या आत्मरूपावर विश्वास ठेवा,—यांतच धर्माच्या सगळ्या शिकवणुकींचें सार आलें. धर्माच्या बाबतींत शिकविण्यासारखें

फक्त एवढेंच आहे. गेलीं हजारों वर्षें मनुष्यजात ह्याच्याचसाठी धड-पड करीत आली आहे, आणि आजहि करीत आहेच. आता तुमची पाळी. सत्य तुम्हांला माहीतच आहे, कारण चहूकडून तें तुमच्या कानीं पडत आहे. केवळ तत्त्वज्ञान किंवा मानसशास्त्रच नव्हे, तर भौतिक शास्त्रेंहि त्याचाच उद्घोष करीत आहेत. ह्या विश्वाचें एकत्व मानावयास भितो असा एकतरी वैज्ञानिक आज सापडेल काय? आज कोण जगांचें अनेकत्व प्रतिपादन करण्यास धजेल? ह्या साऱ्या खुळचट समजुती होत. जीवन एकच आहे आणि जगहि एकच आहे. आणि हें एकच जीवन आणि एकच जग आपल्याला विविध भासत आहे. ही विविधता एखाद्या स्वप्नासारखी आहे. स्वप्न पडतेवेळीं एक स्वप्न विरतें आणि दुसरें दिसूं लागतें. तुम्ही मात्र तसेंच असतां, त्या स्वप्नां-बरोबरच तुम्ही कांही जात-येत नाही. एकामागून एक स्वप्नें पडतात, दृश्यांमागून दृश्यें तुमच्या प्रत्ययास येतात. ह्या जगाचेंहि असेंच आहे. आज तुम्हांला नव्वद टक्के दुःख आणि दहा टक्के सुख प्रतीत होत आहे. कदाचित् कांही काळाने नव्वद टक्के सुख आणि दहा टक्के दुःख अशा स्वरूपांत तें तुमच्या प्रत्ययास येईल. त्यालाच म्हणायचें स्वर्ग. परंतु अशी एक वेळ येते की माणूस सिद्ध होतो, आणि मग त्याच्या दृष्टीसमोरून हें सारेच्या सारेंच अंतर्धान पावतें, हें समस्त विश्व व तो स्वतः स्वयं ईश्वर आहे, ब्रह्मच आहे असें त्याच्या अनु-भवास येऊं लागतें. सारांश, लोकहि अनेक नाहीत आणि जीवनेंहि अनेक नाहीत. ही सगळी विविधता त्या एकाचीच विभिन्न अभिव्यक्ति होय. तें 'एक'च स्वतःला या विविध रूपांनी अभिव्यक्त करीत आहे—जड, चेतन, मन, विचार, सारीं त्या एकाचीच विविध रूपें होत. तें एक-मेवाद्वितीयच ह्या अनेक रूपांनी नटलें आहे, भिन्नभिन्न रूपांनी विलसत आहे. म्हणून पहिल्याप्रथम जर आपण कांही करावयाचें असेल तर तें म्हणजे स्वतःच्या आणि इतरांच्या मनावर हें सत्य ठसविणें. ही पहिली पायरी.

समस्त जगत् ह्या महान् आदर्शाच्या घोषणेने निनादूं द्या. खुळ-चट, वेडगळ समजुती साऱ्या लयाला जाऊं द्या. जे दुर्बल आहेत त्यांना हें सत्य ऐकवा, पुनःपुनः ऐकवा, एकसारखें ऐकवा. ऐकवा की तुम्ही

तोच शुद्ध, अपापविद्ध आत्मा आहां. उठा, जागे व्हा, तुम्ही महान् आहांत, ही निद्रा तुम्हांला शोभत नाही. उठा, जागे व्हा, हा मोह तुम्हांला साजत नाही. स्वतःला दीन, दुर्बल कां समजतां ? तुम्ही सर्वशक्तिमान आहांत, उठा, जागे व्हा, आणि आपलें स्व-रूप प्रकट करा. स्वतःला पापी समजणें तुम्हांला शोभत नाही. स्वतःला दुर्बल समजणें तुम्हांला शोभत नाही. जगाला हें सांगा, स्वतःला हें सांगा, आणि बघा काय चमत्कार होतो तो, त्यांतून काय काय निष्पन्न होतें तें. बघाल—विजेच्या चमकेसारखें सारेंकांही प्रकाशित होईल, सारें-कांही पार बदलून जाईल. मानवजातीला हें शिकवा, मानवाला त्याची शक्ति दाखवून द्या. मग तें सत्य स्वतःच्या रोजच्या जीवनांत कसें लागू करावयाचें हें प्रत्येकजण आपापलें पाहून घेईल.

जीवनांत विवेकाची प्रतिष्ठा करूं शकण्यासाठी, जीवनांत प्रत्येक क्षणीं, आपल्या प्रत्येक कामांत बरोबर काय आणि चुकीचें काय, खरें काय आणि खोटें काय हें ठरवूं शकण्यासाठी सत्याची खूण काय हें आपण जाणून असावयास हवें. सत्याची ती खूण आहे—पावित्र्य, एकत्व. जें जें एकत्वाप्रत नेतें, मीलन घडवून आणतें, तें तें सत्य होय. प्रेम हें सत्य होय आणि द्वेष असत्य होय. कारण प्रेम मीलन साधतें, द्वेष भेद निर्माण करतो. द्वेषामुळेच माणसामाणसांत वेगळेपणा उत्पन्न होतो, दोन माणसें एकमेकांपासून पृथक् होतात, म्हणून द्वेष करणें चूक, म्हणून द्वेष खोटा, असत्य. द्वेष विघटनात्मक शक्ति आहे, ती वेगळेपणा, पृथक्पणा आणते आणि माणसाचा नाश करते.

प्रेम संघटनात्मक असतें, तें पृथक्पणा नाहीसा करून मीलन घडवून आणतें, प्रेम त्या एकत्वाप्रत नेतें. प्रेमाने अभेद जन्मतो, प्रेमाने आपण एक होतों, आई मुलाशीं एक होते, कुटुंबें नगराशीं संबद्ध होतात, पशुपक्ष्यांसहित समस्त जग एक होऊन जातें. कारण प्रेमच मूलभूत, खरीखरी सत्ता आहे, प्रेम स्वयं भगवानच होय. आणि हा सारा त्या एकमेवाद्वितीय प्रेमस्वरूपाचा विलास आहे—कुठे त्याची अभिव्यक्ति कमी, कुठे जास्त. फरक फक्त अभिव्यक्तींत आहे, समस्त श्रेष्ठ-कनिष्ठ अभिव्यक्तींमधून अभिव्यक्त मात्र होत आहे तोच एक प्रेमघन. म्हणून आपल्या कर्माचें मूल्य ठरवितांना आपण नेहमी हें बघितलें पाहिजे की तें

भेदबोध निर्माण करीत आहे की अभेदबोध, पृथक्त्व आणीत आहे की एकत्व. जर त्याने आपल्यांत भेदाचा बोध निर्माण होत असेल, जर त्यामुळे आपल्यांत पृथक्पणा उत्पन्न होत असेल तर त्या कर्माचा आपण त्यागच करावयास हवा; पण त्याने जर एकत्व साधत असेल तर निश्चित समजा की तें चांगलें आहे. हाच निकष आपल्या विचारांनाहि लागू आहे. ते विघटना उत्पन्न करतात की संघटन, ते पृथक्त्व निर्माण करतात की एकत्व, ते परस्परांना अलग करतात की एकमेकांचें मीलन घडवून आणतात हें आपण बघितलें पाहिजे. सर्वांना एक करणारी शक्ति ते निर्माण करतात की नाही हें आपण पाहिलें पाहिजे. त्यांनी जर हें होत असेल तर आपण त्यांचा स्वीकार करूं, एरवी आपण त्यांना झुगारून देऊं--त्यांना गुन्हा, पाप समजून फेकून देऊं.

तात्पर्य काय की, वेदान्तिक नीति कोणत्याहि 'अज्ञेय' वस्तूवर उभारलेली नाही. कोणत्याहि 'अज्ञात' वस्तूचा ती प्रचार करीत नाही. तर, उपनिषदें म्हणतात त्याप्रमाणे, "ज्या ईश्वराची लोक 'अज्ञात' म्हणून उपासना करीत असतात, त्याचेंच मी तुम्हांला ज्ञान देत आहें." कोणत्याहि गोष्टीचें ज्ञान आपल्याला ह्या आत्म्याद्वाराच होत असतें. मला ह्या खुर्चीचें ज्ञान होत आहे. पण तिचें ज्ञान होण्यासाठी आधी मला 'माझें' ज्ञान असावयास हवें, मगच तिचें ज्ञान होणार. ह्या 'मी'-मधून, ह्या आत्म्यामधूनच मला या खुर्चीचें ज्ञान होत आहे, ती माझ्या प्रत्ययास येत आहे. या आत्म्यामधूनच मी तुम्हांला जाणत आहें, सारें विश्व मला उपलब्ध होत आहे. असें असतां, हा आत्मा 'अज्ञात' आहे असें म्हणणें म्हणजे शुद्ध मूर्खपणा होय. हा आत्मा काढून घ्या, सारें विश्वब्रह्माण्ड अंतर्धान पावेल. या आत्म्यामधून सगळें ज्ञान, सारे प्रत्यय, सर्व उपलब्धि होत असतात. म्हणून सर्वांत अधिक 'ज्ञात' तोच होय. तोच 'तुम्ही'--त्यालाच तुम्ही 'मी' म्हणत असतां. 'माझा' मी हा तुमचा 'मी' होणें कसें शक्य आहे याचें तुम्हांला आश्चर्य वाटेल. हा सान्त, ससीम 'मी' अनंत, असीम कसा असू शकेल याचें तुम्हांला आश्चर्य वाटेल. तरीपण तें तसें आहे. वस्तुस्थिति तशीच आहे. सान्त 'मी' ही केवळ कल्पित वस्तु आहे, निव्वळ भ्रान्ति आहे. त्या अनंत आत्म्यावर जणुकांही एक आवरण आलें आहे, आणि त्याचा

अल्पांश ह्या 'मी'च्या रूपाने व्यक्त होत आहे. असीम खरोखरच कधी ससीम होणें शक्य नाही, ती केवळ कल्पना होय, निव्वळ भ्रान्ति होय. म्हणून हा आत्मा स्त्री, पुरुष, बालक, बालिका,—नव्हे, पशु, पक्षी, सगळयांनाच ज्ञात आहे. त्याला न जाणतां आपण जगूं शकत नाही, हालचाल करूं शकत नाहीं, मुळी असूंच शकत नाही. त्या सर्वेश्वराला, त्या प्रभूला जाणत असल्याखेरीज आपण श्वासोच्छ्वास करूं शकणार नाहीं, क्षणभरहि जिवंत राहूं शकणार नाहीं. वेदान्ताचा ईश्वर हा इतर कोणत्याहि वस्तूपेक्षा अधिक ज्ञात आहे, तो मुळीच काल्पनिक नाही.

हा असला ईश्वर जर प्रत्यक्ष, व्यवहार्य नसेल तर प्रत्यक्ष, व्यवहार्य ईश्वर आणखी कशाला म्हणावयाचें ? ज्याला मी माझ्या समोर बघतों आहें, प्राणिमात्राठायीं जो विद्यमान आहे, जो आपल्या इंद्रियांना प्रत्ययास येणाऱ्या वस्तूंपेक्षाहि अधिक सत्य आहे त्याच्यापेक्षा अधिक प्रत्यक्ष, अधिक व्यवहार्य आणखी काय असेल ? कारण तुम्हीच तो आहांत, तुम्हीच तो सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्व आत्म्यांचा आत्मा आहांत. हें असें नाही असें जर मी म्हणेन तर मी खोटें बोललों, असत्य बोललों असें होईल. नेहमीच मला तसा अनुभव येत असो की नसो, पण हें सत्य आहे हें मी जाणतों. तो एकच ह्या अनेकांत अनुस्यूत आहे, त्यांतच ह्या समस्त वस्तु मीलित होतात, एक होतात, सर्व जीवांचें आणि सर्व पदार्थांचें सत्य स्वरूप तोच आहे.

हीं वेदान्तांतील नीतितत्त्वें प्रत्यक्ष आचरणांत कशीं आणतां येतील याचा आपण तपशिलांत जाऊन विचार करावयास हवा. त्यासाठी खूप चिकाटी, खूप धीर आवश्यक आहे. मीं तुम्हांला सांगितलेंच आहे की ह्या विषयाचें आपल्याला संपूर्ण, तपशीलवार विवेचन करावयाचें आहे, हे आदर्श जीवनांत कसे उतरवावयाचें ह्याचें नीट, सांगोपांग आलोचन करावयाचें आहे. आणि त्याचबरोबर, ही नीतितत्त्वें अगदी खालच्या पायरीच्या आदर्शांमधून विकसित होत होत अखेर एकत्वाच्या त्या महान् आदर्शांत परिणत होऊन त्यांना विश्वप्रेमाचें स्वरूप कसें प्राप्त होतें हेंहि आपल्याला बघावयाचें आहे. आपल्या हातून चुका होऊं नयेत, आपल्याला भ्रमांत पडावें लागूं नये

म्हणून ह्या अनुशीलनाची फार आवश्यकता आहे. ही माहिती झाल्याने आपण आपल्या आदर्शाप्रत जाण्याच्या मार्गांतील धोके आणि खाच-खळगे टाळूं शकूं. खालच्या पायऱ्यांपासून वरपर्यंत ह्या आदर्शाचा कसकसा विकास होत जातो हें जाणत बसायला जगाला वेळ नाही. पण आपण जर आपल्यामागून येणाऱ्यांना ह्या मार्गाचें ज्ञान देऊं शकणार नसूं तर मग आपण वरच्या पायऱ्यांवर उभे असल्याचा काय बरें उपयोग ? म्हणून आपण हें सारें नीट तपशीलवार जाणून घेणें श्रेयस्कर आहे. आणि, त्यासाठी आधी त्याचा बौद्धिक भाग नीट समजून घेणें अत्यंत आवश्यक आहे. आता, बौद्धिकतेला विशेष मूल्य नाही, हृदयच अत्यंत महत्त्वाचें होय, हें केव्हाहि खरेंच. हृदयाद्वारांच भगवंताचा साक्षात्कार होत असतो, बुद्धीच्या द्वारां नव्हे. बुद्धीचें काम आहे, आमच्या मार्गांतील कांटेकुटे दूर करून आमचा मार्ग सुरळीत करणें, एवढेंच. बुद्धीचें कार्य गौण आहे, दुय्यम महत्त्वाचें आहे. ती एखाद्या पोलीस शिपायासारखी आहे. समाजाच्या सुव्यवस्थेच्या दृष्टीने पोलीस कोणतेंहि करणात्मक कार्य करीत नसतो. त्याचें सारें काम अकरणात्मक असतें— समाजांतील गडबड-गोंधळ थांबविणें, दुष्कृत्यांना आळा घालणें एवढेंच त्याचें काम. बुद्धीचेंहि कार्य ह्याच स्वरूपाचें असतें. यापेक्षा अधिक कशाची तिच्याकडून अपेक्षा करावयाची नसते. एखादें केवळ बौद्धिक पुस्तक ज्या वेळीं आपण वाचून संपवितों त्या वेळीं आपल्या मनांत आल्याखेरीज राहत नाही की 'वांचलों बुवा, संपलें एकदाचें! खैर देवाची!' कारण, बुद्धि आंधळी असते, तिच्या स्वतःत गतिशक्ति नाही, ती बिनहातपायांची आहे. हृदय किंवा भावनाच खरोखर कार्य करीत असतात, विद्युद्वेगाहूनहि त्यांची गति अधिक जलद आहे. तुमच्या ठायीं भावनाशील, संवेदनाशील हृदय आहे ना ? प्रश्न आहे त्याचाच. तें असेल तर तुम्हांला भगवंताचें दर्शन होऊं शकेल. आज तुमच्या हृदयांत ज्या भावना आहेत त्याच गाढ होत जातील. दैवी स्वरूप धारण करतील, अत्युच्च अवस्थेला पोहोचतील. इतक्या की, अखेर त्या तुम्हांला पूर्णानुभवास पात्र करतील, आणि मग विविधतेंतील ऐक्य तुमच्या प्रत्ययास येईल, स्वतःमधे आणि इतरांमधे तुम्हांला ईश्वराचा अनुभव येऊं लागेल. बुद्धीला हें कदापि शक्य नाही. "तऱ्हतऱ्हेची शब्द-

योजना, नाना तऱ्हांनी शास्त्रांचे अर्थ लावण्याचें कसब, हें सारें पंडितांच्या तृप्तीसाठी होय, त्या साऱ्याने कधी मुक्ति लाभणें शक्य नाही."

तुमच्यापैकी ज्यांनी थॉमस अ केम्पिसचें 'ख्रिस्तानुसरण' ( Imitation of Christ ) नामक पुस्तक वाचलें असेल त्यांना अवगत असेलच की, केम्पिसनी ह्यावर आपल्या त्या पुस्तकाच्या पानापानांतून केवढा तरी भर दिला आहे. आणि एकट्या त्यांनीच नव्हे, तर, जगांतील सर्वच संतांनी ह्या मुद्यावर भर दिला आहे. बुद्धीची गरज आहे, नाही असें नाही. एरवी आपण पदोपदीं भ्रमण्याचा फार संभव असून आपल्या हातून नाना तऱ्हेच्या घोडचुका व्हावयाच्या. बुद्धीने त्यांना पायबंद बसतो. पण फक्त इतकेंच. बुद्धीच्या पायावर कांही निर्माण करण्याची, कांही उभारूं शकण्याची मात्र आशा धरूं नका. ती निष्क्रिय आहे, तिची मदत गौण, अकरणात्मक स्वरूपाची असते. खरी मदत भावनांची, प्रेमाची. इतरांविषयी तुम्हांला प्रेम वाटतें ना? वाटत असेल तर तुमच्यांत एकत्वाची भावना, अभेदबोध वाढत आहे असें समजा. पण, इतरांविषयी असें प्रेम जर तुमच्या हृदयांत स्पंदत नसेल तर मात्र तुम्ही अगदी असामान्य, अभूतपूर्व बुद्धिमान असलां तरी त्यांत कांही नाही, तुमचें कांहीहि व्हायचें नाही. आहांत तसेच शुष्क राहाल. पण त्याच जर तुमच्यांत भावना असतील, प्रेम असेल, तर तुम्हांला एक अक्षरहि वाचतां येत नसलें, एकहि भाषा नीट अवगत नसली तरीदेखील तुम्ही योग्य मार्गावर आहां असें समजा. भगवंत तुम्हांला साहाय्य करील.

काय सांगतो जगाचा इतिहास ? जगांतील द्रष्ट्या महापुरुषांची ( Prophets ची ) शक्ति कुठे असते ? कुठे होतो तिचा उगम ? बुद्धींत ? त्यांच्यापैकी कुणीतरी तत्त्वज्ञानावर गोंडस ग्रंथ लिहिण्याच्या फंदांत पडला का ? त्यांच्यांतील कुणीतरी सूक्ष्म तर्काच्या कोलांट्या मारण्याच्या भरीस पडला का? त्यांच्यांतील एकानेदेखील असलें कांही केलेलें नाही. काय सांगावयाचें तें त्यांनी अगदी थोड्या शब्दांत सांगून टाकलें. ख्रिस्तासारखें हृदय होऊं द्या म्हणजे तुम्ही ख्रिस्त व्हाल. बुद्धासारखें हृदय कमवा म्हणजे तुम्ही बुद्ध व्हाल. प्रेम, भावनाच जीवन होत, त्याच शक्ति होत, त्याच ओज होत, त्यांच्याशिवाय बुद्धीने

केवढाहि आटापिटा केला तरी ती ईश्वराप्रत पोहोचणें शक्य नाही. चलनवलनाची शक्ति नसलेल्या अवयवांसारखी बुद्धीची गत. तिच्यांत भावनांचा संचार होऊन त्यांनी तिला गति दिल्यानंतरच ती कार्य करूं शकते, इतरांवर प्रभाव पाडूं शकते. जगांत कुठेंहि बघा, हें सत्य असल्याचें तुम्हांला आढळून येईल. म्हणून ह्याचें आपण कधीहि विस्मरण होऊं देतां कामा नये. हें सत्य आपण नेहमी ध्यानांत बाळगावयाला हवें. वेदान्ताच्या नीतींतील ही एक अत्यंत व्यवहार्य शिकवण आहे. कारण वेदान्ताची अशी शिकवण आहे की तुम्ही सर्वचजण महापुरुष आहां, द्रष्टे आहां—तुम्हां सर्वांनाच द्रष्टे व्हावयाचें आहे. शास्त्र तुमच्या कार्याचें प्रमाण नसून तुम्हीच शास्त्राच्या सत्यासत्यतेचें प्रमाण आहांत. एखादें शास्त्र सत्य सांगत आहे हें तुम्हांला कसें कळतें ? कारण सत्य तुमच्या ठायीं वसत आहे, आणि म्हणून तें त्या शास्त्रांतील सत्य तुम्हांला जाणवतें—तें खरें आहे असा तुम्हांला प्रत्यय येतो. वेदान्ताचें हेंच म्हणणें आहे. ख्रिस्तांचीं आणि बुद्धांचीं वचनें खरीं कशावरून ? तुम्हांला-आम्हांला तसा अनुभव येऊं शकतो म्हणून. म्हणूनच तीं खरीं आहेत असें आपण म्हणूं शकतों. आमचा ईश्वरी, दैवी बोधच त्यांच्या दैवी बोधाचें प्रमाण होय, त्यांच्या द्रष्टेपणाचें प्रमाण होय. आमचें ईश्वरत्वच खुद्द ईश्वराच्याहि अस्तित्वाचें प्रमाण होय. जर तुम्ही खरोखरच सत्यद्रष्टे नसाल तर ईश्वराच्या बाबतींत प्रमाण काय ? मग ईश्वरासंबंधी कांहीहि खरें नाही असेंच म्हणणें भाग पडेल. तुम्ही जर ईश्वर नसाल तर ईश्वराच्या अस्तित्वाचें प्रमाण काय ? मग ईश्वर नाही, असणें शक्यहि नाही. मानव स्व-रूपत: आत्मा आहे, आणि हें आपलें मूळ स्वरूप आपल्याला फिरून प्राप्त करून घ्यावयाचें आहे—हाच आपला आदर्श आहे, तोच आपल्याला अनुसरावयाचा आहे असा वेदान्ताचा आपल्याला आदेश आहे. आपल्यापैकी प्रत्येकालाच द्रष्टा, महापुरुष व्हावयाचें आहे—झालेंच पाहिजे. तुम्ही तसें आधीचेंच आहांत. हें फक्त 'जाणा', म्हणजे झालें. आत्म्याच्या पक्षीं कांहीहि अशक्य आहे असें कदापि समजूं नका. तसें समजणें ही घोर नास्तिकता आहे, तो घोर पाखंडीपणा आहे. पाप म्हणून जर कांही असेल तर तें फक्त हेंच—स्वत:ला किंवा इतरांना दुर्बल म्हणणें. हेंच एकमात्र पाप होय.

## व्याख्यान दुसरें

(लंडन, १२ नोव्हेंबर १८९६)

एका बालकाला ज्ञानलाभ कसा झाला याविषयीची छांदोग्य उपनिषदांतील एक प्राचीन कथा मी तुम्हांला सांगतों. गोष्ट अर्थातच खूप ओबडधोबड असून तुम्हांला जुन्या थाटाची आणि अमळ चमत्कारिक वाटेल. तथापि तिच्यांत एक तत्त्व दडलेलें तुमच्या निदर्शनास येईल.

एक लहान मुलगा एकदा आपल्या आईला म्हणाला की "आई, मी वेदांचें अध्ययन करावयास जात आहें. माझ्या पित्याचें नांव आणि माझें गोत्र मला सांग." त्या मुलाची ती आई विवाहबंधनाने कुणाशीं बद्ध झालेली नव्हती. अशा स्त्रियांची संतति भारतांत बहिष्कृत समजली जाते. समाजांत तशांना कांही स्थान नसतें. वेदाध्ययनाचा त्यांना अधिकार नसतो. म्हणून मुलाचा तो प्रश्न एकून ती बिचारी म्हणाली— "पोरा, मला तुझें गोत्र माहीत नाही. यौवनांत अनेक ठिकाणीं दासीपणा करीत असतांना मला तुझा लाभ झाला. मी तुला एवढेंच सांगूं शकतें की माझें नांव जाबाला आहे आणि तुझें नांव सत्यकाम आहे." तो मुलगा मग एका ऋषीकडे गेला आणि शिष्य म्हणून आपला स्वीकार करावा अशी त्याने त्यांना प्रार्थना केली. ऋषींनी त्याला त्याच्या पित्याचें नांव आणि गोत्र विचारलें. आईच्या तोंडून जें ऐकलें होतें तें तसेंच्या तसें त्या बालकाने सरलपणें आपल्या गुरुदेवांना कथन केलें. तें ऐकून ते ऋषि एकदम उद्गारले, "वत्सा, तूं सत्यवादी आहेस. स्वतःविषयी हें एवढें अपमानास्पद सत्य सांगतांना तूं सत्यापासून ढळला नाहीस. तूंच खरा ब्राह्मण. कारण सत्यवादित्वच ब्राह्मणाचें लक्षण होय. बाळ, मी तुझा स्वीकार करतों, कारण तूं सत्यनिष्ठ आहेस." याप्रमाणे त्या ऋषींनी त्या मुलाला आपल्या आश्रमांत ठेवून घेतलें आणि त्याच्या विद्याभ्यासास प्रारंभ झाला.

प्राचीन भारतांत त्या वेळीं विद्यादानाच्या अनेक पद्धती होत्या. तींतील एका पद्धतीने त्या ऋषींनी सत्यकामाला विद्या देण्याचें ठरविलें. तुम्हांला ती अमळ विलक्षण वाटणें साहजिक आहे. त्या ऋषींनी चारशे हाडकुळ्या, दुबळ्या गायी सत्यकामाच्या स्वाधीन केल्या आणि त्या

घेऊन त्याला जंगलांत जावयास सांगितलें. तदनुसार सत्यकाम त्या गायींची निगा ठेवीत जंगलांत राहूं लागला. त्या गायी चारशेच्या हजार होईपर्यंत जंगलांतच राहण्याची गुरुदेवांनी त्याला आज्ञा केली होती. तो कळप हजारांचा झाल्यानंतरच सत्यकामाला तो घेऊन गुरुगृहीं परत जावयाचें होतें. दिवसांमागून दिवस जात होते. गुरूच्या आज्ञेनुसार सत्यकामाचा अरण्यवास चालू होता. याप्रमाणे कांही वर्षें लोटल्यानंतर एके दिवशीं सत्यकामाला ऐकूं आलें की त्या कळपांतील एक मोठा बैल त्याला उद्देशून म्हणत आहे "सत्यकामा, एव्हाना आम्ही हजार झालों आहोंत. तूं आता आम्हांला आपल्या गुरूंकडे घेऊन चल. मी तुला ब्रह्मासंबंधी थोडेसें ज्ञान देतों, तें श्रवण कर." "सांगा, प्रभो"–सत्यकाम म्हणाला. त्यावर तो वृषभ म्हणूं लागला, "पूर्व दिशा ही ब्रह्माचा अंश आहे, त्याचप्रमाणे पश्चिम, उत्तर आणि दक्षिण दिशाहि ब्रह्माचे अंश आहेत. ह्या चार मुख्य दिशा ब्रह्माचे चार अंश होत. अग्नि तुला ब्रह्मासंबंधी आणखीहि कांही ज्ञान देईल." त्या काळीं अग्नि हा ब्रह्माचें एक विशेष प्रतीक समजून पूजिला जाई. प्रत्येक ब्रह्मचाऱ्याला अग्नि स्थापन करून त्यांत आहुति द्यावी लागे. असो तर, त्या वृषभाच्या आदेशानुसार सत्यकाम दुसरे दिवशीं गुरुगृहीं परत जाण्यास निघाला. मार्गांत सायंकाल होतांच त्याने संध्यावंदन आटोपलें, आणि अग्नि प्रज्वलित करून त्यांत होमाहुति दिल्या. याप्रमाणे अग्नीसमोर बसला असतांनाच त्याला त्या अग्निशिखांतून एक वाणी ऐकूं आली. "सत्यकामा" म्हणून त्या वाणीने त्याला संबोधिलें. "काय आज्ञा आहे, प्रभो" असें त्यावर तो म्हणाला. बायबलमधेंहि अशीच एक कथा वाचल्याचें तुम्हांला कदाचित् स्मरत असेल. सॅम्युअललाहि अशीच अद्भुत वाणी ऐकूं आल्याची ती कथा आहे. असो. अग्नि त्यावर त्याला म्हणाला––"सत्यकामा, मी तुला ब्रह्माचें थोडें ज्ञान देईन. ही पृथ्वी ब्रह्माचा अंश आहे. अंतरिक्ष हें ब्रह्माचा एक अंश आहे, स्वर्ग एक अंश आहे, आणि समुद्र एक अंश आहे." एक हंस येऊन तुला ब्रह्माचें आणखी ज्ञान देईल असेंहि अग्नीने सत्यकामाला सांगितलें. सत्यकामाने आपला प्रवास पुढे सुरू केला, आणि दुसऱ्या दिवशीं आपलें सायंकालीन हवनादि आटोपून तो बसला असतां तिथे एक हंस आला आणि त्याला

म्हणाला, "मी तुला ब्रह्मासंबंधी कांही ज्ञान देईन. सत्यकामा, ह्या ज्या अग्नीचें तूं अर्चन करीत आहेस तो अग्नि त्या ब्रह्माचा अंश आहे. सूर्य त्या ब्रह्माचा अंश आहे, चंद्र ब्रह्माचा अंश आहे, विद्युत् ब्रह्माचा अंश आहे. मद्गु नामक एक पक्षी तुला आणखी ज्ञान देईल." दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं तो पक्षी आला आणि सत्यकामाला तशीच वाणी ऐकूं आली– "मी तुला ब्रह्मासंबंधी थोडें ज्ञान देईन. प्राण हा ब्रह्माचा अंश आहे, चक्षु एक अंश आहे, श्रोत्र एक अंश आहे, मन ब्रह्माचा एक अंश आहे." तदनंतर सत्यकाम आपल्या गुरूंच्या आश्रमांत येऊन पोहोचला, आणि त्यांना सादर अभिवादन करून समोर उभा राहिला. आपल्या त्या शिष्याच्या मुखाकडे बघतांच ऋषि एकदम उद्गारले, "वत्सा, तुझ्या वदनावर ब्रह्मज्ञानाची प्रभा फाकलेली दिसत आहे. कुणीं बरें तुला हें ज्ञान दिलें?" सत्यकामाने उत्तर दिलें, "अ-मानवी व्यक्तींनी. पण गुरुदेव, आपल्या मुखांतून ब्रह्मविद्या श्रवण करावी अशी माझी इच्छा आहे. कारण मीं आपल्याचसारख्यांकडून ऐकलें आहे की गुरुमुखांतून ऐकलेल्या विद्येनेच श्रेयोलाभ होत असतो." त्यावर त्या ऋषींनी मग सत्यकामाला, त्याने पूर्वी त्या देवतांकडून ऐकलेली विद्याच फिरून ऐकविली.

आता वृषभाने काय शिकविलें, अग्नि, पक्षी इत्यादींनी काय शिकविलें यांतील रूपकाचा भाग वगळल्यास तत्कालीन विचारांची प्रवृत्ति आणि दिशा आपल्या लक्षांत येऊं शकते. एक महान् सत्य बीज-रूपाने आपल्याला येथे आढळतें तें हें की, ह्या सर्व आदेश-वाणी आपल्या आंतच असतात. ह्या सत्यांची आपल्याला जसजशी अधिक स्पष्ट जाणीव होईल तसतसें आपल्याला आढळून येईल की ही वाणी वस्तुत: आपल्या हृदयांतूनच निघत असते. आपण ऐकतों आहोंत तें सत्य आहे ह्याची सत्यकामाला जाणीव होती. तो सत्य ऐकत होता, परंतु तें आपण बाहेरून कुठूनतरी ऐकतों आहोंत ही जी त्याची धारणा होती ती मात्र बरोबर नव्हती. ती वाणी बाहेरून येत आहे असें त्याला वाटत होतें, पण वस्तुत: ती उमटत मात्र होती त्याच्या आंतूनच. ह्या कथेंतून दुसरें आणखी एक सत्य आपल्या प्रत्यय येत असेल तर तें म्हणजे, हें ब्रह्मज्ञान जीवनांत उतरवितां येतें,

हें होय. ह्या आपल्या कर्ममय जीवनांत वेदान्त उतरवितां येतो हें आपल्याला प्रस्तुत आख्यानावरून स्पष्ट दिसतें. धर्मापासून व्यवहारांत उपयोगीं पडूं शकेल असें काय काय लाभूं शकतें हें जग जाणूं इच्छीत असतें. ह्या सर्व कथांवरून, धर्म त्या लोकांच्या जीवनांत दिवसेंदिवस कसा अधिकाधिक उतरत होता, याची कल्पना येते. रोजच्या जीवनांत ज्या साऱ्या वस्तूंशीं शिष्याचा संबंध येत होता त्या सर्व परिचित वस्तूंमधूनच ब्रह्माची उपलब्धि करून घेण्याचें त्याला वळण लावण्यांत येत होतें. ज्यांत तुम्ही आहुति देतां तो अग्निच ब्रह्म होय, जीवर तुम्ही राहतां ती पृथ्वीच ब्रह्माचा अंश होय अशा तऱ्हेचें शिक्षण-वळण त्यांना देण्यांत येत असे.

यानंतरची गोष्ट आहे उपकोशल कमलायनाची. उपकोशल हा या सत्यकामाचा शिष्य होता. विद्याध्ययनार्थ तो कांही काल गुरुगृहीं वास करीत होता. त्या अवधींत सत्यकाम एकदा प्रवासार्थ बाहेर गेला. त्यामुळे शिष्याचें मन अगदी विषण्ण होऊन गेलें. गुरुपत्नीने येऊन 'तूं जेवत कां नाहीस' म्हणून विचारतांच त्याने उत्तर दिलें, "मला फार वाईट वाटत आहे, खाण्याची इच्छाच होत नाही." मग, तो ज्या वेळीं अग्नींत आहुति देत होता त्या वेळीं त्या अग्नींतून एक वाणी त्याला ऐकूं आली--"प्राण ब्रह्म आहे, आकाश ब्रह्म आहे, सुख ब्रह्म आहे. तूं ब्रह्म जाण." उपकोशल त्यावर म्हणाला, "भगवन्, प्राण ब्रह्म आहे हें मी जाणतों. परंतु ब्रह्मच आकाश आहे आणि ब्रह्मच सुख आहे हें मात्र मला अवगत नाही." त्यावर त्या वाणीने त्याला समजावून सांगितलें की आकाश आणि सुख या दोन्ही शब्दांचा अर्थ वस्तुत: एकच आहे, तो म्हणजे हृदयामधील चिदाकाश. याप्रमाणे ब्रह्मच प्राण, आकाश व सुख कसें आहे हें त्या वाणीने उपकोशलास विशद करून सांगितलें. पुढे तो अग्नि त्याला म्हणाला, "ज्यांची तूं उपासना करतोस ती ही पृथ्वी, अन्न, अग्नि आणि सूर्य हीं ब्रह्माचीं रूपें होत. सूर्यमंडलांत जो पुरुष आहे तो मीच. जो हें जाणतो आणि त्यावर ध्यान करतो त्याचीं समस्त पापें नाहीशीं होतात, दीर्घ जीवन लाभून तो सुखी होतो. जो ह्या दिशांमधे अवस्थित आहे, चंद्र, तारा आणि जल यांमधे अवस्थित आहे तो मीच. जो ह्या प्राणांत, आकाशांत,

स्वर्लोकांत आणि विद्युतांमधे वसत आहे तो मीच आहें." येथेदेखील धर्माची व्यवहार्यता आपल्या दृष्टीस पडते. अग्नि, सूर्य, चंद्र प्रभृति ज्या वस्तूंची ते उपासना करीत, आणि ज्या दैवी वाणीशीं ते परिचित होते त्याच साऱ्या गोष्टी ह्या कथांचे विषय होत. ह्या कथांमधून त्या वस्तूंचें स्वरूप स्पष्ट करून सांगितलें असून त्यांच्याकडे बघण्याची एक निराळी, एक अति उच्च दृष्टि देण्यांत येत आहे. आणि वेदान्ताची हीच खरीखरी व्यवहार्य बाजू होय. वेदान्त जग उडवून देत नाही, तर तो त्याचें स्व-रूप खरोखर काय आहे हें स्पष्ट करून सांगतो. वेदान्त व्यक्तित्व उडवून देत नाही, तर त्याचें स्वरूप स्पष्ट करून सांगतो. वेदान्त 'मी'चा नाश करीत नाही, तर खराखरा 'मी' कोणता हें दाखवून देतो. हें जग व्यर्थ आहे, त्याला अस्तित्व नाही असें वेदान्त म्हणत नाही. वेदान्त एवढेंच म्हणतो की "हें जग खरोखर काय आहे हें जाणून घ्या, म्हणजे तें तुमचें अनिष्ट करूं शकणार नाही, तुम्हांला घायाळ करूं शकणार नाही." त्या दैवी वाणीने सत्यकामाला किंवा उपकोशलाला असें सांगितलें नाही की, तुम्ही ज्याची उपासना करीत आहां तो अग्नि, वा सूर्य, वा चंद्र, वा विद्युत्, वा इतर साऱ्या वस्तु अगदी चुकीच्या आहेत. त्या वाणीने त्यांना एवढेंच दाखवून दिलें की जें चैतन्य सूर्यांत, चंद्रांत, विद्युतांत, अग्नींत आणि पृथ्वींत आहे तेंच त्यांच्यांतहि आहे. आणि ह्या ज्ञानाने त्या सर्व रोजच्या परिचयाच्या वस्तूंकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन अजीबात बदलून गेला. त्या वस्तु मग त्यांना एका अगदी निराळ्याच स्वरूपांत दिसूं लागल्या. ज्यांत ते आहुति देत तो जड, भौतिक अग्नि आता त्यांच्या दृष्टीने जड किंवा भौतिक राहिला नाही. आता त्यांना तो वेगळाच दिसूं लागला, आता त्यांच्यापक्षीं तो साक्षात् ब्रह्म——स्वयं भगवान होऊन गेला. पृथ्वी त्यांना निराळी दिसूं लागली, प्राण निराळा दिसूं लागला, सूर्य, चंद्र, तारे, विद्युत् सर्वकांही निराळें दिसूं लागलें, सर्व ब्रह्ममय, ब्रह्मस्वरूप दिसूं लागलें. त्या सर्व वस्तूंचें खरें स्वरूप त्यांना कळलें. वेदान्ताची मुख्य शिकवणच ही आहे—— सर्व वस्तूंत परमेश्वर पाहणें, वस्तूंच्या वरवर भासणाऱ्या रूपांचा त्याग करून त्यांचें यथार्थ स्व-रूप आकलणें. उपनिषदांत आणखी

असेंहि सांगितलें आहे की, "चक्षूंमधे ज्याची दीप्ति दिसत आहे, तें ब्रह्म होय. तें रमणीय आहे, तें ज्योतिर्मय आहे. हें समस्त जग त्या ज्योतिर्मयाचाच प्रकाश होय." याचा अर्थ सांगतांना एक भाष्यकार म्हणतो—"पवित्र व्यक्तीच्या ठायीं जें एक विशिष्ट तेज असतें त्यालाच येथे डोळयांतील दीप्ति म्हटलें आहे. पवित्र माणसाच्या डोळयांत असें तेज येतें असें म्हणतात. हें तेज किंवा ही दीप्ति वस्तुत: त्या आत्म्याची असते. तो आत्मा सर्वत्र प्रकाशमान आहे. ग्रहनक्षत्रें, चंद्रसूर्यतारे यांच्यांतील तेजहि तेंच तेज होय—आत्म्याचीच दीप्ति होय."

जन्म, मृत्यु इत्यादींसंबंधी या प्राचीन उपनिषदांमधील कांही सिद्धान्त मी आता तुम्हांला निवेदन करतों. तुम्हांला कदाचित् ते आवडतील असें वाटतें. श्वेतकेतु पांचालांच्या राजाकडे गेला असतां राजाने त्याला विचारलें, "लोक मृत्यूनंतर कुठे जातात हें तुला अवगत आहे काय ? ते फिरून या लोकीं कसें परत येतात तें तुला अवगत आहे काय ? तो परलोक तेथे जाणाऱ्या लोकांनी भरून कां जात नाही हें तुला अवगत आहे काय ?" आपल्याला हें माहीत नसल्याचें श्वेतकेतूने राजाला सांगितलें. मग श्वेतकेतु तेथून आपल्या पित्याकडे परत गेला व त्याने आपल्या पित्याला तेच प्रश्न विचारले. आपल्यालाहि त्या प्रश्नांचीं उत्तरें ठाऊक नाहीत असें पित्याने श्वेत-केतूला सांगितलें. मग ते दोघेहि राजाकडे गेले. राजा त्यांना म्हणाला की ही विद्या पुरोहितांना कधीच ज्ञात नव्हती. ती फक्त राजांनाच अवगत होती, आणि म्हणूनच ते जगावर राज्य करीत होते. मग ते उभयतां राजाकडेच राहिले व कांही दिवसांनी राजा त्यांना ती विद्या द्यावयास तयार झाला. राजा म्हणाला, "गौतमा, परलोक हा अग्नि आहे. सूर्य हा त्याचें इंधन आहे. सूर्यकिरणें त्या अग्नीचा धूम आहे. दिवस हा त्याची ज्वाला आहे. चंद्र त्याचा निखारा आहे. आणि तारे त्याचे स्फुलिंग आहेत. ह्या अग्नींत देवता श्रद्धेची आहुति टाकतात, आणि त्या आहुतींतून राजा सोम जन्मतो." राजा पुढे सांगू लागला—"तुम्ही ज्या ह्या अग्नीची उपासना करतां तो वस्तुत: अगदी

य:कश्चित् होय. ही पृथ्वी अग्नि आहे. संवत्सरें (वर्षें) त्या अग्नीचें इंधन होत. रात्र त्या अग्नीचा धूर होय. दिशा त्याच्या शिखा (ज्वाला) होत. उपदिशा त्याचे स्फुलिंग होत. या अग्नींत देवता वृष्टिरूप आहुति टाकीत असतात. त्यांतून अन्न उत्पन्न होतें." राजा प्रवाहण त्या पिता-पुत्रांना याप्रमाणे पुष्कळ उपदेश देऊं लागला. त्या साऱ्याचें तात्पर्य हेंच की, तुम्ही या क्षुद्र अग्नींत होम करण्याची कांहीच आवश्यकता नाही. समस्त जगच एक अग्नि असून त्यांत अहोरात्र आहुति देणें चालू आहे. देव, देवता, मानव सर्वच अहोरात्र त्याची उपासना करीत आहेत. राजा अखेर म्हणाला, "हे गौतमा, मनुष्यच त्या अग्नीचें सर्वांत श्रेष्ठ प्रतीक होय. मनुष्यशरीरच सर्वश्रेष्ठ अग्नि होय." येथेदेखील आपल्याला आदर्श प्रत्यक्षांत उतरविलेला दिसत आहे, सर्व वस्तूंविषयी ब्रह्मदृष्टि प्रतिपादित होतांना आढळत आहे. सर्व वस्तूंत ब्रह्म कसें बघावयाचें हें या गोष्टींतून स्पष्ट केलें जात आहे. ह्या सर्व कथांमधून एक सिद्धान्त अत्यंत प्रामुख्याने आपल्या निदर्शनास येतो तो हा की, मानवाने निर्मिलेलीं प्रतीकें चांगलीं असतील, त्यांची आपल्याला मदतहि होत असेल, पण माणसाने बनविलेल्या या प्रतीकांपेक्षा कितीतरी अधिक चांगलीं प्रतीकें आधीचींच विद्यमान आहेत. ईश्वराची उपासना करण्यासाठी एखादी प्रतिमा तुम्ही खुशाल निर्माण करा, पण तिच्याहिपेक्षा कितीतरी अधिक चांगली प्रतिमा आधीचीच अस्तित्वांत आहे. आणि ती श्रेष्ठ प्रतिमा म्हणजे मनुष्य--जिवंत माणूस. ही परमेश्वराची सजीव, चालतीबोलती प्रतिमा होय. ईश्वराच्या पूजेसाठी एखादें मंदिर निर्माण करावयाचें असेल तर तें खुशाल करा. त्याला कांही हरकत नाही, तें चांगलेंच आहे. पण लक्षांत असूं द्या की त्यापेक्षा अधिक चांगलें, त्यापेक्षा कितीतरी श्रेष्ठ मंदिर आधीचेंच अस्तित्वांत आहे. तें म्हणजे--मानवशरीर.

तुमच्या स्मरणांत असेलच की वेदांचे दोन भाग आहेत. पहिला कर्मकांड आणि दुसरा ज्ञानकांड. कालाच्या ओघांत हें कर्मकांड इतकें वाढलें आणि इतकें गुंतागुंतीचें झालें की अखेर तो गुंता सोडविणें आणि त्यांतून वाट काढणें जवळजवळ अशक्यच होऊन बसलें. आणि म्हणून, उपनिषदांत हें कर्मकांड जवळजवळ पूर्णपणें दूर सारल्याचें आपल्याला

आढळून येतें. पण तें किती हळुवारपणें—त्या कर्मानुष्ठानांचा खरा, अंतर्गत अर्थ काय हें सांगून. उपनिषदांपूर्वीच्या काळांत यज्ञयागादि कर्मकांड खूप प्रचारांत होतें. उपनिषत्कालीं तत्त्वज्ञानाचा उदय झाला. त्या तत्त्वज्ञ ऋषींनी काय केलें ? सुदैवाने, आजकालच्या आमच्या सर्वज्ञ समाजसुधारकांप्रमाणे त्यांनी त्या जुन्या रूढ यज्ञयागादि कर्मांविरुद्ध टीकेची झोड उठविली नाही. आजकालच्या एकजात समस्त समाजसुधारकांसारखी केवळ निषेधकाची विघातक, भंजक भूमिका त्यांनी घेतली नाही. हे सारे यागयज्ञ खोटे म्हणून उडवून देण्याचा त्यांनी सपाटा चालविला नाही. सामान्य अज्ञजन जीं प्रतीक-प्रतिमा-कर्मे घेऊन आपलें जीवन घालवीत होते, तीं त्यांनी त्यांच्या हातून हिसकावून घेतलीं नाहीत. तर त्या साऱ्यांचा खरा अर्थ, त्यांचें तात्पर्य त्यांना समजावून देऊन, खरोखर मग कशाच्या आश्रयाने जीवन घालवावयास हवें हें त्यांना दाखवून दिलें. त्यांची भूमिका रचनात्मक, विधायक होती. एक अनिष्ट वस्तु काढून घेतांना दुसरी इष्ट वस्तु त्यांनी त्यांच्या हातीं दिली. त्यांनी लोकांना सांगितलें, "तुम्ही या अग्नींत हवन करतां. तो तुमचें प्रतीक होय. ठीक, चांगलें आहे तें प्रतीक. पण त्यापेक्षा कितीतरी चांगलें, कितीतरी श्रेष्ठ, कितीतरी उदात्त आहे ही आपली पृथ्वी. हें तुमचें लहानसें मंदिर घ्या. चांगलें आहे तें. परंतु वस्तुतः हें समस्त ब्रह्माण्डच एक मंदिर नाही काय ? त्यांत तुम्ही कुठेहि पूजा करा. तुम्ही जमिनीवर नाना आकृत्या काढतां, त्यांवर वेद्या उभारतां. परंतु सर्वांत श्रेष्ठ वेदी आहे मनुष्यदेह—जिवंत, सचेतन मनुष्यदेह. ह्या सजीव वेदीवरील पूजा इतर कोणत्याहि जड, निर्जीव प्रतीकाच्या पूजेपेक्षा कितीतरी चांगली, कितीतरी श्रेष्ठ, किती उच्च नि उदात्त नव्हे काय ?"

उपनिषदांतील आणखी एका सिद्धान्ताचा मी येथे उल्लेख करतों. तो अमळ चमत्कारिक आहे. त्याचा उलगडा मला स्वतःलाहि तितकासा झालेला नाही. तुम्हांला मी तो सांगतों. बघा तुम्हांला त्याचा कांही अर्थबोध झाला तर. ध्यानाभ्यास करून चित्त शुद्ध झाल्याने (सगुण ब्रह्माचें) ज्ञान लाभून जी व्यक्ति देह सोडते ती क्रमाने प्रथम अर्चि, तेथून दिन, तेथून शुक्लपक्ष, तेथून उत्तरायण, तेथून संवत्सर, तेथून

सूर्यलोक, तेथून चंद्रलोक, आणि तेथून विद्युल्लोकाप्रत जाते. विद्युल्लोकांत एक अमानवी पुरुष तिला भेटतो आणि तिला ब्रह्मलोकांत घेऊन जातो. या मार्गाला 'देवयान' म्हणतात. ज्ञानी सत्पुरुष मृत्यूनंतर या मार्गानें जातात, आणि (कल्पान्तापर्यंत) ते तेथून परत येत नाहीत. हे शुक्लपक्ष, संवत्सर वगैरे काय आहेत हें कुणालाच नीट कळत नाही. प्रत्येकजण स्वत:च्या मतें त्यांचा अर्थ लावतो. कित्येकांच्या मतें ह्या साऱ्याला कांही अर्थच नाही! हें सूर्यलोकीं, चंद्रलोकीं जाणें, हें विद्युल्लोकीं अमानवी पुरुषाचें भेटणें वगैरेंचा काय अर्थ आहे हें नीट कुणालाच माहीत नाही. हिंदूंमधे अशी एक धारणा प्रचलित आहे की चंद्रलोकीं प्राण्यांचा वास असून तेथून खाली येऊन ते पृथ्वीवर जन्मतात. 'देवयान' मार्गानें जाणाऱ्या व्यक्तीप्रमाणे ज्यांना ज्ञान लाभलेलें नाही, पण ज्यांनी आयुष्यांत चांगलीं कर्में केलीं आहेत असे लोक मृत्यूनंतर प्रथम धूम, तेथून रात्र, तेथून कृष्णपक्ष, तेथून दक्षिणायन आणि तेथून संवत्सर या मार्गानें पितृलोकीं जातात. पितृलोकाहून आकाश आणि आकाशाहून चंद्रलोक याप्रमाणे ते पुढे जातात. तेथे ते देवतांचें खाद्य होऊन शेवटीं त्यांना देवजन्म लाभतो. पुण्यसंचय संपेपर्यंत ते मग तिथे वास करतात. पुण्यकर्मांचें फल उपभोगून संपतांच ते त्याच मार्गानें परत इहलोकीं—पृथ्वीवर येतात. ते प्रथम आकाशांत परिणत होतात, नंतर वायूंत, नंतर धूमादींत, नंतर मेघांत, आणि मेघांतून पावसाबरोबर ते पृथ्वीवर येतात. तेथे ते धान्यादिकांवर पडून त्याबरोबर माणसांच्या शरीरांत जातात आणि अखेर त्यांच्या पोटीं जन्माला येतात. ज्यांचीं कर्में खूप चांगलीं असतील त्यांना चांगल्या कुळांत जन्म येतो आणि ज्यांचीं कर्में वाईट असतील त्यांना वाईट जन्म येतो, फार काय पण त्यांना पशूंचा देखील जन्म येतो. आणि जे सारे या देवयान वा पितृयान ह्या दोहोंपैकी कोणत्याच मार्गानें जाऊं शकत नाहीत ते ह्याच लोकीं पुन:पुन: जन्मतात आणि पुन:पुन: मरतात. म्हणूनच ही पृथ्वी कधीहि अगदी भरून जात नाही आणि कधीहि अगदी रिकामी होत नाही.

ह्या साऱ्यांतूनहि कांही सिद्धान्त निघूं शकतात. पुढे कदाचित् या साऱ्याचा आणखी उलगडा होऊं शकेल. सध्या आपण ह्यांतून

काय निष्कर्ष निघण्यासारखे आहेत यावर अमळ विचार करूं. वरील एकूण वर्णनांतील दुसरा भाग, म्हणजे, जीव स्वर्गांत गेल्यानंतर तेथून कसे परत येतात हा भाग पहिल्या भागापेक्षा, म्हणजे ते येथून स्वर्गांत कसे जातात यापेक्षा समजण्यास जरा सोपा आहे, बराच स्पष्ट आहे असें म्हणतां येईल. परंतु ह्या साऱ्याचें एक ढोबळ तात्पर्य, या वर्णनांतील मुख्य कल्पना अशी दिसते की भगवत्-दर्शनाखेरीज, ब्रह्मानुभूतीखेरीज नित्य, अक्षय असें कांहीच नाही; कितीहि श्रेष्ठ असला तरी स्वर्गलोक अनित्य आहे, त्याला क्षय आहे. ब्रह्मानुभूतीखेरीज नित्य असें कुठेच कांहीहि नाही. वस्तुस्थिति अशी आहे की, ज्यांना भगवत्‌दर्शन वा ब्रह्मानुभूति झालेली नाही, परंतु ज्यांनी फलभोगाच्या इच्छेने इहलोकीं सुकर्म केलें आहे, असे लोक मृत्यूनंतर एका विशिष्ट मार्गानें स्वर्गलोकीं जाऊन पोहोचतात. आणि इथे आपला जसा जन्म होतो तसाच तिथे त्यांचा होतो. तिथे देवांच्या पोटीं ते जन्मास येतात आणि स्वतःचें पुण्यकर्म संपेपर्यंत त्या लोकीं वास करतात. या साऱ्यावरून वेदान्ताचा एक मूलभूत सिद्धान्त स्पष्ट होतो. तो असा की, ज्याला म्हणून नाम आणि रूप आहे तें अनित्य, नश्वर असतें. इहलोक अथवा ही आपली धरित्री नश्वर आहे, कारण तिला नाम आणि रूप आहे. त्याचप्रमाणे स्वर्गहि नश्वरच असला पाहिजे, कारण त्यालाहि नाम आणि रूप आहेच. 'नित्य स्वर्ग' म्हणून कांही असूंच शकत नाही. ती कल्पनाच मुळी चुकीची आहे, स्व-विरोधी आहे. कारण, ज्याला ज्याला नाम-रूप आहे तें तें कालाच्या ओघांत केव्हातरी उत्पन्न झालें असलें पाहिजे, कांही काल टिकणार आहे आणि कालावधीने नाहीसें होणार आहे. वेदान्ताचा हा अगदी निश्चित सिद्धान्त आहे. आणि म्हणूनच उपनिषदांनी स्वर्गाची कल्पना बाजूस सारली आहे.

ज्याला 'संहिता' म्हणतात, त्या उपनिषदांच्या आधीच्या वेद-भागांत नित्य स्वर्गाची कल्पना आढळून येते. संहितेंतील हा नित्य स्वर्ग पुष्कळसा मुसलमानांच्या आणि ख्रिस्त्यांच्या स्वर्गासारखा आहे. मुसलमानांची स्वर्गाची कल्पना बरीच स्थूल आहे. त्यांच्या मतें स्वर्गांत अनेक उद्यानें असून, त्यांच्याजवळून नद्या वाहतात. अरबस्तानाच्या वाळवंटांत पाण्याची फार टंचाई, म्हणून मुसलमानांनी कल्पिलेल्या

स्वर्गांत भरपूर पाणी असावें हें साहजिकच आहे. मी जिथे जन्माला आलों आहें, तिथे वर्षांतून सहा महिने सतत वृष्टि होत असते. मी ज्या स्वर्गाची कल्पना करीन तो अमळ कोरडाच असेल! मला वाटतें, तुम्हां इंग्रजांचा स्वर्गहि बहुधा तसाच राहील. संहितेंत वर्णिलेला स्वर्ग नित्य आहे. मृत व्यक्ति तिथे गेल्यानंतर त्यांना तिथे सुंदर शरीरें लाभतात आणि आपल्या पितरांसह ते तिथे चिरकाल सुखांत नांदतात. तिथे त्यांना त्यांचे मातापिते, स्त्री-पुत्र व इतर आप्तस्वजन भेटतात. आपण जसे इथे या लोकीं जगतों, तसेच तेहि तिथे राहतात. फरक इतकाच की तिथे ते आपल्यापेक्षा फार सुखांत असतात. सुखाच्या मार्गांतील इहलोकींच्या साऱ्या अडचणी आणि अडथळे तिथे असत नाहीत. इथल्या सुखाचा फक्त चांगला, अनुकूल, उपभोग्य भागच तिथे असतो. परंतु, मानवाला ही अवस्था कितीहि सुखकर वाटली तरी सत्य आणि सुख ह्या दोन अगदी वेगळ्या गोष्टी आहेत. सत्याचा संपूर्ण लाभ होईपर्यंत तें सुखदायक होत नसतें. माणूस हा स्वभावानें फार स्थितिशील प्राणी आहे. आहे तें त्याला सोडावेसेंच वाटत नाही. एखादी गोष्ट तो करतो. आणि एकदा ती केली की मग ती सोडणें, तिचा त्याग करणें त्याच्या जिवावर येतें. तें त्याला फार जड जातें. मन नवीन विचार स्वीकारूं इच्छीत नाही, कारण त्यांनी त्याच्या सुखांत, त्याच्या आरामांत व्यत्यय येतो. ते त्याला त्रासदायक वाटतात.

संहितांपेक्षा उपनिषदांचें वातावरण अगदीच भिन्न आणि वेगळें असल्याचें आपल्या प्रत्ययास येतें. ह्या स्वर्गादिकांकडे बघण्याची उपनिषदांची दृष्टि अगदीच निराळी आहे. उपनिषदें घोषणा करतात की, लोक मृत्यूनंतर आपल्या पितरांसह जिथे वास करतात ते स्वर्ग नित्य असणें शक्य नाही. कारण ते नामरूपात्मक आहेत, आणि नाम-रूप असलेली प्रत्येक वस्तु अनित्य असते. ह्या स्वर्गांना ज्याअर्थी रूप आहे त्याअर्थी कालाच्या ओघांत ते नष्ट झालेच पाहिजेत. त्यांचा नाश कदाचित् लवकर होणार नसेल, लक्षावधि वर्षें कदाचित् ते टिकतील. पण असा एक ना एक दिवस येईलच की ज्या दिवशीं ते नाहीसे होतील. या स्वर्गांसंबंधी आणि तेथे गमन करण्यासंबंधी उपनिषदें आणखी अशीहि घोषणा करतात की, तिथे जाणाऱ्या सर्व

जीवांना फिरून ह्या आपल्या पृथ्वीतलावर परत यावेंच लागतें. स्वर्ग म्हणजे केवळ भोगभूमि—आपण इहलोकीं केलेल्या पुण्यकर्मांचें फल उपभोगण्याचें स्थान. तें फल भोगून होतांच त्या व्यक्ति इहलोकीं फिरून जन्माला येतात. यावरून एक गोष्ट स्पष्ट दिसते की मानव-जातीला त्या तेवढ्या प्राचीन काळींहि कार्य-कारणाचें तत्त्व अवगत होतें. पुढे आमच्या तत्त्वज्ञांनी तेंच तत्त्व तत्त्वज्ञानाच्या आणि न्यायाच्या भाषेंत विशद केल्याचें आपल्याला आढळून येईल. इथे तेंच अस्फुट, अस्पष्टभावें व्यक्त झालें आहे. ह्या उपनिषदांचें अनुशीलन करतांना एक गोष्ट तुम्हांला जाणविल्याखेरीज राहणार नाही. ती ही की, त्यांत वर्णिलेलीं सत्यें हीं त्या ऋषींना स्वतःच्या अंतःकरणांत आलेल्या अनुभूति होत. हीं सत्यें आचरणांत आणतां येतील किंवा नाही हें जर कुणीं मला विचारलें तर त्याला मी सांगेन की वस्तुस्थिति अशी आहे की हीं सारीं आधी आचरणांत आणलीं गेलीं आहेत आणि मग नंतर त्यांना तत्त्वज्ञानाचें रूप लाभलें आहे. वस्तुस्थिति अशीच आहे की ह्या सत्यांची प्रथम उपलब्धि करून घेण्यांत आली आहे. तीं जीवनांत उतरविण्यांत आलीं आहेत, आणि मग नंतर तीं लिहिलीं गेलीं आहेत. हें समस्त विश्वब्रह्माण्ड त्या प्राचीन ऋषींशीं बोलत असे—त्यांना आपलें हृदय उघडून दाखवीत असे, आपलें रहस्य उलगडून दाखवीत असे. पक्षी त्यांच्याशीं बोलत, पशु त्यांच्याशीं बोलत, चंद्रसूर्य त्यांच्याशीं बोलत. हळूहळू त्यांना सत्याचा अनुभव येत गेला, विश्वप्रकृतीच्या अंतर्यामीं त्यांचा प्रवेश झाला—तिच्या गूढांचा त्यांनी वेध घेतला. तर्काच्या कोलांट्या मारून कांही अनुमानें स्थापण्यांत ते गर्क झाले नाहीत. आजकाल लोक करतात त्याप्रमाणे इतरांचे विचार एके ठिकाणीं जमवून भलें थोरलें पुस्तक लिहिण्यांतहि त्यांनी कृत-कृत्यता नि धन्यता मानली नाही. किंवा, त्यांचाच एखादा विचार घेऊन मी ज्याप्रमाणे लांबलचक व्याख्यान देत आहें तसेंहि त्यांनी कांही केलें नाही. तर, शांतपणें अनुसंधान करीत त्यांनी सत्य शोधून काढलें. सत्याविष्काराचा त्यांचा मुख्य उपाय होता—प्रत्यक्ष आचरण. आणि सत्याविष्काराचा नेहमी हाच उपाय असणार. धर्म हा नेहमीच प्रत्यक्ष आचरणावर आधारलेला असतो. मतें किंवा वाद

यांत धर्म कधी नव्हता आणि कधी असणारहि नाही. प्रथम आचरण वा साधना, आणि मग ज्ञान—हाच धर्मलाभाचा चिरंतन क्रम होय. असो तर, आपण पाहिलेंच की, पुण्य संपल्यावर जीव इहलोकीं परत येतात ही कल्पना त्या काळींहि विद्यमान होती. फललाभाच्या कामनेने जे लोक चांगलीं कर्मे करतात त्यांना तें तें फल लाभतें खरें, परंतु तें फल नित्य नसतें. ह्या ठिकाणीं कार्यकारणवाद मोठ्या सुंदर रीतीने व्यक्त होत आहे. कार्य आणि कारण हीं समान असतात, कार्य हें कारणाच्या अनुसारच असतें ही कल्पना ह्या ठिकाणीं व्यक्त होत आहे. जसें कारण असेल, तसेंच कार्यहि निष्पन्न होईल. कारण जर अनित्य असेल तर कार्यहि अनित्यच असणार. कारण जर नित्य असेल तर त्यांतून निष्पन्न होणारें कार्यहि नित्य असूं शकेल; परंतु सत्कर्मे करणें वगैरे कारणें सान्त, ससीम व अनित्य स्वरूपाचीं असल्यामुळेच त्यांचें फल कदापि नित्य वा अनंत होणें शक्य नाही.

या मुद्याला आणखी एक बाजू आहे. तिचा आता आपण विचार करूं. ज्या कारणामुळे नित्य स्वर्ग असणें शक्य नाही, त्याच कारणामुळे नित्य नरकहि असणें शक्य नाही. समजा की मी एक अत्यंत दुष्ट माणूस असून माझ्या आयुष्याचा प्रत्येक क्षण कुकर्म करण्यांत जात आहे. तथापि, माझें या जन्मींचें जीवन हें माझ्या अनंत जीवनाच्या मानाने कांहीच नव्हे. ह्या माझ्या एका जन्मांतील दुष्कृत्यांनी जर मला अनंत नरक लाभेल असें म्हटलें तर सान्त कारणापासून अनंत कार्य वा फल निष्पन्न झालें असें म्हणावें लागेल. पण तसें होणें शक्य नाही. त्याचप्रमाणे, या जन्मांत आयुष्यभर सुकर्म करीत गेल्याने मला अनंत स्वर्ग लाभेल हें म्हणणेंहि तितकेंच चुकीचें होईल. वर वर्णिलेल्या देवयान आणि पितृयान या दोन मार्गांव्यतिरिक्त आणखी एक तिसरा मार्ग आहे. ज्यांनी सत्य जाणलें आहे, ज्यांना सत्याची प्रत्यक्ष अनुभूति झाली आहे त्यांचा हा मार्ग होय. सत्याची अशी प्रत्यक्ष अनुभूति करून घेणें हाच ह्या मायेच्या आवरणापलीकडे जाण्याचा एकमेव मार्ग होय. ही 'सत्याची अनुभूति' म्हणजे काय हें उपनिषदांत विशद करून सांगण्यांत आलें आहे.

सत्याची अनुभूति म्हणजे भलें आणि बुरें दोन्हीं वस्तुतः सत्य

नसून सर्वकांही आत्म्याचा प्रकाश आहे, सर्व वस्तूंत आणि सर्व कार्यांत आत्मा विद्यमान आहे असा प्रत्यय येणें. सत्याची अनुभूति म्हणजे हें विश्व अस्तित्वांतच नाही असें जाणणें, बाह्यदृष्टि बंद होणें, स्वर्गांत आणि नरकांत दोन्ही ठिकाणीं भगवंताचा वास आहे हें जाणणें, जीवनांत आणि मरणांत दोन्हींत त्या प्रभूची उपलब्धि करून घेणें. मीं आतापर्यंत उपनिषदांतील जीं वचनें उद्धृत केलीं त्या साऱ्यांचें मर्म हेंच होय——ही पृथ्वी त्या भगवानाचा एक अंश आहे, द्युलोक, भूलोक सर्व तो भगवानच आहे. जें कांही आहे तें समस्त ब्रह्मच होय. आणि ह्या सत्याचा साक्षात्कार व्हावयास हवा, त्याची प्रत्यक्ष अनुभूति व्हावयास हवी, त्याची केवळ पोपटपंची केल्याने किंवा त्याचा नुसता विचार करीत बसल्याने कांही व्हावयाचें नाही. हें चराचर विश्व त्या भगवंताने भरलेलें आहे, हें सर्व विश्व ब्रह्ममय आहे अशी ज्याला प्रतीति आली आहे तो, आपण स्वर्गांत जाऊं की नरकांत की आणखी कुठे, याची तिळमात्र पर्वा करणार नाही हें काय निराळें सांगावयास हवें ? इहलोकीं जन्म येतो की स्वर्गांत, ह्याची त्याला कांहीच पर्वा नसते हें ओघानेच आलें. इहलोकीं जन्म की स्वर्गलोकीं जन्म इत्यादि त्याच्या लेखीं अगदी अर्थशून्य घटना होऊन बसतात. कारण त्याच्या दृष्टीने आता सर्वच लोक, सर्वच जागा सारख्या असतात. सर्व ठिकाणें त्याच्या दृष्टीने आता भगवंताचीं मंदिरें होत, सर्वच स्थानें आता त्याला पवित्र असतात. स्वर्गांत काय, नरकांत काय की आणखी कुठेहि काय, सर्वत्र त्याच्या आता प्रत्ययाला येत असतो केवळ भगवानच. '**सर्वं ब्रह्म-मयं जगत्**.' भलें-बुरें, जन्म-मरण सर्व त्याच्या दृष्टीपुढून अंतर्धान पावतें, त्याऐवजी सर्वत्र त्याच्या प्रत्ययास येऊं लागतो भगवान——एकमात्र ब्रह्मच.

वेदान्ताच्या मतें, माणसाला हा असा अनुभव आल्याने तो मुक्त होतो, आणि ह्या जगांत वावरण्यास तोच खरोखर पात्र होय. इतर लोक ह्या जगांत वावरण्यास खरोखर पात्रच नव्हत असें वेदान्ताचें मत आहे. ज्याच्या दृष्टीला जगांत अशुभ, अशिव दिसतें, तो काय बरें ह्या जगांत वास करूं शकणार, काय येथे वावरूं शकणार? अशाचें जीवन दुःखाचें झाल्याखेरीज कसें बरें राहील? ज्याला संकटांचा, विघ्नांचा

बोध आहे त्याचें जीवन दुःखमय होणारच. ज्याला मृत्यु सत्य वाटतो त्याचें जीवन दुःखी होणार यांत कसला संशय? ज्याला सत्याचा साक्षात्कार झाला आहे, वस्तुमात्राठायीं तें एकच सत्य ओतप्रोत भरून असलेलें ज्याच्या अनुभवास आलें आहे तोच ह्या जगांत राहूं शकेल; केवळ तोच म्हणूं शकेल की मी जीवन उपभोगीत आहें, त्याचा आस्वाद घेत आहें, मी सुखी आहें, माझें जीवन संतोषाचें आहे. ओघांत आलें म्हणून सांगतों की, वेदामधे नरकाचा उल्लेख कुठेहि आढळत नाही. बऱ्याच नंतर, पुराणांमधे तो आढळतो. वेदांच्या मतें सर्वांत मोठी शिक्षा म्हणजे फिरून जन्मास यावें लागणें, फिरून ह्या जगांत मुक्तीसाठी धडपड करण्याचें कपाळीं येणें, ही होय. सत्याच्या वा परमेश्वराच्या कल्पनेला वेदांत प्रथमपासूनच निर्गुणाचें स्वरूप येत असल्याचें तुम्हांला आढळून येईल. दंड आणि पुरस्कार यांची कल्पना अगदीच स्थूल, पार्थिव आहे. एकावर प्रेम आणि दुसऱ्याचा तिरस्कार करणाऱ्या सगुण, मानवसदृश ईश्वराच्या कल्पनेशींच ही दंड-पुरस्काराची कल्पना सुसंगत असूं शकते. असा मानवी ईश्वरच तुमच्या-आमच्यासारखा पक्षपात करीत एकाला शिक्षा तर दुसऱ्याला बक्षीस देऊं शकेल. संहितेंतला ईश्वर असाच आहे. आणि म्हणूनच संहितेंतील भक्ति ही भयमिश्रित भावना असल्याचें आपल्या प्रत्ययास येतें. परंतु उपनिषदांमधे ही भयाची भावना पार लोपलेली दिसते, आणि त्या-बरोबरच ईश्वराच्या निर्गुणत्वाची कल्पनाहि उदयास आलेली आढळते. ही निर्गुणत्वाची कल्पना आकळणें अत्यंत कठीण गोष्ट आहे, कारण सगुण व्यक्तीला कवटाळणें हा मानवी स्वभाव आहे. थोर तत्त्वचिंतक म्हणून नाणावलेल्या मोठमोठ्या व्यक्तींनाहि ही निर्गुणत्वाची कल्पना रुचत नाही, त्यांना तिचा तिटकारा वाटतो. पण मला स्वतःला सगुण, मानवी ईश्वराची कल्पनाच कशी हास्यास्पद वाटते. माझ्या मतें तर ही ईश्वराची थट्टा करणें होय. कोणती कल्पना श्रेष्ठ आहे—जिवंत ईश्वराची की मृत ईश्वराची? ज्याला कोणी पाहूं शकत नाही, ज्याला कोणीहि जाणूं शकत नाही असा ईश्वर श्रेष्ठ की जाणतां येणारा ईश्वर श्रेष्ठ?

निर्गुण ईश्वर हा जिवंत ईश्वर आहे, तो एक तत्त्व आहे. सगुण

आणि निर्गुणांत फरक हाच की सगुण ईश्वर हा फक्त एक मानव असतो तर निर्गुण ईश्वर हा देवता, मानव, जनावरें सारें कांही असतो, आणि शिवाय आपल्या प्रत्ययापलीकडेहि आणखी कांही तो असतो. कारण निर्गुणांत सगुणाचा अंतर्भाव होतो. या विश्वांत जें कांही आहे त्या साऱ्याचा निर्गुण ईश्वरांत अंतर्भाव होतो; निर्गुण ईश्वर या साऱ्यांची समष्टि आहे आणि आणखीहि केवढातरी आहे. तो व्यष्टि आहे, समष्टि आहे आणि समष्टीच्या अतीतहि आहे. 'एकच अग्नि ह्या जगांत नाना रूपांनी प्रकटत असतो आणि त्या समस्त रूपांव्यतिरिक्तहि तो असतोच.' निर्गुणाचें स्वरूपहि असेंच आहे.

आपल्याला जिवंत ईश्वराची पूजा करावयाची आहे. मीं काय किंवा तुम्हीं काय, आपण आयुष्यभर खरोखर ईश्वराखेरीज आणखी कांहीच पाहिलेलें नाही, वस्तुतः ईश्वराखेरीज आणखी कशाशींच आयुष्यांत आपला संबंध आलेला नाही. ह्या खुर्चीचा प्रत्यय येण्यासाठी आधी तुम्हांला ईश्वराचा प्रत्यय यावा लागतो आणि मग त्याच्याद्वाराच तुम्हांला ह्या खुर्चीचा प्रत्यय येत असतो. तोच सर्वत्र भरला असून, सर्वांच्या तोंडून 'मी आहें' 'मी आहें' असें म्हणत आहे. ज्या क्षणीं 'मी आहें' असा तुम्हांला बोध होतो त्या क्षणीं तुम्हांला 'सत्ते'ची जाणीव झालेली असते. ईश्वर जर आपल्याला आपल्या स्वतःच्या हृदयांत आणि प्राणिमात्राच्या ठायीं दिसूं शकला नाही तर त्याला बघायला मग आपण आणखी कुठे बरें जायचें? "**त्वं स्त्री त्वं पुमान् असि, त्वं कुमार उत वा कुमारी। त्वं जीर्णो दण्डेन वञ्चसि, त्वं जातो भवसि विश्वतोमुखः**"— "तूंच स्त्री आहेस, तूंच पुरुष आहेस. बालक-बालिका, तरुण-तरुणीहि तूंच आहेस. काठीच्या आधाराने रखडत चालणारा वृद्धहि तूंच. तूंच सर्वत्र सर्व रूपांनी जन्म घेत आहेस." 'जें कांही आहे तें सारें तूंच'— किती अपरूप, जिवंत ईश्वर हा! जगांत त्याच्याखेरीज आणखी कांही वस्तुच नाही! ईश्वर कुठेतरी एका आवरणामागे बसला असून त्याला कुणीहि पाहूं शकत नाही अशी ज्यांची ईश्वरासंबंधी परंपरागत कल्पना असते, त्यांना ईश्वरासंबंधीची ही वरील कल्पना मोठी भयंकर आणि विरोधी वाटत असते. ह्या लोकांच्या ईश्वराला कुणी इहजन्मीं पाहूं शकत नाही. फक्त, पुरोहितगण आपल्याला आश्वासन देतात की आपण

जर त्यांचें अनुसरण केलें, त्यांनी घालून दिलेले निर्बंध तंतोतंत पाळले आणि त्यांनी आखून दिलेल्या मार्गाने गेलों तर मृत्युसमयीं ते आपल्याला एक परवाना देतील, आणि त्याच्या बळावर आपण त्या ईश्वराचें मुख बघूं शकूं! निर्बुद्ध पुरोहितगिरीची करामत याखेरीज ह्या स्वर्गादिकांच्या कल्पनांना काय अर्थ आहे?

अर्थातच ईश्वराविषयीची ही निर्गुणत्वाची कल्पना बऱ्याच गोष्टी तोडून-फोडून टाकते. पुरोहितांच्या धंद्याला ती अतोनात घातक आहे आणि चर्च, मंदिरें वगैरेंना मारक आहे. भारतांत सध्या दुष्काळ पडला आहे, पण तिथे अशीं कितीतरी देवळें आहेत की ज्यांच्या मालकीच्या जडजवाहिराने एखादा राजादेखील विकत घेतां येईल! पुरोहित जर ही निर्गुणत्वाची कल्पना लोकांना शिकवूं जातील तर त्यांचा धंदाच बसेल. परंतु पुरोहितबाजी न करतां, निःस्वार्थ भावनेने आपण ही कल्पना लोकांना शिकवायला हवी. तुम्हीहि ईश्वर आहांत, मीहि ईश्वर आहें, मग कुणीं कुणाची आज्ञा पाळायची? कुणीं कुणाची पूजा करायची? तुम्हीच ईश्वराचें सर्वांत श्रेष्ठ मंदिर आहांत. एखाद्या मंदिरांत एखाद्या मूर्तीची किंवा शास्त्रग्रंथाची पूजा करण्याऐवजी मी तुमचीच पूजा करीन. लोक असे इतके परस्परविरोधी विचारांचे कां असतात? स्वतःला ते अगदी बावनकशी व्यवहारी समजत असतात. कोणतीहि गोष्ट आचरणांत आणतां आली पाहिजे, व्यवहार्य असली पाहिजे असा त्यांचा हट्ट असतो. ठीक आहे. पण, दुसरीकडे कुठे देवळा-रावळांत न जातां, या इथेच, तुमचीच पूजा करण्यापेक्षा आणखी व्यवहार्य तें काय असेल बरें? तुम्हांला मी पाहतों, मला तुमचा अनुभव येतो, आणि मी जाणतों कीं तुम्ही ईश्वर आहां. मुसलमान म्हणतात की अल्लाखेरीज ईश्वर नाही. वेदान्त म्हणतो की ईश्वराखेरीज आणखी कांहीच नाही, ईश्वर नाही असें कांहीच नाही. हें ऐकून कदाचित् तुम्ही घाबराल. पण हळूहळू तें तुम्हांला कळूं लागेल. प्रत्यक्ष, जिवंत ईश्वर तुमच्यामध्येच वसत आहे, पण तुम्ही चर्च आणि मंदिरें उभारण्यांतच गुंतलां आहांत. आणि अर्थशून्य काल्पनिक गोष्टींवर विश्वास ठेवण्यांतच कृतकृत्यता मानीत आहांत. पूजा करण्यास एकमेव योग्य ईश्वर म्हणजे मानवदेहस्थित आत्मा—मानवात्मा. अर्थातच

इतर सर्व प्राणीशरीरेंहि ईश्वराचीं मंदिरेंच होत, परंतु मनुष्यदेह हें भगवंताचें सर्वांत श्रेष्ठ मंदिर होय––मंदिरांतला तो ताजमहाल होय. मला जर त्या मंदिरांत भगवंताची पूजा करतां येत नसेल तर मग दुसरें कोणतेंहि मंदिर माझ्यापक्षीं कुचकामाचेंच होय. प्रत्येक मानवशरीररूपी मंदिरांत विराजमान असलेल्या ईश्वराचा मला ज्या क्षणीं साक्षात्कार होईल, ज्या क्षणीं प्रत्येक मानवाठायीं ईश्वराचा वास बघून मी त्यांच्या-पुढे श्रद्धेने गुडघे टेकूं शकेन, त्याच क्षणीं मीं बंधमुक्त होऊन जाईन, सारीं बंधनें निखळून पडतील व मी निर्मुक्त होईन.

हाच सर्वांपेक्षा अधिक व्यवहार्य ईश्वर होय, आणि हीच सर्वां-पेक्षा अधिक व्यवहार्य पूजा-उपासना होय. ह्यांत तात्त्विक विचारांचा किंवा काल्पनिक भाग मुळीच नाही. आणि ह्या कल्पनांना लोक भितात. ते म्हणतात की हें ठीक नव्हे. बापजाद्यांनी सांगितलेल्या कांही जुन्यापुराण्या कल्पनांचा विचार करीत बसणेंच त्यांना ठीक वाटतें. काय तर म्हणे कुठेशी राहणाऱ्या ईश्वराने कुणालातरी सांगितलें होतें की मी ईश्वर आहें. त्या वेळेपासून त्याच कल्पनेभोवती आपले विचार सारखे घुटमळत आहेत––त्याविषयीच मतमतान्तरें चाललीं आहेत. ह्या लोकांना हेंच 'व्यवहार्य' वाटतें, आणि वेदान्ताच्या कल्पना 'अव्यवहार्य' वाटतात ! वेदान्त अर्थातच हें केव्हाहि मान्य करतो की प्रत्येकाने आपापला मार्ग चोखाळावा. परंतु मार्ग म्हणजे कांही गंतव्य स्थान नव्हे. स्वर्गांत वास करणाऱ्या ईश्वराची उपासना वगैरे गोष्टी वाईट अर्थातच नाहीत, परंतु त्या साऱ्या म्हणजे सत्याप्रत जाण्याच्या केवळ पायऱ्या आहेत. त्याच कांही अंतिम सत्य नव्हत. तें सारें चांगलें आहे, छान आहे, त्यांत कित्येक महान् तथ्येंहि गवसतात. परंतु वेदान्त पदोपदीं म्हणतो की "मित्रा, ज्याला तूं अज्ञात म्हणून पुजत आहेस त्याची मी तुझ्याच रूपाने पूजा करतों. ज्याला तूं अज्ञात म्हणून उपासत आहेस आणि ब्रह्माण्डभर धुंडत आहेस तो सदा तुझ्या-ठायींच विद्यमान आहे. तो आहे म्हणून तर तूं अस्तित्वांत असूं शकतोस. तो आहे म्हणूनच तूं आहेस. तो ह्या विश्वाचा नित्य साक्षी होय." "सारे वेद त्याचाच महिमा गातात. 'मी'रूपाने तो नित्य वर्तमान आहे. तो असल्यामुळेच हें समस्त विश्व अस्तित्वांत आहे. तोच

ह्या विश्वाचें चैतन्य, तोच ह्या विश्वाचें जीवन. त्याच्याच प्रकाशाने हें समस्त विश्व प्रकाशमान आहे. तुझ्यांत जर तो 'मी'रूपाने विद्यमान नसता तर तूं सूर्यालाहि पाहूं शकला नसतास, सर्वत्र तुला अंधारच भासला असता. तो प्रकाशत आहे म्हणूनच तूं हें विश्व बघत आहेस."

ह्या बाबतींत साधारणत: एक प्रश्न नेहमी विचारण्यांत येत असतो. आणि तो हा की, ह्या साऱ्या कल्पनांमुळे भयंकर गोंधळ माजणार नाही काय? आपण सर्वच ईश्वर आहोंत म्हटल्याने मोठी मुष्कील नाही का होणार? कारण मग आपल्यापैकी प्रत्येकजणच म्हणूं लागेल की "मी ईश्वर आहें, आणि म्हणून मी जें करीन तें चांगलेंच असलें पाहिजे. माझें कोणतेंहि कर्म किंवा विचार चांगलाच असणार. कारण मी ईश्वर आहें, आणि ईश्वराकडून वाईट कसें घडेल?" धरून चलूं या की वेदान्त असा चुकीचा समजला जाणें शक्य आहे. मी यावर फक्त एवढेंच विचारूं इच्छितों की, चुकीच्या समजुतीची शक्यता या दुसऱ्या पक्षींहि नाहीच असें ठासून म्हणतां येईल का? स्वर्गामधे राहणाऱ्या, आपल्यापासून पृथक् अशा ईश्वराची हे लोक उपासना करीत आले आहेत. त्याला ते खूप भितात. जन्मल्यापासून मरेपर्यंत भयाने थरकापतच ते जगत असतात. आता मी विचारतों, ह्याने जग कांही विशेष सुधारलें आहे काय? ह्याने जग होतें त्यापेक्षा चांगलें झालें आहे काय? जगांतील प्रबल कर्मवीर, प्रचंड नैतिक बलशाली व्यक्ति कुणांत अधिक निपजल्या आहेत—सगुणवाद्यांत की निर्गुणवाद्यांत? सगुण ईश्वराच्या उपासकांत की निर्गुण ईश्वराच्या उपासकांत? बघा एकवार अवलोकन करून. आढळून येईल की निर्गुण ईश्वराच्या उपासकांतच प्रचंड कर्मवीर, प्रचंड नीतिवीर उपजले आहेत. भयाने नीतीचा विकास होऊं शकेल अशी अपेक्षाच तुम्ही कशी धरतां? तें कधीच शक्य नाही. "जिथे एकजण दुसऱ्याला बघतो, जिथे एकजण दुसऱ्याला ऐकतो तिथे माया विद्यमान असते. जिथे एकाने दुसऱ्याला पाहणें, दुसऱ्याला ऐकणें उरत नाही, जिथे सर्वच आत्ममय होऊन गेलेलें असतें, तिथून माया अंतर्धान पावते." त्या वेळीं मग सर्वकांही तोच, किंवा सर्वकांही मीच. त्या वेळीं आत्मा पवित्र झालेला असतो.

तेव्हा, आणि तेव्हाच प्रेम म्हणजे काय हें आपल्याला कळूं शकतें. भयांतून कधी प्रेम निर्माण होणें शक्य नाही. प्रेमाचें मूल आहे स्वाधीनता. स्वाधीन, मुक्त व्यक्तिच प्रेम करूं जाणे. तेव्हाच मग आपण समस्त जगावर प्रेम करूं शकूं, आणि तेव्हाच खरोखर आपण विश्वबंधुत्वाचा अर्थ समजूं शकूं, त्यापूर्वी नव्हे.

म्हणून, या निर्गुण ईश्वराच्या कल्पनेने जगाचें अतोनात अकल्याण होईल या म्हणण्यांत कांही अर्थ नाही. आणि सगुण ईश्वराच्या कल्पनेने जगांत कधी वाईट कृत्यें झालीं नाहीत असेंहि नाही. ईश्वराविषयीच्या या कल्पनेने पंथाभिमान निर्माण होऊन त्याच्या नशेंत लोकांनी एकमेकांना फाडून रक्ताचे पाट वाहविले आहेत. हें जणु काय जगाचें अकल्याण नव्हेच ! मग उगाच वेदान्तमताला बोल कां ? "माझा ईश्वर सर्वश्रेष्ठ होय. या, आपण लढूं. जो जिंकेल त्याचा ईश्वर श्रेष्ठ !"—द्वैतवाद्यांचा जगभर सर्वत्र हाच खाक्या आढळून येतो. द्वैतवादांतून सर्वत्र असे झगडे निर्माण झाले आहेत. ह्यांत जणुकाय कांहीच वाईट नाही ! हें जणुकाय जगाचें अकल्याण करणें नव्हेच ! म्हणून या, दिवसाच्या प्रशस्त, मोकळ्या उजेडांत या. लहान लहान संकुचित मार्गांचा मोह सोडून द्या. अनंत आत्म्याला संकुचित सीमेंत बद्ध होऊन राहणें कसें बरें आवडेल नि मानवेल ? उजेडाच्या राज्यांत या. मग दिसेल की, या विश्वांतली प्रत्येक वस्तु तुमचीच आहे. आपले बाहु पसरून समस्त विश्वाला प्रेमाने आलिंगन द्या. असें करण्याची जर तुम्हांला कधी इच्छा झाली असेल तर समजा की तुम्हांला ईश्वराच्या अस्तित्वाचा अनुभव आला आहे.

बुद्धदेवांच्या चरित्रांतील तो भाग तुम्हांला स्मरत असेलच. असल्या महान्, उदात्त, अनंत प्रेमाने हें समस्त विश्व भरून जाईपर्यंत बुद्धदेव आपली प्रेमभावना उत्तर दक्षिण, पूर्व पश्चिम, वर खाली सर्व दिशांकडे प्रेरीत असत. ज्या वेळीं असली भावना तुमच्याठायीं निर्माण होईल त्याच वेळीं तुम्हांला खऱ्या व्यक्तित्वाचा लाभ झाला असें म्हणतां येईल. समस्त विश्व मग एकच व्यक्ति होऊन जातें—क्षुद्र क्षुद्र वस्तूंनी मग तुमचें व्यक्तित्व विभागलें जाऊं शकत नाही. त्या 'भूमा'-साठी ह्या 'अल्पां'चा त्याग करा, त्या अनंत आनंदासाठी या क्षुद्र

सुखांचा त्याग करा. या साऱ्या क्षुद्र क्षुद्र सुखांनी काय होणार ? आणि तसें पाहिल्यास हीं सारीं सुखेंहि तुम्हांला खरोखर सोडावीं लागणार नाहीत, कारण तुम्हांला आठवत असेल की मीं तुम्हांला पूर्वीच सांगितलें आहे की 'अल्पा'चा 'भूमां'त, सान्ताचा अनंतांत, सगुणाचा निर्गुणांत आपोआपच समावेश होत असतो. म्हणून ईश्वर सगुण आणि निर्गुण दोन्ही आहे. आणि, माणूस—स्व-रूपतः अनंत, निर्गुण माणूस—स्वतःला सगुण, एक व्यक्ति समजत आहे. स्वरूपतः अनंत अशा आपण जणु स्वतःला लहानलहान सीमांत आबद्ध करून घेतलें आहे. वेदान्त म्हणतो की असें कां व्हावें हें आपल्याला कळूं शकलें नाही तरी एवढें मात्र म्हणतां येईल की वस्तुस्थिति ही अशी आहे, ती कधीहि नाकारतां यावयाची नाही. वेदान्त म्हणतो की, अनंतत्वच आपलें खरें स्वरूप आहे, त्याचा कधीहि लोप होणें शक्य नाही. तें चिरकाल जसेंच्या तसेंच राहणार. पण आपण आपल्या कर्मांनी स्वतःला सीमाबद्ध करून टाकीत आहोंत, एखाद्या साखळीने जखडलें जावें तसें आपण आपल्या कर्मशृंखलेने या ससीम देहादिकांशीं बांधले गेलों आहोंत. ती साखळी तोडून टाका आणि मुक्त व्हा. नियम सारे पायाखाली तुडवून टाका. नियम, अदृष्ट, दैव, कांहीच मानवाच्या खऱ्या स्वरूपाला स्पर्शूं शकत नाही. अनंतत्वांत नियम कसला? स्वाधीनताच त्याचें स्वभावसिद्ध स्वरूप होय. आधी स्वाधीन व्हा, मुक्त व्हा, आणि मग जितकीं व्यक्तित्वें हवीं असतील तितकीं खुशाल बाळगा. रंगमंचावर भिकाऱ्याचा अभिनय करणाऱ्या नटाप्रमाणे मग आपण ह्या जीवन-मंचावर खेळूं शकूं. भिकाऱ्याचा अभिनय करणाऱ्या त्या नटाची, दारोदार भीक मागत फिरणाऱ्या एखाद्या खरोखरीच्या भिकाऱ्याशीं तुलना करून बघा. दोहोंच्याहि बाबतींत दृश्य कदाचित् अगदी सारखें असेल, दोघेहि कदाचित् सारख्याच तऱ्हेने, सारख्याच शब्दांत भीक मागत असतील. परंतु दोघांत केवढा फरक! एकजण आपला भिकारीपणा उपभोगत आहे, तर दुसरा आपल्या भिकारीपणाचें दुःख भोगत आहे. एकाची मजा, दुसऱ्याची सजा. कशाने बरें हा फरक पडतो? फरक पडण्याचें कारण म्हणजे एकजण मुक्त असतो तर दुसरा बद्ध असतो हें होय. नटाला पक्कें ठाऊक असतें की आपलें हें भिकारीपण कांही खरें नाही,

खेळ म्हणून, नाटक म्हणून आपण तें अंगीकारलें आहे. उलट, ही आपली नेहमीचीच अवस्था आहे, आपली इच्छा असो की नसो आपल्या नशिबीं हेंच आहे असा त्या खरोखरीच्या भिकाऱ्याचा बोध असतो. हें असेंच असणार--हा नियमच आहे. जोंवर आपलें खरें स्वरूप आपण जाणत नाहीं तोंवर आपण भिकारीच; निसर्गांतील प्रत्येक शक्ति तोंवर आपल्याला अशीच पदोपदीं कोलमडविणार, सृष्टींतील प्रत्येक गोष्ट आपल्याला अशीच गुलाम बनविणार. हा जाच असह्य होऊन त्यांतून सुटण्याकरता आपण 'सोडवा' 'वांचवा' करीत जगभर मदती-साठी ओरडत फिरतों, पण व्यर्थ, अशी मदत आपल्याला कुणीच करीत नाही, कुणीच आपल्याला सोडवीत नाही की वांचवीत नाही. नाना देव-देवता व ईश्वर कल्पून आपण त्यांच्यापुढे रडून-भेकून पाहतों. पण काय ? व्यर्थ. कुणीच आपल्या कामीं पडत नाही. आणि तरी-देखील आपल्याला आशा असतेच की कुणीतरी आपल्या मदतीला धावेल, कुणीतरी आपली सोडवणूक करीलच. याप्रमाणे आशाळभूतपणें रडण्याआरडण्यांतच आयुष्य संपतें, आणि फिरून त्याच खेळाला आरंभ होतो. हें असें सारखें चालू आहे.

मुक्त तुमचें तुम्हांलाच व्हावें लागेल. कुणाकडूनहि मदतीची आशा बाळगू नका. माझी खात्री आहे, तुम्ही जर आपल्या गतजीव-नाचा आढावा घ्याल तर तुम्हांला आढळून येईल की तुम्ही सारखे कुणाची तरी मदत मिळावी म्हणून व्यर्थ धडपडत होतां, पण अशी मदत तुम्हांला कधीच मिळालेली नाही. जी कांही मदत तुम्हांला कधी मिळाली आहे, ती सारी तुमच्या अंतरात्म्यांतूनच--तुमच्या स्वतःतूनच. एखाद्या गोष्टीसाठी तुम्ही जे प्रयत्न केले असतात त्या प्रयत्नांचें फळच फक्त तुम्हांला लाभलेलें असतें; आणि तरीहि मजा अशी की तुम्ही सारखे दुसरा कुणी मदत करील अशी आशा करीत होतां. एखाद्या धनिकाच्या बैठकींत बसून मजा बघा--ती नेहमीच भरलेली तुम्हांला आढळेल. पण तुम्ही जर नीट बघाल तर तुम्हांला दिसेल की तिथे तेच लोक पुन्हा आढळणार नाहीत, नेहमी नवीन नवीन माणसें ! या धनिकाकडून आपल्याला कांहीतरी मिळेल अशी त्या बैठकभाऊंना सारखी आशा असते. मिळत मात्र कधीच कांही नाही ! आपलीं

जीवनेंहि अशींच आशा धरीत बसण्यांत जात असतात. केवळ आशा, आशा आणि आशा—तिला शेवट नाही. वेदान्त आपल्याला सांगतो की ही आशा सोडून द्या, हा आशाळभूतपणा झिडकारून टाका. काय म्हणून तुम्ही असला दीनवाणा आशाळभूतपणा करायचा? सर्वकांही तर तुमचेंच आहे, नव्हे, तुम्हीच सर्वकांही आहां. तुम्हांला कशाची आशा? समजा की एका देशाचा राजा वेडा झाला आहे, आणि या देशाचा राजा कुठे आहे म्हणून देशभर राजाला धुंडाळत हिंडत आहे. सापडेल का कधी त्याला राजा? कसा सापडेल? कारण तो स्वतःच तर मुळी त्या देशाचा राजा होय. आपल्या देशांतील शहरन् शहर आणि खेडेन् खेडें जरी त्याने धुंडाळून काढलें, प्रत्येक घरांत जरी हुडकलें, 'मला राजा दाखवा' म्हणून करुणा भाकीत कितीहि रडला अन् भेकला तरी त्याला राजा कसा गावेल? कारण ज्याला तो शोधतो आहे तो राजा तो स्वतःच आहे. तद्वतच आपलेंहि. आपण स्वतःच आत्मा आहोंत, ईश्वर आहोंत. मग आपल्याला ईश्वर कसा नि कुठे भेटणार? म्हणून आपण ईश्वर आहोंत हें जाणून, ईश्वराला हें वेड्यासारखें धुंडाळीत फिरणें थांबविण्यांतच आपलें भलें आहे. आपण ईश्वर आहोंत, आत्मा आहोंत या ज्ञानाने, या स्व-स्वरूपबोधाने आपण कायमचे सुखी आणि संतुष्ट होऊन जाऊं. ही सारी वेडी धावाधावी सोडून द्या, आणि मग रंगमंचावरील नटाप्रमाणे या जगत्-मंचावरील आपला अभिनय नीट पार पाडा.

आणि असें होतांच मग साराच देखावा बदलून जाईल. तुमची दृष्टि बदलेल, आणि दृष्टि बदलली की सृष्टिहि बदललीच. चिरकालीन कारागृहाप्रमाणे वाटणारें हेंच जग मग एखाद्या क्रीडांगणासारखें वाटूं लागेल. परस्पर स्पर्धेचें, चढाओढीचें ठिकाण न राहतां हें जग मग तुम्हांला आनंदाचें स्थान वाटूं लागेल—सदा फुलं उमलणारं, फुलपाखरं बागडणारं असं वसंताचं माहेर होऊन जाईल. एकदा नरक वाटणारं हेंच जग स्वर्ग बनून जाईल. बद्धांच्या दृष्टीला हें जग ससेहोलपटीचें भयंकर स्थान दिसत असतें, पण मुक्तांच्या दृष्टीला तें अगदीच निराळें दिसूं लागतें. एकच प्राण सर्वत्र विराजमान आहे. पुनर्जन्मादि जें कांही होतें तें सारें इथेच होत असतें. देव-देवता सर्व

इथेच आहेत. देव-देवता साऱ्या मानवाच्या आदर्शानुसारच कल्पिल्या गेल्या आहेत. देवतांनी माणसाला आपल्या आदर्शानुसार निर्माण केलेलें नाही, तर माणसानेच देवता निर्माण केल्या आहेत! इंद्र, वरुण, ब्रह्माण्डांतील समस्त देवता मानवाच्या आदर्शानुसारच निर्मित झालेल्या आहेत., देवता म्हणजे तुम्हीं स्वतःच्या बाहेर कल्पिलेल्या तुमच्याच प्रतिकृति होत. त्या तुमच्याच प्रति-आकृति होत. त्यांतील मूळ आकृति तुम्हीच आहांत. तुम्हीच खऱ्या, पूजा करण्यास एकमात्र योग्य अशा देवता आहांत. हेंच वेदान्ताचें मत होय, आणि म्हणूनच तें प्रत्यक्ष व्यवहारांत खरोखर कामीं पडण्यासारखें आहे. अर्थातच आपण मुक्त झालों म्हणजे वेड्यासारखे समाजाला झिडकारून जंगलांत किंवा एखाद्या गुहेंत जाऊन मरूं अशांतला भाग नाही. तुम्ही जिथे आहां तिथेच राहाल, फरक फक्त इतकाच होईल की तुम्हांला समस्त जगताचें रहस्य अवगत होऊन जाईल. पूर्वीचीं दृश्यें सारीं तशींच दिसतील, परंतु आता तुम्हांला त्यांचा निराळा, अगदी नवीनच अर्थ कळूं लागेल. आपल्याला अजून जगाचें स्वरूप माहीत नाही, मुक्त झाल्यानेच त्याचें स्वरूप कळून येतें. मग आपल्याला आढळून येईल की नियति, दैव वा अदृष्ट यांनी आपल्या स्वरूपाचा केवळ एक लहानसा अंशच व्यापलेला आहे. ही आपल्या स्वरूपाची एक बाजू आहे, दुसऱ्या बाजूला मुक्ति सर्वदाच विद्यमान होती. हें आपल्याला माहीत नव्हतें, आणि म्हणूनच, शिकारी पाठीस लागलेल्या सशाप्रमाणे जमिनींत तोंड लपवून आपण स्वतःचें अशुभापासून रक्षण करण्याचा यत्न करीत होतों.

भ्रमामुळे आपण आपलें खरें स्वरूप विसरण्याचा प्रयत्न करीत होतों, पण त्याचा पूर्ण विसर पडणें शक्य नाही—तें नेहमीच कोणत्या ना कोणत्या रूपाने आमच्या समोर येतच राहतें. आपण जें ईश्वराचें व देवदेवतांचें अनुसंधान करीत असतों, आपण जे बहिर्जगतांत स्वाधीनता मिळविण्यासाठी धडपडत असतों, त्या साऱ्यांचा अर्थ हाच की आपलें खरें स्वरूप कोणत्या ना कोणत्या प्रकारें व्यक्त होण्याचा प्रयत्न करीत असतें. इतकेंच की, ही वाणी कोठून उठत आहे हें समजण्यांत आपली चूक होते. प्रथम आपल्याला वाटतें की ती वाणी अग्नि, सूर्य, चंद्र, तारा वा अन्य एखाद्या देवतेमधून येत आहे. परंतु अखेर आपल्या

प्रत्ययास येतें की ती आपल्या आंतूनच निघत होती. चिरंतन मुक्तीची घोषणा करणारी ती चिरंतन वाणी आपल्या आंतच विद्यमान आहे. तिचा तो घोष, तिचें तें संगीत कायमचेंच चालू आहे. आत्म्याच्या त्या संगीताचा कांही अंश या नियमबद्ध ब्रह्माण्डाच्या, ह्या पृथ्वीच्या रूपाने आकारास आला आहे, पण तें नेहमीच आपल्या आंत विद्यमान आहे आणि नेहमीच विद्यमान राहील. यथार्थतः आपण आत्मस्वरूप आहोंत आणि चिरकाळ तसेच आत्मस्वरूप राहूं. वेदान्ताचें ध्येय एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे असें सांगतां येईल की मनुष्य खरोखर काय आहे हें जाणणें––जगांत मनुष्योपासना करणें. आणि वेदान्ताचा संदेश असा आहे, वेदान्ताचें म्हणणें असें आहे की, ईश्वराचें व्यक्त रूप अशा आपल्या मानवबांधवाची जर तुम्ही उपासना करूं शकत नसाल तर मग अव्यक्त अशा ईश्वराची तुम्ही काय उपासना करूं शकाल? असल्या उपासनेवर वेदान्ताचा विश्वास नाही.

तुम्हांला बायबलांतील त्या वचनाची आठवण नाही काय की, "ज्याला तुम्ही पाहूं शकतां अशा आपल्या भावावर जर तुम्ही प्रेम करूं शकत नसाल, तर ज्याला तुम्हीं कधी पाहिलें नाही त्या ईश्वरावर तुम्ही कसें प्रेम करूं शकाल?" ईश्वराला जर तुम्ही मनुष्यमुखांत पाहूं शकत नसाल तर तुम्हांला तो मेघांत, जड, अचेतन द्रव्यांच्या मूर्तींत, किंवा तुमच्या स्वतःच्याच मनाने रचलेल्या भाकडकथांत कसा काय गवसणार? जेव्हा तुम्ही नर-नारींत ईश्वर बघूं शकाल, तेव्हाच मी तुम्हांला धार्मिक म्हणेन, आणि तेव्हाच, 'उजव्या गालांत थापड मारणाऱ्यापुढे डावा गाल करण्याचा' अर्थ तुम्हांला उमजेल. ज्या वेळीं तुम्ही माणसांत ईश्वर बघूं शकाल, त्या वेळीं मग सर्वच गोष्टींचें, फार काय पण वाघाचेंहि तुम्ही स्वागत करूं शकाल. तुम्हांला दिसणारी, तुमच्याकडे येणारी प्रत्येक गोष्ट केवळ त्या अनंत, आनंदमय प्रभूचें एकेक रूपच होय––आपला पिता, आपली माता, आपला मित्र, आपला पुत्र, सारी त्याचींच विभिन्न रूपें होत. आपला आत्माच त्या त्या रूपांनी आपल्याशीं खेळत आहे.

आपल्या मानवी संबंधांना ज्याप्रमाणे असें दिव्य रूप देतां येतें, त्याचप्रमाणे ईश्वराशीं आपला संबंधहि हीं मानवी रूपें धारण करूं

शकतो. ईश्वराला आपली माता, आपला पिता, आपला पुत्र वा मित्र मानून वात्सल्य, सख्य इत्यादि भावांनी आपण त्याची आराधना करूं शकतों. भगवंताला पिता म्हणण्यापेक्षा त्याला आपली माता समजणें अधिक उच्च भाव होय. त्याहिपेक्षा उच्च भाव आहे सख्यभाव-- भगवंताला आपला प्रिय सखा मानणें. परंतु या साऱ्यांपेक्षाहि उच्च भाव आहे मधुरभाव--भगवंताला आपला परमप्रेमास्पद प्रियकर मानणें. प्रेमिक आणि प्रेमास्पद यांमधे मुळीच भेदबोध न उरणें हीच सर्वोच्च अवस्था होय. तुम्हांला बहुधा ती प्राचीन पर्शियन गोष्ट आठवत असेल. एका प्रेमिकाने येऊन आपल्या प्रेमास्पदाच्या खोलीचें दार ठोठावलें. आंतून प्रश्न आला--"कोण आहे ?" प्रेमिकाने उत्तर दिलें--"मी." दार उघडलें गेलें नाही. प्रेमिकाने पुन्हा येऊन दाराला धक्का दिला. आंतून फिरून तोच प्रश्न. प्रेमिकाने उत्तर दिलें--"हा मी आलों आहें." तरी दार बंदच. तिसऱ्यांदा धक्का दिला. तोच प्रश्न-- "कोण ?" या खेपेस प्रेमिकाने उत्तर दिलें, "माझ्या प्राणा, तूंच आहेस ना--माझ्या रूपाने तूंच ?" या वेळीं दरवाजा उघडला गेला ! भगवंताशीं आपल्या संबंधाचेंहि असेंच आहे. "तूंच सर्वांत आहेस, तूंच सर्व आहेस. प्रत्येक नर, प्रत्येक नारी तोच साक्षात्, जिवंत, आनंदमय, एकमेव ईश्वर होय. कोण म्हणतो की तूं अज्ञात आहेस ? कोण म्हणतो की आम्हांला तुझा शोध करावा लागेल ? आम्हांला तर तूं कायमचाच गवसलेला आहेस. आम्ही तुझ्यांतच कायमचें वसत आहोंत. तूं सर्वत्र सर्वदा ज्ञातच आहेस, सर्वदा उपासला जात आहेस."

या ठिकाणीं आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवावयास हवी. वेदान्त म्हणतो की इतर उपासनाहि चुकीच्या नाहीत. ही एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट कधीहि विसरतां कामा नये की, जे नानाप्रकारच्या कर्मकांडांनी परमेश्वराची उपासना करतात ते वास्तविक चुकत नाहीत, मग त्या क्रिया आपल्याला कितीहि ओबडधोबड किंवा निरुपयोगी वाटोत. कारण धर्मजीवनांत साधक एका सत्यापासून दुसऱ्या सत्याप्रत--खालच्या सत्यापासून वरच्या सत्याप्रत प्रगत होत असतो. अंधार म्हणजे कमी उजेड; वाईट म्हणजे कमी चांगलें; अपवित्रता म्हणजे कमी पवित्रता. म्हणून आपण सर्वांकडे प्रेमाच्या,

सहानुभूतीच्या दृष्टीने बघितलें पाहिजे हें आपण कधी विसरतां कामा नये. कारण, आपण हें जाणून असावयास हवें की, आपण जो मार्ग आक्रमिला आहे, त्याच मार्गानें तेहि येत आहेत. जर तुम्ही खरोखरच मुक्त झालां असाल तर तुम्हांला हें ठाऊक असायला हवें की तेहि आज ना उद्या मुक्त होणारच आहेत. आणि तुम्ही जर खरोखरच मुक्त झालां असाल तर मग तुम्हांला कुठेहि अनित्य कसें बरें दिसेल ? तुम्ही जर खरोखरच पवित्र असाल तर मग तुम्हांला अपवित्रता दिसेलच कशी ? कारण, जें आंत असतें, तेंच बाहेर दिसतें. आपल्या आंत जर अपवित्रता नसेल तर आपल्याला ती बाहेर कधीहि दिसणार नाही. वेदान्ताच्या साधनेचा हा एक पैलू आहे. आणि आपण सर्वजण तो जीवनांत उतरविण्याचा यत्न कराल अशी मला आशा आहे. प्रयत्नपूर्वक हें आचरणांत आणण्यासाठी आपलें उभें आयुष्य आपल्यापाशी आहे. परंतु या सर्व विचारांतून व आलोचनेंतून एक महत्त्वाची गोष्ट आपण शिकलों ती ही की, आपण संतोषाने आणि समाधानाने कार्य करूं. असंतुष्टपणाची किंवा असमाधानाची गरजच काय ? कारण, आपल्याला अवगत झालें आहे की, सत्य आपल्या आंत--अंतर्यामींच विद्यमान आहे, तें आपलेंच आहे, त्यावर आपली जन्मसिद्ध मालकी आहे. तें व्यक्त करावयाचें, प्रत्यक्षगोचर करावयाचें एवढेंच आपलें काम.

---

## व्याख्यान तिसरें

(लंडन, १७ नोव्हेंबर १८९७)

छांदोग्य उपनिषदांत अशी एक आख्यायिका आहे की, एकदा नारदांनी सनत्कुमारांकडे जाऊन त्यांना अनेक प्रश्न विचारले. आणि सनत्कुमारांनी, पृथ्वीपेक्षा अमुक श्रेष्ठ आहे, त्यापेक्षा तमुक तत्त्व श्रेष्ठ आहे असें उत्तर देत, त्यांना पायरीपायरीने अखेर 'आकाश' तत्त्वा-पर्यंत आणून पोहोचविलें. "आकाश तेजाहून श्रेष्ठ आहे. कारण, आकाशांत चंद्र, सूर्य, विद्युत्, तारे इत्यादि सर्व आहेत. आकाशांतच आपण जगतों, आकाशांतच आपण मरतों." मग प्रश्न निघाला की या आकाशापेक्षा श्रेष्ठ आणखी कांही आहे काय ? 'प्राण आकाशाहूनहि श्रेष्ठ होय' असें सनत्कुमारांनी त्यावर उत्तर दिलें. वेदान्ताच्या मतें

ह्या प्राण आपलें जीवनतत्त्व वा जीवनाची मूलभूत शक्ति होय. आकाशाप्रमाणेच प्राणहि एक सर्वव्यापी तत्त्व आहे, आणि आपल्या शरीरांत म्हणा किंवा बाहेर कुठेहि म्हणा, जी म्हणून गति आढळते, ती या प्राणाचेंच कार्य होय. प्राण आकाशाहूनहि श्रेष्ठ होय. प्राणा-मुळेच सर्वकांही जिवंत असतें, अस्तित्वांत असतें. प्राणच माता होय, प्राणच पिता होय, प्राणच भगिनी होय, प्राणच आचार्य होय, प्राणच ज्ञाता होय.

ह्याच छांदोग्य उपनिषदांतील आणखी एक कथा मी तुम्हांला सांगतों. ती अशी की, श्वेतकेतु नांवाचा एक मुलगा आपल्या वडिलांना सत्यासंबंधी प्रश्न विचारीत आहे, आणि पिता आरुणि त्याला नाना गोष्टी शिकवीत आहे. अखेर आरुणि श्वेतकेतूला म्हणाले, "ह्या समस्त वस्तूंचें जें सूक्ष्म कारण आहे त्यापासूनच ह्या सर्व वस्तु निर्माण झाल्या आहेत. तेंच सर्वकांही आहे, तेंच सत्य होय, आणि हे श्वेतकेतो, तूं तेंच आहेस—'तत्त्वमसि श्वेतकेतो.'" त्यानंतर हें समजावून देण्या-साठी आरुणि निरनिराळे दृष्टान्त देऊं लागले. "हे श्वेतकेतो, मधमाशा नाना फुलांमधून मध आणून एकत्र करतात, परंतु आपण कोणत्या फुलांतून आलों आहोंत हें त्या मधांना ठाऊक नसतें. त्याचप्रमाणे आपणहि त्या 'सत्'पासून उत्पन्न झालों असूनहि तें विसरून गेलों आहोंत. म्हणून हे श्वेतकेतो, तूं तेंच आहेस." "नाना ठिकाणांहून उगम पावून नद्या समुद्राला येऊन मिळतात. परंतु त्या नद्यांना ठाऊक नसतें की त्या कुठून आल्या आहेत. त्याचप्रमाणे आपणहि त्या सत्स्वरूपा-पासूनच आलों आहोंत खरे, परंतु आपण तें जाणत नसतों. हे श्वेतकेतो, तूं तेंच आहेस." याप्रमाणे आरुणि आपल्या पुत्राला उपदेश देऊं लागले. असो.

ज्ञान दोन तऱ्हांनी होऊं शकतें. व्यक्तीचा ( particularचा) जातीशीं ( generalशीं ) आणि जातीचा समष्टीशीं (universal-शीं ) काय संबंध आहे हें जाणून आपल्याला त्या व्यक्तीचें, म्हणजेच विशिष्ट वस्तूचें ज्ञान होऊं शकतें. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, विशेषाचा ( particularचा ) साधारणाशीं (generalशीं ), आणि साधारणाचा सर्वव्यापक तत्त्वाशीं ( universalशीं ) असलेला संबंध

जाणून घेतल्याने आपल्याला त्या विशेषाचें ज्ञान होतें. ही ज्ञानाची एक तऱ्हा होय. ज्ञानाची दुसरी तऱ्हा म्हटली म्हणजे, जी वस्तु जाणावयाची आहे त्या वस्तूच्याच स्वरूपांत शक्य तितकें खोल जाऊन ती जाणून घ्यावयाची. ज्ञानाच्या पहिल्या तऱ्हेंत ज्ञान म्हणजे वर्गीकरण होय—अधिकाधिक व्यापक वर्गांत वर्गीकरण करीत जाणें. एखादी घटना घडते. काय झालें हें आपण समजून घेण्याचा प्रयत्न करतों. आपलें समाधान होत नाही. जेव्हा आपल्याला असें समजावून देण्यांत येतें की अशीच घटना वारंवार घडत असते तेव्हा आपलें समाधान होतें, आणि आपण त्याला 'नियम' असें नांव देतों. आपण एखादें सफरचंद किंवा एखादा दगड पडतांना पाहतों. आपलें समाधान होत नाही. कारण, 'काय झालें' हें आपल्याला नीट कळलें नाही. पण जेव्हा आपल्याला दिसून येतें की सर्वच सफरचंदें किंवा सर्वच दगड असे पडत असतात, तेव्हा आपण त्याला 'गुरुत्वाकर्षणा'चा नियम ( **law of gravitation** ) म्हणतों. आणि मगच आपलें समाधान होतें. आपण वस्तुतः काय केलें असतें ? आपण विशिष्ट घटनेवरून सामान्य सिद्धान्त बांधलेला असतो—विशेषाकडून सामान्यांत गेलेलों असतों.

धर्माचें ज्ञान करून घेतांनाहि आपण ही शास्त्रीय पद्धत अनुसरावयास हवी. ज्ञानाची ही तऱ्हा, ही पद्धत धर्मालाहि लागू आहे. आणि आपल्याला आढळून येईल की वस्तुतः ती अनुसरली गेलीहि आहे. ज्या छांदोग्य उपनिषदांतील दोन आख्यायिका मीं आत्ताच तुम्हांला सांगितल्या आहेत, तें नीट वाचल्यास आढळून येतें की त्यांत हीच पद्धत अमलांत आणली गेली आहे. त्यांत प्रथम हेंच आढळतें—विशेषाकडून सामान्याकडे जाणें. अनेक देव एका तत्त्वांत कसे लय पावतात हें आपल्याला त्यांत आढळून येतें. विश्वब्रह्माण्डाच्या ज्ञानाच्या बाबतींतहि हे प्राचीन ऋषि ह्याच पद्धतीने क्रमशः पुढेपुढे गेल्याचें आपल्याला आढळून येतें. सूक्ष्म भूतांपासून ते अधिक सूक्ष्म आणि अधिक व्यापक भूतांप्रत पोहोचले. या विशिष्ट विशिष्ट भूतांपासून ते एका सर्वव्यापी आकाशतत्त्वाप्रत पोहोचले. त्याहिपलीकडे जाऊन ते प्राण नामक एका सर्वव्यापी शक्तीप्रत पोहोचले. या साऱ्यामधे आपल्याला एक तत्त्व आढळून येतें

तें हें की, एक वस्तु इतर साऱ्या वस्तूंहून पृथक् किंवा अलग नसते. प्राण ही आकाशाचीच सूक्ष्मतर अवस्था आहे. तो सूक्ष्म प्राणच स्थूल रूप धारण करून आकाश बनतो, तें आकाश स्थूल, अधिक स्थूल रूपें धारण करीत असतें. असा हा विश्वब्रह्माण्डाचा पसारा पसरतो.

.हें तत्त्व, ज्ञानाची ही पद्धत सगुण ईश्वरालाहि लागू करून बघण्यासारखी आहे. 'ईश्वर सगुण आहे' हा सिद्धान्त कसा बांधला जातो हें आपण पाहिलेंच. सर्व चैतन्याची समष्टि हें त्याचें स्वरूप मानलें जातें. परंतु येथे एक अडचण उपस्थित होते. हा सिद्धान्त 'अव्याप्त' अथवा अपुरा आहे. सृष्टींतील केवळ चैतन्याचेंच वर्गीकरण करीत करीत ह्या 'सगुण' ईश्वरापर्यंत पोहोचलें जातें. पण चैतन्य हा सृष्टीचा एक पैलू आहे. सृष्टींत त्याचबरोबर अचेतन किंवा जड भागहि आहे. त्याची ह्या वर्गीकरणांत दखल घेतली जात नाही. म्हणून, प्रथमत: म्हणजे हें वर्गीकरण सदोष असल्यामुळे, त्यावर आधारलेला 'ईश्वर सगुण आहे' हा सिद्धान्तहि अपुरा आहे. हा सिद्धान्त आणखीहि एका दृष्टीने अपुरा आहे. वस्तूच्या स्वरूपांत शिरून तिचें ज्ञान करून घ्यावयाचें, ही जी ज्ञानाची दुसरी पद्धत आहे, त्या पद्धतीनुसार बघितल्यास हा सिद्धान्त अपुरा असल्याचें आढळून येईल. सफरचंद जें खाली पडतें तें एखाद्या भुताने खेचल्यामुळे पडतें असेंहि समजणारे लोक असूं शकतात. परंतु त्यांचें त्या घटनेचें हें स्पष्टीकरण बरोबर नाही. सफरचंद पडण्याचें कारण गुरुत्वाकर्षण होय. आता 'गुरुत्वा-कर्षण' हेंहि त्या घटनेचें यथार्थ कारण नसणें शक्य आहे. परंतु, 'भूत त्याला जमिनीकडे खेचतें' या स्पष्टीकरणापेक्षा, 'गुरुत्वाकर्षणामुळे तें जमिनीवर पडतें' हें स्पष्टीकरण केव्हाहि अधिक चांगलें आहे. कारण दुसरें स्पष्टीकरण वस्तूच्या स्वरूपावरच आधारलेलें आहे, तर पहिल्यांत एक बाह्य कारण गृहीत धरलें गेलें आहे. आपल्या समस्त ज्ञानाला हें लागू आहे; जें स्पष्टीकरण वस्तूच्या स्वत:च्या स्वरूपावरच आधारलेलें असतें तेंच शास्त्रीय स्पष्टीकरण होय, आणि ज्याच्यासाठी एखादा बाह्य घटक गृहीत धरावा लागतो तें अशास्त्रीय स्पष्टीकरण होय.

'ह्या सृष्टीचा कर्ता सगुण ईश्वर आहे' या सिद्धान्ताला हें तत्त्व लागू केल्यास काय आढळतें ? हा सगुण ईश्वर प्रकृतीच्या बाहेर आहे,

त्याचा प्रकृतीशीं कांही संबंध नाही. त्या ईश्वराच्या आज्ञेने ही प्रकृति शून्यांतून निर्माण झाली. हें मत अशास्त्रीय आहे हें अगदी उघड आहे. सर्वंच सगुणवाद्यांचें मत ह्या मुद्यावर नेहमीच ठिसूळ नि कच्चें असणार. ह्या साऱ्यांच्या मतें ईश्वर हा मानवगुणसंपन्न असतो. फक्त, ह्या गुणांचें प्रमाण त्याच्यांत खूप जास्त असतें, इतकेंच. स्वतः तो प्रकृतीपासून अलग असून, आपल्या इच्छेने तो शून्यांतून ही प्रकृति उत्पन्न करीत असतो. ह्या मताला सगुण ईश्वरवाद किंवा एकेश्वरवाद म्हणतात. या मतांत दोन दोष नेहमी असतात.

पहिला दोष म्हणजे, आपण मघाच पाहिल्याप्रमाणे, हें वर्गीकरण अपुरें आहे. आणि यांतील दुसरा दोष म्हणजे, हें स्पष्टीकरण वस्तूच्या स्वतःच्या स्वरूपावर आधारलेलें नाही. या मतानुसार कारण हें कार्याहून अगदी पृथक् आहे. परंतु माणसाचें ज्ञान जसजसें प्रगत होत आहे तसतसें त्याला आढळून येत आहे की कार्य हें कारणाचेंच दुसरें रूप असतें. आधुनिक विज्ञानाचे सर्व शोध हळूहळू हेंच सिद्ध करीत आहेत की कार्य आणि कारण हीं पृथक् नाहीत—कार्य हें कारणाचेंच रूपान्तर होय. सर्वसंमत असा आजकालचा क्रमविकासाचा सिद्धान्त (theory of evolution) हेंच सांगतो की, कार्य म्हणजेच कारणाचें अन्य रूप होय. कारणाचेंच केवळ अवस्थान्तर किंवा रूपान्तर होय. शून्यांतून सृष्टि निर्माण झाली असें कुणी म्हणूं गेल्यास आजचे वैज्ञानिक त्याला हसतील.

ज्ञानाच्या ह्या दोन्ही पद्धतींच्या कसास धर्म उतरूं शकेल काय? जें धर्ममत ह्या दोन्हींच्या कसास उतरूं शकेल तेंच आधुनिक विचारशील मनाला पटूं शकेल. पुरोहितांच्या, चर्चच्या किंवा धर्मग्रंथांच्या प्रामाण्याचा हवाला देऊन जर आपण आजकालच्या लोकांना एखाद्या मतावर वा सिद्धान्तावर विश्वास ठेवावयास सांगूं तर त्यांना तें शक्य होणार नाही. आणि परिणाम हा होईल की सर्वत्र अविश्वास माजेल. आणि कित्येकांनी बाह्यतः विश्वासाचा देखावा केला तरी त्यांच्या आंत घोर अविश्वासच कोंदलेला आढळून येईल. इतर लोक मुळी धर्माच्या वाऱ्याला उभे राहणार नाहीत, पुरोहितगिरी लेखून ते तसल्या धर्माला दुरूनच हात जोडतील.

धर्माला सध्या कसें एकप्रकारचें राष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें आहे. आपल्या प्राचीन समाजाचा तो एक महान् अवशेष आहे, म्हणून तो असू द्या—हाच आज धर्मासंबंधी आपला मनोभाव आहे. परंतु आधुनिक मानवाच्या पूर्वजांना त्याची जशी एक खरीखुरी गरज भासत असे तशी आज भासेनाशी झाली आहे, आज लोकांना धर्म तर्कसंगत वाटेनासा होऊन गेला आहे, त्यांच्या बुद्धीचें तो समाधान करूं शकेनासा झाला आहे. ईश्वर सगुण असून त्याने शून्यांतून ही सृष्टि निर्मिली आहे ही ईश्वरासंबंधीची कल्पना, सारांश, साधारणतः ज्याला एकेश्वरवाद म्हणतात ती ईश्वरविषयक कल्पना आता लोकांचें समाधान करूं शकेनाशी झाली आहे. त्यामुळे सध्याच्या काळांत तिचा टिकाव लागणें कठीण आहे. भारतामधे बौद्धांच्या प्रभावामुळे ईश्वरविषयक ही कल्पना फोफावू शकली नाही. ह्याच मुद्यावर बौद्धांनी प्राचीनकाळीं जय मिळविला होता. त्यांनी हें दाखवून दिलें की प्रकृति अनंतशक्तिसंपन्न आहे असें मानल्यास, प्रकृति स्वतःच्या गरजा स्वतःच पुरवून घेऊं शकते असें मानल्यास मग प्रकृतीच्या पलीकडे कांही आहे असें समजण्याची कांहीहि गरज नाही. आत्म्याचेंदेखील अस्तित्व स्वीकारण्याची कांही आवश्यकता नाही. या बाबतींत अगदी प्राचीन काळापासून वाद चालत आला आहे, आणि अजूनहि तो संपलेला नाही. तो वाद म्हणजे द्रव्य आणि गुण यांच्या परस्परसंबंधाची चर्चा. या बाबतींतील तेव्हाचे लोकभ्रम आजहि कायमच आहेत.

तुमच्यापैकी पुष्कळांनी वाचलें असेलच की, युरोपांत मध्ययुगामधे (आणि खेदाची गोष्ट अशी की त्यानंतरहि बरेच दिवस) हाच एक वाद चालला होता—गुण हे द्रव्याला चिकटलेले असतात की द्रव्य हें गुणांना चिकटलेलें असतें ? लांबी, रुंदी, उंची इत्यादि गुण हे, आपण ज्याला जडपदार्थ म्हणतों त्या द्रव्याला चिकटलेले असतात काय ? आणि, हे गुण नसतांहि द्रव्य अस्तित्वांत असू शकतें की नाही ? या बाबतींत बौद्धांचें असें म्हणणें आहे की, "अशा प्रकारच्या द्रव्याचें अस्तित्व मानण्याचें कांही कारण नाही. अस्तित्वांत आहेत फक्त गुणच. गुणांखेरीज आणखी कशाचाहि तुम्हांला प्रत्यय येत नसतो." आधुनिक अज्ञेयवाद्यांपैकी बहुतेकांचें मत असेंच आहे. कारण, 'द्रव्य आणि गुण'

यांमधील हा वाद अमळ उच्च तात्त्विक भूमिकेवर 'पारमार्थिक सत्ता आणि व्यावहारिक सत्ता यांमधील वाद' असें रूप धारण करतो. हें सारखें बदलत जाणारें, दृश्य जग आहे, आणि त्याचबरोबर असेंहि कांही आहे की जें बदलत नाही. पहिल्याला म्हणायचें व्यावहारिक सत्ता आणि दुसऱ्याला म्हणायचें पारमार्थिक सत्ता. कुणीकुणी म्हणतात की ह्या दोन्ही सत्ता खऱ्या आहेत, दोन्ही अस्तित्वांत आहेत. तर कुणीकुणी सूक्ष्म तर्काच्या साहाय्याने सिद्ध करूं इच्छितात की, अशा दोन सत्ता मानण्याचें कांही प्रयोजन नाही. कारण आपण जें कांही बघतों, अनुभवतों अथवा ज्या कशावर विचार करतों तें केवळ दृश्यच असतें. ह्या दृश्यापलीकडे कांही आहे हें तुम्ही कशाच्या बळावर म्हणतां ? बौद्धांचें हें म्हणणें निरुत्तर करणारें वाटतें खरें. परंतु अद्वैत वेदान्त, आणि एकमेव अद्वैत वेदान्तच ह्या म्हणण्याला समर्पक उत्तर देऊं शकतो. वेदान्त म्हणतो की अस्तित्व फक्त एकाच वस्तूचें आहे हें अगदी खरें आहे, आणि ती एकच वस्तु कधी व्यावहारिक सत्तेच्या तर कधी पारमार्थिक सत्तेच्या रूपाने प्रत्ययास येत असते. असें नव्हे की दोन सत्ता आहेत, आणि त्यांपैकी एक बदलत असते व तिच्या पाठीशी न बदलणारी दुसरी सत्ता असते. वस्तुस्थिति अशी आहे की एक, कधी न बदलणारी सत्ताच वस्तुतः अस्तित्वांत असून, तीच बदलणाऱ्या व्यावहारिक सत्तेच्या वा दृश्य जगाच्या रूपाने भासमान होत असते.

समजण्यास सोपें जावें म्हणून विचार करतांना आपण देह, मन, आत्मा वगैरे नाना प्रकारचे भेद करीत असतों, परंतु वस्तुतः अस्तित्व आहे फक्त एकाच सत्तेचें. ती एकच सत्ता भिन्नभिन्न रूपांनी भासत असते. अद्वैतवाद्यांचा नेहमीचा दृष्टान्त द्यावयाचा म्हणजे म्हणतां येईल की, असते फक्त दोरीच, तीच सर्परूपाने भासत असते. अंधुकपणामुळे म्हणा की आणखी कांही कारणाने म्हणा, कांहीजण त्या दोरीलाच चुकून साप समजतात. परंतु उजेड येतांच सर्पभ्रम दूर होतो आणि ती दोरी आहे हें कळून येतें. या दृष्टान्तावरून हें आपल्या नीट ध्यानांत येईल की, ज्या वेळीं आपल्या मनांत सर्पज्ञान असतें त्या वेळीं रज्जुज्ञान नाहीसें होतें, आणि ज्या वेळीं रज्जुज्ञानाचा उदय होतो त्या वेळीं सर्पज्ञान निघून जातें. ज्या वेळीं आपण व्यावहारिक सत्ता बघतों त्या

वेळीं (आपल्या दृष्टीने) मग पारमार्थिक सत्ता असत नाही, आणि ज्या वेळीं आपल्याला त्या न बदलणाऱ्या पारमार्थिक सत्तेचा प्रत्यय येतो त्या वेळीं मग अर्थातच व्यावहारिक सत्ता लोपते. हें लक्षांत ठेवलें म्हणजे आपण वास्तववादी (Realist) आणि विज्ञानवादी (Idealist) या दोघांचेंहि म्हणणें नीट समजूं शकूं. वास्तववादी केवळ व्यावहारिक सत्ता बघत असतो आणि विज्ञानवाद्याचें लक्ष पारमार्थिक सत्तेकडे असतें. ज्याला त्या न बदलणाऱ्या पारमार्थिक सत्तेचा प्रत्यक्ष अनुभव आलेला आहे अशा खऱ्याखऱ्या विज्ञानवाद्याच्या दृष्टीपुढून बदलतें जग अंतर्धान पावलेलें असतें, आणि म्हणून हें समस्त जगत् मिथ्या आहे, बदल म्हणून कांही नाही असें म्हणण्याचा त्याला अधिकार आहे. उलट वास्तव-वाद्याचें लक्ष ह्या बदलत्या जगाकडेच असतें. त्याच्या दृष्टीसमोरून न बदलती सत्ता अंतर्धान पावली असते. आणि म्हणून जगत् सत्य आहे असें तो म्हणूं शकतो.

ह्या तात्त्विक विवेचनांतून काय निष्पन्न होतें? यांतून हेंच निष्पन्न होतें की, ईश्वर सगुण आहे ही धारणा पुरेशी समाधानकारक नाही. आपल्याला तिच्यापेक्षा उच्च, म्हणजेच निर्गुणाची धारणा आत्मसात् करावी लागेल. आणि तसें करणेंच तर्कसंगत होईल. येथे हें मात्र लक्षांत ठेवावयास हवें की ह्या निर्गुणाच्या धारणेमुळे सगुण धारणेचा नाश होईल असें मात्र नव्हे. 'निर्गुण' स्वीकारणें म्हणजे 'सगुण' खोडून काढणें, तो नाहीच असें सिद्ध करणें असें मुळीच नाही. आपण निर्गुणाची कास धरावयाची ती सगुण झुगारून देण्याकरता नव्हे, तर सगुणाचें नीट आकलन करण्याकरता. निर्गुणाद्वाराच सगुणाचा खरा अर्थ समजूं शकतो, त्याचें समाधानकारक स्पष्टीकरण होऊं शकतें. कारण निर्गुण हा सगुणापेक्षा अधिक व्यापक सिद्धान्त आहे, तो अधिक व्यापक वर्गीकरणावर आधारलेला आहे. निर्गुणच 'अनंत' असूं शकतो, सगुण नेहमी 'सान्त'च असणार. पुष्कळदा आपल्याला अशी शंका येते की आपण जर ईश्वर निर्गुण आहे या कल्पनेचा स्वीकार केला तर सगुण ईश्वराचा त्याग केल्यासारखें होईल, ईश्वरविषयक सगुण कल्पनेचा नाश केल्यासारखें होईल. जसें ईश्वरा-विषयी, तसेंच माणसाविषयीहि. माणसाविषयीहि सगुण व्यक्तित्व

आणि निर्गुण व्यक्तित्व अशा दोन धारणा असूं शकतात. माणसाच्या निर्गुण व्यक्तित्वाचा स्वीकार केल्याने सगुण व्यक्तित्वाचा नाश होईल असें आपल्याला वाटतें. पण वेदान्त ज्याला निर्गुण म्हणतो, त्याने सगुण व्यक्तित्व—मीपण—नाश पावणार नाही, तर त्याचें खरेंखरें संरक्षण होईल. समष्टीच्या संदर्भांतच व्यष्टीचा अर्थ कळणें शक्य आहे. व्यष्टीचें अस्तित्वच मुळी समष्टीवर अवलंबून आहे. समष्टीपासून अजीबात अलग अशी व्यष्टि असूंच शकत नाही, अशा व्यष्टीची आपण कल्पनाहि करूं शकणार नाहीं.

दुसरें असें की, 'वस्तूच्या स्वरूपांतच खोल जाऊन तिचें ज्ञान करून घ्यावयास हवें' ही ज्ञानाची पद्धत येथे लावल्यास याहिपेक्षा अधिक जाज्वल्य आणि आकलण्यास अधिक कठीण असें तथ्य आपल्याला गवसेल. प्रत्येक वस्तूच्या स्वरूपांत शिरून तिचें ज्ञान करून घ्यावयाचें ठरविल्यास अखेर आपल्या प्रत्ययास येईल की, सर्वांत व्यापक वर्गी-करणाचा अंतिम सिद्धान्त असा तो निर्गुण पुरुष आपल्यांतच विद्यमान आहे—वस्तुत: आपणच तो आहोंत. "हे श्वेतकेतो, तूंच तें आहेस." तुम्हीच तें आहांत, तुम्हीच तो निर्गुण पुरुष आहांत, विश्वभर ज्याला तुम्ही शोधीत होतां तें ब्रह्म तुम्हीच आहांत. येथे 'तुम्ही' म्हणजे 'व्यक्ति तुम्ही' नव्हे तर 'निर्गुण तुम्ही.' स्वत:च्या निर्गुण स्वरूपांत तुम्हीच ब्रह्म आहांत, आपण ज्याला मनुष्य म्हणतों, व्यक्ति म्हणतों, तो सगुण आहे खरा, परंतु वस्तुत:, स्व-रूपत: तो निर्गुण आहे—ब्रह्म आहे. निर्गुणाद्वाराच आपल्याला सगुणाचें ज्ञान होऊं शकतें, सामान्या-द्वाराच आपल्याला विशेषाचें ज्ञान होऊं शकतें. ती निर्गुण सत्ताच खरेखरें सत्य होय, तीच माणसाचें स्व-रूप, माणसाचा आत्मा होय. सगुण, व्यक्त माणूस खरा माणूस नव्हे.

यासंबंधी अनेक प्रश्न उद्भवतील. मी यथावकाश त्याचीं उत्तरें देण्याचा प्रयत्न करीनच. बऱ्याच अडचणी भासूं लागतील पण तिकडे वळण्यापूर्वी आपण आधी अद्वैतवादाचें म्हणणें काय आहे हें नीट सम-जून घेण्याचा प्रयत्न करूं. वेदान्त म्हणतो की, व्यक्त रूपांत आपण एकमेकांपासून वेगळे भासतों खरे, पण वस्तुत: तें एकच सत्य आपल्या सर्वांचें स्व-रूप आहे. आणि त्या एकापासून स्वत:ला आपण जितकें

कमीं वेगळें मानूं तितकें तें आपल्यापक्षीं कल्याणकर होय. या समष्टी-पासून आपण स्वतःला जितकें अधिक वेगळें मानूं तितके आपण दुःखी होऊं. अद्वैतवादाचें हें तत्त्व नीतिमत्तेचा पायाच होय. आणि नीतीला याखेरीज अन्य कोणताहि भरभक्कम पाया असणें शक्य नाही असें मी अगदी ठासून म्हणूं शकतों. कुणी एखादा पुरुष सांगतो किंवा कित्येक विशिष्ट पुरुष सांगतात त्याबरहुकूम वागणें म्हणजेच नीति ही नीतीची जुनी कल्पना आपल्याला अवगत आहेच. आज ही कल्पना स्वीकारावयास फारच थोडे लोक तयार होतील. कारण हा सिद्धान्त अपुरा आहे, व्यापक नाही. हिंदु म्हणतात की आपण अमुक एक गोष्ट करावयास नको, कारण वेदांनी ती मना केली आहे. पण वेदांचें म्हणणें मानायला ख्रिस्ती लोक कां बरें राजी होतील ? त्यांना वेदांचें प्रामाण्य मान्य नसणार. ते म्हणतील की अमुक एक गोष्ट करावयास हवी आणि तमुक एक करावयास नको, कारण बायबलचें तसें सांगणें आहे. ज्यांचा बायबलवर विश्वास नाही त्यांना बायबलच्या या सांगण्याचें कांहीच वाटणार नाही. बायबलाचें तें सांगणें पाळण्याची त्यांना आवश्यकता वाटणार नाही. म्हणून नीतीच्या बाबतींत असा एक सिद्धान्त हवा की ज्यांत ह्या सर्व भिन्नभिन्न प्रेरणांचा अंतर्भाव होऊं शकेल. सगुण सृष्टिकर्त्यावर विश्वास ठेवणारे ज्याप्रमाणे लक्षावधि लोक आहेत, त्याचप्रमाणे असेहि हजारो तेजस्वी बुद्धीचे लोक असतात आणि आहेत की ज्यांना या असल्या कल्पना थोट्या, अपुऱ्या वाटतात, त्यांपेक्षा कांहीतरी उच्च त्यांना हवें असतें. आणि धर्म जेव्हा ह्या लोकांचा समावेश करून घेण्याइतका विशाल वा उदार असूं शकत नाही तेव्हा परिणाम असा होतो की समाजांतील हीं नररत्नें धर्माचा परित्याग करतात. आजकाल असें घडतांना फार आढळतें, आणि युरोपांत तर विशेषतःच.

म्हणून, असल्या व्यक्तींचा समावेश करून घेण्यासाठी धर्माला विशाल, उदार व्हावें लागेल. धर्माचें म्हणणें बुद्धीच्या निकषावर पारखूनच घेतलें जावयास हवें. बुद्धीचा निकष लावून घ्यायला धर्मांनी कां तयार असूं नये कोण जाणे. हें ठीक नव्हे. बुद्धीचा निकष न मानल्यास धर्माच्या बाबतींत कोणत्याहि यथार्थ सिद्धान्ताप्रत पोहोचणें संभवनीय

व्हावयाचें नाही. एखाद्या धर्माने समजा एक अगदी बीभत्स गोष्ट करण्याचा आदेश दिला आहे. * * * समजा की मुसलमान धर्माच्या कुण्या एका आदेशावर एखाद्या ख्रिस्त्याने आक्षेप घेतला आणि म्हटलें की हें चुकीचें आहे. त्यावर तो मुसलमान साहजिकच विचारील की, "कशावरून ? तुला कसें कळलें की हें चुकीचें आहे ? हें चांगलें नाही हें तूं कशावरून म्हणतोस ? तूं स्वतःच्या शास्त्रानुसार चांगलें-वाईट ठरविणार ना ? माझ्या शास्त्रांत चक्क लिहिलें आहे की हें चांगलें आहे, सत्कर्म आहे." यावर जर तो ख्रिस्ती म्हणेल की "माझें शास्त्र तुझ्या शास्त्रापेक्षा जुनें आहे," तर बौद्ध म्हणतील की आमचें शास्त्र तुमच्या शास्त्रापेक्षा जुनें आहे, आणि हिंदु पुढे सरसावून म्हणेल की "माझें शास्त्र साऱ्या जगांत सगळ्यांत जुनें आहे." म्हणून शास्त्राचा हवाला देऊन भागण्यासारखें नाही ! मग ह्या साऱ्यांना ज्यावर पारखायचें असा निकष कोणता ? ख्रिस्ती म्हणेल की "बायबलांतील येशूंचा 'टेकडीवरील उपदेश' बघा. त्याच्या साहाय्याने आपण चांगलें-वाईट काय तें ठरवूं." यावर मुसलमान म्हणेल की, "काय म्हणून ? बायबल काय म्हणून ? कुराणांतील नीतीनुसारच आपण चांगलें-वाईट ठरवूं." या भांडणांत बायबल आणि कुराण यांपैकी कुणीहि मधे पडून निवाडा करूं शकणार नाही, कारण भांडणच मुळी त्या दोघांचें आहे? त्याचा निवाडा करण्यासाठी तिसरेंच कुणीतरी स्वतंत्र असें हवें. हें 'तिसरें' कोणतेंहि शास्त्र असूं शकणार नाही, कारण मग दोघांऐवजी तिघांचें भांडण सुरू होईल ! सारांश, दोन शास्त्रांमधील भांडण तिसरें कोणतेंहि शास्त्र सोडवूं शकणार नाही. त्यासाठीं सर्वसंमत होऊं शकेल अशी एखादी शक्ति हवी. आणि बुद्धीपेक्षा सर्वसंमत अशी आणखी कोणती गोष्ट असूं शकेल ? कित्येकजण म्हणतात की, बुद्धि नेहमीच सत्यापर्यंत पोहोचावयास समर्थ नसते. ती दुबळी, अपुरी पडते. पुष्कळदा ती चुकते. आणि म्हणून आपण एखाद्या पंथाच्या सांगण्यावर डोळे झाकून विश्वास ठेवावयास हवा ! * * * पण मला हें पटत नाही. मी तर उलट असें म्हणेन की, बुद्धि जर दुबळी असेल, तर एखादा पुरोहित-संघ तिच्यापेक्षाहि जास्त दुबळा ठरेल. त्यांचें म्हणणें न ऐकतां मी माझ्या बुद्धीचेंच ऐकेन, कारण ती कितीहि दुबळी असली तरी तिच्या

साहाय्याने सत्य आकलण्याची थोडीतरी शक्यता आहे. परंतु या दुसऱ्या उपायाने सत्य लाभण्याची आशाच नको.

म्हणून आपण बुद्धीचें अनुसरण केलें पाहिजे, आणि बुद्धीचें अनुसरण करून कोणत्याहि प्रकारच्या विश्वासाप्रत जे जाऊन पोहोचत नाहीत अशांविषयी सहानुभूतिहि बाळगली पाहिजे. कारण, केवळ अमुक म्हणतो म्हणून वीस लाख देवतांवर आंधळेपणें विश्वास ठेवण्यापेक्षा बुद्धीचें अनुसरण केल्याने नास्तिक झालेलें परवडलें ! आपल्याला हवी आहे उन्नति, विकास, प्रत्यक्ष अनुभूति. मतें वा सिद्धान्त केवळ दत्तक घेऊन कुणीहि श्रेष्ठ होऊं शकणार नाही. लाखोगणती पोथ्यादेखील आपल्याला अधिक पवित्र होण्यास साहाय्य करूं शकणार नाहीत. ती शक्ति आपल्यामधेच विद्यमान आहे. आणि ती शक्ति म्हणजेच प्रत्यक्षानुभूतीची शक्ति. एकमेव प्रत्यक्षानुभूतिच आपल्याला पवित्र होण्यास मदत करूं शकेल. आणि ती प्रत्यक्षानुभूति चिंतनमननांतून जन्मत असते. म्हणून लोकांना विचार करूं द्या. मातीचें ढेकूळ कधी विचार करीत नाही, पण म्हणून तें अखेरपर्यंत केवळ ढेकूळच राहतें. एखाद्या गाईचा वाटेल त्यावर विश्वास बसवितां येईल. कुत्रा सर्वांपेक्षा विचारहीन प्राणी होय. तीं अखेरपर्यंत कुत्रा, गाय नि ढेकूळच राहणार, त्यांची कांहीहि उन्नति होणें शक्य नाही. माणूस हा विचारक्षम प्राणी आहे यांतच त्याचा गौरव आहे. विचार करणें हा माणसाचा स्वभावसिद्ध धर्म आहे. आणि हाच त्याच्यांत आणि पशूंत फरक. म्हणून आपण विचाराला वाव आणि चालना दिली पाहिजे. माझा बुद्धीवर विश्वास आहे आणि मी बुद्धीचें अनुसरण करीत असतों. केवळ दुसऱ्याच्या म्हणण्यावर विश्वास ठेवीत गेल्याने किती अनिष्ट होतें हें मीं चांगलेंच बघितलें आहे, कारण माझा जन्म अशा देशांत झाला आहे की जिथे ह्या विश्वास ठेवण्याचा अगदी कहर झाला आहे.

हिंदूंचा असा विश्वास आहे की सृष्टि वेदांपासून झाली आहे. गाय आहे हें कसें कळलें ? तर वेदांत 'गाय' शब्द आहे म्हणून. मनुष्य आहे हें कशावरून ? तर वेदामधे 'मनुष्य' शब्द आहे म्हणून. तसें नसतें तर मनुष्यहि नसता. हिंदुलोक असें मानतात. विश्वास ठेवण्याचा कहर अगदी ! अगदी सूड घेऊन विश्वास ठेवायचा ! असो.

आणि ह्याचा अर्थ मी जसा समजतों तसा समजण्यांत येत नाही, तर कांही अत्यंत बुद्धिवान व्यक्तींनी हें घेऊन त्याभोवती अद्भुत तार्किक सिद्धान्त विणले आहेत. त्यांनी त्यावर तर्क लढवून तें सिद्ध केलें आहे, एक संपूर्ण तत्त्वज्ञानच त्यांतून निर्माण केलें आहे. हजारो अत्यंत बुद्धिमान लोक हजारो वर्षें त्यासाठी खपले. निर्बुद्धपणें विश्वास ठेवण्याने काय होऊं शकतें बघा. म्हणूनच तें अत्यंत घातुक, अत्यंत अनर्थकारक होय. त्याने मनुष्यजातीची उन्नति खुरटते, आणि आपण हें कदापि विसरतां कामा नये की आपल्याला हवी आहे उन्नति. सापेक्ष सत्यांच्या बाबतींतसुद्धा सत्यापेक्षाहि आपल्या मनाला चालना देणें हेंच आवश्यक असतें. ह्या सवयीचीच आपल्याला आवश्यकता आहे. विचारच आपलें जीवन होय.

अद्वैतवादाचा हा गुण आहे की सर्व धर्ममतांमधे तोच सर्वांत तर्कसंमत आहे. ईश्वराविषयीचा एकदेशी, संकुचित आणि सगुण असा कोणताहि सिद्धान्त वा धारणा तर्कसंगत कधीच असूं शकत नाही. आणि इतक्यावरहि अद्वैताचा महिमा हा की, ईश्वरविषयक ह्या सर्व एकदेशी धारणा तो धुत्कारीत नाही, तर उलट, पुष्कळांच्यापक्षीं त्या आवश्यक आहेत असें जाणून तो त्यांचा स्वीकारच करतो. कांही लोक म्हणतात की ईश्वराविषयीची सगुण कल्पना ही अगदी तर्कविसंगत, तर्कविरोधी असेल, असूं द्या; पण ती अत्यंत शांतिदायी आहे, सांत्वन देणारी आहे. या लोकांना सांत्वना देणारा धर्म हवा असतो. आणि अद्वैतवादी त्यांची ही आवश्यकता समजूं शकतो. सत्याचा सुस्पष्ट प्रकाश फार थोडेच लोक सहूं शकतात, मग त्या प्रकाशांत जीवन जगणें तर लांबची गोष्ट. म्हणून हा सांत्वना देणारा धर्म अस्तित्वांत राहणें आवश्यक आहे, तो पुष्कळांना उन्नत होण्यास मदत करीत असतो, अधिक उच्च धर्माच्या लाभास पात्र करीत असतो. संकुचित मर्यादेंत घुटमळणारीं लहानलहान मनें सामान्य, लहानसहान वस्तूंच्या आडोशानेच वाढत असतात, विचार-गगनांत उच्च भराऱ्या मारण्याचें धाडस त्यांच्याने कधीच करवत नाही. देव-देवताविषयींच्या आणि प्रतीक-प्रतिमाविषयीच्या मामुली वाटणाऱ्या त्यांच्या कल्पना त्यांच्या स्वतःच्या-पक्षीं चांगल्या आणि उपकारकच असतात. त्यांना त्या लखलाभ

असोत. परंतु आपण हा निर्गुणवाद समजून घ्यावयास हवा. कारण, त्याच्या मदतीनेच आपल्याला ह्या इतर सर्व कल्पना-धारणांचा अर्थ कळूं शकेल. उदाहरणार्थ सगुण ईश्वराची कल्पना घ्या. जो केवळ निर्गुण ईश्वराचीच कल्पना समजूं शकतो आणि म्हणून ज्याचा केवळ निर्गुण ईश्वरावरच विश्वास आहे असा जॉन स्टुअर्ट मिलसारखा माणूस म्हणेल की, सगुण ईश्वर असणें शक्य नाही, त्याचें अस्तित्व सिद्ध करतां यावयाचें नाही. आता, सगुण ईश्वर सिद्ध करून दाखवितां येणें शक्य नाही हें मलाहि कबूल आहे. पण म्हणून काय झालें ? मानवी मन-बुद्धीला गोचर होऊं शकणारी निर्गुणाची सर्वोच्च धारणा सगुण ईश्वर हीच होय. आणि तसें पाहिल्यास जग म्हणजे तरी काय ? भिन्नभिन्न मनांनी त्या निर्गुणाच्या केलेल्या विभिन्न धारणा म्हणजेच (त्या त्या व्यक्तींचें) 'जग' नव्हे काय ? ती निर्गुण, निरपेक्ष सत्ता म्हणजे जणु आपल्या सर्वांसमोरील एक पुस्तक आहे. प्रत्येकजण स्वतःच्या बुद्धीने तें वाचावयाचा प्रयत्न करीत आहे, आणि प्रत्येकाला तें स्वतःचें स्वतःलाच वाचावें लागणार आहे. समस्त मानवांच्या बुद्धींत कांहीतरी सादृश्य असतेंच, म्हणूनच कांही गोष्टी समस्त मानवजातीला सारख्याच वाटत असतात. तुम्हांला आणि मला दोघांनाहि ही खुर्ची खुर्चीच वाटते यावरूनच सिद्ध होतें की आपल्या दोघांच्याहि मनांत कांहीतरी सादृश्य आहेच. कल्पना करा की इथे असा एक जीव आला की ज्याला आपल्यापेक्षा वेगळें एखादें इंद्रिय आहे. आपल्याला दिसत असलेली ही खुर्ची त्याला मुळीच दिसणार नाही. परंतु ज्यांची ज्यांची घडण सारखी आहे त्यांना त्यांना कोणतीहि गोष्ट सारखीच दिसणार. सारांश, हें विश्व म्हणजेच ती निरपेक्ष, अपरिवर्तनशील पारमार्थिक सत्ता (ब्रह्म) होय. आणि व्यावहारिक सत्ता (जग) म्हणजे त्या पारमार्थिक सत्तेच्याच भिन्नभिन्न धारणा होत. कारण, हें अगदी उघड आहे की व्यावहारिक सत्ता नेहमीच सीमित असते. आपण पाहूं शकत असलेली, अनुभवूं शकत असलेली, विचार करूं शकत असलेली प्रत्येक व्यावहारिक सत्ता ही सीमित असते—आपल्या ज्ञानाने मर्यादित झालेली असते. आणि ह्या दृष्टीने बघितल्यास, सगुण ईश्वर हीहि आपली एक 'धारणा'च

असल्याकारणें तो देखील वस्तुतः व्यावहारिक सत्ताच होय. कार्य-कारण संबंध मुळी व्यावहारिक जगांतच शक्य असतो, आणि ज्याअर्थी सगुण ईश्वर हा ह्या जगाचें कारण मानला जातो त्याअर्थी तो सीमित वा मर्यादितच असणार. तरीपण तो (स्वरूपतः) तें निर्गुण ब्रह्मच होय. आपण पाहिलेंच आहे की, जग म्हणजेहि आपण आपल्या बुद्धीने केलेली त्या निर्गुण ब्रह्माची धारणाच होय. जगांत सत्य जर कांही असेल, अस्तित्व जर कशाचें असेल तर त्या निर्गुण ब्रह्माचेंच. त्यांत प्रत्ययास येणारीं नामें आणि रूपें आपल्या बुद्धीनेच कल्पिलेलीं आहेत— त्या निर्गुण सत्तेवर अध्यारोपित केलीं आहेत. ह्या टेबलांत सत्य जर कांही असेल तर तें म्हणजे तें निर्गुण ब्रह्मच; त्याचा टेबल हा आकार वगैरे आपल्या बुद्धीनेच त्याला बहाल केला आहे.

'गती'चेंच उदाहरण घ्या. व्यावहारिक सत्ता म्हटली की तिथे गति आलीच. परंतु विश्वव्यापी पारमार्थिक सत्तेला गति लागू होत नाही. ह्या विश्वब्रह्माण्डांतील अगदी लहानांत लहान गोष्ट, अणु-परमाणुहि सर्वदा परिवर्तन पावत आहे, गतिमान आहे; परंतु समस्त ब्रह्माण्डाचा एकदम विचार केल्यास तें परिणाम पावतें असें म्हणतां यावयाचें नाही, कारण परिणाम वा गति ही नेहमी सापेक्ष असते. स्थिर, गतिहीन पदार्थाच्या अपेक्षेनेच आपण एखादा पदार्थ गतिमान आहे असें म्हणत असतों. गति लक्षांत यावयास दोन पदार्थांची आवश्यकता असते. समस्त विश्वब्रह्माण्ड म्हणजे एक वस्तु असें मानल्यास मग त्यांत गति कशी असणार? तें गतिमान आहे असें आपण कशाच्या बरें अपेक्षेने म्हणणार? तें परिणाम पावतें वा बदलतें असेंहि म्हणतां यावयाचें नाही. कशाच्या अपेक्षेने तें परिणाम पावणार वा बदलणार? म्हणून ही समष्टि ही निरपेक्ष सत्ता होय, परंतु तिच्या अंतर्गत असलेला प्रत्येक परमाणु सारखा परिणाम पावत आहे, निरंतर गतिमान आहे. याप्रमाणे ती समष्टि अपरिणामी आणि त्याचबरोबर परिणामीहि आहे, सगुण आणि निर्गुण दोन्ही आहे. जगत्, गति आणि ईश्वर यांसंबंधी आमची धारणा ही अशी आहे, आणि 'तत्त्वमसि'चा अर्थ हाच आहे. यावरून आपल्याला आढळून येतें की, निर्गुण हें आपल्यापासून सगुणाला हिरावून नेत नाही, निरपेक्ष

हें सापेक्षाचा नाश करीत नाही, उलट आपल्या बुद्धीचें आणि हृदयाचें पूर्ण समाधान होईल अशा तऱ्हेने त्याचें स्पष्टीकरण करतें, त्याचें स्वरूप आपल्याला समजावून देतें. सगुण ईश्वर काय किंवा जगांतील कोणतीहि वस्तु काय, सारींच आपल्या मनाच्या माध्यमांतून दिसणारीं त्या निर्गुणाचींच रूपें होत. आपण ज्या वेळीं आपल्या मनाच्या पलीकडे जाऊं, आपलें क्षुद्र, सीमाबद्ध व्यक्तित्व सोडूं शकूं, त्या वेळीं आपण 'त्या'च्याशीं एक होऊन जाऊं. 'तत्त्वमसि'चा अर्थ हा आहे. आपलें यथार्थ, निरपेक्ष स्व-रूप आपण जाणावयास हवें.

सीमाबद्ध, व्यक्त, सगुण माणूस आपलें उत्पत्तिस्थल--स्वत:चें मूळ स्वरूप--विसरून जातो आणि स्वत:ला संपूर्ण वेगळा मानूं लागतो. याप्रमाणे व्यक्ति बनून, सगुण बनून, वेगळें बनून आपण आपलें सत्य स्व-रूप विसरून गेलों आहोंत. आणि अद्वैतवाद आपल्याला ह्या भेदांचा--भिन्नत्वपूर्ण जगाचा--त्याग करायला सांगत नाही, तर ते वस्तुत:, स्व-रूपत: काय आहेत हें जाणून घ्यावयास शिकवितो. आपण वस्तुत: तो अनंत पुरुष, तो आत्माच आहों. आपण सर्व व्यक्ति म्हणजे एकेक माध्यम असून, या विभिन्न माध्यमांतून ती अनंत सत्ता स्वत:ला व्यक्त करीत आहे. आणि ज्या नाना परिवर्तनांना वा बदलांना आपण 'क्रमविकास' असें नांव देत असतों, ते म्हणजे स्वत:ची अनंत शक्ति अधिकाधिक व्यक्त करण्याचे त्या आत्म्याचे प्रयत्नच होत. परंतु, अनंताच्या ह्या बाजूला--सान्त जगांत--आत्म्याची समस्त शक्ति व्यक्त होणें शक्य नाही. ह्या जगांत आपण केवढ्याहि शक्तीचा, ज्ञानाचा वा आनंदाचा लाभ करून घेतला तरी तीं संपूर्ण म्हणजेच अनंत कदापि असूं शकणार नाहीत, ती सान्तच असणार. सान्त जगांतील शक्ति, ज्ञान व आनंद सान्तच असणार. अनंत शक्ति, अनंत सत्ता आणि अनंत आनंद हीं अनंत आत्म्यांतच शक्य आहेत. आणि तो आत्मा आपलें स्व-रूप होय, आपण वस्तुत: आत्माच आहोंत. म्हणून अनंत सत्ता, अनंत शक्ति, अनंत आनंद आपल्यांतच आहेत. ते आपले आहेतच, आपल्याला ते नव्याने मिळावयाचे नाहीत. ते आधीचेच आपले आहेत, आपल्याला फक्त ते व्यक्त करावयाचे आहेत, इतकेंच.

हीच अद्वैतवादाची मुख्य शिकवण होय. तिचें आकलन होणें सोपें

नाही. कारण बाल्यकालापासून माझ्या भोवतालचे सर्वजण आपण दुबळे आहोंत हेंच शिकवीत आले आहेत, जन्मल्यापासून माझ्या कानीं सतत हेंच पडत आहे की मी दुबळा आहें, म्हणून आता मला माझ्या अंतर्गत शक्तीचा प्रत्यय येणें अत्यंत कठीण होऊन बसलें आहे. परंतु तर्क-विचाराने मला दिसतें की, माझ्या आंत शक्ति आहे हें मला फक्त जाणावयाचें आहे; मी तेवढें करूं शकलों की सारेंकांही झालें. ह्या जगांत आपल्याला जें म्हणून ज्ञान लाभतें तें कोठून येत असतें? तें सर्व आपल्या आंतच असतें. कोणतें ज्ञान बाहेर असतें? कोणतेंहि नाही. ज्ञान कधीच जडांत नव्हतें. तें सदा माणसांतच असतें. ज्ञान कुणीहि कधीहि 'उत्पन्न' करूं शकला नाही, स्वतःच्या आंत सदा वसत असलेलें तें ज्ञान माणूस फक्त बाहेर आणत असतो. तो फक्त त्याचा शोध लावीत असतो. आज कित्येक एकर व्यापणारा हा प्रचंड वड, सगळ्याच्या सगळा मोहरीच्या एकअष्टमांश लहान अशा एका बीजांत होता, ही एवढी प्रचंड शक्ति त्यांत सामावलेली होती. अत्यद्भुत, प्रचंड बुद्धि एका जीवाणु-कोषामधे ( protoplasmic cell मधे ) दडलेली असते हें आपल्याला ठाऊक आहे. हें जर शक्य आहे तर मग अनंत शक्तिहि तशी कां राहूं शकणार नाही? राहूं शकते याविषयी संदेहच नाही. आपल्याला कदाचित् यांत विरोधाभास वाटेल, पण हें सत्य आहे. आपल्यापैकी प्रत्येकजण एकेका जीवाणुकोषांतून निर्माण झालेला आहे, आणि आज आपल्याठायीं आढळणारी सारी शक्ति त्या कोषांत सामावलेली होती. तुम्ही असें म्हणूं शकणार नाही की आपण आजवर जें अन्न खाल्लें त्यांतून ही शक्ति निर्माण झाली आहे. कारण अशा अन्नाचा भला-थोरला पर्वत जरी रचला तरी त्यांतून कांही शक्ति निर्माण होऊं शकेल काय? म्हणून, अर्थातच अव्यक्त रूपाने ही शक्ति आपल्यांत सामावलेली होतीच याबद्दल शंका नाही. म्हणून सिद्धान्त हा की माणूस जाणो की न जाणो, त्याच्या आत्म्यांत अनंत शक्ति वसत असते. तिची फक्त जाणीव होण्याचाच उशीर की ती व्यक्त होते. हळूहळू हा जणु अनंतशक्तिमान दैत्य जागा होत आहे, आणि तसतशी त्याला स्वतःच्या शक्तीची जाणीव होत आहे. आणि जसजशी त्याची ही जाणीव वाढत आहे तसतसें त्याचें बंधनामागून बंधन तटातट तुटत

आहे, शृंखला कडाकड उलून निखळत आहेत. असा एक दिवस अवश्य-मेव उगवेल की जेव्हा त्याला स्वतःच्या अनंत शक्तीची आणि ज्ञानाची संपूर्ण जाणीव होईल, आणि याप्रमाणे शक्तिमान व ज्ञानवान होऊन तो उठून उभा राहील. या, आपण ही गौरवमय अवस्था लवकर येण्यासाठी हातभार लावूं या.

---

## व्याख्यान चवथें

(लंडन, १८ नोव्हेंबर १८९६)

आपण आतापर्यंत समष्टीचाच अधिक विचार केला. आता आज सकाळीं, व्यष्टि आणि समष्टि यांच्यांत वेदान्ताच्या मतें काय आणि कसा संबंध आहे, हें मी तुम्हांला विशद करून सांगण्याचा प्रयत्न करीन. आपण हें बघितलेंच आहे की, वेदांच्या प्राचीन द्वैतात्मक भागांत असें प्रतिपादिलें गेलें आहे की प्रत्येक जीवाचा एकेक वेगवेगळा, अलग-अलग आत्मा असतो. अशा रीतीने प्रत्येक जीवांत अवस्थित असणाऱ्या ह्या आत्म्यासंबंधी निरनिराळीं मतें प्रचलित आहेत. तथापि प्राचीन वेदान्ती आणि प्राचीन बौद्ध यांच्यांतील ह्यासंबंधीचा वाद सर्वांत मुख्य व महत्त्वाचा आहे. जीवाचा आत्मा स्वयंपूर्ण आहे असें प्राचीन वेदान्त्यांचें मत होतें, तर असा आत्मा मुळी नाहीच असें बौद्धांचें मत होतें. मीं कालच तुम्हांला सांगितल्याप्रमाणे, हा वाद म्हणजे तुमच्या युरोपांत चाललेल्या द्रव्य आणि गुण यांच्यासंबंधीच्या वादासारखाच म्हणतां येईल. कांहींच्या मतें, गुणांच्या पाठीमागे द्रव्य म्हणून कांहीतरी असून ते गुण त्या द्रव्यांत वसत असतात, तर कांहीच्या मतें असल्या द्रव्याचें अस्तित्व मानण्याची कांहीच गरज नाही, कारण गुण हे द्रव्या-शिवाय तसेच स्वतःच असूं शकतात. आत्म्यासंबंधीचा सर्वांत प्राचीन सिद्धान्त अर्थातच 'मी नेहमी मीच असतों' या 'मी'च्या एकरूपत्वावर आधारलेला होता. कालचाच मी आजचा मी आहें, आणि आजचा मीच उद्याचाहि मी असणार आहें. शरिरांत इतके बदल घडत असूनहि मी सदा तोच मी आहें असा माझा विश्वास असतो. सीमाबद्ध आणि तरीहि स्वयंपूर्ण अशा आत्म्यावर ज्यांचा विश्वास होता त्यांच्या त्या विश्वासाचा मुख्य आधार बहुधा हाच मुद्दा असावा.

उलटपक्षीं प्राचीन बौद्ध असल्या आत्म्याचें अस्तित्व मानण्याची कांहीहि गरज नाही अशा मताचे होते. आपली बाजू ते अशी मांडीत की, आपल्या जर कांही अनुभवास येत असेल आणि येऊं शकत असेल तर ते म्हणजे बदलच. बदलांखेरीज, परिवर्तनांखेरीज, परिणामांखेरीज आणखी कांहीहि आपल्या प्रत्ययास येत नसतें—येणें संभवनीय नाही. उगाच एखादें बदलूं न शकणारें, न बदलणारें असें द्रव्य मानण्यांत कांही हाशील नाही, आणि अशी एखादी वस्तु जरी असेलहि, तरी ती आपण कधीच जाणूं शकणार नाहीं, आपण ज्याला प्रत्यक्षगोचर होणें म्हणतों त्या अर्थानें ती कधीच आपल्याला प्रत्यक्षगोचर होऊं शकणार नाही. आज युरोपांतहि हाच वाद चालूं असलेला तुम्हांला आढळेल. त्यांत एका बाजूला आहेत धर्मवादी (Religionist) व विज्ञानवादी (Idealist), आणि दुसऱ्या बाजूला आहेत आधुनिक प्रत्यक्षवादी (Realist) व अज्ञेयवादी (Agnostic). एका बाजूच्या विचार-वंतांचें म्हणणें आहे की, न बदलणारें कांहीतरी आहे. तुमचे हर्बर्ट स्पेन्सर हे या पक्षाचे अगदी नवे प्रतिनिधि म्हणतां येतील. ह्यांच्या मतें, आपल्याला न बदलत्या अशा कांहीतरीचें ओझरतें दर्शन लाभत असतें. दुसऱ्या पक्षाचे प्रतिनिधि म्हणजे कोम्टचे अनुयायी (Comtists) व आधुनिक अज्ञेयवादी. कांही वर्षांपूर्वी हर्बर्ट स्पेन्सर आणि फ्रेडरिक हॅरिसन यांच्यांत झालेल्या वादांत तुमच्यापैकी ज्यांनी लक्ष घातलें होतें त्यांच्या ध्यानांत आलें असेल की ती जुनीच अडचण या दोघांनाहि अडवीत आहे. एक पक्ष ह्या बदलत्या वस्तूंच्या मागे एक न बदलती सत्ता मानीत आहे, आणि दुसरा पक्ष तशी ती मानण्याची कांहीहि गरज नाही असें प्रतिपादीत आहे. एक पक्ष म्हणतो की एखाद्या न बदलणाऱ्या सत्तेच्या कल्पनेशिवाय आपण बदलांची कल्पनाच करूं शकणार नाहीं. दुसरा पक्ष म्हणतो की असली कल्पना अगदी निरर्थक आहे; आपण केवळ बदलत्या गोष्टींचीच कल्पना करूं शकतों; आणि तुमच्या त्या न बदलत्या सत्तेसंबंधी एवढेंच म्हणतां येतें की, ती आपण कधी जाणूं शकत नाहीं, कधी अनुभवूं शकत नाहीं, ती कधी आपल्याला प्रत्यक्षगोचर होऊं शकत नाही.

भारतांतहि या महान् वादाचा निर्णय फार प्राचीन काळीं होऊं

शकला नव्हता. कारण, आपण पाहिलेंच आहे की, गुणांच्या मागे असून, परत त्या गुणांहून वेगळया अशा द्रव्याचें अस्तित्व कधीच पुराव्यानें सिद्ध करतां येत नसतें. इतकेंच नव्हे तर, 'कालचाच मी आजचाहि मी आहें कारण मला त्याचें स्मरण आहे, आणि म्हणून मी नेहमीच आहें' — या स्मृतीवर अथवा 'मी'च्या एकरूपत्वावर आधारलेल्या तर्कांतहि कांही दम नाही. या बाबतींत आणखी एक मुद्दा प्रमाण म्हणून बहुधा पुढे करण्यांत येत असतो. पण तोहि वस्तुतः शाब्दिक खेळाखेरीज आणखी कांहीच नाही. तो मुद्दा असा : 'मी जातों', 'मी खातों', 'मी स्वप्न पाहतों', 'मी गाढ झोपतों' अशासारखीं अनेक वाक्यें दृष्टान्तादाखल घेऊन हे लोक म्हणतात की जाणें, खाणें, स्वप्न पाहणें वगैरे बदलत आहेत खरे, परंतु त्या सर्वांमधे 'मी' मात्र जसाच्या तसाच आहे; यावरून हें सिद्ध होतें की, हा 'मी' नित्य आहे, स्वरूपतः अविभाज्य सत्ता आहे, आणि हे जे बदल होतात ते निव्वळ शरीराचे धर्म होत. हा मुद्दा वरवर पाहतां खूप पटण्यासारखा आणि स्पष्ट वाटत असला तरी तो खरोखर पाहिल्यास शाब्दिक खेळावरच आधारलेला आढळेल. हा 'मी' आणि हें 'खाणें', 'जाणें' 'निजणें' इत्यादि केवळ शब्दांतच वेगळे आहेत, स्वतःच्या मनांत त्यांना कुणीहि वेगळे करूं शकणार नाही.

जेव्हा मी खातों, 'मी खात आहें' असा विचार करतों तेव्हा मी खाण्याशीं तादात्म्य पावलेला असतों, जेव्हा मी पळतों, तेव्हा मी आणि पळणें ह्या दोन वेगळया गोष्टी राहिलेल्या नसतात. सारांश काय की हा मुद्दा तितकासा बळकट नाही. 'स्मृती'चा मुद्दाहि असाच फुसका आहे. स्मृतीच्या आधारावर जर माझें एकरूपत्व सिद्ध करूं म्हटलें तर माझ्या ज्या सर्व अवस्था मी विसरून गेलों आहें त्या त्या अवस्थांच्या वेळीं मी नव्हतों असें म्हणावें लागेल. कित्येकजण कांही विशिष्ट परिस्थितींत आपलें संपूर्ण गतजीवन विसरून जातात हें तुम्हांला माहीत असेलच. वेडांचे असे कांही प्रकार आहेत की त्या अवस्थेंत वेडा स्वतःला कांचेचा बनलेला मानूं लागतो, किंवा आपण एक जनावर आहोंत असें समजूं लागतो. जर त्या वेड्याचें अस्तित्व त्याच्या स्मृतीवर अवलंबून असेल तर तो कांच किंवा जनावर होऊन

बसला आहे असें म्हणावें लागेल. पण तसें नसतें. म्हणून, 'मी'चें एकरूपत्व हें स्मृतीच्या असल्या ठिसूळ पायावर आधारणें योग्य व्हावयाचें नाही. यावरून काय निष्कर्ष निघतो ? निष्कर्ष हाच निघतो की, सीमाबद्ध आणि तरीहि स्वयंपूर्ण असा एकरूप 'मी' असून, तो गुणांहून वेगळा आहे असें सिद्ध करतां येणें शक्य नाही. जिला गुणांचा पुंज चिकटलेला आहे अशा एखाद्या समर्याद, सीमाबद्ध सत्तेचें अस्तित्व आपण कदापि सिद्ध करूं शकणार नाहीं.

उलटपक्षीं प्राचीन बौद्धांचें हें म्हणणें अधिक सबळ वाटतें की, गुणसमुच्चयाच्या पलीकडे असलेल्या कोणत्याहि वस्तूसंबंधी आपण कांहीच जाणत नाहीं--जाणूं शकतहि नाहीं. त्यांच्या मतें संवेदना आणि भावनारूपी कांही गुणांची समष्टि म्हणजेच आत्मा होय. असल्या गुणांचा समुच्चय म्हणजेच आत्मा, आणि ते गुण सारखे परिवर्तन पावत असतात.

द्वैतवादी आणि बौद्ध यांच्या ह्या मतांचा समन्वय होऊं शकतो--अद्वैतवादाच्या आत्माविषयक सिद्धान्ताने. अद्वैतवादाचा सिद्धान्त आहे की, आपण गुणांपासून वेगळ्या अशा द्रव्याची कल्पना करूं शकत नाहीं हें खरें आहे; परिवर्तन आणि अ-परिवर्तन या दोहोंची आपण एकाच वेळीं कल्पना करूं शकत नाहीं. तशी कल्पना करणें असंभाव्य होय. परंतु, ज्याला आपण द्रव्य म्हणतों तेंच गुण होय, द्रव्य आणि गुण ह्या दोन वेगळ्या गोष्टी नाहीत. जें अ-परिवर्तनशील वा न बदलणारें आहे तेंच परिवर्तनांच्या वा बदलांच्या रूपाने भासत आहे. ती अपरिवर्तन-शील सत्ता ह्या परिवर्तनशील जगापासून वेगळी नाही. पारमार्थिक सत्ता व्यावहारिक सत्तेहून पृथक् नाही, त्या पारमार्थिक सत्तेनेच ह्या व्यावहारिक सत्तेचें रूप घेतलें आहे. विद्यमान आहे अपरिवर्तनशील आत्माच; आणि आपण ज्यांना भावना, संवेदना, अनुभव इत्यादि इत्यादि म्हणत असतों तीं सर्व, इतकेंच नव्हे तर आपलें शरीरदेखील स्व-रूपत: आत्माच आहे--आत्म्याचींच तीं वेगवेगळीं रूपें होत. वस्तुत: आपल्याला एकाच वेळीं दोहोंचा अनुभव येत नसतो, येत असतो फक्त एकाचाच. आपल्याला शरीर-मनादि आहेत आणि आत्मा आहे असें समजण्याची आपल्याला सवय पडून गेली आहे, परंतु खरोखर विद्यमान आहे

एकच सत्ता.

ज्या वेळीं मी शरीर आहें अशी मला प्रतीति होत असते, त्या वेळीं मी केवळ शरीरच असतों; त्या वेळीं 'मी ह्या शरीराहून निराळें कांहीतरी आहें' असें म्हणणें वृथा होय. आणि ज्या वेळीं मी आत्मा आहें असा मला प्रत्यय येतो त्या वेळीं देह लोपतो, मग देहानुभूति उरत नाही. देहबोध नाहीसा झाल्याखेरीज आत्मबोध उदय पावणें कदापि शक्य नाही. गुणांची प्रतीति निमाल्याखेरीज द्रव्याचा प्रत्यय येणें कधीहि शक्य नाही.

अद्वैतवाद्यांच्या त्या सुपरिचित रज्जुसर्पाच्या दृष्टान्ताने हा मुद्दा अमळ आणखी स्पष्ट होऊं शकेल. आपण ज्या वेळीं दोरीला चुकीने साप समजतों त्या वेळीं आपल्या दृष्टीने तिथे दोरी असत नाही, आणि ज्या वेळीं ती दोरी आहे हें आपल्या नीट लक्षांत येतें त्या वेळीं मग तिथे साप उरत नाही, उरते फक्त दोरी. द्वैत किंवा त्रैत अस्तित्वांत आहे असें वाटणें हा आपल्या विचारपद्धतीचा सदोषपणा होय. या असल्या कल्पनांचा पुरस्कार करणारे ग्रंथ आपल्या वाचण्यांत येत असतात, इतरहि अनेक मार्गांनी या कल्पना आपल्या कानींकपाळीं आदळत असतात. त्यामुळे आपल्याला असा भ्रम होतो की खरोखरच आपल्याला आत्मा आणि देह या दोहोंचाहि एकदमच अनुभव येत असतो. वस्तुत: असा अनुभव येणें कधीच शक्य नाही. अनुभव येणें शक्य आहे फक्त एकाचाच—एकतर शरीराचा, आणि नाहीतर आत्म्याचा. हें सिद्ध करण्यासाठी पुराव्याची गरज नाही, तुम्ही स्वत:शींच हें ताडून पाहूं शकतां.

आपण देहहीन आत्मा आहोंत अशी कल्पना करण्याचा प्रयत्न करून बघा. हें एकप्रकारें अशक्यच असल्याचें तुम्हांला आढळून येईल. आणि ज्या कांही बोटावर मोजण्याइतक्या व्यक्तींना तें जमेल, त्यांच्या अनुभवास येईल की जोंवर त्यांना आपण आत्मा आहोंत असा बोध होत राहील तोंवर त्यांचा देहबोध नाहीसा झालेला असेल. तुम्हीं ऐकलें असेल, कदाचित् पाहिलेंहि असेल की संमोहनामुळे (Hypnotismमुळे), ज्ञानतंतूंच्या रोगामुळे, कांही विशिष्ट रसायनामुळे किंवा अशाच एखाद्या कारणाने कित्येक व्यक्तींच्या मनाची कधीकधी एक विलक्षण

अवस्था होत असते. त्यांच्या अनुभवावरून आपल्याला कळूं शकतें की, ज्या वेळीं त्यांना आंतल्या कशाचा तरी अनुभव येत होता त्या वेळीं त्यांना बाहेरच्या कशाचाहि अनुभव मुळीच येत नव्हता—त्यांचा बाह्य जगाचा बोध त्या वेळीं अजीबात लोपला होता. यावरून हेंच दिसून येतें की अस्तित्व आहे फक्त एकाच सत्तेचें, दोन सत्तांचें नव्हे. ती एक सत्ताच या नाना रूपांनी भासत आहे, आणि त्यांच्यामधे कार्य-कारण संबंध आहे. कार्यकारण संबंध म्हणजे उत्क्रांति वा क्रमविकास—एक दुसऱ्यांत परिणत होणें. कधीकधी कारण जणु लोपतें आणि त्या जागीं कार्य शिल्लक राहतें. जर आत्मा देहाचें कारण असेल तर तो जणु तेवढ्यापुरता लोपून फक्त देहच राहतो, आणि ज्या वेळीं देहाचा लोप होतो त्या वेळीं आत्मा उरतो. या युक्तिवादाने बौद्धांच्या मताचें खंडन होतें. आत्मा आणि देह ह्या दोन वेगळ्या गोष्टी आहेत या द्वैतवाद्यांच्या म्हणण्यावर बौद्धांनी आक्षेप घेतला होता. अद्वैतवाद त्या द्वैताचा अर्थ समजावून देतो, आणि सांगतो की गुण आणि द्रव्य एकच आहेत, एकाचींच दोन रूपें आहेत. आणि म्हणून अद्वैतवादामुळे बौद्धांच्या आक्षेपांचें पूर्ण निरसन होऊन त्यांचें मत खंडित होऊन जातें.

आपण हेंहि बघितलें की, अपरिवर्तनशीलता वा 'न बदलणें' हें फक्त समष्टीच्या बाबतींतच खरें असणें शक्य आहे, व्यष्टीच्या बाबतींत नव्हे. 'व्यष्टि' ही कल्पनाच मुळी बदलाशीं वा गतीशीं निगडित आहे. जें कांही सीमित आहे त्यांतच बदल होऊं शकतो, कारण दुसऱ्या एखाद्या सीमित पदार्थाशीं किंवा असीमाशीं तुलना करून त्यांतील बदल आपण जाणूं शकतों. परंतु समष्टि ही अपरिवर्तनशील असते, कारण ज्याच्याशीं तुलना करून तिचें परिवर्तन वा तिची गति आपण जाणूं शकूं असें तिच्यापासून वेगळें अन्य आणखी कांहीच नाही. न बदलत्या किंवा कमी बदलत्या गोष्टीशीं तुलना करूनच आपण कोणत्याहि पदार्थाचें बदलणें जाणूं शकत असतों.

म्हणून, अद्वैत वेदान्ताच्या मतें सर्वव्यापी, अपरिवर्तनशील अमर आत्म्याचें अस्तित्व सप्रमाण सिद्ध करतां येतें. अडचण आहे ती व्यष्टिविषयीच. मग, आपल्या मनावर इतकी पकड असणाऱ्या आपल्या

प्राचीन द्वैतवादाचें काय होणार ? सीमित, अल्प, व्यक्तिस्वरूप आत्म्यावरील आपल्या विश्वासाचें काय होणार ?

आपण पाहिलेंच की समष्टिदृष्टीने आपण अमर आहोंत, परंतु अडचण अशी की आपण सीमित व्यक्ति या दृष्टीनेहि अमर असूं इच्छितों. या आपल्या इच्छेचें काय होणार ? आपण पाहिलें की, आपण अनंत आहोंत, आणि तेंच आपलें खरें व्यक्तित्व आहे. परंतु आपण आपल्या या क्षुद्र देहात्म्यालाच आपलें व्यक्तित्व मानून तेंच अमर असावें असें इच्छितों. या क्षुद्र व्यक्तित्वाचें स्वरूप काय आहे ? आपल्या दैनंदिन अनुभवांवरून असें म्हणतां येईल की या देहात्म्याला व्यक्तित्व आहे खरें, पण तें व्यक्तित्व सारखें बदलत असतें, विकास पावत असतें. तें एक आहे असेंहि म्हणतां येईल, आणि त्याचबरोबर वेगवेगळें आहे असेंहि म्हणतां येईल. कालचा मीच आजचा मी आहें आणि नाहीहि, कारण त्यांत कांहीसा बदल झाला आहे. यावरून, या बदलांमधे न बदलणारें कांहीतरी आहे हें द्वैतवादी मत अग्राह्य ठरतें, आणि अत्यंत आधुनिक असा क्रमविकासवाद (theory of evolution) ग्राह्य ठरतो. मथितार्थ हा की, 'मी' ही एक सतत बदलणारी, सतत विकास पावणारी अशी वस्तु आहे.

माणूस हा एका विशिष्ट मांसल जंतूचा (molluscचा) क्रमविकास होऊन बनला आहे हें जर खरें असेल तर मग तो जंतु आणि माणूस हे एकच म्हणतां येतील—केवळ, माणूस ही त्या जंतूची अत्यंत विकसित अवस्था होय, इतकेंच काय तें. तो जंतु एकसारखा विकसित होत अनंताकडे चालला असून त्या विकसनांत त्याला मनुष्यरूप प्राप्त झालें आहे. अतएव सीमाबद्ध जीवात्म्यालाहि व्यक्ति म्हणतां येईल; हा सीमाबद्ध जीवात्मा हळूहळू अनंत वा पूर्ण व्यक्तित्वाकडे जात असलेली व्यक्ति होय. तो त्या अनंताप्रत जाऊन पोहोचेल तेव्हाच त्याला पूर्ण व्यक्तित्व लाभेल; परंतु ती अवस्था लाभेपर्यंत त्याच्या व्यक्तित्वांत सारखा बदल, सारखा विकास होत राहतो.

अद्वैत वेदान्ताचें एक वैशिष्टय आहे. तें म्हणजे पूर्वीच्या साऱ्या मतांचा समन्वय साधणें—त्यांचा मेळ बसविणें. तसें करतांना कधीकधी त्याचा लाभ झाला आहे, तर कधीकधी त्याच्या गभीर

तत्त्वज्ञानाची हानिहि झाली आहे. आजच्या क्रमविकासवाद्यांप्रमाणे वेदान्त्यांचेंहि असेंच मत होतें की, उन्नति ही हळूहळू, पायरीपायरीने होत असते. आणि उन्नतीबाबत त्यांचें हें असें मत होतें म्हणूनच ते स्वतःच्या तत्त्वज्ञानाशीं पूर्वीच्या समस्त तत्त्वप्रणालींचा मेळ घालूं शकले--सर्वांचा समन्वय साधूं शकले. परिणामीं, पूर्वीच्या कोणत्याहि तत्त्वप्रणालीचा त्यांनी त्याग केला नाही--ते सर्वांचेंच ग्रहण करूं शकले. बौद्धमतांत हा एक विशेष दोष होता की, ह्या क्रमविकासाचें तत्त्व आकलणें त्यांना जमलें नाही--विकास हा क्रमाक्रमाने, हळूहळू, पायरीपायरीने होत असतो हें तथ्य त्यांना उमजलें नाही. आणि म्हणूनच, त्यांच्या-पूर्वी जे जे सत्याकडे जाणाऱ्या कांही पायऱ्या चढले, त्यांच्या मतांशीं स्वतःच्या मताचा मेळ घालण्याचा बौद्धांनी कधी प्रयत्नदेखील केलेला नाही. उलट तीं सर्व मतें कुचकामाचीं, निरर्थक आणि अनिष्टकारक ठरवून बौद्धांनी त्यांचा त्यागच केला.

धर्माच्या राज्यांत ही असली प्रवृत्ति अत्यंत घातुक, अत्यंत हानिकारक होय. एखाद्या व्यक्तीला एखादा नवीन आणि उच्चतर आदर्श गवसतांच, ती आपल्या त्या पूर्वीच्या आदर्शाविषयी असा सिद्धान्त बांधून बसते की ते जुने आदर्श अनिष्टकारक आणि अनावश्यक होते. मग एकदाहि असा विचार त्या बिचाऱ्याच्या मनांत येत नाही की, त्याच्या आजच्या दृष्टीने ते जुने आदर्श कितीहि विसंगत आणि ओबडधोबड वाटेनात का, पण त्याच्या जीवनांत एक वेळ अशी होती की तेच ओबडधोबड आदर्श त्याला त्या वेळीं अत्यंत उपयोगी होते, त्यांच्याच आसऱ्याने त्याने आजची मजल गाठली आहे; आणि आपल्यापैकी प्रत्येकाचा विकास अशाच तऱ्हेने होत असतो, प्रत्येकाला असेंच प्रथम ओबडधोबड आदर्शांचें साहाय्य घ्यावें लागत असतें व त्यांच्याच मदतीने उच्चतर अवस्था गाठावी लागत असते. आणि म्हणूनच, जुन्यांत जुन्या तत्त्वप्रणालींशीं, द्वैतवादाशीं अथवा कोणत्याहि वादाशीं अद्वैतवादाचें भांडण नाही. सर्वांशींच त्याचें सख्य आहे, तो कुणाचाच त्याग करीत नाही, सर्वांचेंच ग्रहण करतो. पण त्याचबरोबर आपण इतर तत्त्वप्रणालींचें, वादांचें वा मतांचें हें जें ग्रहण करतों, तें म्हणजे आपण त्यांच्यावर दया करतों असा मात्र अद्वैतवेदान्ताचा

मनोभाव नाही. अद्वैतवेदान्त अनुग्रह करायचा म्हणून इतरांचें ग्रहण करीत नाही. तो इतरांचें ग्रहण करतो तें या दृढ धारणेने की हीं इतर मतेंहि खरीं आहेत, तीं एकाच सत्याचे निरनिराळे आविष्कार आहेत, आणि आपण (अद्वैतवादाने) स्वतः जो सिद्धान्त गाठला आहे त्याच सिद्धान्ताप्रत हीं सारीं मतेंहि पोहोचणार आहेत.

म्हणून, मानवाला सत्याकडे जातांना ह्या ज्या पायऱ्या चढाव्या लागत असतात त्यांची हेटाळणी करणें, त्यांची निंदा करणें वा त्यांना शिव्याशाप देणें उचित नाही. उलट, त्या साऱ्यांचें शुभ चिंतून त्यांचें रक्षण करावयास हवें. म्हणूनच अद्वैतवेदान्ताने ह्या साऱ्या द्वैतात्मक तत्त्वप्रणालींचा त्याग केला नाही, तर त्यांचें रक्षण केलें, जतन केलें. आणि म्हणूनच, सीमित आणि तरीहि पूर्ण अशी जी जीवात्म्याविषयी द्वैतवादाची धारणा आहे तिला अद्वैतवेदान्तांत स्थान आहे.

द्वैतवादानुसार माणूस मरणानंतर अन्य लोकांत जातो. अद्वैतवादाने या सर्व कल्पनांना निःसंकोचपणें स्थान दिलें आहे. कारण अद्वैतवादाच्या मतें, विकासाच्या एका स्तरावर ह्या सर्व कल्पना माणसाला खऱ्या वाटत असतात. त्या सर्व खऱ्या आहेत, फक्त त्या अंशतः खऱ्या आहेत एवढें जाणून असलें म्हणजे झालें; सत्याचें तें आंशिक दर्शन आहे.

द्वैतवाद्याच्या दृष्टीने हें जगत् केवळ जड ( matter ) आणि शक्ति ( force ) यांनीच सृष्ट झालेलें ठरणार. एका विशिष्ट इच्छाशक्तीने तें निर्माण केलें आहे असेंच द्वैतवादी समजणार. आणि ती इच्छाशक्ति या जगताहून अलग आहे अशीच त्याची धारणा असणार. म्हणून द्वैतवाद्याची स्वतःसंबंधी अशीच कल्पना असणार की, तो आत्मा आणि देह या दोहोंनी मिळून झालेला असून, हा आत्मा ससीम असला तरी पूर्ण आहे. साहजिकच द्वैतवाद्यांची अमरत्वाची आणि मरणोत्तर जीवनाची कल्पना त्यांच्या या आत्म्याच्या कल्पनेस अनुसरूनच असणार. वेदान्तामधे ह्या सर्व कल्पनांनाहि स्थान दिलें गेलें आहे. आणि ज्याअर्थी द्वैतवादाला वेदान्तांत स्थान आहे त्याअर्थी द्वैतवादाचे कांही मुख्यमुख्य सिद्धान्त मीं येथे तुम्हांला सांगितल्यास तें अप्रासंगिक होणार नाही, उलट ते सांगणें त्या दृष्टीने अमळ आवश्यकहि आहे.

या मतानुसार (द्वैतवादानुसार) अर्थातच प्रथमतः आपलें हें स्थूल शरीर आहे. याच्यामागे आहे सूक्ष्म शरीर. हें सूक्ष्म शरीरदेखील पंचभूतांचेंच बनलेलें आहे, पण तें अत्यंत सूक्ष्म भूतांपासून निर्मिलें गेलें आहे. तें आपल्या समस्त कर्मांचें संचयस्थान होय. आपल्या समस्त कर्मांचे संस्कार या सूक्ष्म शरीरांत विद्यमान आहेत—फल देण्यास उन्मुख अशा अवस्थेंत तिथे सर्वदा विद्यमान आहेत. आपण केलेला प्रत्येक विचार, आपण केलेली प्रत्येक क्रिया कांही कालाने सूक्ष्म रूप धारण करते, जणु बीजरूप धारण करते, आणि अव्यक्त रूपाने या सूक्ष्म शरीरांत राहते, आणि कालान्तराने फिरून प्रकट होऊन अनुरूप फल देते. या फलांनी माणसाचें जीवन नियंत्रित होत असतें. याप्रमाणे माणूस स्वतःच्या कर्मांनीच स्वतःचें जीवन घडवीत असतो. माणूस आणखी कोणत्याहि नियमांच्या आधीन नाही, केवळ स्वतःच्याच कर्म-बंधनांनी तो बांधलेला आहे. तो केवळ स्वतःच्याच कर्मांच्या आधीन आहे, स्वतःच्याच जाळयांत अडकलेला आहे. चांगलीं म्हणा की वाईट म्हणा, आपलींच कर्में त्या जाळयाच्या दोऱ्या असून, स्वतःच विणलेल्या त्या जाळयांत आपण स्वतःच अडकत असतों. एकदा एखाद्या शक्तीला चालना दिल्यानंतर मग तिचे सगळे परिणाम आपल्याला भोगणें प्राप्त आहे. कर्माचा नियमच तसा आहे. या सूक्ष्म शरीराच्या मागे सीमा-न्वित जीवात्मा राहतो. या जीवात्म्याच्या आकाराविषयी अनेक तर्कवितर्क आहेत. कांही संप्रदायांच्या मतें तो आकाराने अणु आहे, कांहींच्या मतें तो मध्यम आहे, तर कांहींच्या मतें तो विभु (व्यापक) आहे. हा जीव त्या अनंत सत्तेचा एक अंश असून अनादि-अनंत आहे. त्याला आदिहि नाही, अंतहि नाही. त्या सर्वव्यापी सत्तेचा एक अंश अशा स्वरूपांत तो सदाच आहे. आपलें स्वतःचें शुद्ध स्वरूप प्रकट करण्यासाठी तो जन्मोजन्म देहामागून देह धारण करीत चालला आहे. त्याचें तें स्व-रूप प्रकट होण्यास ज्या कर्माने वा विचाराने अडथळा येतो त्या कर्माला कुकर्म आणि त्या विचाराला कुविचार म्हणतात. आणि ज्या कर्मांनी वा विचारांनी जीवाच्या त्या खऱ्या स्वरूपाच्या विकासाला किंवा प्रकटीकरणाला मदत होते त्यांना सुकर्में आणि सुवि-चार म्हणतात. येथे एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे ती ही की,

भारतांतील अगदी खालच्या पातळीच्या द्वैतवाद्यांपासून तों सर्वोच्च दर्जाच्या अद्वैतवाद्यांपर्यंत सर्वांचें एका मुद्यावर संपूर्ण एकमत आहे. तो मुद्दा हा की, आत्म्याची सारी शक्ति आणि क्षमता त्याच्या आंतच आहेत, त्या बाहेरून कुठून येत नाहीत. त्या आत्म्यांत अव्यक्त रूपानें वसत असतात, आणि या अव्यक्त शक्तींचा विकास करणें हेंच जीवनाचें एकमेव कार्य होय.

द्वैतवादी पुनर्जन्म मानतात. त्यांच्या मतें, ह्या देहाचा नाश झाल्यानंतर जीवाला दुसरा देह लाभेल, त्याचा नाश झाल्यानंतर तिसरा, याप्रमाणे देहामागून देह त्याला लाभतात. त्याचप्रमाणे, मरणा-नंतर त्याला ह्या पृथ्वीवर जन्म मिळेल किंवा अन्य एखाद्या लोकांतदेखील जन्म मिळूं शकेल. पण सर्व लोकांत ही पृथ्वीच सर्वश्रेष्ठ स्थान होय. कारण, त्यांच्या मतें जीवाचें प्रयोजन इतर कोणत्याहि लोकापेक्षा येथेच सिद्ध होतें. इतर लोकांत दुःख खूप कमी आहे, परंतु म्हणूनच जीवाला उच्च गोष्टींचा विचार करायला तेथे संधि मिळणें कठीण होय, असें त्यांचें म्हणणें आहे. उलट, आपल्या या लोकांत--पृथ्वीवर--कांही सुख आहे आणि खूप दुःख आहे; त्यामुळे येथे कधी ना कधी जीवाची मोहनिद्रा भंगून त्याला आपण मुक्त व्हावें अशी इच्छा होण्याची शक्यता आहे. परंतु, ज्याप्रमाणे आपल्या या जगांत खूपच श्रीमंत माणूस उच्च गोष्टींविषयी विचार करील ही शक्यता अगदी कमी असते, त्याचप्रमाणे स्वर्गात जाऊन वास करणाऱ्या जीवाच्या बाबतींतहि आत्मोन्नतीचा संभव फारच थोडा असतो--नसतोच म्हटलें तरी चालेल. कारण त्या स्वर्गनिवासी जीवाची अवस्था आपल्या ह्या पृथ्वीवरील खूप श्रीमंत माणसासारखीच असते. फरक इतकाच की स्वर्गातील सुख पृथ्वीवरील सुखापेक्षा कितीतरीपट अधिक व उत्कट असतें. स्वर्गांत त्याला अत्यंत सूक्ष्म असा देह लाभत असतो, त्या देहाला कधी रोग होऊं शकत नाही, तिथे खाण्यापिण्याची त्याला आवश्यकता उरत नाही, आणि त्याच्या सर्व वासना पूर्ण होत असतात. जीव तिथे भोगामागून भोग, सुखामागून सुख उपभोगतो आणि स्वतःच्या स्व-रूपाचा वा उच्च गोष्टींचा त्याला पूर्णपणें विसर पडून जातो. तथापि या स्वर्गलोकांमधेहि असें कांही उच्च लोक आहेत की जियल्या

भोगांमधेहि जीवाचा विकास होणें संभवनीय आहे. कांही द्वैतवादी सर्वोच्च स्वर्गलोकालाच अंतिम लक्ष्य मानतात. तो लोक लाभल्यानंतर जीवात्मे मग तिथे कायमचे भगवंताच्या सहवासांत राहतात अशी त्यांची कल्पना आहे. त्या जीवात्म्यांना मग दिव्य देह लाभतो, आधिव्याधि वा मृत्यु वा अन्य कोणतेंहि अशुभ त्यांना स्पर्शू शकत नाही, आणि त्यांच्या सर्व इच्छा तृप्त होतात. वेळोवेळीं त्यांच्यांतील कुणीकुणी या पृथ्वी-लोकांत येऊन जन्म घेतात आणि येथील जीवांना भगवत्प्राप्तीचा मार्ग दाखवून देतात. आपल्या जगांतील श्रेष्ठ धर्माचार्य हे असेच तेथून आलेले आहेत. ते आधीच मुक्त झालेले असतात आणि त्या सर्वोच्च लोकांत भगवंताबरोबर वास करीत असतात; परंतु दुःखार्त मानवांविषयी त्यांच्या हृदयांत इतकें प्रेम आणि करुणा उद्भवते की त्या दुःखार्त मानवांना स्वर्गप्राप्तीचा मार्ग दाखवून देण्यासाठी ते फिरून या पृथ्वीवर जन्म घेतात.

अर्थातच यावर अद्वैतवादी म्हणतात की याप्रमाणे कोणताहि लोक आपलें लक्ष्य वा ध्येय होऊं शकत नाही, संपूर्ण विदेहमुक्तिच आपलें अंतिम लक्ष्य असलें पाहिजे. आपलें अंतिम लक्ष्य वा सर्वोच्च ध्येय कधी सीमित असूं शकणार नाही. असीमाखेरीज, अनंताखेरीज आणखी कांहीहि आपलें अंतिम लक्ष्य होऊं शकत नाही, आणि देह तर कधीच असीम, अनंत असूं शकत नाही. तें अगदी असंभाव्य आहे, कारण शरीर म्हणजेच सीमा—सीमेंतूनच त्याची उत्पत्ति. विचारहि (मनहि) असीम, अनंत असूं शकत नाही, कारण सीमितत्वांतूनच त्याची उत्पत्ति. अद्वैतवादी आपल्याला सांगतात की आपण शरीराच्या, आणि विचाराच्याहि (अथवा मनाच्याहि) पलीकडे गेलें पाहिजे. आणि आपण हेंहि पाहिलें आहे की, अद्वैतवादाच्या मतें ही मुक्ति 'मिळवावयाची' नसते, ती आधीचीच आपल्यांत विद्यमान आहे. स्व-रूपतः आपण मुक्त आहोंतच. आपण आपलें मुक्त स्व-रूप विसरून गेलों आहोंत, आणि म्हणूनच आपण तें नाकबूल करीत असतों. पूर्णता आपल्याला मिळवावयाची नाही. ती आपल्याठायीं आधीचीच आहे. अमृतत्व आणि आनंद हीं आपल्याला मिळवावयाचीं नाहीत, तीं आधीचींच आपलीं आहेत—तीं सदाचींच आपलीं आहेत.

मी मुक्त आहें असें म्हणण्याचें जर तुमचें सामर्थ्य असेल तर त्याच क्षणीं तुम्ही मुक्त व्हाल. मी बद्ध आहें असें जर तुम्ही म्हणत राहाल तर तुम्ही बद्धच राहाल. अद्वैत असें ठासून सांगत आहे. द्वैत-वाद्यांचें म्हणणेंहि मीं तुम्हांला सांगितलें आहेच. तुम्हांला त्या दोहोंतील जें आवडेल त्याचा तुम्ही स्वीकार करा.

वेदान्ताचा अत्युच्च आदर्श समजण्यास फार कठीण आहे. आणि म्हणूनच त्याविषयी नेहमी वादावादी चालू असते. मुष्कील अशी आहे की लोक द्वैत किंवा अद्वैत यांपैकी एक मत स्वीकारतात आणि दुसरें मत खोडून काढण्याचा अट्टाहास धरतात आणि तें मत मानणाऱ्यांशीं भांडण्यास प्रवृत्त होतात. तुम्हांला जें रुचेल आणि पचेल तें मत तुम्ही स्वीकारा, आणि इतरांना जें हवें तें त्यांना स्वीकारूं द्या. स्वतःचें हें टीचभर व्यक्तित्व, स्वतःचें मर्यादित मानवत्व टिकवून ठेवण्याची जर तुमची इच्छा असेल तर खुशाल तसें करा, आपल्या ह्या साऱ्या इच्छा घेऊन असा. त्यांतच तुमचा संतोष आणि आनंद असेल तर तसेच राहा. मनुष्यपणाची अनुभूति जर तुम्हांला इतकी चांगली आणि गोड वाटत असेल तर जोंवर तुमची इच्छा आहे तोंवर ती टिकवा. तुम्ही ती टिकवूं शकाल, कारण स्वतःच्या भाग्याचे तुम्हीच निर्माते आहांत. तुमचें मानवत्व सोडून द्यायला कोणीहि तुम्हांला भाग पाडूं शकणार नाही. आपण मनुष्यच असावें असें जोंवर तुम्हांला वाटतें तोंवर तुम्ही तसें राहूं शकाल, कुणीच तुम्हांला आडकाठी करूं शकणार नाही. जर तुम्हांला स्वर्गातील देव होण्याची इच्छा असेल तर तुम्ही देव होऊं शकाल. नियम असा आहे. पण असेहि कांही लोक असूं शकतील की ज्यांना स्वर्गातील देव होणेंहि आवडत नसेल. त्यांचें मत म्हणजे फार भयंकर आहे असें म्हणण्याचा तुम्हांला काय अधिकार? शंभर रुपये गमावण्याचें तुम्हांला भय वाटत असेल, परंतु अशींहि माणसें असूं शकतील की जगांतील त्यांची सर्व संपत्ति गमावल्यानेंहि त्यांना कांहीच वाटणार नाही. अशीं माणसें होऊन गेलींत, आणि अजूनहि आहेत. स्वतःच्याच मापाने तुम्ही त्यांना कसें मापूं जातां? तुमचा आदर्श वेगळा, त्यांचा वेगळा. आपल्या संकुचित सीमांमधे घुटमळण्यांत, आणि ह्या क्षुद्र ऐहिक भावनांना कवटाळून

बसण्यांतच तुम्हांला कृतकृत्यता वाटते, तोच तुम्हांला सर्वोच्च आदर्श वाटतो. वाटो बापडा, कुणी तुम्हांला मना करीत नाही. तुम्हांला लखलाभ असो तो. परंतु असेहि कांही लोक आहेत की ज्यांना सत्य कळलें आहे--त्यांचें हें सारें होऊन गेलें आहे, त्यांना या घेरांत घुटमळणें रुचेनासें झालें आहे, ह्या सर्व सीमा ओलांडण्याची त्यांना आस लागली आहे. जगांतील कशांतहि त्यांना तृप्ति वाटेनाशी झाली आहे. हें जग आणि त्यांतील सारे भोग त्यांना केवळ कस्पटासारखे वाटत आहेत. त्यांनी तुमच्या आदर्शांना येऊन चिकटावें अशी तुमची मनीषा कां? ही प्रवृत्ति तुम्हीं अजीबात सोडून दिली पाहिजे. प्रत्येकाला त्याच्या स्वत:च्या मनोभावानुसार जाऊं द्या.

कांही दिवसांपूर्वी 'सचित्र लंडन समाचार' (Illustrated London News) नामक वर्तमानपत्रांत मीं एक बातमी वाचली. पॅसिफिक महासागरांतील द्वीपपुंजाजवळ कांही जहाजें † वादळांत सापडलीं. त्या वर्तमानपत्रांत या घटनेचें एक चित्रहि छापण्यांत आलें होतें. एक इंग्रजी जहाज सोडून इतर सर्व जहाजें त्या तुफानांत फुटून बुडलीं. तें इंग्रजी जहाज त्या तुफानाशीं सामना करून सहीसलामत बाहेर आलें. त्या चित्रांत दिसत होतें की, त्या फुटक्या जहाजांतील ते बुडणारे लोक डेकवर येऊन, वादळांतून बाहेर पडणाऱ्या जहाजावरील लोकांना मोठमोठ्याने ओरडून 'धीर सोडूं नका, लवकर बाहेर पडा' म्हणून प्रोत्साहन देत होते. असो. आपण असें धीट आणि उदार झालें पाहिजे. तुम्ही जिथे आहांत तिथे इतरांना ओढण्याचा प्रयत्न करूं नका. तद्वतच, कांही लोकांची आणखी अशी एक मूर्खपणाची कल्पना असल्याचें आढळून येतें की, आपण जर आपलें हें क्षुद्र व्यक्तित्व वा 'मी'पण गमावलें तर नीति उरणार नाही, मानवजातीवर मोठें संकट कोसळेल, तिला कांही आधार वा आशेचें स्थान राहणार नाही. अशी कल्पना बाळगणारे हे लोक जसेकांही मानवजातीच्या काळजीने अगदी मरायलाच बसले आहेत! ईश्वर भलें करो बिचाऱ्यांचें! प्रत्येक देशांत असे खरोखर मानवजातीचें हित करूं इच्छिणारे दोनशेच जरी लोक निपजले तरी सत्ययुग अवतरायला

† पॅसिफिक महासागरांतील सामोया द्वीपपुंजाजवळ 'कॅलिओपी' नामक इंग्रजी जहाज आणि कांही अमेरिकन जहाजें वादळांत सापडलीं होतीं.

दोन दिवस देखील लागणार नाहीत. मानवजातीकरता या मरायला निघालेल्यांची सुरत बघा अमळ! नुसती बडबड--तोंडची वाफ. जगाचा इतिहास हेंच दाखवितो की जे आपल्या क्षुद्र व्यक्तित्वाला वा 'मी'पणाला पूर्ण विसरून गेले होते त्यांनीच मानवजातीचें सर्वांत जास्त भलें केलें आहे, आणि माणूस जितका जितका स्वतःचा विचार करतो तितकीं तितकी त्याची दुसऱ्यांकरता कांही करण्याची शक्ति कमी होत जाते. स्वतःला विसरणें ही निःस्वार्थता आहे, स्वतःचा विचार करीत बसणें म्हणजेच स्वार्थीपणा. या लहानलहान भोगांना जळूसारखें चिकटून बसणें आणि हे असेच कायम राहावेत असें वागणें हा घोर स्वार्थीपणा होय. तें सारें सत्यावरील प्रेमांतून उद्‌भवत नसतें, दुसऱ्यांविषयी दयाहि त्याचें कारण नसतें--त्याचा उगम होत असतो घोर स्वार्थपरायणतेंतून 'इतर कुणाचें कांहीहि होवो, मला सगळें मिळालें पाहिजे' अशा मनोवृत्तींतूनच हें सारें उद्‌भवत असतें. माझें तरी असें मत आहे. प्राचीन महापुरुषांसारखे आणि साधुसंतांसारखे खरेखरे नीतिमान, चारित्र्यशील लोक या जगांत आणखी बघायला मिळावेत अशी माझी इच्छा आहे. एखाद्या क्षुद्र प्राण्याचें भलें करण्यासाठी आपलीं शेकडो आयुष्यें बळी देण्याची त्यांची तयारी होती. नीतीच्या आणि इतरांचें भलें करण्याच्या गोष्टी आम्हीं बोलायच्या! आजकाल सर्वत्र आढळणारी वायफळ बडबड, आणखी काय?

जगांत गौतम बुद्धांसारख्या नीतिमान, चारित्र्यशील व्यक्ति बघावयास मिळाव्यात अशी माझी मनीषा आहे. सगुण ईश्वरावर वा देहाभिमानी आत्म्यावर त्यांचा विश्वास नव्हता, त्यासंबंधी त्यांना कधी आकर्षणहि वाटलें नाही, त्या बाबतींत ते संपूर्ण अज्ञेयवादी होते; परंतु इतरांसाठी प्राण द्यावयास ते सदा तयार होते, त्यांचें अवघें जीवन दुसऱ्यांचें हित करण्यांत गेलें, सर्वांचें हित कशाने होईल हा एकच विचार जन्मभर त्यांच्या हृदयांत होता. त्यांच्या चरित्रकाराने जें म्हटलें आहे तें ठीकच आहे की, त्यांचा जन्मच जगाच्या हितासाठी होता, जगाला आशीर्वादस्वरूप होता. त्यांनी घरदार सोडून तपश्चर्येसाठी वनाची वाट धरली ती कशीतरी स्वतःचीच मुक्ति साधावी म्हणून नव्हे. आपलें हें जग दुःखांत होरपळत आहे, त्याला वांचवि-

ण्याचा कांही उपाय शोधून काढलाच पाहिजे ह्या कणवेने ते व्याकुळ झाले होते. 'जगांत इतकें दुःख कां'—हा एकच विचार त्यांच्या हृदयांत जन्मभर होता. आपण बुद्धासारखे नीतिमान आहोंत असें कां तुम्हांला वाटतें ?

माणूस जितका जास्त स्वार्थी तितका तो अधिक अनीतिमान असतो. हें जसें एका माणसाला लागू आहे तसेंच तें सबंध जातीलाहि लागू आहे. स्वार्थालाच खिळलेल्या जाती जगांत सगळयांत क्रूर आणि दुष्ट ठरल्या आहेत. * * *

येशू ख्रिस्तांनी ज्या धर्माचा प्रचार केला त्या शुद्ध ख्रिस्तीधर्मांत आणि वेदान्तांत फारच थोडा फरक आहे. येशूंनी अद्वैतवादाचाहि प्रचार केला, आणि साधारण लोकांना त्या सर्वोच्च आदर्शाप्रत पोहोचण्याची पायरी म्हणून त्यांनी द्वैतवादाचाहि प्रचार केला. येशूंनी लोकांना 'हे ईश्वरा, हे आमच्या स्वर्गनिवासी पित्या' म्हणून ईश्वराची प्रार्थना करावयास शिकविलें, आणि त्याचबरोबर 'मी आणि तो स्वर्गस्थ पिता एक' अशीहि त्यांनी शिकवण दिली. कारण ते जाणून होते की, ईश्वराची 'स्वर्गस्थ पिता' म्हणून द्वैतभावाने उपासना करतांकरतांच अद्वैतभाव वा अभेदबोध लाभत असतो. त्या वेळचा ख्रिस्तीधर्म केवळ प्रेम आणि आशीर्वाद यांनीच भरलेला होता. पण अखेर नाना मतें त्यांत मिसळून तो गढूळ होऊन गेला. ही या क्षुद्र 'मी'साठी मारामारी, हें 'मी आणि माझें'ला जळूमारखें चिकटून राहणें, केवळ याच जीवनांत नव्हे तर मेल्यानंतरहि हा क्षुद्र 'मी', हें क्षुद्र व्यक्तित्व टिकविण्याची इच्छा—हा सारा धर्मांतील गढूळपणाच नव्हे तर काय ? आणि ह्याला हे लोक निःस्वार्थीपणा म्हणतात—ह्याला ते नीतीचा पाया वा आधार मानतात ! हा जर नीतीचा पाया असेल तर मग अनीतीचा पाया कोणता ? आणि मजा ही की, वास्तविक ज्यांच्याकडून आपण अधिक समंजसपणाची आशा करावी अशा लोकांना धास्ती वाटते की माणसाच्या ह्या टीचभरच्या 'मी'चा नाश झाल्यास सारी नीति नष्ट होऊन जाईल ! ह्या क्षुद्र 'मी'च्या नाशावरच खरी नीति अवलंबून असते असें कुणीं म्हटल्यास हे लोक अगदी घाबरून जातात ! सर्व मांगल्याचा, सर्व नीतिमत्तेचा मूलमंत्र आहे—'मी नाहीं,

तूं' हाच. स्वर्ग-नरक आहेत की नाहीत याची कुणाला पंचाईत? असेल आत्मा, किंवा नसेल, कुणाला त्याची उठाठेव? न बदलणारी सत्ता आहे की नाही--काय अर्थ या वादावादींत? हें समोर जग दिसतें आहे. तें दुःखांत खितपत आहे. बुद्धासारखे पुढे व्हा, तें दुःख दूर करण्याचा प्रयत्न करा, नाहीतर त्या प्रयत्नांत प्राण अर्पण करा. स्वतःला विसरून जा--आधी हा धडा गिरवा, बाकीचें नंतर. मग तुम्ही आस्तिक असां की नास्तिक असां, अज्ञेयवादी असां की वेदान्ती असां, ख्रिश्चन असां की मुसलमान असां, त्याला कांही हरकत नाही. सर्वांनी हाच एक धडा शिकावयास हवा--मी नव्हे, तूं--ह्या क्षुद्र 'मी'चा ध्वंस आणि खऱ्या 'मी'चा विकास.

दोन शक्ति सर्वदा समभावाने कार्य करीत आहेत. एक 'अहं' (मी), आणि दुसरी 'नाहं' (मी नाहीं). ह्या दोन शक्तींचा खेळ केवळ मानवांतच नव्हे तर पशूंनहि पाहावयास सापडतो. फार काय पण लहानलहान जंतूंतहि तो आढळतो. गरम रक्त प्यावयास मिळावें म्हणून जिवंत माणूस फाडून टाकणारी वाघीण आपल्या बच्च्याच्या रक्षणासाठी स्वतःचे प्राण देखील द्यावयास तयार होईल. कुणाचाहि गळा कापण्यास न कचरणारा अत्यंत दुर्वृत्त माणूसहि भुकेने तडफडणाऱ्या आपल्या बायको-पोरांसाठी स्वतःचा बळी देण्याससुद्धा मागेपुढे पाहणार नाही. याप्रमाणे या सृष्टींत ह्या दोन शक्ति जवळजवळच कार्य करीत असतात--जिथे एक असते तिथेच दुसरीहि आढळेलच. एक आहे स्वार्थपरता, दुसरी आहे निःस्वार्थता. एकीचें स्वरूप आहे बळकावणें, दुसरीचें स्वरूप आहे त्याग. पहिलीने प्रेरित झाल्यास माणूस घेतो, दुसरीने प्रेरित झाल्यास देतो. अगदी खालच्या प्राण्यांपासून तों सर्वोच्च प्राण्यांपर्यंत समस्त विश्व ह्या दोन शक्तींचें क्रीडांगण होय. हीं अगदी हातचीं कांकणें आहेत, त्यांना आरशाची जरूर नाही--कुणालाहि कुठेहि दिसेल अशी ही स्पष्ट वस्तुस्थिति आहे.

ह्या दोन शक्तींपैकी 'अहं' शक्तींतून जन्मणाऱ्या स्पर्धा, चढाओढ, संघर्ष इत्यादींवरच जगांतील सर्व कार्य आणि विकास आधारलेला आहे असें म्हणण्याचा समाजांतील एखाद्या पक्षाला काय अधिकार आहे? **जगांतील समस्त कार्य आसक्ति, द्वेष, चुरस आणि कलह यांवरच**

आधारलेलें आहे असें म्हणण्याचा त्याला काय अधिकार आहे ? ह्या सर्व प्रवृत्ति जगांतील पुष्कळशा कार्यांच्या मुळाशीं असतात हें आम्ही नाकबूल करीत नाहीं. त्या अस्तित्वांत आहेत, प्रश्नच नाही. पण म्हणून ती दुसरी शक्ति अस्तित्वांत नाही, जगांतील कार्यांच्या बुडाशीं ती नसतेच असें म्हणण्याचा कुणालाहि काय अधिकार आहे ? प्रेम, ही अहंशून्यता, हा त्याग हीच जगांत एकमेव विधायक शक्ति आहे हें कुणीतरी नाकबूल करूं शकेल काय ? नव्हे, नीट विचार केल्यास आढळून येईल की ती पहिली शक्ति अथवा स्वार्थीपणा हें केवळ या दुसऱ्या म्हणजे प्रेमशक्तीचेंच विकृत रूप होय; स्पर्धा, चढाओढ वगैरेहि वस्तुतः ह्या प्रेमामुळेच निर्माण होत असतात, त्यांचें खरें मूळ प्रेमच आहे. वाईटाचें, बुऱ्याचेंहि खरें मूळ निःस्वार्थताच आहे. शुभांतूनच अशुभ जन्मतें, आणि त्या अशुभांतूनच अंतीं शुभ जन्मतें. अशुभ म्हणजे फक्त शुभ शक्तीचा विकृत आविष्कार होय, शुभ शक्तीलाच चुकीची दिशा लाभली की अशुभ उपजत असतें, आणखी कांही नाही. एकजण दुसऱ्याचा खून करतो, तोहि कदाचित् स्वतःच्या पोटच्या गोळ्यावरील प्रेमाने प्रेरित होऊनच, कदाचित् आपल्या त्या लहानग्याचें पालनपोषण, कोडकौतुक करण्यासाठी आवश्यक असलेल्या पैशाकरता. त्याचें प्रेम अगदी मर्यादित होऊन, जगांतील इतर सर्वांना संपूर्ण वगळून त्या स्वतःच्या मुलावरच केंद्रित होऊन बसलेलें असतें. इतर कुणाहिविषयी मग त्याला प्रेम वाटत नाही, त्याचें सगळें प्रेम त्या आपल्या एका पोरावरच खिळून बसतें, आणि म्हणूनच त्या प्रेमाने प्रेरित होऊन तो इतर कुणाचाहि जीव घेऊं शकतो. परंतु त्याचें तें पुत्रप्रेम मर्यादित असो की कसेंहि असो, असतें मात्र तें प्रेमच.

सारांश, आपल्या या जगाला चालविणारी एकच प्रेरक शक्ति आहे. कधी तिचा आविष्कार बरोबर असतो, कधी चुकीचा. परंतु त्या योग्य वा विकृत रूपांतून प्रकटत असते तीच एकमेव जिवंत, अद्भुत शक्ति—तीच निःस्वार्थपणाची, त्यागाची, प्रेमाची एकमेव, खरी शक्ति. म्हणूनच वेदान्ताचा अद्वैतवादाविषयी इतका आग्रह आहे. आम्ही या वेदान्ताच्या म्हणण्यावरच भर देतों, कारण, जिथे एका कारणाने

अनेक कार्यांचें स्पष्टीकरण शक्य असेल आणि अनेक कारणांनीहि तें शक्य असेल, तिथे अनेक कारणें न स्वीकारतां त्या एका कारणाचाच स्वीकार करणें तर्कसंगत होय. ह्या विश्वाचीं दोन कारणें आहेत हें आम्ही मानूं शकत नाहीं. प्रेमाची ती सुंदर, अद्‌भुत शक्तिच मर्यादित झाल्याने वाईट रूप धारण करते हें जर आपल्याला समजूं शकेल, तर त्या एकाच प्रेमशक्तीने जगांतील समग्र कार्यांचें स्पष्टीकरण होत असल्याचें आपल्या प्रत्ययास येईल. एरवी आपल्याला ह्या जगाचीं दोन कारणें मानावीं लागतील--एक चांगलें आणि दुसरें वाईट, एक प्रेमशक्ति आणि दुसरी द्वेषशक्ति. या दोन मतांतील कोणतें अधिक सयुक्तिक आहे ? अर्थातच, एका शक्तीने सर्व कार्यांचें स्पष्टीकरण होतें, हेंच.

असो तर, आता आपण द्वैतवाद्यांच्या कक्षेपलीकडील गोष्टींकडे वळूं या. द्वैतवाद अधिक घोळत बसणें मला इथे शक्य नाही. आपल्याला हेंच दाखवून देण्याचा माझा उद्देश आहे की नीतीचा व निःस्वार्थतेचा सर्वोच्च आदर्श आणि तत्त्वज्ञानाचा सर्वोच्च आदर्श या दोहोंत मुळीहि विरोध नाही. मी आपल्याला हेंच दाखवून देऊं इच्छितों की नीतिमान होण्यासाठी तत्त्वज्ञानाला मुरड घालण्याची, तें खाली आणण्याची कांहीच गरज नाही. उलट, तुमच्या नीतीला खराखरा पाया हवा असेल तर तुम्हांला तत्त्वज्ञानाच्या आणि विज्ञानाच्या सर्वोच्च, अंतिम सिद्धान्तांचीच कास धरण्याखेरीज गत्यंतर नाही, मानवाचें ज्ञान मानवाच्या हिताला मारक नसतें. उलट, जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत केवळ ज्ञानच आपल्याला तारत असतें. ज्ञानच उद्धारक होय. ज्ञानच पूजन होय. आपण जितकें अधिक जाणूं तितकें आपलें मंगल होईल. वेदान्ती म्हणतो की आपल्या जीवनांत भासणाऱ्या ह्या सर्व वाईटाचें, अमंगलाचें कारण असीमाला सीमेंत आबद्ध करणें हें होय. जें प्रेम सीमायुक्त झाल्यामुळे क्षुद्र, तुच्छ रूपें धारण करून वाईट, ओंगळ भासूं लागतें, तेंच उलट दिशेने जाऊन सीमामुक्त झाल्यास अखेर अनिर्वचनीय प्रेमाच्या म्हणजेच ईश्वराच्या रूपाने प्रकट होतें. वेदान्त आणखी असेंहि म्हणतो की आपल्या जीवनांत भासणाऱ्या साऱ्या वाईटाचें वा अमंगलाचें कारण स्वतः आपल्यांतच विद्यमान आहे, त्यासाठी कुणा दैवी

शक्तीला किंवा देव-देवतेला बोल लावूं नका. त्याचप्रमाणे जीवनांत अशिव, अशुभ आहे म्हणून हताश किंवा विषण्णहि होऊं नका, किंवा असेंहि समजूं नका की आपण अशा एका खाईत पडलों आहोंत की दुसरा कुणी येऊन हात देऊन वर काढीपर्यंत आपली तिच्यांतून सुटका नाही. वस्तुस्थिति अशी मुळीच नाही असें वेदान्त ठामून सांगतो. वेदान्त म्हणतो की आपली स्थिति रेशमाच्या किडयामारखी आहे. रेशमाचा किडा स्वतःच्या शरीरांतून तंतु काढून त्याचा कोष बनवितो आणि अखेर स्वतःच त्या कोषांत अडकतो. आपलेंहि असेंच आहे. स्वतःच विणलेल्या जाळयांत, स्वतःच निर्मिलेल्या बंधनांत आपण अडकत असतों. पण ही आपली बद्धदशा कांही कायमची नाही. कोषांत अडकलेल्या रेशमाच्या किडयाचा जसा पतंग बनतो आणि कोष मोडून बाहेर पडतो, तसेंच आपणहि आध्यात्मिक अनुभूतीचें बल कमावून हीं बंधनें छिन्न करून मुक्त होऊं शकूं. आपण आपल्याभोवती हें कर्माचें जाळें विणलें आहे आणि त्यांत आपण अडकलों आहोंत असें आपण अज्ञानानें समजत आहोंत आणि कुणीतरी येऊन आमची सुटका करा म्हणून रडत-आरडत आहोंत. पण साहाय्य बाहेरून येत नसतें, तें येत असतें आपल्या आंतूनच—आत्म्यांतूनच. जगांत असतील-नसतील तितक्या सर्व देव-देवतांची करुणा भाकून पाहा. मीं वर्षानुवर्षे तसें करून पाहिलें आहे. अखेर मला साहाय्य मिळत आहे असें दिसून आलें. पण तें साहाय्य आलें मात्र आंतून. मीं चुकीनें जें काय केलें होतें, तें माझें मलाच निस्तरावें लागलें. हाच एकमेव उपाय आहे. मीं स्वतःभोवती विणलेलें जाळें मलाच तोडावें लागणार, आणि तसें करण्याची शक्तिहि माझ्या आंतच विद्यमान आहे. एक गोष्ट मी अगदी निश्चित सांगूं शकतों की माझ्या जीवनांतील बरोबर किंवा चुकीची कोणतीच स्पृहा व्यर्थ झाली नाही—आज मी जें कांही आहें तें माझ्या त्या मागच्या बरोबर वा चुकीच्या कर्मांचें एकूण फळ होय. मीं जीवनांत अनेक चुका केल्या आहेत, परंतु माझी पक्की खात्री आहे की त्या जर मीं केल्या नसत्या तर आज मी जो कांही आहें तो झालोंच नसतों, आणि म्हणून मीं त्या केल्या, ह्याचें मला समाधान आहे. याचा अर्थ असा मात्र नव्हे की तुम्हीं हें ऐकून घरीं जाऊन बुद्धयाच चुका करीत सुटायचें ! माझ्या

म्हणण्याचा असा गैरसमज वा विपर्यास करूं नका. माझ्या म्हणण्याचा अर्थ एवढाच की हातून कांही चुका घडल्यात म्हणून सदा कपाळाला हात लावून खिन्न बसूं नका, तर हें जाणून असा की अंतीं सारें ठीक होऊन जाईल---त्यांच्यांतूनहि अंतीं मंगलच निष्पन्न होईल. हें असें झालेंच पाहिजे, असें होणारच, अन्य कांहीहि होऊं शकत नाही, कारण मांगल्य, पावित्र्य आपला स्वरूपसिद्ध धर्म आहे---आपण स्वरूपतः शुभ, पवित्र आहोंत, तें आपलें स्वरूप कधीहि, कशानेहि नष्ट होणें शक्य नाही. आपलें खरेखरें स्व-रूप नेहमी जसेंच्या तसेंच राहणार.

ह्या साऱ्याचा सारांश म्हणून आपण एवढेंच आपल्या मनावर बिंबवावयाचें की ज्याला चूक किंवा वाईट म्हणतात तें आपल्या हातून घडतें याचें कारण आपण दुबळे आहोंत हेंच होय. आणि आपण दुबळे कां आहोंत ? तर आपण अज्ञानांत आहोंत म्हणून. अज्ञानांतून दुबळे-पणा जन्मतो, आणि दुबळेपणामुळे हातून चुका होतात, वाईट घडतें. त्या कर्मांना पाप न म्हणतां चुका म्हणणेंच मला योग्य वाटतें. पाप शब्द मुळांत चांगला असेल. पण त्याला असा कांही अर्थ आला आहे की नकोच तो शब्द असें माझें मत आहे. असो. आपण चुका करतों, कारण आपण दुबळे आहोंत. आपण दुबळे आहोंत, कारण आपण अज्ञानांत आहोंत. आपल्याला अज्ञानांत कोणीं टाकलें ? आपण स्वतःच. दुसऱ्या कुणींहि नाही. आपणच आपल्या हातांनी आपले डोळे झाकतों आणि 'सगळीकडे अंधार आहे हो' म्हणून ओरडतों. हात दूर करा, सगळीकडे उजेड दिसूं लागेल. स्वतःविषयीचें, स्व-स्वरूपाचें आपलें अज्ञान दूर होऊं द्या, मग दिसेल की आपला आत्मा स्वरूपतः स्वयं-प्रकाश आहे. तो प्रकाश नेहमीचाच आहे, अज्ञानामुळे आपल्याला दिसत नाही, आपण तो पाहत नाहीं, इतकेंच. तुमचे आधुनिक शास्त्रज्ञ काय म्हणतात हें तुम्हीं ऐकलें नाही काय ? ते म्हणतात की या क्रमविकासाचें कारण काय ? कशामुळे हा क्रमविकास होत असतो ? इच्छा---इच्छेमुळे तो होत असतो. एखादा प्राणी कांहीतरी करूं इच्छितो, त्याला आढळतें की परिस्थिति त्याला तसें करूं देत नाही, आणि म्हणून त्या परिस्थितीवर मात करून आपली ती इच्छा तृप्त करण्या-करता तो एका नव्याच शरीरांत विकसित होतो---एक नवेंच शरीर

घडवितो. कोण घडवितें तें शरीर ? तो प्राणी स्वतःच—त्याची ती इच्छाच. अगदी क्षुद्र जीवाणूंतून (अॅमीबांतून) तुम्ही क्रमशः माणसांत विकसित झालां आहांत. सारें तुमच्या इच्छाशक्तीच्या प्रभावानेच. त्याच इच्छाशक्तीचा आणखी उपयोग करा, ती तुम्हांला आणखी उन्नत करील. इच्छा सर्वशक्तिमान आहे. यावर तुम्ही असें विचाराल की जर माझी इच्छा सर्वशक्तिमान आहे तर मला अनेक गोष्टी करण्याची इच्छा आहे, त्या मी कां करूं शकत नाहीं ? यावर उत्तर असें की तुम्ही जेव्हा हा प्रश्न विचारतां तेव्हा आपण म्हणजे हा क्षुद्र मी हीच तुमची भावना असते. एकवार स्वतःच्या त्या क्षुद्र जीवाणु-अवस्थेची (अॅमीबा-अवस्थेची) कल्पना करा आणि स्वतःच्याच आजच्या मनुष्य-अवस्थेची कल्पना करा. त्या क्षुद्र जीवाणूचे तुम्ही मनुष्य झालां आहांत. कुणीं केलें हें ? तुम्हांला क्षुद्र जीवाणूचे मनुष्य कुणीं केलें ? तुमच्या स्वतःच्या इच्छाशक्तीने. मग ती सर्वशक्तिमान आहे हें तुम्ही कसें नाकबूल करूं शकाल ? जिने तुम्हांला इतकें उन्नत केलें आहे ती तुम्हांला खचितच आणखीहि उन्नत करूं शकेल. आवश्यकता आहे चारित्र्याची—त्या इच्छाशक्तीला बळवान करण्याची.

म्हणून, तुम्ही स्वभावतःच अमंगल आहां, वाईट आहां, जीवनांत कांही चुका केल्या आहेत म्हणून तुम्हीं उभी हयात पश्चात्ताप आणि रडणें यांतच घालविली पाहिजे असें जर मी तुम्हांला सांगेन तर त्याने तुमचा कांहीच फायदा होणार नाही. उलट तुम्ही आणखी आणखी दुबळे व्हाल, तुम्हांला चांगले होण्याचा मार्ग दाखवून देण्याऐवजी मीं तुम्हांला वाईट बनण्याचा रस्ता दाखवून दिला असें होईल. समजा की एखादी खोली हजारो वर्षांपासून अंधारी आहे. तिच्यांत जाऊन 'हायरे, इथे अंधार आहे' म्हणून तुम्ही कितीहि आरडलां-ओरडलां तरी त्याने तो अंधार दूर होईल काय ? एक आगकाडी पेटवा, निमिषांत उजेड होईल. 'अरेरे मीं वाईट केलें,' 'अरेरे मी चुकलों' असें आयुष्य-भर घोळत राहिल्याने काय लाभ होणार आहे ? आपण वाईट केलें, चुका केल्या हें तर स्पष्ट आहे, तें सांगायला कुणी नको. **ज्ञानाचा प्रकाश आणा,—अशुभ, वाईट तत्क्षणांत पळून जाईल. आपलें जीवन शुद्ध करा, चारित्र्य घडवा आणि स्वतःचें खरें**

स्व-रूप प्रकट करा. स्व-रूपत: तुम्ही ज्योतिर्मय, प्रकाशमय, नित्य-शुद्ध आहां. स्वत:त तें प्रकट करा, आणि इतरांच्याहि त्या यथार्थ स्वरूपाला आवाहन करा. माझी अशी मनीषा आहे की आपल्यापैकी प्रत्येकाला अशी अवस्था लाभावी की अगदी खराबांतील खराब माणसा-शींहि संबंध आला असतां त्याच्या बाह्य दोषदुर्बलतेकडे न पाहतां, आपण त्याच्या हृदयांत विराजणाऱ्या भगवंताला बघूं शकूं, आणि त्याचा तिरस्कार वा निंदा न करतां त्याला म्हणूं शकूं की "हे स्व-प्रकाशा, हे ज्योतिर्मया, ऊठ. तूं नित्य शुद्ध आहेस. हे अविनाशी, हे सर्व-शक्तिमंता, ऊठ, आणि आपलें स्व-स्वरूप प्रकट कर. ही क्षुद्रता, ही तुच्छता तुला शोभत नाही." हीच सर्वांत श्रेष्ठ प्रार्थना आहे, आणि अद्वैतवाद ती आपल्याला शिकवितो. स्वत:च्या खऱ्या स्वरूपाचें सदा स्मरण ठेवणें, सदा त्या अंत:स्थित ईश्वराचें स्मरण ठेवणें, तो अनंत, सर्वशक्तिमान, मंगलस्वरूप, कल्याणमय, बंधनहीन आहे असें स्मरण ठेवणें हीच एकमात्र प्रार्थना होय. मानवाच्या खऱ्या स्वरूपांत हा क्षुद्र 'मी' नाही, हीं क्षुद्र बंधनें नाहीत. तें वासनाकामनांच्या अतीत आहे. वासना-कामना त्याला स्पर्शू शकत नाहीत. आणि मानवाचें स्वस्वरूप कामनाहीन आहे म्हणूनच मग तो अभय, ओज:स्वरूप होऊन जातो. कारण, कामनेच्या स्वार्थाच्या पोटींच भय उत्पन्न होत असतें. ज्याला स्वत:साठी कांहीहि मिळवावयाचें नाही तो कुणाला भिईल, काय त्याला भिववूं शकेल? मृत्यूचें त्याला कसलें भय? वाईट, अशुभ त्याचें काय करूं शकणार? म्हणून, आपण जर अद्वैती असूं तर या क्षणापासून आपण पक्कें मानावयास हवें की आपला जुना 'मी' मरून गेला आहे. मग मी श्रीयुत अमुक वा श्रीमती तमुक हा बोध निघून जाईल. तो केवळ भ्रांतिजन्य होता. तो निघून जाईल, आणि उरेल फक्त तो नित्य शुद्ध, नित्य ओजस्वरूप, सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ ब्रह्मबोध. तोच केवळ उरेल, आणि तेव्हाच मग आपल्या साऱ्या भयाचा निरास होईल, आपण संपूर्ण निर्भय होऊं--अभयत्व पावूं. त्या सर्वव्यापी माझें कोण अनिष्ट करूं शकणार? त्या वेळीं आपली समस्त दुर्बलता नाहीशी होते. आणि मग हाच बोध इतरांमधेहि जागविणें हेंच एकमेव कार्य आपल्यापक्षीं शिल्लक राहतें. मग आपल्याला दिसूं लागतें की तेहि आत्मस्वरूप आहेत, तेहि

तेच नित्य शुद्ध आत्मा आहेत, पण ते हें जाणत नाहीत. आपण त्यांना तें सांगितलें पाहिजे, शिकविलें पाहिजे, स्वतःचें अनंत आत्मस्वरूप प्रकट करण्यास आपण त्यांना साहाय्य केलें पाहिजे. ह्याच सत्याचा जगभर प्रचार होण्याची फार गरज आहे असें मला वाटतें. हें सत्य, हे सिद्धान्त जुने आहेत, बहुधा जगांतील कितीतरी पर्वतांपेक्षाहि ते प्राचीन आहेत. सत्य नेहमीच सनातन असतें. सत्य कुणाहि एकाच व्यक्तीची संपत्ति असत नाही. सत्य केवळ आमचेंच असें कोणतीहि जात किंवा कोणतीहि व्यक्ति म्हणूं शकत नाही. कुणालाहि सत्याचा मक्ता मिळालेला नाही. सत्य हें सर्वांचेंच स्व-रूप आहे. सत्यावर फक्त माझाच विशेषाधिकार आहे, माझाच एकाधिकार आहे असें कोण म्हणूं शकेल? पण तें जीवनांत उतरविलें पाहिजे. अगदी सोप्या रीतीने त्याचा प्रचार केला पाहिजे. कारण उच्चतम सत्यें नेहमीच सोपीं, सरळ असतात. खूप सरळ, सोप्या रीतीने त्याचा प्रचार केला पाहिजे की जेणेंकरून समाजाच्या सर्व अंगांमधे तें शिरूं शकेल, अत्यंत बुद्धिमान आणि अगदी मामुली बुद्धीच्या सर्वांनाच तें आत्मसात् करतां येईल, आबालवृद्धवनिता सर्वांनाच तें आकळतां येईल. हें तर्कटें लढविणें, हा तात्त्विक काथ्याकूट, हीं सारीं मतें आणि वाद, हें क्रियाकांड, हीं एके काळीं उपयोगाचीं असतील. पण, या, आपण आता धर्म अगदी सरळ, सोपा करण्याचा प्रयत्न करूं या; आणि, जेव्हा प्रत्येकजणच उपासक होईल व प्रत्येक व्यक्तींच्या अंतरीं वसत असलेलें तें सत्यच उपास्य होईल असे सोन्याचे दिवस, असें तें सत्ययुग प्रत्यक्षांत आणण्याला हातभार लावूं या.

---

प्रत्येक जीव अव्यक्त ब्रह्म होय.

बाह्य आणि आंतर प्रकृतीला वशीभूत करून स्वतःचें हें अ-व्यक्त ब्रह्मस्वरूप व्यक्त करणेंच जीवनाचें परम उद्दिष्ट होय.

कर्म, उपासना, मनःसंयम वा ज्ञान यांपैकी कोणत्याहि एकाचा वा एकापेक्षा अधिकांचा किंवा सर्वच उपायांचा अव-लंब करून तें उद्दिष्ट साधा आणि मुक्त व्हा.

यांतच सगळा धर्म आला. मतें, वाद, क्रियाकांड, अनु-ष्ठानें, शास्त्रें, मंदिरें वा इतर बाह्य गोष्टी केवळ गौण तपशिलाच्या बाबी होत.

# राजयोग

## भूमिका

इतिहासाच्या आरंभापासून तहत आजपर्यंत मानवसमाजांत नाना अलौकिक घटना अथवा चमत्कार घडत असल्याची नोंद आढळते. आजहि, आधुनिक विज्ञानाच्या झोताने उजळून निघालेल्या समाजामध्येसुद्धा असल्या घटना किंवा चमत्कार घडत असल्याची ग्वाही देणाऱ्यांची वाण नाही. आता, या ग्वाहींतला बराचसा भाग विश्वास ठेवण्याजोगा नसतो हें खरें. कारण, ही असली ग्वाही देणाऱ्यांपैकी बरेचजण अडाणी, भोळसर, लोकभ्रमांनी पछाडलेले किंवा फसवे असतात. पुष्कळदा हे तथाकथित चमत्कार निव्वळ नकल असल्याचेंहि दृष्टोत्पत्तीस येतें. परंतु प्रश्न असा आहे की ती कशाची नकल असते? कारण 'नकल' म्हटली की 'असल' कांहीतरी आलेंच. कोणत्याहि गोष्टीचा नीट धांडोळा न घेतां, 'ह्यांत कांही अर्थ नाही' असें म्हणून ती अजीबात उडवून देणें हें कांही मोकळ्या, शास्त्रीय मनाचें लक्षण नव्हे. मानसराज्यांत घडणाऱ्या असल्या विविध अलौकिक घटनांचें म्हणजेच 'चमत्कारां'चें स्वरूप समजून घेऊन त्यांची संगति लावण्यापुरती भेदक, सूक्ष्म दृष्टि नसलेले शास्त्रज्ञ तसल्या घटना घडूं शकतात हें मानायलाहि तयार नसतात. ही प्रवृत्ति दोषास्पद होय. नव्हे, आकाशांत मेघाआड बसलेला कुणीतरी आपल्या प्रार्थना पूर्ण करीत असतो किंवा आपली प्रार्थना ऐकून या सृष्टीचे नियम बदलीत असतो असें मानणाऱ्या लोकांपेक्षाहि हे असले नामधारी शास्त्रज्ञ दोषास अधिक पात्र होत. कारण त्या लोकांच्या बाबतींत, ते अडाणी आहेत, त्यांना चुकीचें, सदोष शिक्षण दिलें गेलें असल्यामुळे ते याप्रमाणे 'मेघापलीकडील कुणावर तरी' भार टाकण्यास शिकले आहेत, आणि असा भार टाकतांटाकतां त्यांचा स्वभावच आता तसा विकृत बनून गेला आहे, असें म्हणतां येईल. परंतु ह्या शास्त्रज्ञांच्या बाबतींत तीहि सबब सांगतां येण्यासारखी नाही.

(भारतांत) हजारों वर्षे असल्या घटनांचें निरीक्षण केलें गेलें आहे, त्यांच्यावर खोल विचार केला गेला आहे, व त्यांच्यासंबंधी कांही

सामान्य सिद्धान्त बसविले गेले आहेत. माणसांत असणाऱ्या धार्मिक प्रवृत्तींचें मूलगामी विश्लेषण करण्यांत आलें आहे. आणि या साऱ्याचें प्रत्यक्ष फळ किंवा परिपाक म्हणजेच 'राजयोगा'चें शास्त्र होय. ज्या घटनांचें स्पष्टीकरण करणें आपल्याला जमत नाही त्या घटनांचें मुळांत अस्तित्वच नाकारण्याकडे आजकालच्या कांही शास्त्रज्ञांची प्रवृत्ति असते. ही प्रवृत्ति अगदी अक्षम्य आहे. राजयोग असें कधीच करीत नाही. उलट, सौम्य परंतु असंदिग्ध शब्दांत राजयोग लोकभ्रमांनी पछाडलेल्या भोळसर लोकांना म्हणतो की, बाबांनो, तुम्ही ज्यांना चमत्कार म्हणतां त्या अलौकिक घटना, प्रार्थनांना फल लाभणें, विश्वासाची शक्ति इत्यादी सारें अगदी खरें आहे; परंतु मेघापलीकडील कुणाची तरी ती करणी आहे असें जें तुम्हांला भोळसरपणामुळे वाटतें तें कांही त्या साऱ्या घटनांचें खरें स्पष्टीकरण नव्हे; राजयोग अशी घोषणा करतो की, प्रत्येक व्यक्तीच्या पाठीशीं ज्ञानाचा आणि शक्तीचा अनंत समुद्र विद्यमान असून, प्रत्येकजणच जणुकांही त्या समुद्राचा एकेक लहानसा कालवा आहे. राजयोगाची मानवजातीला अशी शिकवण आहे की, वासना आणि गरजा जशा माणसाच्या आंतच असतात तद्वतच त्या पूर्ण करण्याची शक्तिदेखील त्याच्या आंतच वसत असते; आणि कुठेहि व केव्हाहि एखादी वासना, एखादा अभाव किंवा एखादी प्रार्थना पूर्ण होते तिथेतिथे आणि तेव्हातेव्हा ह्या अनंत साठ्यांतूनच कुमक आलेली असते असें निश्चित समजा, मेघाआडील कुणी अलौकिक पुरुष तें सारें पुरवीत नसतो. मेघापलीकडील असल्या अलौकिक पुरुषावरील आपला विश्वास कदाचित् आपली कार्यशक्ति कांही अंशीं उद्दीपित करूं शकेल खरा, पण त्याने आध्यात्मिकदृष्ट्या माणसाची अवनति होते हेंहि तितकेंच खरें. त्याने परावलंबीपणा येतो, त्याने भय उपजतें, त्याने खुळचटपणा वाढतो. 'माणूस हा स्वभावत:च दुबळा आहे' अशी तुच्छतेची भावना त्यांतून निपजते. योगी म्हणतो की, अलौकिक किंवा अनैसर्गिक असें कांहीहि नाही; फक्त, निसर्गाचे स्थूल आणि सूक्ष्म असे दोन प्रकारचे आविष्कार किंवा अशीं दोन रूपें असतात, इतकेंच. पैकी, सूक्ष्म हें कारण असून स्थूल त्याचें कार्य असतें. स्थूलाचा इंद्रियांना अगदी सहज प्रत्यय येऊं शकतो, तसा सूक्ष्माचा येऊं शकत नाही. राजयोगाच्या

अभ्यासाने अधिकाधिक सूक्ष्म प्रत्यय येऊं लागतात.

भारतांतील सर्वच आस्तिक तत्वज्ञानांचें अथवा वेदांना प्रमाण मानणाऱ्या तत्त्वज्ञानांचें एकमेव ध्येय आहे—पूर्णत्व प्राप्त करून घेऊन आत्म्याची मुक्ति साधणें. त्याचा उपाय आहे—'योग'. 'योग' या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. तो शब्द फार व्यापक अर्थाचा आहे. तरीपण सांख्य आणि वेदान्त हीं दोन्हीं दर्शनें 'योगा'चें कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत समर्थन करीत असतात एवढें मात्र खरें.

'योग' शब्दाचे अनेक अर्थ आहेत हें वर सांगितलें आहेच. त्यांत 'राजयोग' असाहि एक अर्थ प्रसिद्ध आहे. योगाच्या त्या स्वरूपाचा, म्हणजेच 'राजयोगा'चा प्रस्तुत ग्रंथांत परामर्ष घेण्यांत आला आहे. पतंजलींचीं योगसूत्रें हा राजयोगावरील सर्वांत श्रेष्ठ प्रमाणग्रंथ असून राजयोगी त्यालाच आपलें 'शास्त्र' मानीत असतात. इतर तत्त्वज्ञ कांही तात्त्विक मुद्यांवर मतभेद दर्शवीत असले तरी पतंजलींच्या साधनाप्रणालीला मात्र ते निर्विवादपणें पाठिंबा देतात.

प्रस्तुत ग्रंथकर्त्यानें न्यूयॉर्क शहरीं निवडक जिज्ञासूंसमोर राजयोगावर कांही व्याख्यानें दिलीं होतीं. तीं ह्या ग्रंथाच्या पहिल्या भागांत समाविष्ट केलीं आहेत. ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत पतंजलींच्या सूत्रांचा भावानुवाद दिला असून त्यांवर धावतें भाष्यहि केलेलें आढळेल. पारिभाषिक शब्द होतां होईतों टाळले असून संभाषणाच्या सहज आणि सोप्या पद्धतीने विषय मांडण्याचा प्रयत्न केला आहे. 'राजयोगा'ची प्रत्यक्ष साधना करूं इच्छिणाऱ्यांसाठी पुस्तकाच्या प्रथमार्धांत कांही सोप्या व विशिष्ट सूचना देण्यांत आलेल्या आढळतील. तथापि, सर्व साधकांना असें विशेष आणि कळकळीचें सांगणें आहे की, ह्या राजयोगाचा कांही मामुली भाग वगळल्यास, साधारणपणें गुरूच्या प्रत्यक्ष सान्निध्यांत राहूनच त्याचें अनुष्ठान करणें सुरक्षितपणाचें होय, एरवी तें धोक्याचें आहे. संभाषणपद्धतीने विशद केलेल्या ह्या विद्येने जर कुणाच्या अंतःकरणांत त्या बाबतींत अधिक जाणण्याची इच्छा उत्पन्न होईल तर त्या व्यक्तीला गुरूचाहि लाभ झाल्यावांचून राहणार नाही.

पतंजलींचें योग-दर्शन हें सांख्यतत्त्वज्ञानावर आधारलेलें आहे.

त्या दोहोंत फरक फारच थोड्या मुद्यांवर आहे. त्यांतील फक्त दोनच मुद्दे मुख्य आणि महत्त्वाचे आहेत. पहिला मुद्दा असा की, पतंजलि आदिगुरु म्हणून सगुण ईश्वर मानतात. तर, एक कल्पभर जगाच्या शासनाचा तात्पुरता भार ज्याच्यावर असतो अशा, जवळजवळ पूर्णत्व पावलेल्या (कल्पनियामक) पुरुषाखेरीज अन्य कोणताहि ईश्वर सांख्य मानीत नाहीत. पातंजल योग आणि सांख्य यांमधील भेदाचा महत्त्वाचा दुसरा मुद्दा म्हणजे, आत्म्याप्रमाणे वा पुरुषाप्रमाणे मनहि सर्वव्यापी आहे असें योग मानतो, पण सांख्यांना तें संमत नाही.

—ग्रंथकर्ता
(स्वामी विवेकानंद)

---

## प्रकरण पहिलें

# प्रास्ताविक

आपलें सर्वच ज्ञान अनुभवावर आधारलेलें असतें. ज्याला आपण अनुमान वा तर्कजन्य ज्ञान म्हणतों, ( ज्यांत आपण साधारण तत्त्वां-कडून अधिक साधारण तत्त्वाकडे, किंवा साधारण तत्त्वांतून एखाद्या विशिष्ट गोष्टीकडे जात असतों ) त्या आनुमानिक ज्ञानाचाहि आधार अनुभव हाच असतो. 'निश्चित विज्ञान' (Exact Science)* म्हणून गणल्या गेलेल्या शास्त्रांत जीं सत्यें सांगितलेलीं असतात, त्यांचा पड-ताळा लोकांना सहज घेतां येतो. कारण, मानवमात्राच्या विशिष्ट अनुभवांवरच तीं सत्यें आधारलेलीं असतात. शास्त्रज्ञ तुम्हांला कशा-वरहि विश्वास ठेवायला सांगणार नाही. त्याला कित्येक गोष्टींविषयी कांही प्रत्यक्ष अनुभव आलेला असतो, व त्यावर विचार करून त्याने कांही सिद्धान्त बांधलेले असतात. विचारान्तीं बसविलेले ते सिद्धान्त तो ज्या वेळीं आम्हांला स्वीकारावयास सांगतो तेव्हा तुम्हांआम्हां सर्वांना येणाऱ्या कांही सार्वजनीन अनुभवांशीं ताडूनच त्यांचा खरेखोटे-

---

* ज्यांचीं तत्त्वें इतकीं निश्चित आहेत की त्यांच्या बळावर पुढे काय घडणार हें ठामपणें सांगतां येतें अशीं शास्त्रें. जसें गणित, ग्रहगणित इत्यादि.

पणा ठरविला जावा अशी त्याची अपेक्षा असते. प्रत्येक 'निश्चित विज्ञानां'त पायाभूत असें कांहीतरी असतें की जें मानवमात्राला उपलब्ध असतें. त्यामुळे त्या शास्त्रांचे सिद्धान्त खरे की खोटे हें आपल्याला तात्काळ ताडून पाहतां येतें. आता प्रश्न असा आहे की धर्माला असा कांही पाया आहे किंवा नाही ? या प्रश्नाचें उत्तर मला 'होय'. आणि 'नाही' असें दोन्ही प्रकारचें द्यावें लागेल.

जगांत सर्वत्रच धर्मासंबंधी साधारणत: अशी शिकवणूक देण्यांत येत असते की धर्म हा केवळ श्रद्धेवर आणि विश्वासावर आधारलेला आहे. आणि, कित्येक मतांचें एकेक गाबाळ, एवढेंच अधिकांश धर्मांचें स्वरूप असतें. म्हणूनच धर्माधर्मांत सारखीं भांडणें होतांना दृष्टीस पडतात. हीं मतें परत विश्वासावर आधारलेलीं असतात. कुणी म्हणतात कीं ढगांपलीकडे एक महान् पुरुष बसला असून तोच साऱ्या विश्वाचा कारभार चालवीत आहे. जे लोक असे म्हणतात ते फक्त असें म्हणूनच थांबत नाहीत, तर केवळ त्यांच्या म्हणण्यावर विसंबून इतरांनी त्यांच्या त्या मतावर विश्वास ठेवला पाहिजे अशीहि ते अपेक्षा धरतात. इतरांच्याहि याचप्रमाणे कांही कल्पना असतात, त्यांवर सर्वांनी विश्वास ठेवावा अशी ते मनीषा बाळगतात. 'अहो पण तुमच्या म्हणण्यावर आम्हीं कां विश्वास ठेवावा' असें जर एखाद्याने त्यांना हटकलें तर त्याला देण्यासारखें समर्पक उत्तर ह्यांच्याजवळ नसतें. म्हणूनच आजकाल धर्माचें आणि तत्त्वज्ञानाचें नांव इतकें बद्‌दू झालें आहे. प्रत्येक सुशिक्षित माणूस जणु म्हणूं इच्छितो—"अरे घुत्, हे धर्म म्हणजे नानातऱ्हेच्या मतांचीं भेंडोळीं होत, आणखी कांही नाही. असा कोणता एखादा निकषहि नाही की ज्याच्यावर त्यांचा खरेखोटेंपणा पारखतां येईल. जो तो आपापलीं लाडकीं मतें ठासून प्रतिपादण्यांत दंग असतो." तें कसेंहि असो आणि हे शिकलेले लोक कांहीहि म्हणोत, वस्तुस्थिति मात्र अशी आहे की धर्मावरील ह्या विश्वासाला एक सर्वसाधारण पाया आहे. आणि, विभिन्न देशांतील भिन्नभिन्न पंथांच्या नानाविध कल्पना व हीं सारीं निरनिराळीं धर्ममतें त्या एका सार्वजनीन पायावरच उभारलेलीं आहेत. ह्या साऱ्यांच्या मुळाशीं गेल्यास दृष्टोत्पत्तीस येतें की तीं सारींच्या सारीं सार्वजनीन अनुभवांवरच

आधारलेलीं आहेत.

जगांत प्रचलित असलेल्या विभिन्न धर्मांचें अनुशीलन आणि पृथक्करण केल्यास सर्वांत प्रथम एक गोष्ट आपल्या निदर्शनास येते. आपल्या निदर्शनास येतें की हे सगळे धर्म दोन श्रेणींमध्ये विभागतां येतात. कांही, म्हणजे एका श्रेणींतील धर्म एखाद्या 'शास्त्र ग्रंथा'ला आपला पाया मानतात. त्यांचें प्रामाण्य त्या ग्रंथावर अवलंबून असतें. ते त्याच्यावरच उभारलेले असतात. तर कांही, म्हणजे दुसऱ्या श्रेणींत पडणाऱ्या धर्मांना असा पायाभूत, प्रमाणभूत ग्रंथ नसतो. आणि या बाबतींत आपल्याला असेंहि आढळून येईल की, असे शास्त्राच्या पायावर आधारलेले धर्म अत्यंत सकस असतात, आणि त्यांचे अनुयायीहि अधिक असतात. ज्यांना असा शास्त्रग्रंथ नाही अशा धर्मांचा प्राय: लोप झालेला असून, तसले जे कांही थोडे धर्मसंप्रदाय नव्याने उदयास आले आहेत त्यांच्या अनुयायांची संख्या फार थोडी आहे. तथापि ह्या दोन्ही श्रेणींमधील एकूणएक सर्व धर्मांचें एका मुद्यावर अगदी एकमत असलेलें आढळतें; तें प्रतिपादीत असलेलीं सत्यें केवळ कांही विशिष्ट व्यक्तींचे प्रत्यक्ष अनुभवच होत असें त्या सगळ्यांचेंच म्हणणें आहे. ख्रिश्चन तुम्हांला त्याच्या स्वत:च्या धर्मावर, येशू ख्रिस्त हे ईश्वरावतार आहेत यावर, ईश्वरावर, आत्म्यावर, आणि आत्म्याला उन्नत अवस्था लाभू शकते यावर विश्वास ठेवायला सांगेल. हें सारें विश्वास ठेवण्यायोग्य वा खरें कशावरून असें जर तुम्हीं त्याला विचारलें तर तो तुम्हांला फक्त एवढेंच उत्तर देईल की, "माझा तसा विश्वास आहे." परंतु म्हणून तेवढ्यावरच न थांबतां तुम्ही जर त्याच्या त्या ख्रिस्ती धर्माच्या मुळाशीं जाऊन पाहिलें तर तुम्हांला आढळून येईल की तो प्रत्यक्षानुभूतीवरच आधारलेला आहे. मुळांत तो धर्म ज्यांनी स्थापला ते येशू ख्रिस्त म्हणत की "मीं ईश्वर प्रत्यक्ष पाहिला आहे." येशूंचे शिष्यहि म्हणत की "आम्हांला ईश्वराचा अनुभव आला आहे." याप्रमाणे त्या धर्माच्या मुळाशीं आणखी कित्येकांची प्रत्यक्षानुभूति असल्याचें आढळून येईल.

बौद्ध धर्माचेंहि तसेंच. बौद्ध धर्म म्हणजे बुद्धदेवांचे प्रत्यक्षानुभव. बुद्धदेवांच्या प्रत्यक्षानुभूतींवरच तो आधारलेला आहे. बुद्धदेवांना

कांही सत्यांचा अनुभव आला, त्यांना त्या सत्यांचें प्रत्यक्ष दर्शन झालें, त्यांचा साक्षात्कार झाला, आणि त्यांचाच बुद्धदेवांनी जगाला उपदेश दिला. त्यालाच आपण बौद्ध धर्म म्हणतों. हिंदूंचेंहि असेंच आहे. हिंदूंना त्यांच्या शास्त्रांचें दान देणाऱ्या ऋषींनी घोषणा केली आहे की "आम्हांला ह्या सत्यांचा अनुभव आलेला आहे," आणि त्यांचाच त्यांनी प्रचार केला आहे.

यावरून हेंच स्पष्ट दिसतें की, आपल्या समस्त (लौकिक) ज्ञानाचा सार्वजनीन आणि सुदृढ आधार जो 'प्रत्यक्ष अनुभव', त्या 'प्रत्यक्ष अनुभवा'वरच जगांतील यच्चावत् सर्व धर्म आधारलेले आहेत. त्या साऱ्याच धर्मांच्या आचार्यांना ईश्वराचें दर्शन झालें होतें. त्यांना आत्मदर्शन झालें होतें. स्वत:चें अनंत स्व-रूप त्यांनी जाणलें होतें. स्वत:ची भविष्यावस्था त्यांनी आकळली होती. आणि जें त्यांनी पाहिलें, त्याचाच त्यांनी प्रचार केला. परंतु या बाबतींत एक गंमत बघायला मिळते. यांतील अधिकांश धर्म, विशेषत: आजकाल, असें एक विचित्र मत अट्टाहासाने प्रतिपादतांना दिसतात की, "ह्या साऱ्या अनुभूति आजकाल होणें शक्य नाही; ज्यांच्या नांवांनी हे धर्म प्रचारांत आले, त्या मूठभर मूळ संस्थापकांना फक्त त्या प्रत्यक्षानुभूति शक्य होत्या. आता ते अनुभव कुणालाहि येणें शक्य कोटींतलें नाही. आणि म्हणून आज आपल्याला धर्मावर फक्त विश्वास ठेवण्याखेरीज गत्यंतर नाही." हें म्हणणें मला अजीबात नाकबूल आहे. ज्ञानाच्या कोणत्याहि क्षेत्रांत कुठेहि जर एखादा प्रत्यक्ष अनुभव आला असेल तर त्यावरून हें अगदी असंदिग्धपणें सिद्ध होतें की त्यापूर्वीहि तो अनुभव लाखो वेळां येऊन गेला असणें संभवनीय आहे आणि पुढेहि चिरकाळ केव्हाहि येणें शक्य आहे. एकरूपता हा प्रकृतीचा अगदी अविच्छेद्य नियम आहे. प्रकृति नेहमी एकाच तऱ्हेने वागत असते, एकाच तऱ्हेने कार्य करीत असते. सारांश, जें एकदा घडलें तें फिरून केव्हाहि घडूं शकतें.

योगशास्त्राच्या आचार्यांचें म्हणूनच असें सांगणें आहे की, धर्म केवळ पूर्वीच्या काळच्या अनुभवांवरच आधारलेला आहे असें नव्हे, उलट स्वत:ला कांही प्रत्यक्ष अनुभूति आल्याखेरीज कुणीहि खरोखर धार्मिक या संज्ञेस पात्र होऊंच शकणार नाही. ह्या अनुभूति कशा

प्राप्त करून घ्याव्यात हें शिकविणाऱ्या शास्त्रालाच 'योग' असें नांव आहे. धर्मातील सत्यांचा स्वतःला कांही अनुभव आल्याखेरीज धर्माविषयी बोलण्यांत विशेष तात्पर्य नाही. परमेश्वराच्या नांवाने इतके संघर्ष, इतकीं युद्धें, इतके कलह चालतात याचें कारण काय बरें असेल? ईश्वराच्या नांवाने दुनियेंत जितका रक्तपात झाला आहे तितका आणखी इतर कशापायीहि झाला नसेल. कां बरें असें? कारण हेंच की, हे लोक धर्माच्या मुळाशीं कधीच गेले नाहीत. पूर्वापार चालत आलेल्या कित्येक आचारांना वा रूढींना 'मानण्या'पलीकडे त्यांची मजल कधीच गेली नाही. स्वतः त्या तेवढ्या रूढि मानायच्या, आणि इतरांनाहि मानायला लावावयाच्या, हीच त्या बापड्यांची धर्माची कल्पना. आणि म्हणूनच धर्माधर्मांत एवढीं भांडणें होतात. ज्याला आत्म्याची अनुभूति झालेली नाही, ईश्वराचा साक्षात्कार झालेला नाही अशा माणसाला 'आत्मा आहे' 'ईश्वर आहे' असें म्हणण्याचा खरोखर काय बरें अधिकार? आत्मा खरोखरच असेल तर आपल्याला त्याचा साक्षात्कार व्हावयास हवा, ईश्वर म्हणून खरोखरच कांही असेल तर आपल्याला त्याचा साक्षात्कार व्हावयास हवा. एरवी त्या साऱ्यावर विश्वास न ठेवणेंच बरें. ढोंगी माणसापेक्षा स्पष्टवादी नास्तिक बरा. एकीकडे, आजकालच्या 'विद्वान्' म्हणून म्हणविल्या जाणाऱ्या व्यक्तींची अशी धारणा आहे की धर्म, तत्त्वज्ञान, परमेश्वराचा शोध वगैरे सारें निष्फळ आहे तर दुसरीकडे, अर्धशिक्षित लोकांचा मनोभाव असा दिसतो की, ह्या धर्म-तत्त्वज्ञान वगैरेंना वास्तविक पाहतां कांही आधार नाही; त्यांचें मूल्य फक्त इतकेंच की, ह्या सर्व कल्पना हृदयांत असल्यास इतरांचें भलें करण्याची प्रबल प्रेरणा आपल्याठायीं निर्माण होते; ईश्वरावर विश्वास ठेवल्याने लोक चांगले, नीतिमान म्हणजेच उत्तम नागरिक निपजतील. असल्या कल्पना बाळगल्याबद्दल अर्थातच आपण ह्या लोकांना दोष देऊं शकत नाहीं. कारण, सारहीन शब्दावडंबरावर विश्वास ठेवणें म्हणजेच धर्म, असेंच त्यांना शिकविण्यांत आलेलें असतें. धर्मजीवन शब्दांवरच जगण्यास त्यांना शिकविण्यांत आलें असतें. पण हें शक्य आहे काय? कदापि नाही. धर्मजीवन माणसें जर केवळ शब्दांवरच जगूं शकलीं असतीं तर मानवीस्वभावाविषयी मला काडीचाहि आदर वाटला नसता.

माणसाला सत्य हवें असतें, सत्याची स्वतःला प्रत्यक्ष अनुभूति हवी असते. आणि वेद म्हणतात की, सत्य असें आकळलें, तें असें समोरासमोर पाहिलें, तें असें अंतरींच्या अंतरीं जाणवलें म्हणजेच माणसाचे सर्व संदेह विरतात, त्याच्या जीवनांतला अंधार सरतो, अंतःकरणाच्या गाठी सुटतात. वेद म्हणतात—"हे विश्वमानवांनो, हे दिव्यलोकनिवासी देवतांनो, ऐका, तुम्ही अमृतत्वाचे वारसदार आहांत. तुम्ही त्या अमृत-स्वरूप परम पुरुषाचें संतान आहां. ऐका, या अंधारभरल्या आयुष्यांतून त्या प्रकाशमय जीवनाकडे जाण्याचा मार्ग मला सापडला आहे. अज्ञान-तमापलीकडे विराजमान असलेल्या त्या ज्योतिर्मय परम पुरुषाचें दर्शन प्राप्त करून घेणें हाच तो मार्ग होय. आपलें हें अंधारें जीवन—ही मृत्यूची खाई ओलांडून जाण्याचा आणखी अन्य मार्ग नाही."

जीवनांतील हें अंतिम सत्य प्राप्त करून घेण्याची एक व्यवहार्य आणि शास्त्रशुद्ध साधनाप्रणाली राजयोग मानवजातीला सादर करतो. राजयोग हें एक शास्त्र आहे. प्रत्येक शास्त्राची सत्योपलब्धीची स्वतःची अशी एक पद्धति असते. तुम्हांला जर खगोलशास्त्रज्ञ व्हावयाचें असेल तर, बसल्या बसल्या 'खगोल शास्त्र' 'खगोल शास्त्र' घोकत राहिल्याने तें कधीच साधणार नाही. रसायनशास्त्राचें म्हणा की पदार्थविज्ञानाचें म्हणा, सर्वच शास्त्रांचें असेंच आहे. कोणत्याहि शास्त्रांत एका विशिष्ट पद्धतीचा अवलंब करावा लागेल. रसायनशास्त्राचेंच उदाहरण घ्या. तुम्हांला प्रयोगशाळेंत जावें लागेल, निरनिराळीं द्रव्यें घ्यावीं लागतील, तीं विशिष्ट प्रमाणांत एकमेकांत मिसळावीं लागतील, त्या मिश्रणांतून निर्माण होणाऱ्या संयुक्त पदार्थांवर प्रयोग करावे लागतील, परीक्षण करावें लागेल, तेव्हाच कुठे तुम्हांला रसायनशास्त्राचें ज्ञान होईल. तुम्हांला जर खगोलशास्त्रज्ञ व्हावयाचें असेल तर तुम्हीं वेधशाळेंत गेलें पाहिजे आणि दुर्बीण घेऊन ग्रहनक्षत्रांचें निरीक्षण केलें पाहिजे, तरच तुम्ही खगोलशास्त्रज्ञ होऊं शकाल. याप्रमाणे प्रत्येक शास्त्राची स्वतःची अशी एकेक विशिष्ट पद्धति असणार. मी तुम्हांला हजारो उपदेश देईन, पण तुम्हीं जर योग्य प्रणालीनुसार साधना करणार नसाल तर हजारच काय पण लाख उपदेशहि तुम्हांला धार्मिक बनवूं शकणार नाहीत. **सर्वच देशांतील व सर्वच कालांतील साधु-महापुरुषांनी आणि निःस्वार्थ,**

पवित्र व्यक्तींनी जीवनांतील ह्या सत्यांचा उद्घोष केला आहे. जगाचें भलें करण्याखेरीज त्यांचा आणखी कांहीच उद्देश नव्हता. ते सर्वजण अशी घोषणा करतात की, "पंचेंद्रियांद्वारा आपल्याला जें कळतें, त्यापलीकडील केवढेंतरी उच्च सत्य आम्हांला गवसलें आहे. खुशाल पडताळा घेऊन पाहा आणि मगच त्यावर विश्वास ठेवा." त्यांचें आपल्याला असें सांगणें आहे की, "तुम्ही या पद्धतीने प्रामाणिकपणें साधना करा. तसें करून जर तुम्हांला ह्या उच्च सत्याची प्रतीति आली नाही तर मगच उच्च, अतींद्रिय, सत्याविषयीच्या आमच्या ह्या बोलण्यांत कांही अर्थ नाही असें म्हणण्याचा तुम्हांला अधिकार पोहोचूं शकतो. परंतु असें कांही न करतांच आम्ही म्हणतों तें धुडकावून लावणें हें तर्काला सोडून होईल." म्हणून आपण त्यांनी ठरवून दिलेल्या पद्धतीचा अवलंब करून मनापासून साधना करावयास हवी. प्रकाश लाभेलच.

कोणतेंहि ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें झाल्यास आपण सामान्यीकरणाचा (generalisationचा) उपयोग करीत असतों. सामान्यीकरण हें प्रत्यक्ष निरीक्षणावर आधारलेलें असतें. आपण प्रथम कित्येक घटनांचें निरीक्षण करतों, मग त्यांचें सामान्यीकरण करतों, आणि नंतर त्यापासून कांही निष्कर्ष काढतों किंवा सिद्धान्त बसवितों. आपल्या आंतमध्ये काय घडत आहे ह्याचें आधी निरीक्षण करूं न शकल्यास आपल्याला मनाचें, मानवाच्या अंतःप्रकृतीचें, विचाराचें ज्ञान होणें केव्हाहि शक्य नाही. बाह्य जगांत घडणाऱ्या घटनांचें निरीक्षण करणें त्या मानाने सोपें आहे, कारण त्यासाठी अनेक उपकरणें शोधून काढलीं गेलीं आहेत. परंतु अंतर्जगांत आपल्याला मदत करूं शकेल असें यंत्र आपल्याजवळ नाही. पण, खऱ्या अर्थाने एखादें शास्त्र उभारावयाचें झाल्यास निरीक्षण अपरिहार्य आहे हें निराळें सांगावयास नको. योग्य विश्लेषणाखेरीज शास्त्र कसें काय बनविणार ? तसलें शास्त्र कुचकामाचें आणि बिनबुडाचें होईल--निराधार तर्कापेक्षा त्याला अधिक कांही मूल्य असणार नाही. आणि म्हणूनच, अंतर्जगताचें निरीक्षण करण्याचें साधन ज्यांना सापडलें आहे असे कांही मूठभर मानसशास्त्रज्ञ अपवाद म्हणून वगळल्यास इतर सर्व मानसशास्त्रज्ञ सुरवातीपासून वादावादी करीत आले आहेत, एकमेकाशीं भांडत आले आहेत.

राजयोगाचें शास्त्र आपल्याला प्रथम ह्या आपल्या अंतर्गत अवस्थांचें निरीक्षण करण्याचें साधन काय आहे तें सांगतें. राजयोगाच्या मतें, आपल्या आंतील (अंतर्गत) अवस्थांचें निरीक्षण करण्याचें तें साधन किंवा तें यंत्र म्हणजे आपलें मनच होय. आपल्या अवधानशक्तीला नीट वळण लावून ती अंतर्जगताकडे वळवूं शकल्यास आपण आपल्या मनाचें सुरेख विश्लेषण करूं शकूं, आणि त्यामुळे तिथे काय काय घडामोडी चालल्या आहेत हें आपल्याला कळून येईल. मग अंधाऱ्या ठिकाणीं उजेड यावा असें होऊन जाईल. आपल्या मनाच्या शक्ति विखुरलेल्या प्रकाशकिरणांप्रमाणे असतात; एका ठिकाणीं केंद्रित केल्यास, जिच्यावर त्या केंद्रित केल्या जातात ती गोष्ट त्या उजळून टाकतात. ज्ञानलाभाचा हा एकच एक उपाय आपल्याला उपलब्ध आहे. बाह्य जगाचें ज्ञान करून घेण्यासाठी म्हणा की आंतर जगाचें ज्ञान करून घेण्यासाठी म्हणा, या दोन्ही जगांच्या ज्ञानासाठी सर्वजण ह्याच उपायाचा वापर करीत असतात. तथापि, वैज्ञानिक जी सूक्ष्म निरीक्षणशक्ति बहिर्जगताकडे वळवीत असतो तीच मानसशास्त्रज्ञाला अंतर्जगताकडे वळवावी लागत असते; आणि हें साधण्यास पुनःपुनः बरेच प्रयत्न करून तशी सवय करून घ्यावी लागते. बालपणापासून आपण बाह्य गोष्टींकडेच लक्ष देण्यास शिकत असतों, आंतील गोष्टींकडे लक्ष देण्याचें आपल्याला वळण नसतें. त्यामुळे आपल्यापैकी बहुतेकांची आंतील यंत्ररचनेचें निरीक्षण करण्याची शक्ति जवळजवळ नाहीशी झाली असते. मनाला अंतर्मुख करणें, त्याची बहिर्मुख प्रवृत्ति बंद करणें आणि मग तें जेणेंकरून स्वतःच स्वतःचें विश्लेषण करून स्वतःचें स्वरूप जाणूं शकेल यासाठी त्याच्या सर्व शक्ति केंद्रित करून त्यांचा त्याच्यावरच प्रयोग करणें हें फार कठीण काम आहे. परंतु हा विषय शास्त्रीय पद्धतीने हाताळावयाचा झाल्यास हाच एक उपाय आहे.

यावर कुणी म्हणतील की एवढा आटापिटा कशासाठी ? ज्यासाठी एवढा खटाटोप करावयाचा, त्या या ज्ञानाचा उपयोग काय ? फायदा काय ? याला उत्तर असें की, प्रथमतः म्हणजे ज्ञानलाभ हाच ज्ञानलाभापासून होणारा सर्वांत मोठा फायदा आहे. आणि द्वितीयतः म्हणजे त्याचा उपयोगहि आहे. हें ज्ञान आपलें समस्त दुःख दूर करील.

आपल्या मनाचें विश्लेषण करून माणसाला जेव्हा अशा एका वस्तूचा साक्षात्कार होतो की जी कधी नष्ट करतां येत नाही, जी स्वभावतःच नित्य शुद्ध आणि पूर्ण आहे, तेव्हा मग त्याच्या दुःखाचा निरास होऊन जाईल, त्याला मग सुखाची वाण पडावयाची नाही. सर्व दुःखांचें मूळ भय आणि अतृप्त वासनाच होत. वर वर्णिल्याप्रमाणे माणसाला स्वतःच्या खऱ्या स्वरूपाचा साक्षात्कार झाल्याने आपल्याला कधी मृत्यु नाही हें त्याला कळेल, आणि मग मृत्यूचें भय त्याला मुळीच राहणार नाही, त्या भीतीपासून त्याची कायमची सुटका होईल. स्वतःच्या पूर्णत्वाची जाणीव झाल्यावर मग त्याच्या मनांत असार वासना उठणेंच शक्य होणार नाही. आणि जीवनांतल्या समग्र दुःखांचीं हीं दोन्हीं कारणें नाहीशीं झाल्यामुळे त्याला कोणतेंच दुःख उरणार नाही. याच देहांत पूर्ण आनंदाचा उपभोग घेत तो जगूं शकेल.

हें ज्ञान प्राप्त करून घेण्याची फक्त एकच पद्धत वा एकच उपाय आहे. ती पद्धत किंवा तो उपाय म्हणजे 'एकाग्रता.' रसायनशास्त्रज्ञ आपल्या प्रयोगशाळेंत जाऊन, स्वतःच्या मनाच्या सर्व शक्ति एका ठिकाणीं एकत्रित करतो, आणि ज्या द्रव्यांचें तो पृथक्करण करीत असेल त्यांवर त्या केंद्रित करतो; अशा रीतीने तो त्यांचें रहस्य जाणून घेतो. खगोलशास्त्रज्ञ आपल्या मनाच्या सर्व शक्ति एकत्रित करून दुर्बिणींतून आकाशावर रोखतो, आणि लगेच चंद्र, सूर्य, तारे हीं आपापलीं रहस्यें त्याला उघडीं करून दाखवूं लागतात. मी ज्या विषयावर तुमच्यापुढे बोलतों आहें, त्यावर मी जितका एकाग्र होऊं शकेन, तितका त्या विषयांतील गूढ तत्त्वांवर मी अधिक प्रकाश पाडूं शकेन. तुम्ही माझें बोलणें ऐकत आहांत. जितके एकाग्र होऊन तुम्ही तें ऐकाल तितकें तुम्हांला मी सांगत आहें त्याचें अधिक आकलन होऊं शकेल.

जगांत जें ज्ञान दृष्टीस पडतें तें सारें मानवाच्या शक्तींच्या एकाग्रतेखेरीज आणखी कोणत्या बरे उपायाने मिळविलें गेलें आहे? हें विश्व स्वतःचीं रहस्यें आम्हांला उघडीं करून दाखवायला तयार आहे —स्वतःच्या रहस्याचीं द्वारें आमच्यासमोर उघडायला राजी आहे, मात्र त्यासाठीं तें दार कसें ठोठावयाचें, त्यावर आवश्यक तेवढा धक्का कसा मारायचा हें आम्हांला अवगत असलें पाहिजे. तो धक्का देण्याला

आवश्यक असलेली शक्ति आणि जोर एकाग्रतेंतूनच निर्माण होत असतात. मानवी मनाच्या शक्तीला कांही सीमा नाही. तें जितकें अधिक एकाग्र होईल, तितकी एखाद्या गोष्टीवर केंद्रित होण्याची त्याची शक्ति वाढेल. हेंच या बाबतींतील रहस्य होय.

मनाला बाहेरील वस्तूंवर एकाग्र करणें सोपें आहे, कारण मन स्वभावतःच बाहेर जात असतें—बहिर्मुख असतें. परंतु धर्माच्या, तत्त्वज्ञानाच्या किंवा मानसशास्त्राच्या बाबतींत मन एकाग्र करणें सोपें नाही, कारण तिथे जाणणारा आणि जाणलें जाणारें—ज्ञाता आणि ज्ञेय, वा विषयी आणि विषय—एकच असतात. येथे वस्तु ही आंतील असते —मनच येथे जाणावयाची वस्तु असते, मनाचें निरीक्षण करावयाचें असतें—मनच मनाचें निरीक्षण करीत असतें. असें करण्याची मनामधे शक्ति आहे हें आपल्याला ठाऊक आहेच. स्वतःचेंच निरीक्षण-परीक्षण करूं शकण्याच्या मनाच्या या शक्तीला अंतःपर्यालोचनाची (Reflectionची) शक्ति असें म्हणतां येईल. मी तुमच्यासमोर बोलत आहें. त्याबरोबरच जणु अमळ बाजूला उभा राहून, मी जें बोलत आहें तें मीच एखाद्या तिऱ्हाइताप्रमाणे ऐकत आहें आणि जाणत आहें. तुम्ही एकाच वेळीं काम आणि विचार करतां, परंतु तुमच्या मनाचा एक अंश जणु बाजूला उभा राहतो आणि तुम्ही काय विचार करतां तें बघत असतो. मनाच्या सर्व शक्ति एकत्रित करून मनावरच वळवावयास हव्यात. आणि मग, सूर्याचीं भेदक किरणें पडल्यावर ज्याप्रमाणे अगदी अंधाऱ्या जागाहि आपलें गुप्त रहस्य उघडें करून दाखवितात त्याप्रमाणे हें एकाग्र मनहि स्वतःच्या अगदी अंतरंगांतील झाकलीं गूढें प्रकाशांत आणील. अशा रीतीने आपण धर्म-विश्वासाच्या पायापर्यंत म्हणजेच खऱ्याखऱ्या धर्मापर्यंत जाऊन पोहोचूं. मगच आपण खरोखर धार्मिक झालों, आपल्याला खरोखर धर्माचा लाभ झाला असें म्हणतां येईल. आणि मगच आपण आत्मा आहोंत की देह, जीवन दों घडींचें आहे की चिरंतन आहे, या विश्वाचा नियंता ईश्वर आहे किंवा नाही, हें सारें आपलें आपल्यालाच समक्ष दिसून येईल. आपल्या ज्ञानचक्षूंना मग सारेंकांही उघड दिसूं लागेल. राजयोग आपल्याला हेंच शिकवूं इच्छितो. राजयोगाच्या साऱ्या शिकवणुकींचा उद्देश आहे—मन एकाग्र

करणें, नंतर या एकाग्र मनाने त्याच्याच अगदी आंतल्या कप्प्यांत काय चाललें आहे हें शोधणें, नंतर तिथे जें काय गवसतें त्यावरून कांही सामान्य निष्कर्ष काढणें आणि अखेर तदनुसार स्वतःच एखादा सिद्धान्त बसविणें. म्हणूनच, तुमचा धर्म कोणता हा प्रश्न राजयोग तुम्हांला कधी विचारीत नाही--तुम्ही आस्तिक असां की नास्तिक असां, ख्रिश्चन असां, ज्यू असां की बौद्ध असां, त्याला कांहीच हरकत नाही. राजयोगाच्या दृष्टीने त्याला कांहीच महत्त्व नाही तुम्ही मनुष्य आहांत ना--राजयोगाच्या दृष्टीने तेवढेंच पुरें. प्रत्येक मानवाला धर्माचा लाभ करून घेण्याचा अधिकार आहे आणि तशी शक्ति पण प्रत्येक मनुष्याच्या ठायीं वसत आहे. प्रत्येकजणाला कोणत्याहि गोष्टीचें कारण विचारण्याचा--'असें कां' हें विचारण्याचा अधिकार आहे, आणि प्रत्येकाठायीं असें क्षमत्वहि वसत आहे की ज्याच्या साहाय्याने तो स्वतःच्या आंतमधूनच त्या प्रश्नाचें उत्तर प्राप्त करून घेऊं शकेल. फक्त, ह्या साऱ्यासाठी आवश्यक ते कष्ट सोसण्याची मात्र त्याची तयारी असली पाहिजे.

आतापर्यंतच्या विवेचनावरून आपल्याला दिसून आलें की, ह्या राजयोगाची साधना सुरू करण्यासाठी कोणत्याहि प्रकारच्या श्रद्धेची वा विश्वासाची मुळीच अट नाही. स्वतःला प्रत्यक्ष अनुभव येत नाही तोंवर कशावरहि विश्वास ठेवूं नका, अशीच राजयोगाची आपल्याला शिकवण आहे. सत्य स्वतःच्याच पायांवर उभें राहूं शकतें, त्याला कुणी धरून उभें करण्याची आवश्यकता नाही,--उभें राहण्यासाठी त्याला कसल्याच टेकूची गरज नाही. आपल्या जागृत अवस्थेंतील घटना खऱ्या आहेत हें सिद्ध करण्यासाठी स्वप्नाची किंवा कल्पनेची मदत घ्यावी लागेल असें का तुम्हांला म्हणावयाचें आहे? नाही, असें कुणीहि कधी म्हणणार नाही. आता एवढें मात्र खरें की, या राजयोगाच्या साधनेला दीर्घ अवधि आणि निरंतर प्रयत्न यांची आवश्यकता आहे. राजयोगाची साधना कांही अंशीं शारीरिक स्वरूपाची म्हणजेच शरीरसंयमात्मक आहे. परंतु ती अधिकांशीं मानसिक स्वरूपाचीच आहे--मुख्यतः ती मनःसंयमात्मकच आहे. मनाचा शरीराशीं किती घनिष्ठ संबंध आहे हें विवेचनाच्या ओघांत पुढे आपल्याला कळून येईलच. मन हा शरीराचाच केवळ सूक्ष्म भाग असून तें शरीरावर कार्य

करीत असतें हें जर आपल्याला मान्य असेल तर, शरीरहि उलट मनावर कार्य करीत असलेंच पाहिजे हेंहि तर्कसंगत म्हणावें लागेल. शरीर आजारी पडल्यास मनहि आजारी होतें. शरीर निकोप असल्यास मनहि निकोप आणि सुदृढ राहतें. माणूस क्रोधाविष्ट झाल्यास त्याचें मन क्षुब्ध होतें, त्याचप्रमाणे मन क्षुब्ध झाल्याने शरीरहि क्षुब्ध होऊन जातें. जगांतील अधिकांश लोकांचीं मनें बव्हंशीं त्यांच्या शरीराच्या कह्यांत असतात—त्यांचें शरीर त्यांच्या मनावर पूर्णपणें ताबा चालवीत असतें. कारण त्यांच्या मनांची फारशी वाढच झालेली नसते. तुम्ही जर मनास लावून घेणार नसाल तर म्हणूं इच्छितों की, बरीचशी मानवजात पशूंहून विशेष निराळी नसते. पुष्कळदा कनिष्ठ पशूंपेक्षा त्यांची संयमशक्ति विशेष जास्त नसल्याचेंहि आढळून येतें. स्वतःच्या मनावर आपला फारच थोडा ताबा असतो. तसा ताबा लाभावा, शरीरावर आणि मनावर आपला ताबा चालावा म्हणून आपल्याला सुरवातीस कित्येक बाह्य अथवा शारीरिक बाबींची मदत घ्यावी लागेल. शरीर बरेचसें काबूंत आल्यावर मग मनाला हाताळण्याचा आपण प्रयत्न करूं शकूं. याप्रमाणे मनाला हाताळून त्याला बरेचसें ताब्यांत आणल्यावर आपण त्याला आपल्या इच्छेनुसार कार्य करायला लावूं शकूं, आणि आपल्या इच्छेनुसार त्याला त्याच्या सर्व शक्ति एकत्र केंद्रित करावयास भाग पाडूं शकूं.

राजयोग्याच्या मतें हें बाह्य विश्व म्हणजे आंतर वा सूक्ष्म जगताचें केवळ स्थूल स्वरूप होय. सूक्ष्म हें नेहमीच कारण असतें, स्थूल हें कार्य असतें. म्हणून बाह्य जगत् हें कार्य असून अंतर्जगत् हें कारण होय. त्याचप्रमाणे, बाहेरील शक्ति ह्या आंतील सूक्ष्म शक्तींचा केवळ स्थूल आविष्कार होत. ज्याने ह्या आंतील शक्ति समजून घेऊन त्यांना कसें हाताळावें हें जाणलें आहे तो समस्त प्रकृतीवर ताबा चालवूं शकेल. समस्त विश्वावर प्रभुत्व मिळविणें, समस्त प्रकृतीला वशीभूत करणें याखेरीज कशानेंहि योग्याचें समाधान होण्यासारखें नसतें. आपण ज्याला 'प्रकृतीचे वा निसर्गाचे नियम' म्हणतों त्यांचा त्याच्यावर कांहीच परिणाम होऊं शकणार नाही, तो त्या साऱ्यांच्या पलीकडे जाऊं शकेल अशी अवस्था प्राप्त करून घ्यावयाची त्याची इच्छा

असते. त्या अवस्थेस पोहोचल्यावर योग्याला आंतर आणि बाह्य समस्त प्रकृतीवर प्रभुत्व लाभत असतें. ह्या प्रकृतीवर जय मिळविण्या-वरच मानवजातीची प्रगति आणि सभ्यता अवलंबून असते. ह्या प्रकृतीला मानव जितकी वशीभूत करूं शकेल तितका तो प्रगत आणि सुसभ्य म्हणतां येईल.

या प्रकृतीला वशीभूत करण्यासाठी भिन्नभिन्न जातींनी भिन्न-भिन्न पद्धति अंगीकारल्या आहेत. ज्याप्रमाणे एकाच समाजांत कांही व्यक्ति बहि:प्रकृतीवर जय मिळवूं इच्छितात तर कांही अंत:प्रकृतीवर, त्याचप्रमाणे जातीजातींचेंहि आहे. कांही जाती बाह्य प्रकृतीला वशी-भूत करूं इच्छितात, तर कांही जाती आंतर प्रकृतीवर प्रभुत्व प्राप्त करून घेऊं इच्छितात. कांहींच्या मतें अंत:प्रकृति जिंकली की सारें कांही जिंकलें, तर कांहींचें म्हणणें पडतें की बहि:प्रकृति जिंकणेंच मुख्य आहे, ती जिंकली की त्यांतच सारेंकांही आलें. हे दोन्ही पक्ष मधे कुठेच न थांबतां अखेरपर्यंत गेले तर सरतेशेवटीं एकाच ठिकाणीं जाऊन पोहोचतील, कारण खुद्द प्रकृतींत वस्तुत: आंतर आणि बाह्य असा मुळी विभागच नाही. आंतर प्रकृति आणि बाह्य प्रकृति असें वेगवेगळें खरोखर कांही अस्तित्वांतच नाही, हा केवळ कल्पनेने निर्माण केलेला एक मानीव विभाग आहे, आणखी कांहीच नाही. प्रत्यक्षांत असा विभाग नाही, कधीच नव्हता. स्वत:च्या मार्गाचा अखेरचा टप्पा गाठूं शकल्यास अंतर्वादी आणि बहिर्वादी दोघेहि अंतीं एकाच मुक्कामीं पोहोचण्याखेरीज गत्यंतरच नाही. पदार्थशास्त्रज्ञ ज्या वेळीं आपल्या ज्ञानाची अंतिम सीमा गाठतो त्या वेळीं तो अकल्पितपणें तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत जाऊन उपस्थित होतो आणि तद्वतच तत्त्वज्ञान्यालाहि आढळून येतें की ज्यांना तो मन आणि जड-द्रव्य म्हणत होता, तीं केवळ वरवर पाहिल्यासच वेगळीं आहेत, वस्तुत: तीं उभयत: एकच होत.

ज्या एकापासून हें बहु निर्माण झाले आहेत, जो एक ह्या अनेकांच्या रूपांनी विराजत आहे, त्या एकाचा शोध लावणें हेंच समस्त विज्ञानांचें उद्दिष्ट आणि लक्ष्य होय. राजयोग आंतर-जगता-पासून सुरवात करतो, अंत:प्रकृतीचें अनुशीलन करतो, आणि

तद्द्वारां आंतर आणि बाह्य, दोहोंनाहि वशीभूत करून घेतो. फार प्राचीन काळापासून हा प्रयत्न होत आला आहे. भारतवर्षांत हे प्रयत्न विशेषेंकरून झाले आहेत, थोडेबहुत इतर देशांतहि झाले नाहीत असें नाही. पाश्चात्त्य देशांत हिला गुप्तविद्या मानण्यांत येत असे, आणि जे लोक ती आत्मसात् करूं जात त्यांना चेटुक करणारे किंवा जादु-टोणा करणारे ठरवून मारून टाकलें जाई किंवा जिवंत जाळण्यांत येई. भारतांत नाना कारणांनी ही विद्या अशा लोकांच्या हातीं पडली की त्यांनी तिचा नव्वद टक्के भाग नष्ट केला, आणि उरलेला भाग पडद्या-आड, अत्यंत गुप्त ठेवण्याचा प्रयत्न केला. आजकाल परत पाश्चात्त्य देशांत ह्या विद्येचे कित्येक नामधारी गुरु उदयास आलेले दिसतात. ह्या विद्येचा खेळखंडोबा करणाऱ्या भारतांतील त्या गुरूंपेक्षाहि हे आधुनिक पाश्चात्त्य गुरु जास्त निपटारे आहेत. कारण, भारतांतील ते गुरुब्रुव निदान कांहीतरी जाणत असत. ह्या आजकालच्या पश्चिमी प्रणेत्यांना तेवढेंहि ठाऊक नसतें.

योगांच्या ह्या पद्धतींमधे जें कांही गुप्त, गुह्य वा चमत्काराच्या स्वरूपाचें असेल त्या साऱ्याचा आपण एकदम त्याग करावयास हवा. त्याच्या वाऱ्यालाहि आपण उभें राहतां कामा नये. जें बल देईल, शक्ति देईल तेंच केवळ ग्राह्य. हें केवळ ह्या विद्येलाच लागू आहे असें नव्हे, जीवनांतील सर्वच गोष्टींना हें लागू आहे. आणि जीवनांतील इतर सर्व गोष्टींप्रमाणे धर्माच्या बाबतींतहि, जें आपल्याला दुबळे बनवील तें सारें आपण साफ झुगारून दिलें पाहिजे, त्याला मुळी देखील थारा देतां कामा नये. चमत्कारांचें, रहस्याचें वा गुप्त गोष्टींचें वेड आपल्याला खुळे, दुबळे बनवीत असतें. ह्यापायींच योगासारख्या एका सर्वश्रेष्ठ विज्ञानाचा जवळजवळ सत्यानाश झाला. भारतवर्षांत ही विद्या पूर्णत्वास पोहोचा-वयास आज चार हजारांहूनहि अधिक वर्षे होऊन गेलींत. तेव्हापासून एका उत्कृष्ट, सुसंबद्ध शास्त्राच्या स्वरूपांत तिचा प्रसार भारतांत होत आला आहे. ह्या बाबतींत एक मोठी डोळ्यांत भरण्याजोगी गोष्ट आढळते ती ही की, ह्या शास्त्राचा टीकाकार जितका अर्वाचीन तितका तो अधिक चुका करतांना आढळतो, आणि लेखक जितका प्राचीन, तितका तो अधिक तर्कशुद्ध आढळून येतो. अर्वाचीन लेखकांपैकी बहुतेकजण

तऱ्हतऱ्हेच्या चमत्कारांच्याच वर्णनांत रंगतांना आढळतात. याप्रमाणे, ज्यांच्या हातीं ही योगविद्या पडली त्यांनी, ती केवळ आपल्याच हातीं राहावी या उद्देशाने तिला एखाद्या गुप्तविद्येचें स्वरूप दिलें, बुद्धीचा प्रकाश तिच्यावर कधीच पडूं दिला नाही, ती अंधारांत दडवून ठेवली.

मी तुम्हांला अगदी प्रारंभींच सांगून ठेवूं इच्छितों की मी ज्याचा प्रचार करीत आहें त्यांत 'गुप्त' किंवा चमत्काराच्या स्वरूपाचें असें कांहीहि नाही. या बाबतींत मला जें काय थोडेसें माहीत आहे तें मी तुम्हांला सांगेन. ह्यांतलें जितकें बुद्धीच्या द्वारें समजावून सांगतां येईल तितकें सांगण्याचा मी यत्न करीनच. परंतु त्यांतलें जें मला समजलेलें नाही त्या बाबतींत 'शास्त्र असें म्हणतें' एवढेंच मी आपल्याला सांगून पुढे जाईन. ह्याविषयी अविश्वास धरणें किंवा त्यावर आंधळयासारखा विश्वास ठेवणें चुकीचें, अनुचित होय. आपल्या बुद्धीचा आणि विचार-शक्तीचा वापर करावयास हवा, प्रत्यक्ष उपलब्धि करून घेऊन पडताळा पाहावयास हवा की शास्त्रांत सांगितलें तें खरें आहे की खोटें. एखाद्या भौतिक शास्त्राच्या बाबतींत तुम्ही जसें वागलां असतां तसेंच याहि शास्त्राच्या बाबतींत तुम्हीं वागावयास हवें. तें शास्त्र तुम्ही जसें शिकतां तसेंच हेंहि शिकून आत्मसात् करा. ह्यांत छपवाछपवीचेंहि कांही नाही, कसलाच धोका पण नाही. ह्यांत जेवढें सत्य आहे त्याचा अगदी ऐन चौरस्त्यावर सर्वांसमोर उघडपणें प्रचार करायला काय हरकत आहे? झाकाझाकीची काय गरज? ह्यांत छपवाछपवी करण्याचा, ह्या गोष्टी गुप्त ठेवण्याचा प्रयत्न केल्यास नाना अनर्थ उद्भवतात.

याविषयी आणखी अधिक कांही सांगण्यापूर्वी मी तुम्हांला सांख्य तत्त्वज्ञानासंबंधी थोडें सांगेन. संपूर्ण राजयोग ह्या सांख्य दर्शना-वरच आधारलेला आहे. सांख्य तत्त्वज्ञानानुसार आपल्याला बाह्य वस्तूंचें ज्ञान पुढीलप्रमाणे होत असतें. प्रथमतः डोळे, कान इत्यादींचा बाह्य वस्तूंशीं संबंध येतो. आता, ज्यांना आपण साधारणतः ज्ञानेंद्रियें म्हणतों ते हे आपले डोळे, कान वगैरे वस्तुतः 'ज्ञानेंद्रियें' नव्हत. डोळे, कान इत्यादि खऱ्या 'ज्ञानेंद्रियां'चीं केवळ बाह्य यंत्रें होत. खरीं 'ज्ञानेंद्रियें' आपल्या मेंदूमध्ये विशिष्ट केंद्रांच्या रूपांत असतात. असो तर, ह्या डोळे, कान इत्यादि बाह्य ग्राहक-यंत्रांचा जगांतील वस्तूंशीं

संयोग घडतांच ह्या बाह्य यंत्रांत कांही संवेदना उत्पन्न होतात. ही बाह्य यंत्रें त्या संवेदना (ज्ञानतंतूंच्या द्वारा) मेंदूतील आपापल्या केंद्राकडे, म्हणजेच खऱ्या ज्ञानेंद्रियाकडे पाठवितात. तीं ज्ञानेंद्रियें त्या संवेदना मनाला देतात, मन त्या निश्चयात्मिका बुद्धीला सुपूर्द करतें. बुद्धीकडून पुरुष वा आत्मा त्यांचें ग्रहण करतो. नंतर पुरुष, त्या बाबतींत काय करावयाचें ह्याची प्रेरणा मेंदूतील क्रियाकेंद्रांना देतो. ज्या मार्गानें संवेदना बाह्य ग्रहण-यंत्रांतून पुरुषापर्यंत आली होती, त्याच मार्गानें ही प्रेरणा उलट पुरुषापासून नाक-डोळे इत्यादि बाह्य ग्रहण-यंत्रांकडे जाते. बाह्य वस्तूंचें ज्ञान आपल्याला अशा रीतीने होत असतें. ह्या साऱ्यांपैकी एक पुरुष सोडून बाकी सगळेच जड आहेत. तथापि, बाह्य ग्रहण-यंत्राच्या मानाने मन हें कितीतरी सूक्ष्म द्रव्याने निर्मिलें गेलेलें असतें. मन ज्या द्रव्याने निर्मिलें गेलें असतें त्याचेंच तन्मात्रा नामक सूक्ष्म भूतद्रव्य बनत असतें. ह्या तन्मात्राच अधिकाधिक स्थूल होत होत दृश्य जड भूतें निर्माण होतात. सांख्यांचें मनोविज्ञान वा मानसशास्त्र असें आहे. म्हणजे काय की, बुद्धि आणि बाह्य स्थूल भूतें यांमध्ये फरक फक्त स्थूल-सूक्ष्मतेच्या प्रमाणाचा आहे. दोन्हीं आहेत एकाच कोटींतलीं, फक्त एक सूक्ष्म तर दुसरें स्थूल, एवढाच फरक. त्यांची कोटी कांही वेगळी नाही. अ-जड, म्हणजेच चेतन जर कांही असेल तर तो, फक्त पुरुषच, बाकी सर्व जड, अचेतन--एकाच कोटींतले. पुरुषाची मात्र कोटीच वेगळी. कारण तो, आणि एकमेव तोच चेतन आहे. मन जणु कांही ह्या पुरुषाच्या किंवा आत्म्याच्या हातचें एक यंत्र आहे. त्या यंत्राद्वारेंच आत्मा बाह्य वस्तु पकडीत असतो, त्यांचें ग्रहण करीत असतो. हें मन सदा संकल्प-विकल्प करीत असतें, सारखें बदलत असतें. तें कमावलें गेलें, पूर्णत्व पावलें तर अनेक इंद्रियांशीं संलग्न होऊं शकतें, एका इंद्रियाशीं संलग्न असूं शकतें, किंवा कोणत्याच इंद्रियाशीं संलग्न नाही अशा अवस्थेंत राहूं शकतें. उदाहरणार्थ, समजा की मी एखाद्या घड्याळाची टिक्‌टिक् अगदी लक्ष लावून ऐकत आहें. अशा वेळीं माझे डोळे सताड उघडे असूनहि मला कदाचित् कांहीहि दिसत नसणें शक्य आहे. यावरून हें स्पष्ट होतें की माझें मन त्या वेळीं श्रवणेंद्रियाशीं संलग्न असलें तरी दर्शनेंद्रियाशीं संलग्न

नव्हतें. परंतु पूर्णत्व पावलेलें मन एकाच वेळीं सर्वच्या सर्व इंद्रियांशीं संयुक्त करतां येतें. मनांत परत अंतर्दर्शनाचीहि शक्ति आहे. त्या शक्तीच्या साहाय्याने तें स्वतःच्या अगदी खोल भागांत प्रवेश करून तिथली खबर जाणूं शकतें. या अंतर्दर्शनाच्या शक्तीचा विकास करणेंच योग्याचें उद्दिष्ट होय. मनाच्या समस्त शक्ति एकत्र करून, त्या एकाग्रीकृत मनानें मनाच्या अगदी अंतस्तलीं शिरून तिथे काय चाललें आहे हें जाणून घेण्याची योग्याची मनीषा असते. या बाबतींत केवळ विश्वास ठेवण्याचा प्रश्नच येत नाही; कित्येक तत्त्वज्ञांनी विश्लेषण करून प्रस्थापित केलेले हे सिद्धान्त आहेत. आधुनिक शरीरशास्त्रज्ञ आपल्याला सांगतात की, आपले डोळे हे खरोखर आपलीं बघण्याचीं इंद्रियें नव्हत, तर आपलें खरें दर्शनेंद्रिय आपल्या मेंदूतील एक केंद्र होय. आपल्या इतर ज्ञानेंद्रियांचेंहि असेंच आहे. आधुनिक शरीर-शास्त्रवेत्ते आपल्याला असेंहि सांगतात की, आपल्या मेंदूतील हीं ज्ञान-तंतूंचीं केंद्रें आणि आपला मेंदू हीं उभयतां एकाच द्रव्याचीं बनलीं आहेत. सांख्य तत्त्वज्ञानहि आपल्याला हेंच सांगतें. फरक इतकाच की, या आधुनिक शरीरशास्त्रज्ञांचें विधान शरीराच्या अभ्यासावर आधार-लेलें आहे, तर सांख्यांचें विधान मनाच्या अभ्यासावर आधारलेलें आहे. परंतु विधान दोघांचेंहि सारखेंच आहे. आपल्या अभ्यासाचें वा अन्वेष-णाचें क्षेत्र मात्र ह्याच्या पलीकडे आहे.

मनाच्या भिन्नभिन्न सर्व अवस्था निरीक्षण करतां येतील अशी सूक्ष्म अनुभवशक्ति संपादण्याचा योग्याचा प्रयत्न असतो. मनाने त्या सर्व मानसिक प्रक्रियांचें पृथक्‌पृथक्‌पणें निरीक्षण करतां यावयास हवें. बाह्य विषयांचा नेत्रादि बाह्येंद्रियांशीं संबंध येतांच निर्माण होणाऱ्या संवेदना ज्ञानतंतूंच्या मार्गें मेंदूतील अंतरिंद्रियाकडे कशा धावतात, मन त्यांचें कसें ग्रहण करतें, तें (मन) त्या संवेदना बुद्धीला कशा देतें, तेथून त्या संवेदना पुरुषापर्यंत कशा पोहोचतात, हें सारें पृथक्‌पृथक्-पणें बघतां यावयास हवें. कोणत्याहि शास्त्राचें ज्ञान करून घ्यावयाचें झाल्यास कांही विशिष्ट पूर्वतयारी असावी लागते. त्याचप्रमाणे, त्या त्या शास्त्राची स्वतःची एक विशिष्ट पद्धति असते, तिचें अनुसरण केल्याखेरीज आपल्याला त्या शास्त्राचें ज्ञान लाभणें शक्य नाही. हें

सारें राजयोगालाहि लागू आहे.

आहारासंबंधी कांही विधिनिषेध आवश्यक आहेत. ज्यायोगें मन अत्यंत पवित्र राहील असाच आहार आपण केला पाहिजे. आहाराचा जीवनाशीं काय संबंध आहे हें एखाद्या पशुशाळेंत गेल्यास तुम्हांला स्पष्टपणें कळून येईल. तिथे हत्ती असतात. केवढा प्रचंड प्राणी, पण किती शांत आणि स्वस्थ असतो. तेंच वाघ-सिंहांच्या पिंजऱ्यांकडे जा. सारखी चळवळ, सारखी अस्वस्थता, सारखी चंचलता आढळेल. आहाराआहाराने काय फरक पडतो बघा. आपल्या शरीरांत ज्या ज्या म्हणून शक्ति कार्य करीत आहेत, त्या सर्व अन्नांतूनच उत्पन्न झालेल्या असतात. ही आपल्या रोजच्या प्रत्ययास येणारी गोष्ट आहे. तुम्ही जर उपास करायला सुरुवात केली तर प्रथम तुमचें शरीर दुर्बळ होईल, तुमच्या शारीरिक शक्ति क्षीण होतील. आणि उपवास तसाच सुरू ठेवला तर कांही दिवसांनी तुमच्या मानसिक शक्तींचाहि ऱ्हास होऊं लागेल. प्रथम तुमच्या स्मरणशक्तीवर परिणाम होईल, तुम्हांला कांही आठवेनासें होऊन जाईल, होतां होतां अशी वेळ येईल की तुमचें मन अगदी पांगळें होऊन जाईल, एखादा साधा विचार करणेंहि तुम्हांला शक्य होणार नाहीं, मग एखाद्या मुद्द्याचें नीट, तर्कशुद्ध, सांगोपांग चिंतन करणें तर दूरच राहिलें. म्हणून साधनेच्या प्रथमावस्थेंत आपण आपल्या आहाराविषयी खूप चोखंदळ राहिलें पाहिजे. साधनामार्गावर बरेंच पुढे गेल्यावर, पुरेसे प्रगत झाल्यावर मग आहारासंबंधी तितका चोखंदळपणा न बाळगला तरी चालण्यासारखें आहे. वाढत्या रोपाला कुंपणाची गरज असते. एरवी त्याला इजा पोचूं शकेल. पण तें वाढून एकदाचें झाड झाल्यावर मग कुंपण काढून टाकीत असतात. सर्व तडाख्यांतून निभून जाण्याचें बळ मग त्याच्या अंगीं आलेलें असतें.

विलासीपणा आणि कडकपणा हीं दोन्हीं टोकें योग्याने टाळलीं पाहिजेत. उपवास, शरीरदंड इत्यादि त्याने अवलंबूं नयेत. जो स्वत:ला निष्कारण क्लेश देतो तो योगी होऊं शकणार नाही, असें भगवंतांनी गीतेंत सांगितलेलें आहे. गीतेंत भगवान म्हणतात की, जो मनुष्य अतिशय खातो किंवा अजीबात खातच नाही, जो मनुष्य अत्यधिक झोपतो किंवा अगदी झोपतच नाही, जो मनुष्य कर्माचा अतिरेक

करतो किंवा मुळीच कर्म करीत नाही असा कुणीहि मनुष्य योगी होऊं शकणार नाही.

---

## प्रकरण दुसरें

## पूर्वतयारी

राजयोगाचीं आठ अंगें आहेत. पैकी पहिलें म्हणजे 'यम.' अहिंसा, सत्य, अस्तेय (कांहीहि न चोरणें), ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह (दान न घेणें) यांना 'यम' म्हणतात. त्यानंतर म्हणजे 'नियम.' नियम म्हणजे शौच, संतोष, तप, स्वाध्याय, आणि ईश्वरप्रणिधान अथवा ईश्वराला आत्मसमर्पण. त्यानंतर 'आसन'. आसन म्हणजे बसण्याची पद्धति. राजयोगाचें चवथें अंग म्हणजे 'प्राणायाम'. पांचवें— 'प्रत्याहार'. मनाची विषयाकडची धाव थोपवून त्याला अंतर्मुख करण्याला प्रत्याहार असें नांव आहे. त्यानंतर 'धारणा' अथवा एकाग्रता. मग 'ध्यान'. आणि अखेरचें अंग म्हणजे 'समाधि' अथवा ज्ञानातीत अवस्था. अशा रीतीने राजयोग हा अष्टांगयुक्त आहे. त्यांतील यम आणि नियम हे साधकाला नैतिक वळण लावण्यासाठी आहेत हें उघडच आहे. या यम-नियमांचा पाया नसल्यास कोणतीहि योगसाधना यशस्वी होणें शक्य नाही. यम आणि नियम जीवनांत जितकेजितके मुरतील तितकेतितकें योग्याला त्याच्या साधनेचें फळ दिसूं लागेल. त्यांच्या अभावीं मात्र त्याच्या साधनेला कांहीच फळ येणार नाहीं. आपल्या विचाराने, आपल्या वाणीने किंवा आपल्या आचरणाने योग्याने कुणाचेंहि कधी अहित करूं नये. आणि अशी वागणूक त्याने माणसांशींच ठेवावयाची असें नव्हे, तर इतर प्राण्यांशींहि. केवळ माणसांविषयींच त्याने दया बाळगावयाची असें नव्हे. त्यापलीकडे जाऊन त्याने समस्त जगालाच आलिंगन दिलें पाहिजे.

यम आणि नियम यांच्यानंतर येतें 'आसन'. खूप उच्च अवस्थेचा लाभ होत नाही तोंवर दररोज कांही शारीरिक आणि मानसिक क्रिया नियमितपणें करावयाच्या असतात. त्याकरिता, बराच वेळ एकाच तऱ्हेने बसणें जमेल अशा एका आसनाची सवय असणें अत्यंत आवश्यक

आहे. ज्याला जें सोयीचें पडेल तें आसन त्याने निवडावें. एका विशिष्ट प्रकारें बसून चिंतन करणें एकाला सोयीचें वाटेल, तर दुसऱ्या एखाद्याला तसें बसून चिंतन करणें कदाचित् अत्यंत अवघड वाटेल. पुढे आपल्याला दिसेलच की, योगसाधनकालीं आपल्या शरीरामध्ये नाना क्रिया होत असतात. मज्जातंतुगत शक्तिप्रवाहांची गति बदलवून त्यांना नव्या मार्गाने प्रवाहित करावें लागतें. शरीरामध्ये नवीन स्पंदनें सुरू होतात, अवघें शरीरच जणु नव्याने घडविलें जातें. यांतील अधिकांश क्रिया-प्रक्रिया मेरुदंडांत अथवा पाठीच्या कण्यांतच घडत असतात. म्हणून 'आसना'च्या बाबतींत लक्षांत ठेवावयाची अत्यंत आवश्यक गोष्ट ही की त्या वेळीं आपला मेरुदंड अगदी स्वाभाविक अवस्थेंत राहिला पाहिजे. त्यासाठी सरळ, ताठ बसावयास हवें—छाती, मान आणि डोकें नीट एका रेषेंत असावयास हवींत. शरीराचा सगळा भार बरगड्यांवर पडूं द्या. असें बसलांत म्हणजे तुमच्या पाठीचा कणा सरळ राहील. हें अगदी सोपें, सरळ, स्वाभाविक 'आसन' आहे. छाती आंत ओढून पोक काढून बसल्यास खूप उच्च विचार करणें शक्य होत नाही हें तुमच्या अगदी सहज निदर्शनास येईल. या 'आसना'च्या बाबतींत राजयोगाचें हठयोगाशीं अमळ साम्य आहे. अर्थातच हठयोगाचा संबंध पूर्णतया स्थूल शरीराशींच असतो. स्थूल शरीराला खूप सबल करणें हेंच हठयोगाचें ध्येय होय. हठयोगाशीं आपल्याला येथे कांहीच करावयाचें नाही, कारण हठयोगाच्या क्रिया फार कठीण असतात. त्या एका दिवसांत शिकणें शक्य नाही. शिवाय त्यांनी आध्यात्मिक उन्नतीस विशेष कांही मदत होते अशांतलाहि भाग नाही. त्यांपैकी बऱ्याचशा क्रिया तुम्हांला डेलसर्ट प्रभृति व्यायामशिक्षकांच्या ग्रंथांत वर्णिलेल्या आढळतील. विभिन्न शारीरिक आसनें त्यांनीहि सांगितलीं आहेत. ह्या साऱ्यांचा उद्देश शारीरिक उन्नति असतो, मानसिक वा आध्यात्मिक उन्नति नव्हे. मानवी शरीरांत असा एकहि स्नायु नाही की ज्यावर हठयोगी पूर्ण ताबा प्रस्थापित करूं शकणार नाही. तो आपल्या इच्छेनुसार स्वतःच्या हृदयाची क्रिया बंद करूं शकतो आणि फिरून सुरू करूं शकतो. स्वतःच्या शरीराच्या कोणत्याहि भागावर तो याप्रमाणे ताबा चालवूं शकतो.

माणसाला दीर्घायुषी बनविणें हेंच हठयोगाचें कार्य होय. शरीर-प्रकृति अजीबात निकोप ठेवणें हेंच हठयोगाचें मुख्य ध्येय वा एकमेव उद्दिष्ट होय. कधीहि आजारी पडावयाचें नाही असा हठयोग्याचा दृढ-निश्चय असतो, आणि तो कधी आजारी पडतहि नाही. तो खूप जगतो. शंभर वर्षे वांचणें म्हणजे त्याला कांहीच नाही. दीडशे वर्षांचा असतांनाहि तो अगदी तरुण आणि ताजा असतो--त्याचा एकसुद्धा केस पिकलेला नसतो. पण इतकेंच. वडाचें झाड कधी कधी पांच हजार वर्षें टिकतें, पण तें वडाचें झाड तें वडाचें झाडच राहतें. माणूसहि त्याचप्रमाणे खूप खूप जगू शकेल, पण त्याचें फळ काय? एक निरोगी जनावर, एवढीच त्याची मातब्बरी. असो. या हठयोगाच्या एकदोन मामुली क्रिया फार उपयोगाच्या आहेत. उदाहरणार्थ, डोकें दुखत असल्यास, सकाळी निजून उठतांच नाकाने थंड पाणी प्याल्यास आराम वाटेल. दिवसभर तुमचा मेंदू छान थंड राहील, आणि पडशाचा तुम्हांला कधीच उपद्रव होणार नाही. नाकाने असें पाणी पिणें मुळीच कठीण नाही. तें अगदीं सोपें आहे. नाक पाण्यांत बुडवून नाकपुड्यांतून घशाने पंपासारखें पाणी ओढा. हळूहळू पाणी आपोआप आंत जाईल. अस्तु.

'आसन' जमल्यानंतर, कांही संप्रदायांच्या मतें राजयोगाच्या साधकाने 'नाडीशुद्धि' करावयाची असते. 'नाडीशुद्धि' ही राजयोगांत येत नाही असें म्हणून कित्येकजण ती नाकारतात. परंतु भाष्यकार शंकराचार्यांसारख्या एवढ्या मोठ्या अधिकारी व्यक्तीने ज्याअर्थी तिची आवश्यकता प्रतिपादिली आहे, त्याअर्थी तिचा उल्लेख करणें उचित होईल असें मला वाटतें. श्वेताश्वतर उपनिषदावरील त्यांच्या भाष्यांतूनच याविषयी त्यांनी दिलेल्या सूचना मी येथे उद्धृत करतों म्हणजे झालें. त्या अशा--"ज्या मनांतील मळ प्राणायामाने नाहीसा झाला आहे तेंच मन ब्रह्मांत स्थिर होतें. म्हणूनच शास्त्रांत प्राणायाम सांगितला आहे. आधी नाडीशुद्धि करावयास हवी, मगच प्राणायाम करण्याची पात्रता उत्पन्न होईल. आंगठ्याने उजवी नाकपुडी दाबून, डाव्या नाकपुडीने घेववेल तितकी हवा आंत घ्या. मग मुळीच न थांबतां डावी नाकपुडी बंद करून उजव्या नाकपुडीने ती हवा बाहेर सोडा. नंतर

याच्या उलट क्रिया करा. यथाशक्ति उजव्या नाकपुडीने वायु आंत घेऊन डाव्या नाकपुडीने तो बाहेर सोडा. प्रत्येक वेळीं तीनदा किंवा पांचदा याप्रमाणे दिवसांतून एकूण चारवेळ हें करावयास हवें. त्या चार वेळा म्हणजे सूर्योदयापूर्वी, मध्यान्हीं, सायंकाळीं आणि मध्यरात्रीं अशा होत. अशा रीतीने सतत पंधरा दिवस किंवा महिनाभर केल्यास नाडीशुद्धि होते. त्यानंतर प्राणायामाचा अधिकार प्राप्त होतो."

प्रत्यक्ष साधना करणें अत्यंत आवश्यक आहे. संतत साधना केल्याखेरीज कांहीहि लाभावयाचें नाही. रोज तासन् तास माझ्या-समोर बसून, मी बोलेन तें ऐकत गेलांत तरी, स्वतः प्रत्यक्ष साधना केली नाही तर पाऊलभरदेखील तुमची प्रगति होऊं शकणार नाही. प्रत्यक्ष साधनेवरच सारेंकांही अवलंबून आहे. प्रत्यक्ष अनुभव आल्या-खेरीज ह्या गोष्टी खरोखर समजणें कदापि शक्य नाही. आपण त्या प्रत्यक्ष पाहिल्या पाहिजेत, त्यांची आपल्याला प्रत्यक्ष अनुभूति झाली पाहिजे, प्रतीति आली पाहिजे. नुसतें भाष्य, विवरण, मतें ऐकून काय होणार ?

या साधनेच्या मार्गांत कांही विघ्नें आहेत. पैकी पहिलें विघ्न म्हणजे रोगट शरीर. शरीर जर ठीक नसेल तर साधनेंत अडथळा उत्पन्न होईल. म्हणून आपण आपलें शरीर चांगलें निकोप, सुदृढ ठेवावयास हवें. त्यासाठी आपण आपलें खाणेंपिणें, आपलें वागणें-राहणें वगैरे-विषयी खूप चोखंदळ असलें पाहिजे. या देशांत (अमेरिकेंत) ज्याला 'ख्रिश्चन सायन्स' म्हणतात त्या पद्धतीप्रमाणे नेहमी मनाशीं म्हणावें की माझें शरीर सुदृढ राहो. बस, इतकेंच. शरीरासाठी आणखी अधिक कांही करण्याची आवश्यकता नाही. सुदृढ शरीर हें आपल्या उद्देश-पूर्तीचें केवळ एक साधन आहे, ह्याचा आपल्याला विसर न पडो. सुदृढ शरीर हाच जर आपला उद्देश असता तर आपण पशुतुल्यच झालों असतों. पशु क्वचितच आजारी पडतात.

दुसरें विघ्न म्हणजे संदेह. ज्या गोष्टी आपल्याला दिसत नाहीत त्या गोष्टींविषयी आपल्याला नेहमी संदेह वाटत असतो. कितीहि आटापिटा केला तरी माणूस निव्वळ कुणाच्या सांगण्यावर विश्वास ठेवून जगूं शकत नाही. म्हणून, ह्या योगशास्त्रांत सांगितलेल्या गोष्टी खऱ्या

आहेत की नाहीत असा संदेह आपल्याला येणें अगदी स्वाभाविक आहे. अगदी भल्या, अगदी उत्तम व्यक्तींनाहि हा संदेह कधी ना कधी घेरल्याखेरीज सोडीत नाही, मग इतरांची काय कथा. परंतु नेटाने साधना केल्यास थोड्याच दिवसांत आपल्याला निदान कवडसा तरी दिसेल. साधनामार्गांत धीर आणि आशा द्यायला तेवढाच पुरे आहे. या योग-शास्त्रांवरील एका टीकाकाराने म्हटलें आहे, "योगशास्त्राच्या सत्यते-संबंधी अगदी लहानसें का होईना पण एखादें जरी प्रमाण आपल्याला गवसलें तरी तेवढ्यानेहि आपला समस्त योगशास्त्रावर ठाम विश्वास बसूं शकेल." उदाहरणार्थ, कांही महिने साधना केल्यानंतर आपल्याला दुसऱ्यांचे विचार कळूं शकतात असें तुम्हांला आढळून येईल, चित्रां-सारखे ते तुम्हांला दिसूं लागतील. किंवा समजा की दूर कुठेतरी कांही बोलणें चाललें आहे. तुमची इच्छा असल्यास, मन एकाग्र करतांच, आहांत तेथूनच तो लांबचा संवाद तुम्ही ऐकूं शकाल. प्रथमप्रथम अर्थातच ह्या गोष्टी कधीमधी, अगदी ओझरत्या ओझरत्या घडतील. पण तेवढ्याहि तुम्हांला विश्वास, बळ आणि आशा द्यावयास पुऱ्या आहेत. नासिका-ग्रावर चित्त एकाग्र केल्यास थोड्याच दिवसांत तुम्हांला अत्यंत मधुर सुगंध येऊं लागेल. यावरून, आपलें मन कधीकधी प्रत्यक्ष वस्तूच्या संबंधांत न येतांसुद्धा त्याला तिचा अनुभव येऊं शकतो याविषयी तुमची खात्री पटेल. तथापि, आपण हें नेहमी लक्षांत ठेवावयास हवें की ह्या सर्व चमत्कारांना वा सिद्धाईंना स्वतःची अशी कांही किंमत नाही, आपल्या खऱ्या उद्देश्याच्या प्राप्तीला ते किंचित् साहाय्यक आहेत, इतकीच फक्त त्यांची किंमत. आपण कदापि विसरतां कामा नये की, ह्या सर्व साधनांचें एकमेव लक्ष्य, त्यांचा एकमेव उद्देश आहे—आत्म्याची मुक्ति. प्रकृतीला संपूर्णपणें अधीन करून घेणें, तिला संपूर्णपणें वशीभूत करून घेणेंच आपलें एकमेव लक्ष्य होय, अन्य कांहीहि आमचें लक्ष्य होणें शक्य नाही. मामुली चमत्कारांवर वा सिद्धाईवर संतुष्ट राहून चालणार नाही. आपण प्रकृतीचे स्वामी झालों पाहिजे, आपण प्रकृतीचे दास कदापि होतां कामा नये. शरीराने म्हणा की मनाने म्हणा, कशानेहि आपल्यावर प्रभुत्व गाजवावयास नको. 'शरीर माझें आहे' 'मी शरीराचा नाहीं' हें आपण कदापि विसरतां कामा नये.

एकदा एक देव आणि एक असुर एका महापुरुषाजवळ आत्म-विद्या शिकावयास गेले. त्या महापुरुषाजवळ बरेच दिवस राहून त्या दोघांनी आत्मविद्येचें अध्ययन केलें. अखेर त्या महापुरुषाने त्यांना सांगितलें की ज्याचें तुम्ही अन्वेषण करीत आहांत तो आत्मा तुम्हीच आहांत. तें ऐकून त्या दोघांचीहि धारणा झाली की आपला हा देहच आत्मा होय. याप्रमाणे आपलें उद्दिष्ट सिद्ध झालें आहे अशा समाधानांत ते आपापल्या स्थानीं परत गेले आणि आपापल्या लोकांना म्हणाले की, "लोकहो, जें काय शिकावयाचें होतें तें आम्ही शिकलों. तर मग आता या, आपण आता खाऊं, पिऊं, मजा करूं; कारण आपण आत्मा आहों; यापलीकडे जाणण्यासारखें आणखी कांही नाही." तो असुर स्वभावतःच अज्ञानग्रस्त होता, त्यामुळे त्याला या बाबतींत आणखी कांहीच शंका आली नाही. हा देह म्हणजेच आत्मा अशी त्याची पक्की धारणा झाली होती. त्यामुळे आपण ईश्वर आहों या कल्पनेने तो अगदी संतुष्ट राहिला. परंतु तो देव त्या मानाने पवित्र होता. 'मी म्हणजे हा देह, आणि तोच ब्रह्म आहे, म्हणून तो सबळ व निरोगी राखणें, त्याला कपड्यालत्त्यांनी भूषविणें, आणि त्याच्या सर्व भोगस्पृहा तृप्त करणें यांतच जीवनाची इतिकर्तव्यता आहे' असें समजण्याची चूक अर्थातच प्रथम त्यानेहि केली होती. परंतु, कांही थोड्या दिवसांनंतरच त्याला उमजलें की 'हा देहच आत्मा आहे' असा आपल्या गुरुदेवांच्या उपदेशाचा अर्थ असणें शक्य नाही, आत्मा हा देहापलीकडील कांहीतरी उच्च तत्त्व असला पाहिजे, या देहापेक्षा कांहीतरी श्रेष्ठ अशी वस्तु असला पाहिजे. अशा मनःस्थितींत तो आपल्या गुरूकडे परत गेला आणि त्यांना म्हणाला, "गुरुदेव, माझा हा देह आत्मा होय असा का तुमच्या म्हणण्याचा अर्थ होता ? पण तें शक्य नाही. देह तर विनाशी आहे, सर्व देह नष्ट होतात. पण आत्मा तर अविनाशी आहे. आत्मा मरणें किंवा नाहीसा होणें शक्य नाही." त्यावर गुरुदेव त्याला म्हणाले, "तूं स्वतःच नीट विचार करून काय तें ठरव, पण एवढें मात्र खरें की तूंच तो आहेस." त्यावर त्या शिष्याच्या मनांत विचार आला की, आपल्या शरीरांत जो प्राण कार्य करीत आहे, त्याला उपलक्षूनच बहुधा गुरुदेवांनी हा उपदेश दिला

असावा. परंतु लवकरच त्याच्या ध्यानांत आलें की अन्न खाल्ल्याने हा प्राण सबळ होतो आणि उपास केल्याने दुर्बळ होऊन जातो. मग फिरून आपल्या गुरूकडे जाऊन तो त्यांना म्हणाला, "महाराज, आपण काय प्राणालाच आत्मा म्हणालां होता ?" गुरूने उत्तर दिलें, "तूं स्वतःच नीट विचार करून काय तें ठरव. पण एवढें मात्र खरें की तूंच तो आहेस." तो सत्यान्वेषी शिष्य फिरून स्वस्थानीं परत गेला. आता त्याला वाटूं लागलें की बहुधा मनच आत्मा असावें. परंतु थोड्याच वेळांत त्याला आढळून आलें की, मनांत नाना प्रकारचे विचार येत असतात. त्यांत घटकेंत चांगले विचार येतात, घटकेंत वाईट, तेव्हा हें इतकें बदलतें मन आपला आत्मा असणें कदापि शक्य नाही. फिरून गुरूकडे जाऊन तो त्यांना म्हणाला, "महाराज, मन आत्मा असेल असें मला वाटत नाही. आपण मनालाच आत्मा म्हणालां होतां काय ?" गुरुदेवांनी उत्तर दिलें, "नाही, तूंच काय तें ठरव. पण तूंच तो आहेस." त्यावर तो देव फिरून स्वस्थानीं परत गेला. या वेळीं मात्र त्याला खरें ज्ञान झालें. त्याला कळून आलें की, सर्व विचारांच्या वा मनोवृत्तींच्या पलीकडे असलेला आत्मा आपण आहोंत. त्याला कळून आलें की हा आत्मा एक असून त्याला जन्म नाही की मृत्यु नाही, त्याला शस्त्र छेदूं शकत नाही, अग्नि जाळूं शकत नाही, वायु सुकवूं शकत नाही, पाणी विरघळवूं शकत नाही. तो अनादि, अनंत आहे. तो अचल, सूक्ष्म, अस्पर्श, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान पुरुष आहे. तो शरीरहि नाही, मनहि नाही, तो त्या दोहोंच्या—साऱ्याच्या—अतीत आहे. याप्रमाणे त्या देवाच्या अंतःकरणांत यथार्थ ज्ञानोदय झाला. त्याला खरें आत्मज्ञान झालें. तज्जनित आनंदाने तो तृप्त झाला, कृतार्थ होऊन गेला. त्या बिचाऱ्या असुराला मात्र सत्य लाभूं शकलें नाही. कारण त्या असुराची देहावर अत्यंत आसक्ति होती. देह त्याला अतोनात प्रिय होता.

आपल्या या जगांत असे असुरस्वभावाचे लोक अनेक आहेत. परंतु म्हणून जगांत देव अजीबात नाहीत असें मात्र नव्हे. जिने माणसाची इंद्रियोपभोगाची शक्ति वाढेल अशी विद्या जर कुणी शिकवूं निघेल तर हजारो लोक त्याच्या मागे लागतील. पण तेंच जर कुणी

मानवजीवनांतील परम पुरुषार्थ काय हें सांगूं जाईल तर मूठभर लोकहि त्याच्याकडे वळणार नाहीत. उच्च तत्त्वें नुसतीं आकलन करण्याचीहि शक्ति फारच थोडयांमधे असते, मग चिकाटीने तीं तत्त्वें प्रत्यक्ष आत्मसात् करून घेण्याविषयी तर बोलावयासच नको. सत्याच्या प्रत्यक्ष लाभासाठी यत्न करणाऱ्या लोकांची संख्या फारच थोडी असते. तथापि आपल्या ह्याच जगांत असेहि कांही लोक असतात की, हें शरीर जरी हजार वर्षें टिकवितां आलें तरी त्याचा शेवट एकच आहे हें ते पक्के जाणून असतात. ज्या सर्व शक्तींमुळे हा देह तगून आहे, त्या लोपतांच ह्या देहाचें पतन अनिवार्य असतें. आपल्या शरीरांत पडत असलेले बदल एक क्षणभरदेखील कुणी थांबवूं शकणार नाही. 'शरीर' म्हणजेच मुळी सतत परिवर्तन होणाऱ्या परमाणूंची रास. नदीच्या उदाहरणाने ही गोष्ट स्पष्ट होईल. तुमच्या समोरून नदी वाहत जाते. तुमच्या डोळयांदेखत क्षणभरांत समोरील पाणी निघून जातें आणि तिथे नवें पाणी येतें. हें आलेलें पाणी अगदी नवें असतें खरें, पण दिसायला अगदी गेलेल्या पाण्यासारखें असतें. आपल्या शरीरांचेंहि असेंच आहे. तरीपण, शरीर याप्रमाणे परिवर्तनशील असलें तरीदेखील त्याची काळजी घेऊन तें निरोगी आणि सुदृढ ठेवावयासच हवें. एरवी आपण धर्मसाधना करूं शकणार नाहीं. धर्मसाधनेचें तें सर्वांत श्रेष्ठ उपकरण होय.

सृष्टींतील समस्त शरीरांमध्ये मनुष्यशरीरच सर्वांत श्रेष्ठ शरीर होय. मनुष्यप्राणी हा विश्वांतील सर्व प्राण्यांतील श्रेष्ठ प्राणी होय. मनुष्य सर्वश्रेष्ठ जीव होय. माणूस सर्व प्राण्यांपेक्षा श्रेष्ठ आहे, सर्व देवदेवतांपेक्षा श्रेष्ठ आहे; माणसापेक्षा श्रेष्ठ कोणीच नाही. मुक्ति मिळविण्यासाठी देव-देवतांनाहि फिरून इहलोकीं जन्मून मनुष्यशरीरच धारण करावें लागतें. मुक्तीचा अधिकारी फक्त माणूसच, देवतांनादेखील तो अधिकार नाही. यहुदी आणि मुसलमान धर्मांत अशी कथा आहे की ईश्वराने सृष्टि निर्माण करतांना, देव-देवता इत्यादि सारेंकांही निर्मिल्यानंतर मनुष्य निर्माण केला, आणि माणूस तयार झाल्यावर त्याने देव-देवतांना आज्ञा केली की 'जा, माणसाला वंदन करा, त्याचें अभिनंदन करा.' ईश्वराच्या आज्ञेनुसार सर्व देव-देवतांनी तसें केलें. केलें नाही फक्त एका इब्लिसने. आणि म्हणून ईश्वराने इब्लिसला शाप

दिला. त्या शापाने इब्लिसचा सैतान झाला. या पौराणिक कथेमध्ये एक महान् सत्य दडलेलें आहे. तें सत्य हेंच की हा मनुष्यजन्मच सगळ्या जन्मांमधे श्रेष्ठ जन्म होय. पशुप्रभृति हीन योनि ह्या जडयोनि होत, मुख्यतः तमोगुणांतूनच त्यांची उत्पत्ति. पशूंना कसलेहि उच्च विचार करतां येणें शक्य नाही. देवांनाहि मनुष्यजन्म घेतल्याखेरीज आहे त्या अवस्थेंतच मुक्ति लाभणें शक्य नाही. मनुष्यसमाजांतहि अत्यंत श्रीमंती आणि अत्यंत गरीबी हे दोन्ही, माणसाच्या आत्मोन्नतीच्या मार्गांतील मोठे अडथळे होत. अत्यंत श्रीमंत आणि अत्यंत गरीब यांच्या मधल्या वर्गांतूनच जगांतील थोर पुरुष निपजत असतात. हा मधला वर्ग सम-तोल असतो. त्यांत विरोधी शक्तींचा छान मेळ बसलेला असतो.

असो तर आता आपण आपल्या मूळ विवेचनाकडे वळूं या. आपण प्राणायामासंबंधी--श्वासोच्छ्वासाच्या नियमनासंबंधी--बोलत होतों. येथे कुणी विचारील की, मनाला एकाग्र करण्याशीं वा चित्त-वृत्ति-निरोधाशीं या प्राणायामाचा वा श्वासोच्छ्वासाच्या नियमनाचा काय संबंध आहे ? त्याला उत्तर असें की, श्वासोच्छ्वास हें आपल्या ह्या देहरूपी यंत्रांतील गतीचें नियमन करणारें मूल यंत्र (fly-wheel) होय. एखाद्या मोठ्या इंजिनावर दृष्टि टाकल्यास तुम्हांला आढळून येईल की एक मोठें चाक फिरत आहे, आणि त्याच चाकाची गति सूक्ष्म सूक्ष्मतर यंत्रांमध्ये संक्रमित होत आहे, आणि अशा रीतीने त्या यंत्रां-मधील अगदी सूक्ष्मांतील सूक्ष्म आणि नाजुकांतील नाजुक भागहि गतिमान होत आहेत. श्वासोच्छ्वास हा आमच्या शरीरयंत्रांतील गति-नियामक चक्र (fly-wheel) होय. तोच आमच्या शरीरांत कुठेहि ज्या प्रकारच्या शक्तीची गरज असते ती शक्ति पुरवीत असतो आणि तिला नियंत्रित करीत असतो.

एका राजाचा एक मंत्री होता. एकदा कांही कारणाने त्या मंत्र्यावर राजाची इतराजी झाल्यामुळे राजाने त्या मंत्र्याला एका खूप उंच मनोऱ्याच्या शेंड्यांत कोंडून ठेवण्याची शिक्षा फर्मावली. राजाची आज्ञा पाळली गेली; तो मंत्री त्या ठिकाणीं मरणाची वाट बघत दिवस कंठूं लागला. त्या मंत्र्याची पत्नी अत्यंत पतिनिष्ठ आणि विश्वासू होती. संधि साधून ती एके रात्रीं त्या मनोऱ्याजवळ आली, आणि तिथे

अगदी वरच्या भागांत डांबलेल्या आपल्या पतीला खुणावून, 'तुमच्या सुटकेसाठी मी काय करूं' असें तिने विचारलें. त्यावर तो तिला म्हणाला की "तूं उद्या रात्रीं पुन्हा इथे ये. आणि येतांना बरोबर एक लांब दोरखंड, थोडी पक्की दोरी, सुताचा एक रीळ, थोडें रेशीम, एक नाकतोडा आणि थोडासा मध घेऊन ये." तें ऐकून त्याच्या वायकोला मोठा विस्मय वाटला. असो, त्याच्या सांगण्याप्रमाणे ती पतिव्रता त्या सर्व जिनसा घेऊन दुसऱ्या दिवशीं रात्र झाल्यावर तिथे जाऊन हजर झाली. सांगितलेल्या सर्व वस्तु घेऊन आलेल्या आपल्या पत्नीला पाहतांच तो मंत्री तिला म्हणाला--"आता एक काम कर. तुझ्याजवळचें तें रेशीम त्या नाकतोड्याच्या कमरेला छान पक्कें बांध. मग त्याच्या शिंगा-सारख्या दोन्ही केसांच्या टोकाला थोडा मध लाव, आणि त्याचें तोंड वर करून त्याला ह्या मनोऱ्याच्या भिंतीवर सोडून दे." नवऱ्याच्या सांगण्या-प्रमाणे त्या विश्वासू पत्नीने सारेंकांही केलें. त्या नाकतोड्याने आपल्या दीर्घ प्रवासाला सुरवात केली. समोर कुठेतरी मध आहे असा सुगावा लागल्या-सारखें वाटून, त्या काल्पनिक मधाच्या लोभाने तो नाकतोडा हळूहळू पुढेपुढे सरकूं लागला. असें करतां करतां तो त्या मनोऱ्याच्या टोकाला पोहोचतांच त्या मंत्र्याने त्याला पकडलें. अशा रीतीने त्या रेशमाचें एक टोक मंत्र्याच्या हातीं आलें. मग त्याने आपल्या वायकोला सांगितलें की, "या रेशमाच्या तुझ्याकडील खालच्या टोकाला तूं आणलेल्या रिळावरील सूत बांध." मग तें रेशीम वर ओढून त्या सुताचें एक टोक हातीं येतांच त्याने त्याच युक्तीने पक्की दोरी, आणि अखेर तो दणकट दोरखंड हस्तगत केला. आता तेथून निसटणें फार सोपें होतें. त्या दोर-खंडाच्या साहाय्याने तो मंत्री त्या मनोऱ्यावरून खाली उतरला आणि राजाच्या हातीं पडणार नाही अशा ठिकाणीं पळून गेला. अशा रीतीने त्याने आपली सुटका करून घेतली. आपल्या देहांतील श्वासोच्छ्वासाची गति म्हणजे जणु त्या 'रेशमा'सारखी आहे. तिच्यावर ताबा मिळवून तिचा संयम साधूं शकल्यास 'ज्ञानतंतूंमधील शक्ति-प्रवाह' (nerve currents) रूपी 'सूत' आपल्या हातीं आल्यासारखें होईल. त्यानंतर मग आपल्या मनोवृत्तिरूपी 'पक्की दोरी' व अखेर प्राणरूपी 'दोरखंड' आपल्या ताब्यांत येऊं शकेल, आणि याप्रमाणे प्राणाचा संयम साधून

आपण मुक्त होऊं शकूं.

आपण आपल्या देहाबद्दल खरोखरच अत्यंत अज्ञ आहोंत, आणि त्याबद्दल आपल्याला कांही कळूं शकेल असेंहि आपल्याला वाटत नाही. फार झालें तर एखादा मृत देह घेऊन, त्याची चिरफाड करून त्याच्या आंत काय आहे हें आपण पाहूं शकतों. कांही असेहि हरीचे लाल असतात की ते एखादा जिवंत प्राणी पकडतात, त्याला जिवंत फाडतात आणि त्याच्या आंत काय आहे काय नाही हें बघत बसतात. पण यानेहि आपल्या स्वतःच्या देहाबावत आपल्याला खरोखर काय कळलें? आपला स्वतःचा देह वेगळा तो वेगळाच राहिला, या साऱ्याचा त्याच्याशीं कांहीहि संबंध नाही. स्वतःच्या देहासंबंधी आपल्याला फारच थोडें अवगत असतें. असें कां बरें असावें? ह्याचें कारण असें की, आपण आपलें मन इतकें एकाग्र करूं शकत नाही की जेणेंकरून आपण आपल्या शरीरामधे चालूं असलेल्या अगदी सूक्ष्म सूक्ष्म गति जाणूं शकूं. मन जेव्हा बाह्य विपयांचा परित्याग करून देहाच्या अगदी आंत प्रवेश करतें, जेव्हा तें अत्यंत सूक्ष्म होऊन जातें, तेव्हाच आपल्याला ह्या गति जाणवूं शकतात. अशा तऱ्हेची सूक्ष्मानुभूति प्राप्त करून घेण्यासाठी आपल्याला प्रथम स्थूलापासून प्रारंभ केला पाहिजे. असो तर, हें आपलें संपूर्ण शरीरयंत्र कशावर चालत आहे हें बघूं गेल्यास आपल्याला आढळून येईल की प्राणच हें यंत्र चालवीत आहे. श्वासोच्छ्वास हा त्या प्राणाचा अगदी दृश्य आविष्कार होय. या श्वासोच्छ्वासाच्या आश्रयाने आपण हळूहळू शरीराच्या आंत प्रवेश करावयास हवा. तसें करूं शकल्यास आपण तिथे विद्यमान असलेल्या सूक्ष्मातिसूक्ष्म शक्तींसंबंधी जाणूं शकूं—ज्ञानतंतुगत शक्तिप्रवाह (nerve currents) शरीरभर सर्वत्र कसे संचार करीत आहेत हें आपण जाणूं शकूं. आणि त्यांचा असा प्रत्यय येतांच, ते असे जाणवतांच आपला त्यांच्यावर व त्याबरोबरच शरीरावरहि, ताबा बसूं लागेल. मनहि ह्याच साऱ्या ज्ञानतंतुगत शक्तिप्रवाहांद्वाराच संचालित होत असतें. म्हणून त्यांच्यावर जय मिळविल्याने, अखेर शरीर आणि मन हीं दोन्हीं आपल्या आधीन होऊन जातील—तीं आपले दास होऊन जातील. ज्ञान ही शक्ति आहे. ही शक्ति आपल्याला मिळवावयाची आहे. ती मिळविणें

ह्याच आपला उद्देश आहे. त्यासाठी आपल्याला मुळापासून, म्हणजेच प्राणायामापासून आरंभ करावयास हवा. प्राणायाम हा फार विशाल विषय आहे, त्याचें संपूर्ण, सांगोपांग विवेचन करावयाचें म्हणजे बरेच दिवस लागतील. आपण क्रमशः त्याचें एकेक अंग घेऊन आलोचन करूं या.

प्राणायाम करतांना करावयाच्या प्रत्येक क्रियेचा हेतु काय आणि त्या त्या क्रियेमुळे देहाच्या आंत कोणत्या शक्ति खेळूं लागतात हें आपण हळूहळू पाहूंच. हळूहळू हें सर्व आपल्याला कळूं लागेल. पण त्यासाठी सतत साधनेची आवश्यकता आहे. ह्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत ह्याचें प्रमाण साधनेद्वाराच आपल्याला लाभेल. तर्कबुद्धीच्या साहाय्याने मीं तुम्हांला ह्या गोष्टी कितीहि पटवून दिल्यात तरी तुमची खात्री पटणें शक्य नाही. तुम्हांला त्यांचा प्रत्यक्ष अनुभव आल्यानेच खरोखर तुमची खात्री पटेल, एरवी नाही. स्वतःच्या शरीराच्या आंत-मधील हे शक्तिप्रवाह जेव्हा तुम्हांला जाणवतील, तुमच्या स्पष्टपणें अनुभवाला येतील तेव्हाच तुमचे सारे संशय नाहीसे होतील. पण त्यासाठी रोज प्रबळ साधना करावी लागेल. रोज निदान दोनदा तरी साधना-भ्यास करावयास हवा. आणि त्यासाठी सर्वांत चांगल्या वेळा म्हणजे पहाट आणि तिन्हीसांजा ह्या होत. रात्र सरून दिवस उगवत असतांना आणि दिवस मावळून रात्र पडत असतांना सर्वत्र एक प्रकारची शांतता पसरत असते. मोठ्या पहाटेस आणि तिन्हीसांजा होत असतांना मन स्थिर होण्यास अनुकूल असें वातावरण निर्माण होत असतें. केवळ मनच नव्हे तर शरीरहि या दोन वेळीं आपोआपच कांहींसें शांत आणि स्थिर होऊं लागत असतें. या स्वाभाविक अवस्थेचा फायदा घेऊन आपण त्या दोन वेळीं साधनाभ्यास करावयास हवा. दैनिक साधना आटोपल्या-खेरीज जेवावयाचें नाही असा नियम करा. अशाने तुमची भूकच तुमच्या आळसावर मात करून तुम्हांला साधना करावयास भाग पाडील. स्नान-संध्यादि आन्हिक वा दैनिक साधना उरकल्याखेरीज कदापि भोजन करावयाचें नाही असें भारतांतील मुलांना वळण लावण्यांत येत असतें. हळूहळू तें त्यांच्या अगदी आंगवळणीं पडून जातें. इतकें की, स्नान-संध्या-पूजादि आटोपल्याखेरीज त्यांना भूकच लागावयाची नाही.

तुमच्यापैकी ज्यांना ऐपत आहे त्यांनी स्वतःच्या केवळ साधनाभ्यासासाठीच म्हणून एक स्वतंत्र खोली वेगळी ठेवणें चांगलें. त्या खोलींत निजणें-बसणें करूं नका, ती सर्वथा अगदी पवित्र राखावयास हवी. स्नान केल्याखेरीज पारोशानेच त्या खोलींत कदापि जाऊं नका, नेहमी शरीराने आणि मनाने अगदी स्वच्छ होऊनच तींत प्रवेश करीत जा. फुलें आणि मनाला आनंदवितील अशीं चित्रें तिथे नेहमी असूं द्या; योग्याला असलें वातावरण फार उपकारक असतें. सकाळ-संध्याकाळीं तिथे उदबत्ती, धूप वगैरे जाळीत जा. भांडणें, रागवारागवी, अपवित्र विचार तिथे होणार नाहीत अशी खबरदारी घ्या. तुमच्या विचारांशीं ज्यांचे विचार जुळतात अशांनाच फक्त त्या खोलींत प्रवेशूं द्या. बघाल की हळूहळू त्या खोलींत कसा एक पवित्र, सात्त्विक भाव दरवळूं लागेल. आणि अखेर अशी वेळ येईल की तुम्ही कशाने दुःखी, कष्टी झालां असतां, संशय तुम्हांला पछाडूं पाहत असतां वा तुमचें मन विक्षुब्ध झालें असतां नुसतें त्या खोलींत जाऊन बसण्यानेच तुम्ही शांत होऊन जाल. चर्च, मंदिरें वगैरेंमागे हाच उद्देश होता. अजूनहि कित्येक चर्चमधे आणि मंदिरांमधे तुम्हांला असलें वातावरण आढळून येईल, परंतु बहुतांश ठिकाणीं ह्या उद्देशाचा सपशेल विसरच पडल्याचें आढळून येतें. चर्च किंवा मंदिर बांधण्यामागे हीच कल्पना आहे की सतत पवित्र भाव-भावना स्पंदत राहिल्याने तें स्थान पावन ज्योतीने भरून सदा जागृत राहतें. असो. ज्यांना साधनाभ्यासासाठी अशी वेगळी खोली असणें जमण्यासारखें नाही त्यांनी स्वतःच्या इच्छेनुसार आणि सोयीनुसार कुठेहि बसून साधनाभ्यास करावा. शरीर सरळ ठेवून ताठ बसा. आणि मग साधनाभ्यासास सुरवात करण्यापूर्वी अगदी पहिल्याप्रथम करावयाची गोष्ट म्हणजे ही की, साऱ्या जगाचें मंगल चिंतून जगांत एका पवित्र विचाराचा प्रवाह तुम्ही सोडा. मनांतल्या मनांत वारंवार म्हणा—"जगांतील सर्वजण सुखी होवोत; सर्वांना शांति लाभो; आनंद लाभो." याप्रमाणे पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण सर्व दिशांना असल्या पवित्र विचारांचा प्रवाह वाहवून द्या. हें तुम्ही जितकें कराल, तितकें तुम्हांला स्वतःला बरें वाटूं लागेल. अखेर तुम्हांला आढळून येईल की इतर सारेजण निरामय होवोत ही भावनाच स्वतः निरामय

होण्याचा सगळ्यांत सोपा उपाय होय; इतर सर्वजण सुखी होवोत ही इच्छाच स्वत: आपण सुखी होण्याचा सर्वांत सुलभ उपाय होय. असो तर, हें आटोपल्यानंतर मग ज्यांचा ईश्वरावर विश्वास असेल त्यांनी ईश्वराजवळ प्रार्थना करावी—पैशासाठी, शरीरस्वास्थ्यासाठी किंवा स्वर्गासाठी नव्हे, तर ज्ञान लाभावें म्हणून, हृदयांत सत्य आविर्भूत व्हावें म्हणून, जीवन सत्याच्या प्रकाशाने उजळून निघावें म्हणून. इतर कशासाठीहि प्रार्थना करणें म्हणजे शुद्ध स्वार्थीपणा होय. त्यानंतर मग असें चिंतन करा की माझा देह वज्रासारखा दृढ आहे, सबल आहे, निरोगी आहे. हा देहच आपल्या मुक्तिलाभाचें सर्वश्रेष्ठ उपकरण होय. तो वज्रासारखा दृढ आहे असें चिंतन करा. मनांतल्या मनांत असें चिंतन करा की या शरीराच्या साहाय्याने मी हा जीवनसमुद्र उल्लंघून जाईन. दुर्बलाला कधीच मुक्तिलाभ व्हावयाचा नाही. सारी दुर्बलता अजीबात दूर सारा. आपल्या देहाला म्हणा की तूं अत्यंत बलवान आहेस. आपल्या मनाला सांगा की तूं अनंतशक्तिशाली आहेस. स्वत:विषयी अपरंपार विश्वास आणि आशा बाळगा

---

## प्रकरण तिसरें

## प्राण

लोक साधारणपणें समजतात की 'प्राणायाम' म्हणजे श्वासोच्छ्वासासंबंधी कांहीतरी—श्वासोच्छ्वासाची कांही विशिष्ट क्रिया. पण वस्तुस्थिति तशी नाही; लोकांची प्राणायामासंबंधीची ही समजूत चुकीची आहे. श्वासोच्छ्वासाशीं प्राणायामाचा संबंध असला तरी तो खरोखर अगदीच थोडा आहे. खराखरा प्राणायाम साधण्यासाठी ज्या अनेक क्रिया कराव्या लागतात त्यांपैकी श्वासोच्छ्वासाचें नियमन ही केवळ एक क्रिया आहे, इतकेंच. प्राणायाम म्हणजे प्राणाचा संयम. भारतीय तत्त्वज्ञांच्या मतें हें समस्त विश्व दोन पदार्थांनी निर्मिलें गेलें आहे. त्या दोन पदार्थांपैकी एकाला ते 'आकाश' म्हणतात. हें आकाश म्हणजे सर्वव्यापी, सर्वत्र अनुस्यूत असलेली अशी सत्ता आहे. ज्या वस्तूला आकार आहे, जी वस्तु इतर कित्येक वस्तूंच्या संमिश्रणाने

उत्पन्न झालेली आहे, ती प्रत्येक वस्तु या आकाशापासून उत्पन्न झालेली असते. हें आकाशच वायुरूप बनत असतें, हें आकाशच द्रव पदार्थ बनत असतें, हें आकाशच परत घन पदार्थ बनत असतें; हें आकाशच पृथ्वी, चंद्र, सूर्य, तारे, धूमकेतु इत्यादि बनत असतें. मनुष्यशरीर, पशुशरीर, वनस्पति, सारेंकांही ह्या आकाशाचेंच बनलेलें असतें. जें कांही आपण पाहतों, ज्या कशाचा आपल्याला इंद्रियांद्वारा अनुभव येऊं शकतो, ह्या विश्वांत जी जी वस्तु अस्तित्वांत आहे, ती ती या आकाशापासूनच निर्माण झालेली आहे. ह्या आकाशतत्त्वाला आपण इंद्रियांद्वारा जाणूं शकत नाहीं; तें इतकें सूक्ष्म आहे की तें साधारण अनुभूतीच्या अगदी पलीकडे आहे. स्थूल होऊन तें ज्या वेळीं आकार धारण करतें त्याच वेळीं तें आपल्या अनुभवास येऊं शकतें. सृष्टीच्या प्रारंभीं केवळ हें आकाशच असतें. कल्पाच्या अंतीं सारे वायुरूप, द्रव आणि घन पदार्थ वितळून त्या आकाशांत विलीन होतात. पुढील कल्पांत सृष्टि फिरून याच आकाशापासून उत्पन्न होते.

कोणत्या शक्तीच्या प्रभावाने हें 'आकाश' या विश्वाच्या रूपांत परिणत होत असतें? ह्याच 'प्राणा'च्या शक्तीने. ज्याप्रमाणे 'आकाश' ह्या विश्वाचा कारणभूत, अनंत, सर्वव्यापी मूल पदार्थ आहे, त्याच-प्रमाणे 'प्राण' ही ह्या विश्वाचा विकास करणारी अनंत, सर्वव्यापी, कारणभूत शक्ति होय. कल्पाच्या प्रारंभीं आणि अखेर सारेंकांही आकाशांत विलीन होऊन जातें. आणि विश्वांत जेवढ्या म्हणून शक्ति आहेत त्या सर्व प्राणांत लय पावतात; पुढील कल्पांत समस्त शक्ति या प्राणांतूनच विकसित होतात. हा प्राणच गतीच्या रूपाने व्यक्त होत आहे; प्राणच गुरुत्वाकर्षणाच्या, चुंबकत्वाच्या रूपांनी व्यक्त होत आहे. हा प्राणच शारीरिक क्रियांच्या रूपांनी, ज्ञानतंतूंतील शक्ति-प्रवाहांच्या रूपांनी व विचाररूपी शक्तीच्या रूपाने व्यक्त होत आहे. विचारापासून तों अगदी मामुली शारीरिक क्रियांपर्यंत सर्वत्र आढळणारी शक्ति म्हणजे ह्या प्राणाचींच निरनिराळीं रूपें होत. बाह्य व अंतर्जगां-तील सर्व शक्ति ज्या वेळीं आपल्या मूल अवस्थेप्रत जातात त्या वेळीं त्यांच्या त्या अवस्थेलाच प्राण म्हणतात. "ज्या वेळीं अस्ति किंवा नास्ति कांहीहि नव्हतें, ज्या वेळीं तमाद्वारा तम आच्छादित होता, त्या

वेळीं काय होतें? गतिशून्य अवस्थेंत हें आकाशच त्या वेळीं अस्तित्वांत होतें." प्राणाची त्या वेळीं कोणत्याहि प्रकारची अभिव्यक्ति नव्हती खरी, पण तरीहि तो तेव्हाहि विद्यमान होताच. ह्या विश्वांत ज्या सर्व शक्ति अभिव्यक्त झालेल्या आहेत त्या कल्पान्तीं शांत होऊन अव्यक्त स्वरूप धारण करतात. पुढील कल्पाच्या प्रारंभीं त्या फिरून व्यक्त होऊन आकाशावर कार्य करूं लागतात, आणि त्या आकाशापासून ह्या नाना आकाराच्या समस्त वस्तु निर्माण होतात. जसजशीं ह्या आकाशांत परिवर्तनें होतात, तसतसा हा प्राणहि नाना शक्तींच्या रूपांत विकसित होत जातो. ह्या प्राणाचें खरें स्वरूप जाणून घेणें आणि त्याचा संयम साधण्याचा यत्न करणें हाच खरा प्राणायाम होय. प्राणायामाचा खरा अर्थ हा आहे.

हा प्राणायाम ज्याला साध्य झाला आहे त्याला जणु अनंत शक्तीचें द्वार खुलें होऊन जातें. कल्पना करा, असा एक माणूस आहे की ज्याला ह्या प्राणाचें स्वरूप पूर्णपणें कळलें आहे आणि त्यानें त्याच्यावर जय मिळविला आहे. जगांत मग अशी कोणती शक्ति आहे की जिच्यावर त्याचा ताबा चालणार नाही ? तो चंद्र-सूर्यांना आपापल्या जागा बदलावयास लावूं शकेल, लहानशा परमाणूपासून तों प्रचंड सूर्यापर्यंत ह्या विश्वांतील सारेंकांही त्याला वशीभूत होऊन जाईल, कारण त्याने प्राणावर ताबा मिळविला आहे. प्रकृतीला वशीभूत करण्याचें सामर्थ्य प्राप्त करून घेणें हेंच प्राणायामाचें लक्ष्य आहे, तोच प्राणायामाचा उद्देश आहे. योगी ज्या वेळीं सिद्ध होतो त्या वेळीं प्रकृतींत अशी कोणतीच वस्तु असत नाही की जी त्याला वश नसते. त्यानें देव-देवतांना किंवा मृतात्म्यांना आज्ञा केली तर त्यांना त्याच्या पुढ्यांत येऊन उभें राहणें भाग पडेल. प्रकृतीच्या वा निसर्गाच्या सर्व शक्ति अगदी गुलामाप्रमाणे त्याच्या आज्ञा पाळतील. अज्ञ लोक ज्या वेळीं योग्याचें हें असलें सामर्थ्य पाहतात त्या वेळीं त्यांना तें सारें 'चमत्कार' आहे असें वाटूं लागतें. योग्याच्या असल्या कार्यांना ते चमत्कार मानतात. हिंदु मनाचें हें एक वैशिष्ट्य आहे की, कांहीहि आकलन करूं जातां तें आधी त्या बाबतींतील शक्य तितकें अखेरचें सामान्य तत्त्व जाणून घेण्याचा यत्न करतें, त्या बाबतींतील तपशि-

ल्याचा विचार तें मागाहून करतें. वेदांमध्ये ही एकच पृच्छा पुनः पुनः केली गेली आहे— "कस्मिन् नु भगवो विज्ञाते सर्वम् इदं विज्ञातं भवति ?"—"असें काय आहे की जें जाणल्याने हें सारेंकांही जाणलें जातें ?" याप्रमाणे, 'ज्या'ला जाणल्याने सर्व जाणलें जातें, त्याचा निर्णय करण्यासाठीच आमचीं सर्व शास्त्रें आणि सारीं तत्त्वज्ञानें अस्तित्वांत आलीं आहेत. कुणी जर ह्या विश्वाचें तत्त्व तपशिलां-मधून जाणण्याची इच्छा धरील तर त्याला अनंत अवधि लागेल, कारण मग त्याला वाळूचा प्रत्येक कण वेगवेगळा जाणून घ्यावा लागेल. हें शक्य तरी आहे काय ? या अशा रीतीने समस्ताचें ज्ञान होणें कितपत संभवनीय आहे हें यावरून दिसून येतें. मग असें ज्ञान करून घेण्याचा उपाय कोणता ? एकेक गोष्ट वेगवेगळी जाणून सर्वज्ञ होणें कसें शक्य आहे ? यावर योग्यांचें उत्तर असें की, "ह्या समस्त विशिष्ट अभिव्यक्तींमागे एक साधारण सत्ता आहे. तिला धरूं वा जाणूं शकल्या-सच सारेंकांही जाणतां येईल." या समस्त विश्वाच्या मागे एक सामान्य सत्ता आहे असें वेदांमधे सांगितलें आहे. ती सत्ता वा तें सत् ज्याने जाणलें त्याने समस्त विश्व जाणलें असें होतें. ह्याच पद्धतीने प्राण या सामान्यभूत शक्तींत सर्व शक्तींचा समावेश होतो, आणि म्हणून ज्याने हा प्राण जिंकला आहे त्याने विश्वांतील भौतिक वा मानसिक सर्व शक्ति जिंकल्या आहेत असें म्हणतां येईल. ज्याने हा प्राण जिंकला आहे त्याने केवळ स्वतःचेंच मन नव्हे, तर सर्वांचींच मनें काबीज केलीं आहेत असें म्हणतां येईल. ज्याने हा प्राण जिंकला आहे त्याने स्वतःचा आणि इतर सर्वांचे देह जिंकले आहेत असें म्हणतां येईल. कारण प्राणच समग्र शक्तींचें मूळ होय, सर्व शक्तींमागील सामान्य शक्ति होय.

हा प्राण जिंकणें हेंच 'प्राणायामा'चें एकमेव उद्दिष्ट होय. प्राणायामाच्या सर्व क्रिया-प्रक्रिया या एकाच उद्दिष्टासाठीं आहेत. साधक जिथे आहे तेथूनच त्याने साधना सुरू करावयास हवी, ज्या गोष्टी त्याच्या अगदी जवळ आहेत त्यांना जिंकण्यापासूनच त्याने सुरुवात करणें उचित. जगांतील सर्व गोष्टींमधे आपल्याला सर्वांत जवळची गोष्ट म्हटली म्हणजे आपला देह; आणि मन तर त्याहिपरीस जवळचें

होय. जो प्राण विश्वांत सर्वत्र खेळत आहे, त्याचा जो अंश आपलें हें शरीर आणि मन चालवीत आहे तो प्राणांश आपल्याला सगळ्यांत जवळचा आहे. आपल्या शारीरिक आणि मानसिक शक्तींच्या रूपांनी व्यक्त होणारा हा लहानसा प्राणतरंग, विश्वव्यापी अनंत प्राणसमुद्रावरील इतर कोणत्याहि तरंगापेक्षा आपल्याला अधिक जवळचा आहे. हा लहानसा तरंग जिकण्यांत जर आपल्याला यश आलें तरच आपण समस्त प्राणसमुद्र जिकण्याची आशा बाळगूं शकूं. हें जो योगी करूं शकतो त्याला सिद्धि लाभते,––मग कोणतीहि शक्ति त्याच्यावर ताबा चालवूं शकत नाही. तो एकप्रकारें सर्वशक्तिमान आणि सर्वज्ञच होऊन जातो. हा प्राण वशीभूत करून घेण्याचा यत्न करणारे संप्रदाय आपल्याला प्रत्येक देशांत आढळतील. या देशांत (अमेरिकेंत) आपल्या मनाच्या शक्तीने रोग बरे करणारे (mind healers), विश्वासाच्या बळावर रोग बरे करणारे (faith healers), मृतात्म्यांशीं संबंध असणारे (spiritualists), ख्रिश्चन सायंटिस्टस्, मोहिनीविद्या जाणणारे (hypnotists) इत्यादि अनेक संप्रदाय आढळतात. या सर्व संप्रदायांच्या मतांचें जर आपण नीट विश्लेषण केलें तर, त्या सर्वांच्या मुळाशीं हा 'प्राणायाम' असल्याचें आपल्याला आढळून येईल,––मग त्या त्या संप्रदायांतील व्यक्तींना ह्याची जाणीव असो की नसो. त्या सर्व मतांच्या मुळाशीं 'प्राणावर जय' हें एकमेव तत्त्व विद्यमान आहे. ते सर्वजण ती एकच शक्ति हाताळीत आहेत, फक्त त्यांना आपण काय करीत आहोंत याची कल्पना नसते, इतकेंच. एक शक्ति जणु अचानकपणें त्यांच्या हातीं आलेली आहे, आणि तिचें स्वरूप नीट न जाणतांच ते तिचा वापर करीत आहेत. पण, ते तिचें स्वरूप जाणोत की न जाणोत, योगी जी शक्ति हाताळीत असतात तीच शक्ति हेहि वापरीत आहेत. ती प्राणाचीच शक्ति होय.

हा प्राणच समस्त प्राण्यांमधे जीवनशक्तीच्या रूपाने विद्यमान आहे. मनोवृत्ति (विचार) ही प्राणाची सर्वांत सूक्ष्म आणि सर्वांत श्रेष्ठ क्रिया होय. आपण सर्वसाधारणपणें जिला मनोवृत्ति (विचार) म्हणतों ती वस्तुतः संपूर्ण मनोवृत्तीचा किंचित् अंश होय, मनोवृत्ति कांही केवळ तेवढीच नसते. मनोवृत्तीचे नाना प्रकार आहेत. आपण जिला उपजत-

प्रेरणा (instinct) वा जाणीवरहित चित्तवृत्ति (unconscious thought) म्हणतों तें आपलें सर्वांत खालचें कार्यक्षेत्र होय. मला एखादा डास चावतांच माझा हात अगदी आपोआप त्याला मारण्याकरता वळतो. त्याला मारण्यासाठी हात उचलण्याकरता आणि त्या जागेकडे वळविण्याकरता मला कांही विशेष विचार करण्याची गरज पडत नाही. मनोवृत्तीचा हा एक प्रकार आहे. विचाराच्या मदतीखेरीज शरीराच्या जेवढ्या म्हणून प्रतिक्रिया (reflex actions) होत असतात त्या सर्व प्रतिक्रिया मनोवृत्तीच्या ह्याच प्रकारांत मोडतात. मनोवृत्तीचा ह्यापेक्षा उच्च असा एक प्रकार आहे. तिला जाणीवयुक्त (conscious) मनोवृत्ति म्हणतां येईल. मी तर्क करतों, मी एखादी गोष्ट जोखतों, एखाद्या गोष्टीचा सर्व बाजूंनी विचार करतों. परंतु मनोवृत्ति म्हणजे इतकेंच असें मात्र नाही. मनोवृत्तीचा आणखी एक प्रकार आहे. आपली बुद्धि ही सीमित आहे हें आपण जाणतों. एका लहानशा सीमेंतच ती कार्य करीत असते. एका विशिष्ट मर्यादेपर्यंतच ती जाऊं शकते, ती मर्यादा उल्लंघून पलीकडे जाण्याची तिच्यांत कुवत नाही. ज्या वर्तुळांत ती फिरते तें वर्तुळ फारच लहान आहे. पण त्याचबरोबर हेंहि आपल्या प्रत्ययास येत असतें की कांही सत्यें या वर्तुळांत बाहेरून आंत घुसतात. धूमकेतु ज्याप्रमाणे सूर्यमालेच्या कक्षेंतील नसूनहि कधीकधी सूर्यमालेंत प्रवेशून आपल्याला दृग्गोचर होतो, त्याचप्रमाणे, आपल्या तर्कबुद्धीच्या कक्षेंत नसलेलींहि कित्येक सत्यें तिच्या वर्तुळांत शिरतात. तीं ह्या वर्तुळाच्या बाहेरून येत असतात यांत कांहीच संशय नाही. आपली विचारशक्ति वा बुद्धि मात्र ती सीमा ओलांडून जाऊं शकत नाही—त्या वर्तुळाच्या बाहेर पडूं शकत नाही. आमच्या बुद्धीच्या संकुचित वर्तुळांत हीं जीं सत्यें जणुकाय बिनापरवाना शिरतात, त्यांचें मूळ ह्या वर्तुळाच्या बाहेर शोधावें लागेल, कारण तीं ह्या वर्तुळांत उगम पावत नसतात, बाहेरून आंत घुसत असतात. आपली बुद्धि स्वतःच्या वर्तुळाचा भेद करून त्यांच्या त्या उगमस्थानापर्यंत वा त्यांच्या त्या मुळापर्यंत पोहोचूं शकत नाही. परंतु योगी म्हणतात की आपल्या बुद्धीद्वारा आपल्याला जें ज्ञान होतें तीच कांही आपल्या ज्ञानाची अंतिम मर्यादा नव्हे. वर सांगितलेल्या उपजत प्रेरणा वा जाणीवरहित चित्तवृत्ति आणि

जाणीवयुक्त मनोवृत्ति यापेक्षा उच्च अशा एका स्तरावर आपलें मन विचरण करूं शकतें. त्या स्तरालाच आपण 'जाणिवेपलीकडील जाणीव' वा 'ज्ञानातीत' भूमि (पूर्ण चैतन्य वा super consciousness) म्हणूं शकतों. मन ज्या वेळीं ह्या पूर्ण एकाग्रतेच्या वा ज्ञानातीत अवस्थेंत वा समाधींत आरूढ होतें, त्या वेळीं तें बुद्धीच्या सीमांपलीकडे निघून गेलेलें असतें; आणि मग, जीं सत्यें सहजात प्रेरणेला वा बुद्धीला कधीहि कळणार नाहीत त्यांचा त्या अवस्थेंत प्रत्यक्ष साक्षात्कार होतो, तीं तेव्हा प्रत्यक्ष अनुभवास येतात. प्राणाचींच भिन्न भिन्न रूपें अशा, आमच्या शरीरांतील समस्त सूक्ष्म सूक्ष्म शक्तींना जर नीट संचालित केलें तर त्या शक्ति आमच्या मनाला ह्या वरच्या स्तरावर, ह्या ज्ञानातीत भूमीवर चढण्यास मदत करतात. मन मग त्या भूमीवर कार्य करूं लागतें.

ह्या विश्वांतील प्रत्येक स्तरावर एकेक अखंड एकसंध द्रव्यच विद्यमान आहे. विश्वाच्या भौतिक रूपाकडे लक्ष दिल्यास आढळून येईल की समस्त भौतिक विश्व एकाच वस्तूचें बनलेलें आहे. एक अखंड द्रव्यच नाना रूपांनी विराजत आहे. वस्तुत: तुमच्या-माझ्यांत आणि सूर्यांत कांहीच भेद नाही. वैज्ञानिकांकडे जा, ते तुम्हांला समजावून देतील की वस्तूंवस्तूंतील भेद हा खरोखरचा नाही, सर्व वस्तु एकाच द्रव्याच्या बनलेल्या आहेत, एकाच द्रव्याचीं तीं निरनिराळीं रूपें आहेत. ह्या टेबलांत आणि माझ्यांत खरोखर पाहतां कांही फरक नाही. अनंत जडद्रव्याचा (matter चा) हें टेबल हा एक बिंदु आहे आणि मी त्याचा दुसरा एक बिंदु आहें. विश्वामधील प्रत्येक साकार वस्तु जणुकांही या अनंत जड-सागरांतील एकेक भोवरा आहे. कोणताहि भोवरा सर्वदा कधीहि होता तसाच नसतो. कल्पना करा की एखाद्या वाहत्या नदींत लक्षावधि भोवरे आहेत; प्रत्येक भोवऱ्यांत प्रत्येक क्षणीं नवीन पाणी येत आहे, थोडा वेळ फिरत आहे, मग निघून जात आहे, आणि त्या जागीं नवें पाणी येत आहे. हें विश्वहि तद्वतच सदा बदलणारा एक जड स्रोत आहे, आणि अस्तित्वांत असलेल्या सर्व वस्तु त्यांतील लहान लहान भोवरे आहेत. जडद्रव्याचा स्रोत कधी मानवदेह नामक भोवऱ्यांत शिरतो, तिथे कांही काल फिरतो, बदलतो, आणि

मग तेथून कदाचित् पशुशरीर नामक दुसऱ्या भोवऱ्यांत शिरतो, तेथून कांही वर्षांनी कदाचित् खनिजरूपी आणखी एका भोवऱ्यांत शिरतो. सारखा बदल ! सारखा बदल ! कोणतीहि वस्तु स्थिर नाही--सदा तीच नाही, माझें शरीर, तुमचें शरीर म्हणून वस्तुतः कांही नाही, आपण तसें केवळ म्हणायचें, इतकेंच. नुसते शब्द ! विद्यमान आहे--केवळ एक अखंड जडद्रव्य. त्याच्या एका बिंदूचें नांव चंद्र, एका बिंदूचें नांव सूर्य, एका बिंदूचें नांव मनुष्य, एका बिंदूचें नांव पृथ्वी, एका बिंदूचें नांव उद्भिज तर आणखी एका बिंदूचें नांव खनिज पदार्थ. यांतील कोणतीच वस्तु सदा एकाच स्वरूपाची नसते, सर्वच सदा बदलत आहेत; जडद्रव्य कधी संमिश्रित होत आहे तर कधी विश्लेषण पावत आहे. मनाचेंहि असेंच. जगांतील सर्व वस्तु 'ईथर' पासून (आकाशापासून) उत्पन्न झालेल्या आहेत. अतएव त्यालाच समस्त जडवस्तूंचा प्रतिनिधि म्हणतां येईल. प्राणाच्या अत्यंत सूक्ष्म स्पंदनाच्या अवस्थेंत ह्या 'ईथर'लाच मनाचाहि प्रतिनिधि म्हणतां येईल. आणि म्हणून, समस्त मनोजगतहि एका अखंड स्वरूपाचें ठरतें. कुणी जर स्वतःच्या मनामधे तें अति सूक्ष्म कंपन उत्पन्न करूं शकेल तर त्याच्या प्रत्ययास येईल की समस्त जग म्हणजे केवळ सूक्ष्म सूक्ष्म कंपनांचीच समष्टि आहे. कांही औषधें आहेत की तीं घेतल्यास आपल्या मनाला ती अवस्था प्राप्त होऊं शकते, त्या वेळीं आपल्याला ह्या सूक्ष्म कंपनांचा (subtle vibrations चा) स्पष्ट अनुभव येऊं शकतो. सर हंफ्री डेव्हींचा तो सुप्रसिद्ध प्रयोग तुमच्यापैकी पुष्कळांच्या स्मरणांत असेल. 'हसविणाऱ्या वायू'ने (Laughing gas ने) त्यांच्यावर अंमल बसवितांच ते स्तब्ध आणि बधिर होऊन गेले. थोड्या वेळाने भानावर येऊन ते म्हणाले की समस्त जग केवळ कल्पनांचें (ideas चें) बनलेलें आहे. तेवढ्या वेळापुरती जणु सर्व स्थूल कंपनें (gross vibrations) थांबून, ज्यांना त्यांनी कल्पना (ideas) म्हटलें तीं सूक्ष्म कंपनेंच फक्त त्यांच्यापक्षीं विद्यमान होतीं. त्या वेळीं, त्यांना सगळी-कडे केवळ सूक्ष्म कंपनेंच प्रत्ययास येत होतीं. समस्त जग त्यांच्या दृष्टीने जणु एक महा कल्पना-सागर होऊन गेलें होतें. त्या महासमुद्रांत ते स्वतः आणि जगांतील सर्व चराचर वस्तु जणु कल्पनेचा एकेक लहान

लहान भोवरा होय असा त्यांना अनुभव आला.

याप्रमाणे, मनोजगतांत वा अंतर्जगतांतहि एकत्व आहे हें आपण पाहिलें. आणि बाह्य आणि आंतर समस्त जग ओलांडून अखेर ज्या वेळीं आपण आत्म्यासमीप पोहोचूं त्या वेळीं तिथेहि एकत्वाखेरीज, अखंडत्वाखेरीज आणखी कांही नाही हेंच आपल्या अनुभवास ग्रेईल. जडद्रव्याच्या स्थूल आणि सूक्ष्म अभिव्यक्तींपलीकडे, सर्व प्रकारच्या गतीपलीकडे ती एक अखंड सत्ता स्व-महिम्यांत विराजत आहे. शक्तीच्या विभिन्न व्यक्त, दृश्यमान रूपांमध्येहि एक अखंडता विद्यमान आहे. हें सत्य आता नाकबूल करून चालणार नाही, कारण आधुनिक भौतिक शास्त्रांनी ह्या गोष्टी सप्रमाण सिद्ध करून दाखविल्या आहेत. आधुनिक पदार्थविज्ञानाने हें सिद्ध केलें आहे की विश्वांतील शक्तींची गोळाबेरीज नेहमी सारखीच असते. आधुनिक पदार्थविज्ञानाने हेंहि सिद्ध करून दाखविलें आहे की, ह्या शक्तिसमष्टीचीं दोन रूपें आहेत, कधी ती अव्यक्त रूपांत असते तर कधी व्यक्त रूपांत. अव्यक्त रूपांत ती शांत स्वरूपांत असते. ती व्यक्त होते त्या वेळीं निरनिराळ्या शक्तींचीं रूपें धारण करते. याप्रमाणे अनंतकालापासून ती कधी व्यक्त तर कधी अव्यक्त रूप धरीत आहे, कधी विकसित होत आहे तर कधी संकुचित होत आहे. ही शक्ति म्हणजेच प्राण, आणि या प्राणाचा संयम म्हणजेच प्राणायाम.

ह्या प्राणाची मानवशरीरांतील सर्वांत स्पष्ट अभिव्यक्ति म्हणजे फुप्फुसांची क्रिया ( म्हणजेच श्वासोच्छ्वास ) होय. ती जर थांबेल तर प्राणशक्तीच्या आपल्या शरीरांतील इतर सर्व क्रियाहि ताबडतोब थांबतील. परंतु अशींहि कांही माणसें असतात की जीं स्वतःला असें वळण लावतात की ही फुप्फुसांची क्रिया (श्वासोच्छ्वास) थांबली तरी सुद्धा त्यांचें शरीर जिवंत राहूं शकतें. असे कांही लोक आहेत की जे स्वतःला कित्येक दिवसपर्यंत मातींत पुरून घेतात, आणि तरीहि श्वासोच्छ्वासाखेरीज जिवंत राहूं शकतात. असो, सूक्ष्म शक्तीवर ताबा मिळविण्यासाठी आपल्याला स्थूल शक्तीची मदत घ्यावयाला हवी, आणि अशी मदत घेऊन हळूहळू स्थूलापासून अधिकाधिक सूक्ष्म शक्तींवर ताबा मिळवीत मिळवीत आपण आपलें लक्ष्य गाठावयास हवें. प्राणायामाचा

खरा अर्थ आहे--फुप्फुसांच्या या क्रियेवर ताबा मिळविणें. आणि फुप्फुसांची क्रिया म्हणजेच श्वासोच्छ्वास. श्वासोच्छ्वासामुळे फुप्फुसांची क्रिया होते असें मात्र नव्हे तर उलट, फुप्फुसांच्या क्रियेमुळेच श्वासोच्छ्वास चालतो. फुप्फुसांच्या ह्या क्रियेमुळे हवा पंपासारखी आंत ओढली जाते. प्राणामुळे ही फुप्फुसांची क्रिया होते, आणि फुप्फुसांच्या क्रियेमुळे हवा आंत ओढली जाते. यावरून हें स्पष्ट होतें की, प्राणायामाचा श्वासोच्छ्वासाशीं संबंध नाही, तर प्राणायाम म्हणजे, जिच्यामुळे फुप्फुसांची क्रिया चालते त्या स्नायुशक्तीवर ताबा मिळविणें होय. जी शक्ति मज्जातंतूद्वारें स्नायूंकडे जाते, आणि तेथून फुप्फुसांकडे जाऊन त्यांच्यांत विशिष्ट क्रिया निर्माण करते, ती शक्ति म्हणजेच प्राण होय. प्राणायामाची साधना करून आपण त्या प्राणशक्तीला जिंकावयाचें असतें. प्राणावर ताबा मिळवितांच ह्या प्राणाच्या आपल्या शरीरांतील इतरहि सर्व क्रिया हळूहळू आपल्या ताब्यांत येत असल्याचें आपल्या प्रत्ययास येईल. स्वतःच्या शरीरांतील प्रत्येक स्नायूवर ज्यांनी ताबा मिळविला आहे असे लोक मीं स्वतः बघितले आहेत. स्वतःच्या शरीरांतील कोणताहि स्नायु ते इच्छेनुसार चाळवूं शकतात. आणि त्यांत विशेष तें काय आहे ? माझा जर कांही स्नायूंवर ताबा चालूं शकतो, तर मग माझ्या शरीरांतील सर्वच स्नायूंवर नि मज्जातंतूंवर कां चालूं नये ? यांत अशक्य काय आहे ? सध्या आपला त्यांच्यावरील ताबा नाहीसा झाला असून त्यांच्या क्रिया आपोआप होऊं लागल्या आहेत. आपण आपल्या इच्छेनुसार आपले कान हालवूं शकत नाहीं, पण पशु तसें करूं शकतात हें आपण पाहतोंच. आपण तसें करूं शकत नाहीं, कारण तसें करण्याच्या आपल्या शक्तीचा उपयोग करणें आपण सोडून दिलें आहे. यालाच पिढ्यानुपिढ्यांनी होणारा शक्तिऱ्हास (atavism) म्हणतात.

आपण परत हेंहि जाणतों की, जी शक्ति सध्या अव्यक्त बनलेली आहे तिला फिरून व्यक्तावस्थेस आणतां येतें. आपल्या शरीरान्तर्गत ज्या अनेक क्रिया आज आपल्या इच्छाधीन नाहीत, त्यांना दृढ आणि दीर्घ साधनेने पूर्णपणें आपल्या इच्छेच्या अधीन बनवितां येतें. या दृष्टीने विचार केल्यास आपली खात्री पटते की, स्वतःच्या

शरीराचा प्रत्येक भाग आपल्या इच्छाधीन होऊं शकणें केवळ संभवनीयच नव्हे तर संपूर्णपणें शक्य आहे. योगी हें प्राणायामाद्वारा साध्य करीत असतात. 'प्राणायाम करतेवेळीं श्वास घेतांना आपलें समस्त शरीर प्राणाने भरून टाका' असें योगशास्त्रावरील ग्रंथांत वाचल्याचें तुम्हांपैकी कांहींना कदाचित् स्मरत असेल. इंग्रजींत 'प्राणा'चें भाषान्तर 'श्वास' असें केलें जातें. त्यामुळे 'श्वासाने आपलें समस्त शरीर भरून टाकायचें म्हणजे काय करायचें' असें साहजिकच तुम्हांला वाटेल. दोष वास्तविक भाषान्तरकर्त्याचा आहे. आपल्या शरीरांतील प्रत्येक भाग ह्या प्राणाने वा जीवनशक्तीने भरून टाकतां येणें शक्य आहे, आणि ज्या वेळीं तुम्ही तसें करूं शकाल त्याच वेळीं समस्त शरीरावर तुमचा ताबा चालूं शकेल—स्वतःच्या शरीरांतील प्रत्येक भाग तुमच्या आधीन होऊन जाईल. देहाच्या सर्व व्याधि आणि दुःखें तुमच्या इच्छाधीन होतील. केवळ इतकेंच नव्हे तर, दुसऱ्याच्या शरीरावर देखील तुमचा ताबा चालूं शकेल—तीं देखील तुमच्या इच्छाधीन होतील. आपल्या ह्या जगांतील चांगल्याचा काय किंवा वाईटाचा काय, दोन्हींचाहि संसर्गाने प्रसार होत असतो—दोन्ही संक्रामक आहेत. तुमची शरीर-वीणा जर एका विशिष्ट सुरांत चढविलेली असेल तर, तुमच्या सान्निध्यांतील इतरांतहि तोच सूर उमटूं लागतांना दिसेल. तुम्ही जर निरोगी आणि सुदृढ असाल तर तुमच्या सान्निध्यांतील लोकांतहि अमळ निरोगीपणा, अमळ सुदृढपणा येत असल्याचें आढळून येईल. पण तुम्ही जर रोगट आणि दुबळे असाल तर तुमच्या भोवतालचे लोकहि जणु अमळ तसेंच होत असल्याचें दिसून येईल. ज्या वेळीं एकजण दुसऱ्या एखाद्याला रोगमुक्त अथवा बरा करूं जातो त्या वेळीं तो प्रथम कांही करीत असेल तर तें हेंच की तो स्वतःठायीचा निकोपपणा त्या दुसऱ्यांत संचारित करून देत असतो. रोग बरें करण्याची ही अगदी प्राथमिक—आदिम—पद्धत म्हणतां येईल. जाणतां वा न जाणतां एकजण दुसऱ्यांत स्वतःचा निकोपपणा संक्रमित करूं शकतो. एखादा खूप सुदृढ, सबळ मनुष्य जर एखाद्या दुबळ्या माणसाबरोबर नेहमी असेल तर कळत वा न कळत तो त्या दुबळ्यांत अमळ बळ संचारूं शकेल. हें ज्या वेळीं जाणतां, म्हणजेच जाणूनबुजून

घडतें त्या वेळीं त्याचा परिणाम जलद आणि अधिक चांगला होतो. रोग्याला निरोगी करण्याचा आणखीहि एक प्रकार आहे. तो म्हणजे स्वत: खूप निरोगी किंवा निकोप नसतांहि कित्येकजण दुसऱ्यांना रोगमुक्त करूं शकतात, असाहि प्रकार पुष्कळदा पाहण्यांत येतो. या साऱ्या प्रकाराचा अर्थ एवढाच की, दुसऱ्यांना निरोगी करणाऱ्या ह्या व्यक्तींचा 'प्राणा'वर थोडाफार ताबा चालत असतो, त्यांनी थोड्या-फार प्रमाणांत 'प्राणा'वर जय मिळविलेला असतो, तो वशीभूत केला असतो; स्वत:च्या 'प्राणां'त तात्पुरतें एक विशिष्ट स्पंदन उत्पन्न करून हे लोक तें स्पंदन इतरांत संक्रमित करून देत असतात.

पुष्कळदा हें कार्य दूर अंतरावरून घडवून आणल्याचेंहि आढळून येतें. आता हें मात्र खरें की, येथे दूरत्वाचा किंवा अंतराचा अर्थ विच्छेद (break) असा नाही, कारण विच्छेद (break) या अर्थी दूरत्व किंवा अंतर कुठेच, कशांतहि विद्यमान नाही. दोन वस्तूंमध्ये खंड आहे, त्यांचा परस्परांशीं कांहीहि संबंध नाही अशा अर्थी दूरत्व किंवा अंतर खरोखर असणें शक्य नाही. तुम्ही, आणि सूर्य यांमध्ये खरोखर खंड (break) आहे काय ? वस्तुस्थिति अशी आहे की, एक सलग, अखंड द्रव्य विद्यमान आहे—तुम्ही त्याचा एक अंश आहांत आणि सूर्य त्याचा दुसरा अंश आहे. नदीचा इथला एक भाग आणि दूरचा दुसरा एक भाग या दोन भागांत खंड (break) असतो काय ? आणि असा खंड जर कुठेहि नसेल तर मग शक्ति एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं कां संक्रमित करतां येऊं नये ? हें होऊं शकणार नाही असें तुम्ही कशाच्या आधाराने म्हणाल? तुमच्या म्हणण्याला काय आधार, काय पुरावा ? तर्कानें हें सत्य खोडून काढतां यावयाचें नाही. दूर अंतरावरून एकजण दुसऱ्याला बरा करतो अशा कितीतरी घटना उदा-हरणादाखल दाखवितां येतील. त्या अगदी पुरेपूर खऱ्या आहेत. हा प्राण दूर अंतरावरील एखाद्यांत संचारित करतां येतो. एवढें मात्र खरें की या असल्या घटनांपैकी एक खरी असेल तर शंभर खोट्या असतात ! या बाबतींत बनवाबनवी, खोटेंपणा बराच आढळून येतो. कारण, ही क्रिया लोक समजतात तितकी सोपी नाही. तो कांही पोरखेळ नव्हे की कुणाहि सोम्यागोम्याला साधावा. या पद्धतीने एकजण दुसऱ्या एकाला

बरा करीत आहे अशा बहुतांश घटनांत, तो बरा करणारा सर्वसाधारणपणें मानवदेहाच्या स्वाभाविक निरोगीपणाचा फायदा घेऊन आपलें कार्य करीत असल्याचें तुम्हांला आढळून येईल. जगांत असा कोणताहि रोग नाही की जो झाल्याने सर्वचजण मरत असतात. फार काय पण कॉलऱ्याच्या साथींत देखील लागण झाल्यांपैकी प्रथम कांही दिवस शेकडा साठ रोगी दगावले तर हळूहळू ती संख्या घटत जाऊन शेकडा तीस, शेकडा वीसवर येऊन ठेपते, बाकीचे सारे बरे होऊन जातात. ॲलोपॅथिक डॉक्टर येऊन कॉलऱ्याचें निदान करून रोग्याला औषध देतो. होमिओपाथ येऊन औषध देतो, आणि कदाचित् ॲलोपाथ डॉक्टरांपेक्षा कितीतरी अधिक रोगी बरे करतो. होमिओपाथला अधिक यश येण्याचें कारण एवढेंच की तो रोग्याच्या शरीरांत कांही ढवळाढवळ न करतां निसर्गाला स्वतःचें कार्य करण्यास अवसर देतो, निसर्गाकडूनच तो रोग बरे करवून घेतो. विश्वासाच्या बळावर इतरांना बरे करणाऱ्या लोकांना ( faith-healers ना) याहिपेक्षा अधिक यश लाभतें, कारण, ते स्वतःच्या इच्छाशक्तीद्वारें कार्य करून विश्वासाच्या बळाने रोग्यांतील सुप्त प्राणशक्ति जागृत करीत असतात.

परंतु, विश्वासाच्या बळावर रोग्यांना बरे करणाऱ्या व्यक्तींची एक चुकीची समजूत असल्याचें नेहमी आढळून येतें. ती अशी की, ते असें समजतात की विश्वासच प्रत्यक्षपणें रोग्यांना बरे करीत असतो. परंतु केवळ विश्वासानेच त्यांचे रोगी बरे होतात अशी खरी वस्तुस्थिति नाही. त्या बरें होण्याला केवळ विश्वासच एकमेव कारण नसतो. असे कांही रोग आहेत की, आपल्याला तो रोग झाला आहे असें त्या रोग्याला कदापि वाटत नाही. आपल्याला तो रोग झालेला नाही असा त्या रोग्याचा प्रचंड विश्वासच त्या रोगाचें प्रमुख लक्षण होय ! आणि त्यावरून तो लवकरच मरणार असें निदान केलें जातें ! जर केवळ विश्वासानेच रोग बरा होत असेल, तर मग ह्या रोग्यांच्या बाबतींत तें तत्त्व कां लागू पडू नये ? ते नक्कीच बरे व्हावयास हवेत. कारण त्यांच्याठायीं विश्वास असतो. यावरून हें स्पष्ट होतें की, वस्तुतः रोगी ह्या प्राणाच्या शक्तीनेच बरा होत असतो. ज्याने प्राणावर जय मिळवून प्राण वशीभूत केला आहे असा पवित्र माणूस स्वतःच्या प्राणांत एक

विशिष्ट स्पंदन उत्पन्न करूं शकतो आणि तें स्पंदन तो दुसऱ्यांत संक्रमित करून त्या दुसऱ्या व्यक्तीच्या ठायींहि तसलें स्पंदन निर्माण करूं शकतो. ह्याचें प्रत्यंतर तुम्हांला रोजच्या अनेक घटनांमध्ये येईल. मी तुमच्यासमोर व्याख्यान देत आहें. व्याख्यान देतांना मी काय करीत आहें ? मी माझ्या मनांत जणु एक विशिष्ट स्पंदन निर्माण करीत आहें, आणि तें मला जितकें अधिक साधेल तितका माझ्या बोलण्याचा तुमच्यावर अधिक परिणाम होईल. हा तुमचा नेहमीचा अनुभव आहे की, ज्या दिवशीं माझ्यांत खूप उत्साह असेल त्या दिवशींचें माझें व्याख्यान तुम्हांला खूप आवडेल, आणि ज्या दिवशीं माझ्यांत ही उत्साहाची मात्रा कमी असेल त्या दिवशीं तुम्हांलाहि माझ्या बोलण्यांत तितका रस वाटणार नाही.

जग हलवून सोडणारीं, जगाचा इतिहास घडविणारीं, प्रचंड इच्छाशक्तीचीं माणसें स्वतःच्या प्राणांत खूप उच्च स्पंदनाची अवस्था उत्पन्न करूं शकतात, आणि तें स्पंदन इतकें प्रचंड व इतकें प्रबल असतें की तें क्षणार्धांत इतरांमध्ये संक्रमित होतें, शेकडो हजारो लोक त्यांच्याकडे ओढले जातात, जगांतल्या अर्ध्याअधिक लोकांवर त्यांच्या विचारांची छाप पडते. जग ज्यांना द्रष्टे म्हणून पूजितें त्या सर्व थोर द्रष्ट्यांनी प्राणावर अति विलक्षण ताबा मिळविलेला होता—त्यांनी प्राण पूर्णतया वशीभूत केला होता. ह्या प्राणजयांतूनच त्यांच्याठायीं प्रचंड इच्छाशक्ति निर्माण झाली होती. त्यांनी आपल्या प्राणांत सर्वोच्च स्पंदन उत्पन्न केलें होतें, आणि त्यामुळेच त्यांच्याठायीं उभें जग हलवून सोडील अशी शक्ति निर्माण झाली होती. जगांत जिथेजिथे म्हणून शक्तीचा विकास होतांना आढळून येतो तिथेतिथे हा प्राणाचा संयम त्याला कारणीभूत झालेला असतो. प्राणजयामुळेच शक्ति प्रकटत असते. लोकांना हें रहस्य अवगत नसेल, पण ह्या घटनांचें हेंच एकमेव स्पष्टीकरण होय. कधीकधी आपल्या शरीरांत या प्राणाचा पुरवठा एका भागांत कमी तर दुसऱ्या भागांत जास्त होऊन जातो, प्राणाची साम्यावस्था किंवा समतोलपणा बिघडतो. यांतूनच आपण ज्याला रोग म्हणतों त्या विकृतीची उत्पत्ति होते. उबारीचा प्राण त्या भागांतून दूर करून, जिथे त्याची उणीव आहे तिथे त्याचा पुरवठा केल्याने रोग

बरा होईल. शरीराच्या कोणत्या भागांत प्राण आवश्यकतेपेक्षा कमी किंवा जास्त आहे हें जाणणें हा देखील प्राणायामाचाच एक भाग होय. या प्राणायामसाधनेने आपलें मन इतकें संवेदनाक्षम होईल की मग आपल्याला हें देखील जाणवूं शकेल की आपल्या पायाच्या किंवा हाताच्या आंगठ्यांत आवश्यकतेपेक्षा कमी प्राण आहे; आणि त्याचबरोबर तेथील ती प्राणाची कमतरता भरून काढण्याची शक्ति देखील मग आपल्या ठायीं निर्माण होईल. याप्रमाणे प्राणायामाचीं हीं नाना अंगें आणि कार्ये आहेत. आपल्याला तीं सारीं हळूहळू एकामागून एक शिकावीं लागतील. आणि हळूहळू आपल्याला आढळून येईल की, निरनिराळ्या रूपांनी प्रकट होणाऱ्या या प्राणाचा संयम कसा करावा, आणि प्राणाच्या त्या विभिन्न रूपांना नाना तऱ्हेने संचालित कसें करावें हें शिकविणेंच राजयोगाचें एकमेव उद्दिष्ट होय. ज्या वेळीं कुणी स्वतःतील सर्व शक्तींचा संयम करीत असतो, त्या वेळीं तो स्वतःच्या देहांतील प्राणाचाच संयम करीत असतो. ज्या वेळीं कुणी ध्यान करतो, त्या वेळीं तोहि प्राणाचाच संयम करीत असतो, प्राणच एकाग्र करीत असतो.

एखाद्या समुद्राकडे दृष्टि फेकल्यास आढळून येईल की, त्यावर पर्वतासारख्या प्रचंड लाटा उसळत असतात, कांही त्या मानाने लहान असतात, आणखी कित्येक त्यांहिपेक्षा लहान असतात, आणि त्याचप्रमाणे लहानलहान बुडबुडेहि तिथे असतात. परंतु त्या सगळ्यांच्या पाठीशीं तो अनंत समुद्र असतो. एकीकडे एक लहानसा बुडबुडा त्या समुद्राशीं संयुक्त असतो तर दुसरीकडे एक प्रचंड लाटहि त्याच समुद्राशीं संयुक्त असते. त्याचप्रमाणे, ह्या विश्वसंसारांत एखादा अत्यंत थोर पुरुष—अतिमानव—असतो, तर एखादा लहानशा बुडबुड्यासारखा क्षुद्र असतो, पण प्रत्येकजणच त्या अनंत महाशक्तिसागराशीं संयुक्त असतो. त्या महाशक्तीशीं प्रत्येक जीव जन्मतांच संबद्ध असतो—तिच्यावर त्याचा जन्मसिद्ध अधिकार असतो. जिथे जिथे म्हणून जीवन आहे, तिथे तिथे त्याच्या पाठीशीं त्या अनंत महाशक्तीचें भांडार विद्यमान आहे हें लक्षांत ठेवा. सुरवातीला होतें बुरशीचें रूप—केवळ सूक्ष्मदर्शक भिगांतूनच दिसूं शकेल अशी मामुली, सूक्ष्म बुरशी. महाशक्तीच्या

अनंत भांडारांतून हळूहळू शक्ति आत्मसात् करीत करीत कालाच्या ओघांत ती बुरशी आपलें रूप वा आपला आकार बदलते, होतां होतां उद्भिजाचें रूप धारण करते, त्या उद्भिजाचा पशु होतो, पशूचा मनुष्य होतो, आणि अखेर तो मनुष्य ईश्वरांत परिणत होऊन जातो. अर्थातच, प्रकृतीच्या नियमानुसार हें सारें घडावयास लक्षावधि वर्षें लागतात. पण अवधि अवधि तो काय ? प्रयत्नांचा, साधनेचा वेग वाढविल्यास हा अवधि कितीतरी कमी करतां येईल. योगी म्हणतात की, जी गोष्ट नैसर्गिकरीत्या सिद्ध व्हावयास सुदीर्घ काल लागतो, तीच गोष्ट, कार्याचा वेग वाढविल्यास कितीतरी कमी वेळांत सिद्ध होऊं शकते. ह्या विश्वान्तर्गत शक्तीच्या अनंत भांडारांतून थोडी थोडी शक्ति घेत घेत माणूस प्रगतीचा मार्ग आक्रमूं शकतो. अशा मंद गतीने चालल्यास त्याला देवजन्म लाभावयास कदाचित् लाख वर्षें लागतील. त्याहिपेक्षा उच्च अवस्था प्राप्त करून घेण्यास त्याला कदाचित् पांच लक्ष वर्षें लागतील. आणि पूर्णत्वलाभासाठी कदाचित् आणखी पांच लाख वर्षें लागतील. पण त्याने जर आपला उन्नतीचा वेग वाढविला तर हा अवधि कमी होईल. आणि जर नीट, कमर कसून प्रयत्न केला तर सहा महिन्यांत किंवा सहा वर्षांत हें पूर्णत्व कां प्राप्त करून घेतां येऊं नये ? ह्या बाबतींत, अमुक इतकाच समय लागेल अशी वेळेची मर्यादा नाही हें बुद्धीला सहज पटूं शकते. कल्पना करा की एखादें इंजिन कांही विशिष्ट कोळशावर ताशीं दोन मैल धावतें. अधिक कोळसा घालून जळण वाढविल्यास त्याला तेवढें अंतर जायला कमी वेळ लागेल. त्याचप्रमाणे, आपण जर आपला वेग वाढविला, आपली साधना प्रबळ, तीव्र केली तर याच जन्मांत आपल्याला पूर्णत्व कां प्राप्त करून घेतां येऊं नये ? अर्थातच, अखेर सर्वांनाच मुक्ति लाभणार आहे याबद्दल शंकाच नाही. पण त्यासाठी युगानुयुगें वाट बघत बसण्याची काय गरज ? ह्याच क्षणीं, ह्याच देहांत, ह्याच मनुष्यशरीरांत आपण ती कां प्राप्त करून घेऊं नये ? तें अनंत ज्ञान, ती अनंत शक्ति मला आत्ताच कां लाभूं नये ?

आत्म्याच्या उन्नतीचा वेग वाढवून कशा रीतीने अल्प कालावधींत मुक्तिलाभ करून घेतां येतो हें शिकविणेंच योगविद्येचें लक्ष्य आणि

उद्दिष्ट होय. समस्त मानवजात मुक्त होईल त्या वेळीं आपण मुक्त होऊं अशी सर्व मानवांच्या मुक्तीची वाट बघत थोडें थोडें पुढे न सरकतां, प्रकृतीच्या अनंत शक्तिभांडारांतून शक्ति आत्मसात् करण्याचें आपलें सामर्थ्य वाढवून शीघ्र मुक्तिलाभ कसा करून घेतां येतो ह्याचा उपाय योग्यांनी शोधून काढला आहे. जगांतील सर्व द्रष्टयांनी, साधुसंतांनी, ऋषींनी काय केलें ? साधारण मानव कोटी कोटी जन्मांमधे ज्या साऱ्या अवस्थांतून जाऊन मुक्त होत असतो, त्या सर्व अवस्था त्यांनी आपल्या एकाच आयुष्यांत ओलांडल्या,—मानवजातीचें अथपासून इतीपर्यंतचें सारें जीवन ते स्वतःच्या एका जीवनांतच जगले. एका जन्मांतच ते आपली मुक्ति साधून घेतात. दुसऱ्या कशाचाहि विचार मनांत न आणतां, दुसऱ्या कशांतहि आपल्या आयुष्याचा एक क्षणदेखील न दवडतां ते मुक्तिलाभाचा अवधि कमी करीत असतात—सत्वर मुक्ति प्राप्त करून घेत असतात. हें एकाग्रतेने साधत असतें. एकाग्रता म्हणजेच अनंत शक्तिभांडारांतील शक्ति आत्मसात् करून घेण्याचें सामर्थ्य वाढविणें आणि त्यायोगें मुक्तिलाभाचा अवधि कमी करणें. ही एकाग्रतेची शक्ति कशी प्राप्त करून घ्यावी हेंच राजयोग शिकवितो.

ह्या प्राणायामाचा भूतप्रेतविद्येशीं ( spiritualism शीं ) काय संबंध आहे ? ही भूतविद्याहि प्राणायामाचाच एक आविष्कार होय. मृतात्मे अस्तित्वांत असतात, फक्त आपण त्यांना पाहूं शकत नाहीं, इतकेंच. हें जर खरें असेल तर हेंहि संभवनीय आहे की तसले हजारो लाखो मृतात्मे आमच्याभोवती वावरत असावेत—आम्ही त्यांना पाहूं वा शिवूं शकत नाहीं, एवढेंच काय तें. आपण कदाचित् सततच त्यांच्यामधून जाणें-येणें करीत असूं. आणि हेंहि संभवनीय आहे की तेंहि आपल्याला पाहूं-स्पर्शूं शकत नसावेत. एखाद्या वर्तुळांत दुसरें वर्तुळ असावें तसला हा प्रकार—एका जगांत आणखी दुसरें जग. जे एकाच भूमीवर वा स्तरावर ( plane वर ) राहतात, तेच एकमेकांना पाहूं शकतात. आपल्याला पांच इंद्रियें आहेत, आणि आपल्या प्राणाचें कंपनहि एका विशिष्ट प्रकारचें आहे. ज्यांच्या प्राणाचें कंपन आपल्यासारखेंच आहे, त्यांनाच आपण बघूं शकूं. परंतु, ज्यांच्या प्राणाचें कंपन

आपल्या मानाने उच्च आहे असे जर कांही जीव असतील तर त्यांना आपण पाहूं शकणार नाहीं. प्रकाशाची उज्ज्वलता अतिशय वाढल्यास आपण तो पाहूं शकत नाहीं, पण तो अतिप्रखर प्रकाश पाहूं शकतील असे शक्तिसंपन्न डोळे असलेलेहि कांही प्राणी असूं शकतात. त्याचप्रमाणे, प्रकाशाचीं स्पंदनें जर अगदी मंद असतील तरी आपण पाहूं शकणार नाहीं, पण घुबड, मांजर वगैरे प्राण्यांना तो दिसतो. आमची दृष्टि या प्राण-कंपनाचा एक विशिष्ट प्रकारच पाहूं शकते. आपल्या ह्या वातावरणाचीच गोष्ट घ्या; त्याचे स्तरांवर स्तर आहेत, परंतु पृथ्वीच्या निकटचे स्तर हे वरच्या स्तरापेक्षा अधिक घन आहेत, आणि आपण जसजसें वर वर जाऊं, तसतसें वातावरण अधिकाधिक विरळ विरळ होत जाईल. किंवा समुद्राचें उदाहरण घ्या. समुद्रांत तुम्ही जसजसें खोल खोल जाल, तसतसा पाण्याचा दाब वाढत जाईल. जे प्राणी समुद्राच्या तळाशीं राहतात ते वर कधीच येऊं शकत नाहीत. ते तसें वर येतील तर तात्काळ फुटून मरतील.

अशी कल्पना करा की हें समस्त विश्व 'ईथर'चा एक समुद्र आहे. प्राणाच्या शक्तीने तो स्पंदित होत आहे, आणि त्या स्पंदनांच्या तीव्रतेमंदतेनुसार त्याचे एकानंतर एक असे अनेक स्तर आहेत. स्पंदनें जिथून निर्माण होतात त्या मध्यभागापासून जेवढें जेवढें दूर जाल तेवढीं तेवढीं स्पंदनें मंद मंद वा कमी कमी होत जातात, आणि जितकें जितकें त्याच्या जवळ जाल तितकीं तितकीं तीं वेगाने वा जलद जलद होतांना आढळतील. एकेका प्रकारचें वा गतीचें स्पंदन म्हणजे जणु त्या ईथर-सागराचा एकेक स्तर. आता अशी कल्पना करा की निरनिराळ्या गतींच्या स्पंदनांचे हे निरनिराळे स्तर एकमेकांपासून विलग करून त्यांच्या वेगवेगळ्या पातळ्या केल्या आहेत. एक पातळी अमुक लक्ष मैल विस्तृत असून तिच्यांतील स्पंदनांची गति अमुक एक आहे, दुसरी पातळी त्यापेक्षा अधिक वेगाच्या स्पंदनाची असून तिचा विस्तार अमुक लक्ष मैल आहे. याप्रमाणे अनेक पातळ्या असून, प्रत्येकीचा विशिष्ट विस्तार आहे आणि प्रत्येकींत विशिष्ट गतीचीं स्पंदनें चालूं आहेत. म्हणून असें संभवनीय आहे की, एका विशिष्ट गतियुक्त स्पंदनांच्या पातळीवर राहणारे लोक स्वतःच्या पातळीवरील एकमेकांना ओळख-

ण्यास समर्थ होतील, परंतु स्वतःच्या वरच्या पातळीवर वास करणाऱ्या लोकांना ते ओळखणार नाहीत. आता अशी कल्पना करा की हीं सगळीं स्पंदनक्षेत्रें मिळून एक वर्तुळ आहे. आत्मा त्याचें केंद्र असून जडद्रव्य (matter) हा सर्वांत दूरचा वा बाहेरचा स्तर आहे, व मन हा त्यापेक्षा जवळचा स्तर आहे. अशा रीतीने विचार केल्यास आढळून येईल की जे एकाच स्तरावर वास करतात ते त्या स्तरावरील परस्परांना ओळखूं शकतात, परंतु स्वतःच्या स्तराहून वेगळ्या स्तरांत राहणाऱ्यांना ओळखूं शकणार नाहीत. तथापि, दूरदर्शक आणि सूक्ष्मदर्शक यंत्रांच्या साहाय्याने ज्याप्रमाणे आपण आपल्या दृष्टीचें क्षेत्र वाढवूं शकतों,त्याचप्रमाणे योगाच्या मदतीने आपण स्वतःला आपल्याहून वेगळ्या स्पंदनांनी युक्त करून अन्य कोणत्याहि स्तरांत काय चाललें आहे हें जाणूं शकतों. अशी कल्पना करा की ही खोली अशा कांही जीवांनी भरलेली आहे की ते आपल्याला दिसूं शकत नाहीत. ते प्राणस्पंदनांच्या एका विशिष्ट पातळीवरील आहेत आणि आपण तीहून वेगळ्या पातळीवर राहणारे आहोंत. कल्पना करा की त्यांची पातळी जास्त जलद स्पंदनांची आहे आणि आपली पातळी त्या मानाने कमी वेगाच्या स्पंदनांची आहे. आपण जसे प्राण ह्या मूलवस्तूचे बनलेलों आहोंत, तसेच तेहि त्याच प्राणरूपी मूलवस्तूचे बनलेले आहेत. सर्वच त्या एका प्राणसमुद्रांतील बिंदु आहेत. त्यांच्यांत आणि आपल्यांत फरक आहे तो केवळ स्पंदनांच्या कमीअधिक वेगामुळे. मी जर स्वतःला अधिक जलद स्पंदनयुक्त करूं शकेन तर मग मी माझ्या ह्या सध्याच्या स्तरावरील रहिवासी राहणार नाहीं, लगेच मी त्या दुसऱ्या स्तरावरील रहिवासी होऊन जाईन. आणि मग मी तुम्हांला पाहूं शकणार नाहीं, तुम्ही माझ्या दृष्टीसमोरून अंतर्धान पावाल आणि त्या नव्या स्तरावरील जीव मला दिसायला लागतील. तुमच्यापैकी कित्येकांना बहुधा ह्याची प्रतीति आली असेल. मनाला जास्तजास्त वेगाच्या स्पंदनांनी युक्त करणाऱ्या ह्या साऱ्या प्रकाराला योगांत फक्त एकच शब्द वापरला आहे, तो म्हणजे—समाधि. उच्च स्पंदनांच्या ह्या सर्व अवस्था, मनाचीं जाणिवेपलीकडील स्पंदनें—हें सारें 'समाधि' ह्या एका शब्दांत अंतर्भूत होऊन जातें. दुय्यम प्रतीच्या समाधीच्या अवस्थांत आपल्याला हें

सूक्ष्म जीव वगैरे दिसूं शकतात. सर्वोच्च प्रकारच्या समाधींत आपल्याला वस्तूंच्या खऱ्या स्वरूपाचा—सत्यस्वरूप ब्रह्माचा साक्षात्कार होतो. त्या वेळीं आपल्याला, हे सर्व दर्जांचे जीव ज्या एका उपादानाचे घडले आहेत त्या उपादानाचें—त्या आदि कारणाचें ज्ञान होतें. "ज्याप्रमाणे एक मातीचा गोळा जाणल्याने मातीच्या बनलेल्या सर्व वस्तु जाणल्या जातात, त्याचप्रमाणे ब्रह्म जाणल्याने समस्त जगत् जाणलें जातें."

असो तर, याप्रमाणे आपल्याला दिसून येतें की भूतविद्येमधेंहि ( spiritualism मधेंहि ) जेवढा म्हणून सत्याचा भाग आहे त्या साऱ्याचा प्राणायामांत अंतर्भाव होऊन जातो. त्याचप्रमाणे, जेव्हा जेव्हा तुम्हांला दिसेल की एखादा पंथ वा संप्रदाय चमत्कार करूं शकण्याच्या शक्तीच्या, गूढ, गुप्त गोष्टींच्या मागे लागला आहे, तेव्हा तेव्हा जाणून असां की ते सगळे कांही प्रमाणांत वस्तुतः ह्या राजयोगाची साधना करीत आहेत, प्राणसंयमाचाच प्रयत्न करीत आहेत. जिथे कुठे म्हणून शक्तीचा असाधारण विकास झालेला आढळून येईल तिथे ती ह्या प्राणाचीच अभिव्यक्ति होय असें समजा. फार कशाला, भौतिक विज्ञानांचाहि प्राणायामांतच अंतर्भाव करतां येण्यासारखा आहे. वाफेचें यंत्र कशाने चालतें ? वाफेंतून कार्य करणाऱ्या प्राणाने. ह्या ज्या विद्युत् वगैरेंच्या अद्भुत क्रिया दिसतात, त्या प्राणाव्यतिरिक्त आणखी काय आहेत ? भौतिक विज्ञान म्हणजे तरी काय ? तें म्हणजे बाह्य उपायांनी साधावयाचा प्राणायाम, आणखी कांहीच नाहीं. प्राण जेव्हा मानसिक शक्तींच्या रूपाने अभिव्यक्त होतो तेव्हा मानसिक उपायांनीच त्याचा संयम करतां येतो. जो प्राणायाम प्राणाच्या भौतिक रूपांवर बाह्य उपायांद्वारा जय मिळविण्याचा यत्न करतो त्याला भौतिक शास्त्र म्हणतात. आणि ज्या प्राणायामांत प्राणाच्या मानसिक अभिव्यक्तींचा मानसिक उपायांनी संयम करण्याचा प्रयत्न केला जातो त्याला म्हणतात—**राजयोग**.

---

## प्रकरण चवथें

# प्राणाचें आध्यात्मिक रूप

योग्यांच्या मतें आपल्या मेरुदंडांत ( पाठीच्या कण्यांत ) इडा व पिंगला नामक दोन ज्ञानतंतूंचे प्रवाह असून, मेरुदंडांतील मज्जेच्या मध्यांतून जाणारा सुषुम्ना नांवाचा एक पोकळ मार्ग आहे. ह्या पोकळ मार्गाच्या खालच्या टोकाशीं, योगी ज्याला 'कुंडलिनीचें कमल' म्हणतात तें कुंडलिनीशक्तीचें निवासस्थान आहे. हें स्थान त्रिकोणाकृति आहे असें योगी त्याचें वर्णन करतात, आणि त्या ठिकाणीं कुंडलिनीशक्ति वेटोळीं घालून बसलेली आहे असें ते आपल्या रूपकात्मक, गूढ, यौगिक भाषेंत म्हणतात. ज्या वेळीं ही कुंडलिनी जागृत होते त्या वेळीं ती ह्या पोकळ मार्गानें ( सुषुम्नामार्गे ) वर चढण्याचा प्रयत्न करते. त्या प्रयत्नांत ती कुंडलिनी जशीजशी पायरीपायरीने वर चढत जाते तसतसे मनाचे जणु स्तरामागून स्तर उमलायला लागतात आणि योग्याला निरनिराळीं अलौकिक दर्शनें होऊं लागतात व अद्‌भुत शक्ति प्राप्त होतात. ही कुंडलिनी जेव्हा मेंदूंत जाऊन पोहोचते तेव्हा योगी शरीर आणि मन यांपासून संपूर्णपणें अलग होऊन जातो; स्वत:च्या मुक्त आत्मस्वरूपाचा त्याला साक्षात्कार होतो.

मेरुमज्जेची घडण एका विशिष्ट प्रकारची आहे हें आपण जाणतोंच. इंग्रजींतील आठ ( 8 ) हा आंकडा जर आडवा ( ∞ ) केला तर त्याचे दोन भाग असून ते मध्यभागीं एकमेकांशीं जुळलेले आहेत असें आढळून येईल. असे आडवे इंग्रजी आठ एकावर एक रचत गेल्याने जसें दिसेल तसा कांहीसा ह्या मेरुमज्जेचा आकार असतो असें म्हणतां येईल. डाव्या भागांत इडा असते, उजव्या भागांत पिंगला असते, आणि मधोमध असलेला पोकळ मार्ग म्हणजे सुषुम्ना होय. कमरेच्या भागांतील मणक्यांत जिथे मेरुमज्जा संपते तिथून एक अगदी बारीक सुतासारखा पदार्थ थेट खालपर्यंत जाऊन पोहोचतो. सुषुम्नेचा पोकळ मार्ग ह्या बारीक दोऱ्यामधूनहि जातो. अर्थातच, त्या दोऱ्यांत तो मार्गहि फारच बारीक असतो. ह्या मार्गाचें खालचें तोंड बंद असतें. ह्या मार्गाचें हें खालचें तोंड कमरेंतील एका ज्ञानतंतूंच्या जाळ्यापाशी

(sacral plexus जवळ) असतें. आधुनिक शरीरक्रियाशास्त्राच्या (Physiology च्या) मतें तें त्रिकोणाकृति असतें. ज्ञानतंतूंच्या असल्या भिन्नभिन्न जाळ्यांचीं केंद्रें ह्या मेरुमज्जेंत अवस्थित असून, त्यांनाच आपण योगशास्त्रांतील निरनिराळीं 'कमलें' म्हणूं शकूं.

योगीलोक म्हणतात की, सर्वांत खालच्या मूलाधार कमलापासून तों मेंदूंतील सहस्रार वा सहस्रदलांच्या शेवटच्या कमलापर्यंत मधे आणखी कित्येक केंद्रें आहेत. म्हणून, वर उल्लेखिलेलीं ज्ञानतंतूंचीं भिन्न भिन्न जाळीं (Plexus) म्हणजेच योगशास्त्रांतील हीं निर-निराळीं कमलें होत असें समजलें म्हणजे मग आपण ह्या योगीजनांचें म्हणणें आधुनिक शरीरक्रियाशास्त्राच्या अनुषंगाने अगदी सहज समजूं शकूं. आपण हें जाणतोंच की, आपल्या ज्ञानतंतूंची क्रिया दोन प्रकारची असते. एक अंतर्गामी असते व दुसरी बहिर्गामी असते, एक संवेदनामय असते व दुसरी गतिस्वरूप असते, एक केंद्राभिमुख असते व दुसरी केंद्रविमुख असते, एक मेंदूकडे संवेदना घेऊन जाते, आणि दुसरी मेंदूतून बाहेर इतर अवयवांना त्या संवेदना पोहचविते. अर्थातच हे समग्र क्रियाप्रवाह अखेर मेंदूशींच संबद्ध असतात. असो. आपण हें लक्षांत ठेवावयास हवें की ह्या सर्व केंद्रांपैकी सर्वांत खालचें मूला-धार, मेंदूतील सहस्रार आणि नाभिस्थानांतील मणिपूर हीं कमलें आपल्या विवेचनाच्या दृष्टीने महत्त्वाचीं आहेत. म्हणून तीं आपण विशेषत: ध्यानांत ठेवावयास हवींत.

आता, आपला विषय नीट आकलण्यासाठी, पदार्थविज्ञानांतील एक तत्त्व आपल्याला समजून घ्यावें लागेल. आपण सर्वजण विद्युत् आणि तिच्याशीं संबद्ध अशा आणखीहि कित्येक शक्तींविषयी ऐकत असतों. विद्युत् वस्तुत: काय आहे हें कुणालाच अवगत नाही. तथापि तिच्यासंबंधी आपण एवढेंच जाणतों की ती एक विशिष्ट प्रकारची गति आहे. विश्वामधे आणखीहि कितीतरी निरनिराळ्या गति आहेत. त्यांच्यांत आणि या विद्युत्मधे काय फरक आहे ? कल्पना करा की हें टेबल संचलन करीत आहे—त्याचे परमाणु भिन्नभिन्न दिशांनी संचलन करीत आहेत. जर त्या सगळ्यांना एकसारखें एकाच दिशेने संचालित केलें जाईल तर तेंच विद्युत्शक्तीचें रूप घेईल. समस्त परमाणु एकाच

दिशेने गतिमान झाल्यास तिलाच विद्युत्-गति म्हणतात. जर एखाद्या खोलींतील हवेचे समग्र परमाणु सतत एकाच दिशेने संचालित केले जातील तर त्याने ती खोली एक प्रचंड विद्युत्‌जनकयंत्र ( battery ) बनून जाईल.

आता येथे आपण शरीरक्रियाशास्त्रांतील एक तत्त्व लक्षांत घ्यावयास हवें. तें असें की, ज्ञानतंतूंचें जें केंद्र श्वासोच्छ्‌वासक्रिया करणाऱ्या अवयवांचें नियमन करीत असतें त्या ज्ञानतंतूंच्या विशिष्ट केंद्राचा इतर सर्वच ज्ञानतंतूंच्या क्रियांवरहि एकप्रकारचा अंमल चालत असतो. हें विशिष्ट केंद्र मेरुदंडांत छातीच्या विरुद्ध बाजूस वसलेलें असतें. तें श्वासोच्छ्‌वासक्रियेचें नियमन करतें आणि इतरहि जीं सारीं ज्ञानतंतुचक्रें आहेत त्यांच्यावरहि थोडाफार ताबा चालवितें.

आता आपल्याला प्राणायाम कां केला जातो हें कळू शकेल. प्रथमतः म्हणजे, श्वासोच्छ्‌वास जर तालबद्ध वा नियमित गतीने केला जाईल तर शरीरांतील सर्व परमाणु एकाच दिशेने गतिमान होऊं लागतील. नाना दिशांनी जाणारें मन ज्या वेळीं नाना दिशांना न विखुरतां एकाग्र होऊन दृढ इच्छाशक्तीचें रूप धारण करतें त्या वेळीं समस्त ज्ञानतंतूंची क्रियाहि बदलून त्यांच्या ठायीं एक प्रकारची विद्युत्‌गति निर्माण होते. कारण ज्ञानतंतूंत विद्युत्प्रवाहाचा संचार केल्यास त्यांच्या दोन्ही टोकांस दोन विरुद्ध शक्तींचा उद्भव होतो असें निदर्शनास आलें आहे. यावरून म्हणतां येतें की, इच्छाशक्ति ज्या वेळीं ज्ञानतंतूंच्या क्रियांत परिणत होते त्या वेळीं तिला एक विद्युत्प्रवाहासारखें रूप प्राप्त होतें. जेव्हा शरीरान्तर्गत समग्र गति संपूर्णपणें तालबद्ध वा नियमित होतात —एकाभिमुख होऊन जातात—तेव्हा तें इच्छाशक्तीचें जणु एक प्रचंड विद्युत्‌संचययंत्रच बनून जातें. ही असली प्रबल इच्छाशक्ति प्राप्त करून घेणेंच योग्याचें उद्दिष्ट असतें. याप्रमाणे प्राणायामाचें शरीरक्रियाशास्त्राच्या शब्दांत स्पष्टीकरण करतां येतें. प्राणायामाने शरीरामधे एकप्रकारची एकाभिमुख गति उत्पन्न होते, आणि श्वासोच्छ्‌वासकेंद्रावर ताबा मिळवून देऊन शरीरांतील इतर केंद्रेंहि वशीभूत करून घेण्यास तो आपल्याला मदत करतो. चालू संदर्भांत प्राणायामाचा उद्देश आहे —मूलाधारांत वेटोळीं घालून बसलेली कुंडलिनीशक्ति जागृत करणें.

आपण जें कांही पाहतों, ज्याची म्हणून कल्पना करतों वा जीं कोणतीं स्वप्नें बघतों तें सारें आपल्याला 'आकाशां'त (space मधे) अनुभवावें लागत असतें. हें म्हणजे आपलें नेहमीचें आकाश—ज्याला महाकाश म्हणतात तें भौतिक आकाश. योगी ज्या वेळीं दुसऱ्याचें विचार ओळखतो किंवा अलौकिक वस्तु बघतो त्या वेळीं तो तें एका निराळ्या प्रकारच्या आकाशांत बघत असतो. त्याला म्हणतात चित्ताकाश. आणि जेव्हा अनुभूति निर्विषय होऊन जाते आणि आत्म्याचें स्वस्वरूप प्रकट होतें तेव्हा त्याला म्हणतात चिदाकाश. ज्या वेळीं कुंडलिनी जागृत होते आणि सुषुम्नानाडींत प्रवेश करते त्या वेळीं जे सारे प्रत्यय येत असतात ते चित्ताकाशांतच येत असतात. आणि ज्या वेळीं ती कुंडलिनीशक्ति हा सुषुम्नामार्ग संपवून मेंदूत प्रवेश करते त्या वेळीं जी निर्विषय अनुभूति होत असते ती चिदाकाशांत होत असते.

विद्युत्शक्तीचाच दृष्टान्त पुन्हा घेऊं या. माणूस विद्युत्प्रवाह केवळ तारांच्या मदतीनेच एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पाठवूं शकतो.* परंतु निसर्गाला वा प्रकृतीला आपले प्रचंड शक्तिप्रवाह पाठविण्यासाठी तारांची गरज पडत नाही. यावरून हें सिद्ध होतें की कोणताहि शक्तिप्रवाह पाठविण्यासाठी तारांची वास्तविक कांही गरज नाही. तारांची मदत घेतल्याखेरीज शक्तिप्रवाह पाठविणें आपल्याला जमत नाही म्हणूनच तारांचा उपयोग करणें आपल्याला भाग पडतें. ही केवळ आमच्या असमर्थतेची बाब आहे. असो. विद्युत्शक्तीची उपमा घेऊन आपण म्हणूं शकतों की विद्युत्प्रवाह ज्याप्रमाणे तारांच्या साहाय्याने निरनिराळ्या ठिकाणीं पाठविला जातो, थेट त्याचप्रमाणे बाह्य विषयांचे जे संवेदनाप्रवाह मेंदूत पाठविले जातात आणि मेंदूतून जे आदेशप्रवाह बाहेर पाठविले जातात, ते सारे ह्या तारांसारख्या ज्ञानतंतूंच्या मदतीनेच आंत-बाहेर पाठविले जात असतात. मेरुमज्जेंतील संवेदनाशील आणि क्रियात्मक तंतुस्तंभांनाच योगी इडा आणि पिंगला म्हणत असतात. पूर्वी उल्लेखिलेले अंतर्गामी व बहिर्गामी प्रवाह मुख्यतः ह्याच दोन नाडीमार्गांनी संचार करीत असतात. आता मुद्दा

* येथे हें लक्षांत ठेवावयास हवें की हें विधान बिनतारी संदेश वगैरे पाठविण्याचा शोध लागण्याच्या पूर्वी केलेलें आहे.

असा आहे की तारांसारख्या वस्तूंचें ( ज्ञानतंतूंचें ) साहाय्य न घेतां मेंदूला कुठेहि संदेश पाठविणें आणि तद्वतच कुठलाहि संदेश ग्रहण करणें कां साधूं नये ? निसर्गांत असला प्रकार घडतांना आपण पाहतोंच ना ? योगी म्हणतो की जर तुम्हांला तें साधूं शकेल तर तुम्हीं जडाचीं बंधनें वा भौतिक बंधनें झुगारून दिल्यासारखें होईल. आता हें साधावयाचें कसें हा प्रश्न आहे. जर मेरुदंडाच्या मध्यांतून जाणाऱ्या सुषुम्नेमधून हा प्रवाह प्रवाहित करतां येईल तर हा प्रश्न सुटूं शकेल. मनानेच हें ज्ञानतंतूंचें जाळें तयार केलें आहे आणि त्यालाच तें छेदून टाकावें लागेल की जेणेंकरून तें 'तारां'शिवायच—ज्ञानतंतूंचें माध्यम न वापरतांच—काम करूं शकेल. तेव्हाच समस्त ज्ञान आपल्या हातीं येईल, देहाचें बंधन मग आणखी उरणार नाही. म्हणूनच सुषुम्नानाडी-वर ताबा मिळविणें इतकें महत्त्वाचें आहे. तुम्ही जर ह्या (सुषुम्नेच्या) पोकळ मार्गानें, ज्ञानतंतूंचा तारांसारखा उपयोग न करतांच, मानसिक प्रवाह संचारित करूं शकाल तर हा प्रश्न सुटलाच असें समजा. योगी म्हणतात की हें करणें शक्य आहे.

साधारण माणसांत ही सुषुम्ना खालच्या टोकाशीं बंद असते, तिच्यामधून कोणतेंहि कार्य चालत नाही. सुषुम्नेचें हें बंद द्वार उघडण्याची आणि तिच्यामधून संवेदनाप्रवाह संचारित करण्याची विशिष्ट साधनापद्धति योगी आम्हांला शिकवूं इच्छितात. बाह्य विषयाच्या संबंधाने उत्पन्न झालेली कोणतीहि संवेदना जेव्हा एखाद्या केंद्रांत जाऊन पोहोचते तेव्हा त्या केंद्रांत एक प्रतिक्रिया उद्भवते. तें केंद्र जर स्वयंसंचलनात्मक (automatic centre) असेल तर त्यांत उद्भवलेली असली प्रतिक्रिया फक्त गतीस जन्म देते. पण तें केंद्र संज्ञाकेंद्र (conscious centre) असेल तर त्या प्रतिक्रियेचें फल प्रथम ज्ञान आणि नंतर गति असें होतें. आपलें सर्वच ज्ञान बाहेरून आलेल्या क्रियेची प्रतिक्रिया या स्वरूपाचेंच असतें. असेंच असेल तर मग स्वप्नांत आपल्याला ज्ञान कसें होत असतें ? त्या वेळीं बाहेरची तर कोणतीहि क्रिया असत नाही. ह्याचा अर्थ एवढाच की विषयसंबंधजनित संवेदना-प्रवाह आपल्या शरीराच्या आंतच कुठे तरी अव्यक्तरूपांत बसत असतात. उदाहरणार्थ अशी कल्पना करा की मीं एक शहर पाहिलें. त्या

शहराचें मला झालेलें ज्ञान हें त्या शहरामधील बाह्य वस्तूंच्या संवेदनांनी माझ्यांत उद्भवलेल्या प्रतिक्रियांमधून झालेलें असतें. म्हणजेच, त्या शहरांतील बाह्य वस्तूंनी माझ्या अंतर्बाही ज्ञानतंतूंमधे जो प्रवाह निर्माण केला होता, त्याने माझ्या मेंदूतील परमाणूंत एक विशिष्ट गति निर्माण केली. आता, त्या प्रसंगानंतर बऱ्याच कालानेहि मी तें शहर आठवूं शकतों. ह्या स्मृतिकालींहि अगदी तशीच घटना घडत असते, फक्त मंद स्वरूपांत, इतकेंच. परंतु माझ्या मेंदूमधे, मंद स्वरूपांत का होईना, पण जिच्यामुळे तशींच कंपनें निर्माण झालींत ती क्रिया आता (स्मरणकालीं) कुठून आली ? मागे तें शहर प्रत्यक्ष पाहतांना वस्तूंच्या प्रत्यक्ष दर्शनाने झालेल्या संवेदना आताच्या (स्मरणकालीन) ह्या कंपनांचें कारण असणें अर्थातच शक्य नाही. यावरून हें सिद्ध होतें की बाह्य वस्तूंच्या संबंधामुळे निर्माण झालेल्या संवेदना ह्या माझ्या शरीरामधेच कुठेतरी वेटोळीं घालून अस्तित्वांत आहेत, आणि आता (स्मरणकालीं) त्यांचीच क्रिया होऊन माझ्या अशा स्मरणाच्या वा स्वप्नाच्या रूपाने त्यांची मंद प्रतिक्रिया घडते—मला स्मरणाचा वा स्वप्नाचा अनुभव येतो.

आता, या सर्व विषयसंबंधजनित संवेदनांचे हे असले अवशेष, म्हणजेच त्यांचे समस्त संस्कार, ज्या केंद्रांत जणु साठविलेले असतात त्या केंद्राला मूलाधार म्हणतात, आणि तिथे वेटोळीं घालून बसलेल्या ह्या क्रियाशक्तीला कुंडलिनी म्हणतात. ज्ञानतंतूंमधून प्रवाहित झालेल्या संवेदनाप्रवाहाचे अवशेष वा संस्कार जसे ह्या केंद्रांत संचित असतात तसेच ज्ञानतंतूंमधून प्रधावित होणाऱ्या गतिशक्तीचेहि अवशेष वा संस्कार ह्या केंद्रांतच साठविलेले असतात; कारण बाह्य विषयाच्या सखोल चिंतनाने वा ध्यानाने, जिथे हें मूलाधारचक्र अवस्थित आहे तो आपल्या शरीराचा भाग (बहुधा Sacral Plexus) गरम झालेला आढळतो. आता, ह्या वेटोळीं घालून झोपलेल्या कुंडलिनीशक्तीला जागृत आणि क्रियाशील करून जाणूनबुजून जर सुषुम्नानाडीमधून वर संचारित केलें तर त्या सुषुम्नामार्गांतील एकेका केंद्रावर वा कमलावर ती कुंडलिनीशक्ति क्रिया करीत जात असतांना प्रचंड प्रतिक्रिया निर्माण होतील. ज्या वेळीं ह्या कुंडलिनीशक्तीचा अगदी थोडासा अंश एखाद्या

ज्ञानतंतूमधून प्रवाहित झाल्यामुळे विभिन्न केंद्रांमधे प्रतिक्रिया निर्माण होते त्या वेळीं स्वप्न किंवा कल्पना आपल्या अनुभवास येत असतात. परंतु ज्या वेळीं ही बहुकालसंचित प्रचंड कुंडलिनीशक्ति दीर्घकालीन ध्यानाभ्यासाने जागी होऊन सुषुम्नामार्गाने वर चढूं लागते आणि त्या सुषुम्नामार्गातील केंद्रांवर आघात करूं लागते त्या वेळीं ज्या प्रतिक्रिया निर्माण होतात त्या फारच वेगळया आणि विलक्षण असतात. त्या प्रतिक्रिया स्वप्नकालीन वा कल्पनाकालीन प्रतिक्रियांहून तर अनंतपट श्रेष्ठ असतातच, पण त्या जागृतिकालीन विषयज्ञानाच्या प्रतिक्रियांहूनहि अनंतपट प्रबल आणि तीव्र असतात. ती अनुभूति अतींद्रिय अनुभूति असते. आणि ज्या वेळीं ती कुंडलिनीशक्ति समस्त संवेदनांची राजधानीच अशा मेंदूंत जाऊन थडकते त्या वेळीं जणु समग्र मेंदूत, त्याच्या संवेदनाशील प्रत्येक परमाणूंत प्रतिक्रिया निर्माण होते; आणि ह्या असल्या प्रतिक्रियेचें फल म्हणजेच—ज्ञानदीप्तीचा संपूर्ण प्रकाश अथवा आत्मानुभूति. ही कुंडलिनीशक्ति जसजशी सुषुम्नापथावरील एक केंद्र ओलांडून दुसऱ्या केंद्रांत जाते तसतसे मनाचे जणु पडद्यामागून पडदे बाजूस सरूं लागतात आणि योग्याला ह्या विश्वाच्या सूक्ष्म वा कारण-अवस्थेची उपलब्धि होऊं लागते. केवळ तेव्हाच ह्या जगाच्या—विषय-संवेदनांच्या आणि त्यांच्या प्रतिक्रियांच्या—कारणांच्या खऱ्या स्वरू-पाचें ज्ञान होतें; म्हणून तेव्हाच आपल्याला सर्व वस्तूंचें पूर्ण ज्ञान लाभतें. कारणांचें ज्ञान झाल्यावर कार्यांचें ज्ञान होईलच होईल यांत काय संशय ?

यावरून दिसून येतें की, कुंडलिनी जागृत करणें हाच दिव्य बोध, ज्ञानातीत अनुभूति वा आत्मसाक्षात्कार करून घेण्याचा एकमेव मार्ग आहे. ही कुंडलिनी जागृत करण्याचे निरनिराळे उपाय आहेत. कुणाची कुंडलिनी नुसत्या भगवत्प्रेमबलानेच जागृत होते, कुणाची कुंडलिनी सिद्ध महापुरुषांच्या कृपेने जागृत होते, तर विश्लेषणात्मक सूक्ष्म ज्ञान-विचाराद्वारा कुणाकुणाची कुंडलिनी जागृत होते. लोक ज्याला अ-लौकिक शक्ति वा ज्ञान म्हणत असतात तें कुणाच्याहि ठिकाणीं कोण-त्याहि प्रमाणांत प्रकट झालेलें जेव्हा जेव्हा आढळेल तेव्हा तेव्हा जाणून असां की ह्या कुंडलिनीशक्तीचा थोडाफार प्रवाह सुषुम्नेमधे शिरला

असलाच पाहिजे. फक्त, असल्या अधिकांश घटनांच्या बाबतींत असें घडलेलें असतें की ती व्यक्ति अजाणतां अकस्मात् अशी एखादी साधना करून बसते की जिच्यामुळे तिच्या नकळत कुंडलिनीशक्तीचा थोडासा अंश मोकळा होऊन सुषुम्नेंत शिरला असतो. उपासनेचा कोणताहि प्रकार असो, कळत नकळत त्याने ही एकच गोष्ट साधत असते—त्याने ही कुंडलिनीशक्ति जागृत केली जात असते. आपली प्रार्थना बाहेरून सफळ होत आहे असें जो माणूस समजत असतो त्याला माहीत नसतें की तें फळ त्याला त्याच्या आंतूनच लाभलेलें आहे—त्याच्या त्या प्रार्थनामय विशिष्ट मनोवृत्तीद्वारें तो त्याच्या स्वत:तच सुप्त असलेल्या अनंत शक्तीचा एक अंश जागृत करूं शकला आहे. याप्रमाणे, माणूस अजाणतां जिची नाना नांवांनी, भीतीने, कष्टपूर्वक उपासना करतो तिच्यासंबंधी योगीजन जगाला ललकारून सांगतात की, ती हीच जिवंत कुंडलिनी-शक्ति असून ती प्रत्येक व्यक्तीमधे वसत आहे आणि तिच्यापर्यंत कसें पोहोचावें हें अवगत असल्यास ती शाश्वत सुखाची जननी ठरते. सारांश, राजयोग हें धर्माचें 'विज्ञान' होय—विभिन्न उपासना, विभिन्न प्रार्थना, विभिन्न अनुष्ठानें, विभिन्न साधनापद्धति आणि चमत्कार ह्या साऱ्यांचें तर्कसंगत स्पष्टीकरण होय.

---

## प्रकरण पांचवें

## अध्यात्म प्राणाचा संयम

आता आपल्याला प्राणायामाच्या विभिन्न क्रियांचें विवरण करावयाचें आहे. आपण बघितलेंच आहे की, योग्यांच्या मताने प्राणायाम-साधनेची पहिली पायरी फुप्फुसांच्या क्रियेवर ताबा मिळविणें ही होय. आपला उद्देश आहे—आपल्या शरीरांत ज्या साऱ्या सूक्ष्मसूक्ष्म गति चालू आहेत त्यांचा प्रत्यय घेणें. आमचीं मनें अगदी बहिर्मुख होऊन बसलीं आहेत, त्यामुळे त्यांना आंतमधील सूक्ष्मसूक्ष्म गतींचा प्रत्यय येईनासा झाला आहे. आपल्याला जर त्यांचा प्रत्यय येऊं शकेल तर आपण त्यांच्यावर ताबा मिळवूं शकूं. हे ज्ञानतंतुगत शक्तिप्रवाह आपल्या शरीरांत सर्वत्र संचार करीत आहेत, प्रत्येक स्नायूला जीवन आणि बल पुरवीत आहेत, पण आपल्याला त्या शक्तिप्रवाहांचा प्रत्यय मात्र

येत नाही. योगी म्हणतात की प्रयत्न केल्यास आपण त्यांचा प्रत्यय घेण्यास शिकूं शकतों. हा प्रयत्न कसा करावयाचा? त्यासाठी आधी आपल्याला फुप्फुसांच्या गतीचें नियमन करण्याचा यत्न करावा लागेल. आवश्यक तेवढा काल तो केल्यास आपण मग अधिकाधिक सूक्ष्म गतींचेंहि नियमन करूं शकूं — त्या सूक्ष्मतर गतींवरहि ताबा मिळवूं शकूं.

असो तर, आता आपण प्राणायामांतील क्रियांकडे वळूं या. त्यासाठी स्वाभाविकपणें बसा. शरीर अगदी सरळ ठेवा. मेरुमज्जा ही मेरुदंडाला आंतून चिकटलेली नसली तरी ती त्याच्या आंतच अवस्थित असते. म्हणून, तुम्ही जर सरळ न बसतां वाकून बसाल तर मेरुमज्जा चाळविली जाईल. ती अगदी स्वाभाविक अवस्थेंत, मोकळी राहील असें बसावयास हवें. वाकून बसून ध्यान करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे स्वत:ला इजाच करून घेणें होय. शरीराचे तीन भाग--छाती, मान आणि डोकें—सदा एका रेषेंत अगदी सरळ राखावयास हवेत. थोड्याशा सवयीने हें अगदी श्वासोच्छ्वासाप्रमाणे सोपें, स्वाभाविक होऊन जाईल. यानंतरची गोष्ट म्हणजे ज्ञानतंतूंवर ताबा मिळविण्याचा यत्न करावा लागेल. आपण मागे पाहिलेंच आहे की, ज्ञानतंतूंचें जें केंद्र श्वासोच्छ्वासाच्या अवयवांचें नियमन करीत असतें त्या केंद्राचा इतर ज्ञानतंतूंवरहि एक प्रकारचा ताबा चालत असतो, आणि म्हणूनच श्वासोच्छ्वास तालबद्ध करणें आवश्यक आहे. आपण सर्वसाधारणपणें ज्या तऱ्हेने श्वास घेत असतों आणि सोडत असतों त्याला श्वासोच्छ्वास हें नांव देणेंच योग्य नाही, इतका तो अनियमित असतो! याखेरीज, स्त्रियांच्या आणि पुरुषांच्या श्वासोच्छ्वासांत कांही नैसर्गिक फरक असतो.

प्राणायामसाधनेंतील पहिली क्रिया म्हणजे मोजक्या प्रमाणांत श्वास आंत घेणें आणि मोजक्या प्रमाणांत तो बाहेर सोडणें एवढीच होय. त्याने आपल्या शरीरांत एक प्रकारची छंदोबद्धता वा लय निर्माण होईल. ह्याचा कांही दिवस अभ्यास केल्यानंतर, याप्रमाणे श्वास घेतांना आणि सोडतांना मनांतल्या मनांत ॐ किंवा दुसरा एखादा पवित्र शब्द उच्चारीत गेल्यास चांगलें होईल. भारतांत आम्ही प्राणायामाच्या वेळीं श्वास घेतांना आणि सोडतांना एक, दोन, तीन, चार असें न मोजतां

कांही प्रतीकात्मक वा सांकेतिक शब्दांचा उपयोग करीत असतों. म्हणूनच मी तुम्हांला प्राणायाम करतांना ॐ किंवा असाच एखादा पवित्र शब्द मनांतल्या मनांत उच्चारावयास सांगत आहें. अशी कल्पना करीत चला की तो शब्द श्वासाच्या तालावर श्वासाबरोबर बाहेर जात आहे आणि आंत येत आहे—श्वास, उच्छ्वास आणि त्या शब्दाचा उच्चार यांत लय साधू द्या. असें केल्याने तुमचें सगळें शरीर हळूहळू सम वा लयबद्ध होत असल्याचें तुमच्या प्रत्ययास येईल. मग तुम्हांला खरी विश्रांति म्हणजे काय हें कळेल. त्या विश्रांतीच्या तुलनेने झोप ही मुळी विश्रांतिच नव्हे. एकदा तशी ती विश्रांति लाभल्यास अत्यंत थकलेले ज्ञानतंतूहि शांत होतील, आणि तुमचें तुम्हांलाच आढळून येईल की ह्यापूर्वी तुम्हीं खऱ्याखऱ्या विश्रांतीचें सुख कधी उपभोगलेंच नव्हतें.

ह्या साधनेचें पहिलें दृश्यफल म्हणजे तुमच्या चेहऱ्याचा भावच बदलून जाईल. चेहऱ्याला शुष्कता, उग्रता किंवा कठोरता आणणाऱ्या रेषा नाहीशा होतील. मनांतील शांति चेहऱ्यावर उमटेल. त्यानंतर म्हणजे तुमचा आवाज सुरेख होईल. मीं अजून कधी योग्याचा आवाज कर्कश असलेला पाहिला नाही. कांही महिन्यांच्या साधनेनंतर हीं लक्षणें दिसूं लागतात. याप्रमाणे वरील प्रकारच्या प्राणायामाचा कांही दिवस अभ्यास केल्यानंतर ह्याच्या वरच्या पायरीवर तुम्हांला चढावें लागेल— ह्यापेक्षा अमळ उच्च अशा क्रियेचा अभ्यास करावा लागेल. ती क्रिया अशी : इडेने म्हणजे डाव्या नाकपुडीने हळूहळू श्वास घेऊन फुप्फुसें भरा. त्याबरोबरच ज्ञानतंतूंच्या प्रवाहावरहि मन केंद्रित करा; अशी कल्पना करा की, तुम्ही जणु ज्ञानतंतु-प्रवाह मेरुमज्जेच्या खालच्या टोकाला प्रेरित करून कुंडलिनीशक्तीला आधारभूत असलेल्या मूलाधारात्मक त्रिकोणाकृति पद्मावर खूप जोराने आघात करीत आहांत; त्यानंतर तो ज्ञानतंतु-प्रवाह त्याच ठिकाणीं कांही वेळ स्थिर ठेवा. त्यानंतर मग अशी कल्पना करा की तो ज्ञानतंतु-प्रवाह तुम्ही श्वासाबरोबर दुसऱ्या बाजूने म्हणजे पिंगलेने हळूहळू वर ओढीत आहांत. त्यानंतर उजव्या नाकपुडीने वायु हळूहळू बाहेर सोडा. ह्या क्रियेचा अभ्यास करणें तुम्हांला अमळ जड जाईल. सगळ्यांत सोपी क्रिया आहे—आंगठ्याने

उजवी नाकपुडी बंद करा. मग डावीने हळूहळू वायु आंत घ्या. नंतर आंगठा आणि तर्जनी यांनी दोन्ही नाकपुड्या बंद करा आणि अशी कल्पना करा की तुम्ही ज्ञानतंतु-प्रवाह खाली प्रेरित करीत असून सुषुम्नेच्या मुळावर आघात करीत आहांत. त्यानंतर आंगठा दूर करा आणि उजव्या नाकपुडीने वायु बाहेर निघून जाऊं द्या. त्यानंतर तर्ज-नीने डावी नाकपुडी बंद करून उजवीने वायु हळूहळू आंत घ्या, आणि मग मघाप्रमाणे दोन्ही नाकपुड्या बंद करा. हिंदु ज्या तऱ्हेने ही क्रिया करतात त्या तऱ्हेने ती करणें ह्या देशांतील (अमेरिकेंतील) लोकांना फार अवघड जाईल, कारण हिंदु लहानपणापासूनच ती करीत आले असतात आणि त्यामुळे त्यांच्या फुप्फुसांना त्या साऱ्याची सवय झालेली असते. इथे (अमेरिकेंत) चार सेकंदांपासून सुरू करून प्राणायामाचा काल हळूहळू वाढवीत जाणेंच उचित होईल. चार सेकंद वायु आंत घ्या, सोळा सेकंद तो आंत ठेवा, आणि आठ सेकंदांत तो बाहेर सोडा. इतकें मिळून (पूरक, कुंभक आणि रेचक मिळून) एक प्राणायाम होतो. मात्र ह्याच वेळीं मूलाधारांतील त्रिकोणाकृति पद्मावर मन केंद्रित करण्यास विसरूं नये. ही कल्पना तुम्हांला साधनेंत बरेंच साहाय्य करील. आणखी एक प्रकारचा (तिसऱ्या प्रकारचा) प्राणायाम आहे तो असा:--हळूहळू श्वास आंत घ्या, नंतर मुळीच न थांबतां लगेच तो हळूहळू बाहेर सोडून थोडा वेळ तो बाहेरच रोधून धरा; संख्या पूर्वीच्या प्राणायामासारखीच मोजा. पूर्वीच्या प्राणायामांत आणि ह्या प्राणायामांत फरक इतकाच की पूर्वीच्या प्राणायामांत श्वास आंत रोधला असतो आणि ह्या प्राणायामांत श्वास बाहेर रोधायचा असतो. हा शेवटीं सांगितलेला प्राणायाम पूर्वीच्या प्राणायामापेक्षा सोपा आहे. ज्या प्राणायामांत श्वास आंत रोधावयाचा असतो तो प्राणायाम फार जास्त करणें चांगलें नाही. सुरवातीला तो फक्त सकाळीं चार वेळ आणि संध्याकाळीं चार वेळ करा. नंतर मग हळूहळू त्याच्या वेळा आणि संख्या वाढवूं शकतां. हळूहळू तुम्हांला आढळून येईल की तुम्हांला तो अगदी सहज जमतो आहे आणि तो करण्यांत तुम्हांला खूप आनंद पण वाटत आहे. म्हणून तो तुम्हांला अगदी सहज साधत आहे असें प्रत्ययास आल्यानंतर खूप काळजीपूर्वक आणि सावधानतेने त्याची

संख्या वाढवून चाराऐवजी सहा करा. तो अनियमितपणें केल्यास तुमचें अनिष्ट होणें शक्य आहे.

नाडीशुद्धीसाठी वर ज्या तीन क्रिया वर्णिल्या आहेत त्यांपैकी पहिली आणि शेवटची क्रिया कठीणहि नाही आणि धोक्याची पण नाही. त्यांतील पहिल्या क्रियेचा तुम्ही जितका अभ्यास कराल तितकें तुम्ही अधिकाधिक शांत व्हाल. त्या क्रियेला ॐकाराची जोड द्या. तुम्हांला आढळून येईल की, इतर कामें करीत असतांनाहि तुम्ही ती प्रक्रिया करूं शकत आहांत. ही क्रिया केल्याने तुम्हांला सर्वच बाबतींत चांगलें वाटूं लागेल. असें करतां करतां एखाद्या दिवशीं तुम्ही जर ती क्रिया खूपच अधिक कराल तर तुमची कुंडलिनी जागी होईल. जे लोक दिवसांतून एकदा वा दोनदा तिचें अनुष्ठान करतात त्यांना फक्त देहाचा आणि मनाचा अमळ शांतभाव व सुरेख आवाज लाभेल, इतकेंच. परंतु जे अगदी कमर कसून साधनेंत पुढे जाण्याचा यत्न करतील, केवळ त्यांचीच कुंडलिनी जागृत होईल; त्यांच्या दृष्टीला समस्त प्रकृति एका नव्याच रूपांत दिसूं लागेल, ज्ञानाचें दार त्यांना मोकळें होईल. तेव्हा मग ज्ञानासाठी तुम्हांला पुस्तकांकडे धांव घ्यावी लागणार नाही. तुमचें मनच मग तुमच्यापक्षीं अनंत ज्ञान भरलेलें पुस्तक होऊन बसेल. असो. मेरुदंडाच्या दोन्ही बाजूंनी प्रवाहित होणाऱ्या इडा आणि पिंगला नामक शक्तिप्रवाहांविषयी, आणि मेरुमज्जेच्या मध्यांतून जाणाऱ्या सुषुम्नेविषयी मीं तुम्हांला आधीच सांगितलें आहे. ह्या तिन्ही ——इडा, पिंगला आणि सुषुम्ना——प्रत्येक प्राण्यांत विद्यमान आहेत. ज्यांना ज्यांना म्हणून मेरुदंड आहे त्यांच्या त्यांच्या ठायीं हे तीन निरनिराळ्या क्रियांचे मार्गहि आहेतच. परंतु योगी म्हणतात की साधारण जीवांत वा माणसांत ही सुषुम्ना बंद असते, तिचें कसल्याहि प्रकारचें कार्य प्रत्ययास येत नाही, परंतु इडा आणि पिंगला ह्या दोन नाड्यांचें शरीराच्या निरनिराळ्या भागांत शक्ति घेऊन जाण्याचें कार्य मात्र सर्वच प्राण्यांत चाललेलें आढळून येतें.

केवळ योग्याचीच ही सुषुम्ना मोकळी असते. ह्या सुषुम्नेचें द्वार उघडें होऊन ज्या वेळीं तिच्यांतून ज्ञानतंतुगत शक्तिप्रवाह वर चढूं लागतो त्या वेळीं आपलें चित्तहि अधिकाधिक उच्च भूमीवर आरूढ

होऊं लागतें, आपण त्या वेळीं अतींद्रिय राज्यांत प्रवेश करतों. आपल्या मनाला त्या वेळीं इंद्रियातीत वा संज्ञातीत वा पूर्ण चैतन्याची अवस्था प्राप्त होते. आपण त्या वेळीं बुद्धीच्या पलीकडील प्रदेशांत निघून जातों, आपण त्या वेळीं अशा एका स्थानीं गेलेलों असतों की जिथे तर्क पोहोचूं शकत नाही. हा सुषुम्नामार्ग मोकळा करणें हेंच योग्याचें एकमेव उद्दिष्ट असतें. पूर्वी उल्लेखिलेलीं केंद्रें, किंवा आलंकारिक भाषेंत म्हणावयाचें म्हणजे कमलें ह्या सुषुम्नामार्गावरच एकानंतर एक अवस्थित आहेत असें योगी म्हणतात. ह्या कमलांतील सगळ्यांत खालचें कमल या सुषुम्नेच्या खालच्या टोकाशीं असून त्याला मूलाधार म्हणतात. त्याच्या वरच्या कमलाला स्वाधिष्ठान म्हणतात. त्यावरच्या तिसऱ्या कमलाला म्हणतात मणिपूर, चवथ्याला म्हणतात अनाहत, पांचव्याला म्हणतात विशुद्ध, सहाव्याला आज्ञा, आणि मेंदूंत असलेल्या शेवटच्या म्हणजे सातव्या, हजार पाकळ्यांच्या कमलाला म्हणतात सहस्रार. यांपैकी सध्या आपल्याला फक्त दोनच केंद्रें वा चक्रें लक्षांत घ्यावयाचीं आहेत; तीं म्हणजे सर्वांत खालचें मूलाधार चक्र आणि सर्वांत वरचें सहस्रार चक्र. समस्त शक्ति सगळ्यांत खालच्या चक्रांत म्हणजे मूलाधारांत वसत असून, तिला तिथून मेंदूंतील सर्वांत वरच्या चक्रांत म्हणजे सहस्रारांत न्यावयाचें आहे. योगीलोक म्हणतात की मानवी शरीरांत जितक्या शक्ति वास करीत आहेत त्या सगळ्यांत ओज नामक शक्ति सर्वांत श्रेष्ठ आहे. हें ओज मेंदूंत साठलेलें असतें. ज्याच्या मेंदूंत हें ओज जितक्या अधिक प्रमाणांत साठलेलें असतें तितका तो शक्तिमान, बुद्धिमान आणि आध्यात्मिकदृष्ट्या अधिक बलवान असतो. एखादा माणूस सुंदर भाषेंत सुंदर विचार व्यक्त करीत असतो, पण लोकांवर त्यांचा प्रभाव पडत नाही. दुसऱ्या एखाद्या माणसाची भाषाहि सुंदर नसेल आणि विचारहि सुंदर नसतील, पण त्याच्या शब्दांची लोकांना मोहिनी वाटते. हा ओजाचा प्रभाव आहे. तो ओजःसंपन्न पुरुष जें म्हणून कार्य करील त्यांत महाशक्ति प्रकट होतांना दिसेल. त्याची प्रत्येक हालचाल शक्तिपूर्ण असते.

आता, प्रत्येक माणसांत हें ओज कमीअधिक प्रमाणांत संचित असतें. आपल्या शरीरामधे जितक्या म्हणून शक्ति खेळत आहेत त्या

साऱ्यांचा सर्वांत श्रेष्ठ विकास ओजच होय. आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे की, हा सर्व एका शक्तीचें दुसऱ्या शक्तींत केवळ रूपान्तर होण्याचा प्रकार आहे. जी शक्ति बाहेर विद्युत्शक्तीच्या वा चुंबकशक्तीच्या रूपानें कार्य करीत आहे तीच हळूहळू आंतील शक्तीच्या रूपांत रूपान्तरित होईल, स्नायुगत शक्ति ओजांत परिणाम पावेल. योगी म्हणतात की माणसामधील जी शक्ति कामक्रिया, कामचिंतन इत्यादि रूपांनी व्यक्त होत असते ती जर रोधली गेली, तिचें दमन केलें गेलें तर ती अगदी सहजरीतीने ओजांत परिणत होते. आणि मूलाधार नामक केंद्र ह्या शक्तीचें नियमन करीत असतें, म्हणून योगी त्या केंद्राकडे विशेष लक्ष पुरवीत असतो. ह्या सगळ्याच्या सगळ्या कामशक्तीला ओजांत परिणत करण्याचा त्याचा प्रयत्न असतो. केवळ कामजयी स्त्री-पुरुषच हें ओज निर्माण करून तें मेंदूंत संचित करूं शकत असतात. म्हणूनच ब्रह्मचर्य हा सर्वत्र सदा सर्वश्रेष्ठ धर्म मानला गेला आहे. कामाला थारा दिल्याने, कामाला बळी पडल्याने धर्मभाव नाहीसा होतो, मनाचें तेज आणि चारित्र्यबल यांना माणूस पारखा होतो ह्याचा कुणालाहि सहज प्रत्यय येण्यासारखा आहे. ह्याच कारणास्तव असें आढळून येतें की जगांत ज्या ज्या धर्मसंप्रदायांत मोठेमोठे धर्मवीर उदयास आले आहेत ते ते संप्रदाय ब्रह्मचर्यावर विशेष जोर देत असतात. म्हणूनच विवाहत्यागी संन्यासी निर्माण झाले आहेत. हें ब्रह्मचर्य कायावाचामनाने पूर्णपणें पाळलें गेलें पाहिजे. ब्रह्मचर्य न पाळतां राजयोगाची साधना करणें धोक्याचें आहे, तशाने अखेर वेडहि लागणें शक्य आहे. एकीकडे राजयोगाचा अभ्यास चालला आहे आणि दुसरीकडे अपवित्र जीवन घालविणें चाललें आहे अशाने कुणी योगी होण्याची कशी बरें शक्यता आहे ? अशाच्या पदरीं अखेर निराशाच पडणार.

---

## प्रकरण सहावें

# प्रत्याहार व धारणा

यानंतरची पायरी म्हणजे प्रत्याहार. राजयोग्याला प्राणायामानंतर प्रत्याहाराची साधना करावयाची असते. हा प्रत्याहार म्हणजे

काय ? विषयानुभूति कशी होत असते हें तुम्हांला माहीत आहेच. पहिल्या प्रथम येतात, हीं आपलीं इंद्रियद्वारें. त्यानंतर आहेत—ह्या बाह्य इंद्रियद्वारांमागील आंतलीं इंद्रियें — हीं मेंदूतील केंद्रांच्या मदतीने शरीराच्या आंत कार्य करीत असतात. आणि त्यानंतर म्हणजे मन. ज्या वेळीं हीं तिन्हीं एकत्रित होऊन बाहेरील एखाद्या वस्तूशीं त्यांचा संबंध येतो त्याच वेळीं आपल्याला त्या वस्तूचें ज्ञान होतें—ती आपल्या अनुभवास येते. पण त्याचबरोबर, मन एकाग्र करून कोणत्यातरी फक्त एकाच इंद्रियाशीं संयुक्त करणें अत्यंत कठीण आहे, कारण मन (विषयांचें) गुलाम आहे.

साऱ्या जगभर 'चांगले व्हा' 'चांगले व्हा' 'चांगले व्हा' हा उपदेश दिला जातांना आपण ऐकतों. आपल्या ह्या जगांतील कोणत्याहि देशांत असें मूल अजून जन्माला आलें नसेल की ज्याला 'चोरी करूं नकोस,' 'खोटें बोलूं नकोस' ही शिकवण दिली गेली नसेल; परंतु ह्या साऱ्या कुकर्मांपासून परावृत्त होण्याचा उपाय मात्र त्याला कुणीहि शिकवत नसतो. नुसत्या उपदेशाने काय होणार ? त्या बिचाऱ्याने चोर कां होऊं नये ? आपण तर त्याला चोरीपासून परावृत्त होण्याचा उपाय शिकवत नाहीं, फक्त 'चोरी करूं नकोस' एवढेंच त्याच्या कानीं-कपाळीं ओरडत असतों. परंतु मन कसें आवरावें हें आपण त्याला जेव्हा शिकवूं तेव्हाच आपण त्याला खरें साहाय्य केल्यासारखें होईल, आणि तरच त्याचा फायदा होईल. ज्यांना इंद्रिय म्हणतात त्या निरनिराळ्या शक्तिकेंद्रांशीं मन जेव्हा जोडलें जातें तेव्हाच आंतील म्हणा की बाहेरील म्हणा, कोणतेंहि कर्म घडत असतें. इच्छेने म्हणा की अनिच्छेने म्हणा, मन त्या साऱ्या (इंद्रिय नामक) केंद्रांकडे ओढलें जाऊन त्यांच्याशीं संयुक्त होऊन जातें, आणि त्यामुळेच लोक नानातऱ्हेचीं अविचाराचीं, मूर्ख कृत्यें करून बसतात नि कष्ट पावतात. तेंच जर त्यांचें मन त्यांच्या ताब्यांत असतें तर त्यांनी तीं कृत्यें कदापि केलीं नसतीं. मनाला ताब्यांत ठेवल्याने, ह्या मनःसंयमाने काय साधेल? त्याने हेंच साधेल की मन इंद्रिय नामक निरनिराळ्या विषयानुभूति-केंद्रांशीं संयुक्त होणार नाही. साहजिकच मग साऱ्या भावना आणि विचार आपल्या कह्यांत राहतील. येथपर्यंत तर सर्वकांही स्पष्ट आहे.

आता प्रश्न असा की हें प्रत्यक्षांत शक्य आहे काय ? याला उत्तर असें की, होय तें शक्य आहे, अगदी संपूर्णपणें शक्य आहे. आजच्या ह्या जमान्यांतहि तुम्हांला ह्याची थोडी चुणूक दिसून येईल---विश्वासाच्या शक्तीने रोग बरे करणारे लोक दु:ख, कष्ट, अशुभ वगैरेंचें अस्तित्वच नाकबूल करायला शिकवत असतात. त्यांचा मार्ग कदाचित् आडवळणाचा असेल, परंतु ते जें सांगतात तो मात्र योगाचाच एक भाग आहे. अजाणतां कसातरी त्यांना तो मार्ग अचानक सापडून गेला असतो. दु:ख नाकबूल करायला शिकवून ते ज्या वेळीं एखाद्याचें दु:ख नाहीसें करूं शकतात त्या वेळीं वस्तुत: ते त्या दु:खी माणसाला थोडासा 'प्रत्याहार'च शिकवीत असतात; कारण ते त्या दु:खी माणसाचें मन इतकें सबळ करतात की तेणेंकरून तो माणूस इंद्रियांचे अनुभव खुशाल दुर्लक्षूं शकतो. मोहिनीविद्या जाणणारेहि अशाच रीतीने, सूचनांच्या द्वारें रोग्यांत तेवढ्या वेळेपुरता एक प्रकारचा अस्वाभाविक 'प्रत्याहार' जागवीत असतात. मोहिनीविद्येचा प्रयोग करणाऱ्यांच्या तथाकथित सूचना ह्या फक्त दुबळ्या मनांवरच कार्य करूं शकतात. मोहिनीविद्येचा प्रयोग करणारा जोंपर्यंत स्थिर दृष्टीच्या साहाय्याने किंवा असल्याच एखाद्या उपायाने रोग्याचें मन एक प्रकारच्या निश्चेष्ट, जडीभूत, अस्वाभाविक अवस्थेला आणूं शकत नाही तोंपर्यंत त्याच्या सूचनांचा त्या रोग्यावर कांहीएक परिणाम होत नाही.

विश्वासाच्या शक्तीने वा मोहिनीविद्येने रोग बरे करणारे लोक रोग्याच्या ठायीं त्याच्या शरीरामधील केंद्रांवर ( इंद्रियांवर ) तेवढ्या वेळेपुरता जो एक प्रकारचा संयम उत्पन्न करीत असतात तो अत्यंत गर्हणीय होय, कारण त्याने अखेर त्या रोग्याचा सत्यानाश ओढवत असतो. हें कांही रोग्याने खरोखर स्वत:च्या इच्छाशक्तीने स्वत:च्या मेंदूमधील केंद्रांवर ताबा मिळविणें नव्हे, तर हें म्हणजे दुसऱ्याच्या इच्छाशक्तीच्या अचानक प्रबल आघातांनी त्या रोग्याचें मन तेवढ्या वेळापुरतें जणु बधिर होऊन जाणें होय. हें कांही बेफाम उधळलेल्या उद्दाम घोड्यांना आपल्या अंगबळाने लगाम ताणून कह्यांत आणणें नव्हे, तर हें म्हणजे कुणालातरी घोड्यांच्या टाळक्यावर जबर तडाखे लगावायला सांगून त्या घोड्यांना तेवढ्यापुरतें बधिर करून थोपविणें

होय. अशा तऱ्हेचे विश्वासाच्या शक्तीचे वा मोहिनीविद्येचे प्रयोग एखाद्यावर जितकेजितके केले जातात तितकीतितकी तो आपल्या मनाची शक्ति गमावत असतो, आणि अखेर, मनावर संपूर्ण जय मिळविणें तर दूरच राहो, त्याचें मन उलट अस्ताव्यस्त, दुबळें, नि:सत्त्व, लोळागोळा बनून जातें आणि सरतेशेवटीं त्याला पागलखाना दाखवावा लागतो.

स्वत:च स्वत:च्या इच्छाशक्तीने स्वत:वर जय मिळविण्याऐवजी असा दुसऱ्याच्या इच्छाशक्तीने आत्मसंयम साधण्याचा प्रयत्न नुसता घातुकच नसतो, तर ज्या उद्देशाने असला प्रयत्न केला जातो तो उद्देशच मुळी विफल होत असतो. प्रत्येक जीवाचें लक्ष्य आहे—मुक्ति वा स्वाधीनता—जडाच्या आणि चित्तवृत्तींच्या गुलामींतून सुटका—बाह्य आणि आंतर प्रकृतीवर प्रभुत्व. तें प्राप्त होणें तर राहिलें एकीकडेच, उलट, अशा रीतीने दुसऱ्याकडून माझ्यांत येणारा इच्छाशक्तीचा प्रवाह (मग तो कोणत्याहि रूपांत येवो—तो मला प्रत्यक्षपणें इंद्रियसंयम साधून देवो किंवा इंद्रियांचा संयम साधण्यास भाग पाडणारी एक अस्वाभाविक मनोवृत्ति माझ्यांत निर्माण करो) मला जखडणाऱ्या माझ्या जुन्या संस्कारांच्या आणि भ्रमांच्या बंधनांमधे आणखी भरच घालीत असतो. मुक्ति मिळण्याऐवजी त्याने बंधनेंच वाढतात, स्वाधीनता लाभण्याऐवजी त्याने गुलामीच बळावते. म्हणून दुसऱ्याच्या इच्छाशक्तीची स्वत:वर अशी क्रिया होऊं देऊं नका, या बाबतींत नेहमी सावध असां. त्याचप्रमाणे दुसऱ्या कुणावर आपल्या इच्छाशक्तीचा असला प्रयोग करून न कळत त्याचा सत्यानाश करूं नका. आता, हें खरें आहे की कुणीकुणी आपल्या इच्छाशक्तीचा असा प्रयोग करून अनेकांच्या प्रवृत्तींची दिशा बदलवून टाकून तेवढ्यापुरतें त्यांचें अमळ कल्याण करूं शकतात. परंतु त्याचबरोबर, असले प्रयोग करीत राहून ते ज्या अज्ञात सूचना सभोवार फैलावीत असतात त्यांनी ते लक्षावधि नरनारींमधे अस्वाभाविक, विकृत जडभाव निर्माण करून अखेर त्या बिचाऱ्यांच्या व्यक्तित्वाचा नायनाट करून टाकून अजाणतां त्यांच्या आयुष्याची माती करीत असतात त्याचें काय ? म्हणून, जो कुणी इतरांना आपल्यावर अंधविश्वास ठेवायला भाग पाडतो किंवा आपल्या प्रबळ इच्छाशक्तीच्या प्रभावाने वशीभूत करून लोकांना आपल्या मागे

फरफटत नेतो तो, तशी त्याची इच्छा नसली तरी मनुष्यजातीची अपरिमित हानि करीत असतो.

म्हणून स्वतःच्या देहाचा व मनाचा संयम करण्यासाठी नेहमी स्वतःच्याच इच्छाशक्तीचा उपयोग करा. लक्षांत असूं द्या की जोंवर तुम्ही दुबळे, रोगट बनत नाही तोंवर बाहेरील इतर कुणाचीहि इच्छाशक्ति तुमच्यावर अंमल गाजवूं शकणार नाही. जर कुणी तुम्हांला त्याच्यावर अंधविश्वास ठेवायला सांगत असेल तर मग तो कितीहि मोठा असो नि कितीहि चांगला असो, त्याला तुम्ही दुरूनच नमस्कार करा. जगांत सर्वत्रच तुम्हांला असे धर्मसंप्रदाय आढळतील की नाचणें, उडया मारणें, ओरडणें हें त्यांच्या धर्माचें प्रमुख अंग आहे. ते जेव्हा गायला, नाचायला नि प्रचार करायला लागतात तेव्हा त्यांचा भाव जणु संसर्गजन्य रोगाप्रमाणे लोकांत पसरूं लागतो. हे लोकहि एकप्रकारें मोहिनीविद्यावालेच म्हणतां येतील. हळुवार मनाच्या संवेदनाशील व्यक्तींवर ते तेवढयापुरता कमालीचा अंमल बसवूं शकतात. पण हाय, परिणामीं एखादी सारी जातची जात ते साफ नासवितात—त्यांच्या करणीने परिणामीं उभी जात अधःपतित होऊं शकते ! होय, बाहेरच्या शक्तीच्या बळावर साधलेल्या असल्या अस्वाभाविक, विकृत संयमाने बेगडी भलें होण्याऐवजी एखादी व्यक्ति किंवा जात वाईट राहिली तरी परवडलें, नव्हे, तेंच तिच्यापक्षीं निकोपपणाचें ठरेल. ह्या साऱ्या धर्मवेडया व्यक्तींचा उद्देश भला असतो खरा, परंतु त्यांना जबाबदारीची कांही जाणीव नसते. हे लोक मानवजातीची केवढी भयंकर हानि करीत असतात ह्याचा विचार केल्यास मन विषण्ण होऊन जातें. ह्या लोकांना माहीत नसतें की त्यांच्या सूचनांच्या प्रभावाने ज्या व्यक्ति संगीत, स्तव इत्यादींद्वारा अशा एकाएकी भगवद्भावोन्मत्त होऊन जात असतात त्या व्यक्ति तशाने स्वतःला केवळ जड, विकृत, शक्तिहीन बनवून टाकीत असतात. हळूहळू त्यांचीं मनें अशीं होऊन जातात की तीं मग कोणत्याहि सूचनांना—मग त्या सूचना कितीहि वाईट असोत—बळी पडतात, त्या वाईट सूचनांचा प्रभाव रोधण्याची त्यांच्यांत मुळीच कुवत उरत नाही. मानवी हृदयांमधे बदल घडवून आणण्याची एक अद्‌भुत, अलौकिक, ईश्वरदत्त शक्ति आपल्यांत आहे अशा कल्पनेने हे अज्ञ,

आत्मवंचक लोक स्वतःच स्वतःची पाठ थोपटून घेण्यांत दंग असतात. परंतु त्यांच्या गावींहि नसतें की आपल्या कृत्यांनी ते भावी मानसिक अवनति, गुन्हे, वेड नि सत्यानाश यांचीं बीजें पेरीत असतात. म्हणून, ज्याने तुमची स्वाधीनता, तुमचें स्वातंत्र्य नाहीसें होईल अशा कोणत्याहि प्रभावापासून सदैव सावध राहा. तसें होणें अत्यंत धोक्याचें आहे असें पक्कें जाणून आपली सारी शक्ति पणास लावून वाटेल त्या उपायाने स्वतःला त्या प्रभावापासून अलिप्त ठेवा.

आपलें मन आपल्या इच्छेनुसार केंद्रांशीं संयुक्त करणें किंवा आपल्या इच्छेनुसार केंद्रांवरून काढून घेणें ज्याला जमलें आहे त्याला प्रत्याहार साधला आहे असें म्हणतां येईल. 'प्रत्याहार' म्हणजे 'एकीकडे गोळा करणें' 'आपल्याकडे ओढून घेणें'—मनाची बहिर्गामी गति रुद्ध करून, इंद्रियांच्या गुलामींतून त्याला सोडवून आंत खेचून घेणें. हें जेव्हा आपल्याला साधेल तेव्हाच आपण खरेखुरे शीलवान ठरूं, तरच आपण मुक्तीचा मार्ग बराचसा आक्रमिला असें होईल. तोंपर्यंत यंत्रांत आणि आपल्यांत काय बरें फरक ?

मनावर ताबा मिळविणें, त्याचा संयम करणें किती कठीण गोष्ट आहे ! मनाची एखाद्या वेड लागलेल्या माकडाशीं तुलना केली जाते ती अगदी योग्यच होय. एक माकड होतें. माकडाचीच जात ती ! सगळ्या माकडांप्रमाणे तेंहि स्वभावतःच चंचल होतें. त्याचा तो स्वभावसिद्ध चंचळपणा कमी वाटला म्हणून की काय, एकाजणाने त्याला यथेच्छ दारू पाजली ! माकडाच्या चंचळपणाला आणखीच बहर आला. भरींत भर त्यांतच परत त्याला चावला विंचू. विंचू चावला म्हणजे माणूस दिवसभर कसा तडातड नाचतउडत असतो हें तुम्हीं पाहिलेंच असेल. साहजिकच मग त्या माकडाची जी अवस्था झाली असेल तिची कल्पनाच केलेली बरी. आणि झाली ही दुर्दशा पुरेशी नव्हती म्हणूनच की काय तेवढ्यांतच त्या माकडाला भूतबाधा झाली ! त्यानंतरच्या त्याच्या दुर्दम्य चंचळतेचें वर्णन कोणत्या शब्दांत करावें ? मानवी मनाची स्थितिहि त्या माकडासारखीच आहे. स्वभावतःच तें सदैव चंचळ असतें. वासनेच्या मद्याचा कैफ चढून तें आणखीच क्षुब्ध होतें. वासनेचा अंमल बसल्यावर त्याला मत्सराचा विंचू नांग्या मारूं लागतो

—दुसऱ्यांचें यश वगैरे बघून त्याला त्यांचा हेवा वाटूं लागतो. आणि या सर्वांवर कडी म्हणजे अखेर गर्वरूपी पिशाच्च त्याला झपाटतें, त्याने मग आपणच सर्वांत श्रेष्ठ आहोंत असें त्याला वाटूं लागतें. ह्या अशा मनाचा संयम करणें किती कठीण गोष्ट आहे !

म्हणून मन:संयमाची पहिली पायरी म्हणजे कांही वेळ चूप बसून राहणें आणि मनाला हवें तसें भरकटूं देणें ही होय. मन सदा चंचळ असतें, त्याला सदाच उकळ्या फुटत असतात. वर वर्णन केलेल्या माकडासारखें तें सदासर्वदा इतस्तत: उड्या मारीत असतें. हें मनरूपी माकड हव्या तितक्या उड्या मारो, तुम्हीं फक्त स्थिर बसा आणि त्याच्या चेष्टा साक्षीभावाने शांतपणें पाहत राहा. ज्ञान ही शक्ति होय अशा अर्थाची एक म्हण आहे. ती अगदी खरी आहे. मन काय करीत असतें ह्याचें जोंपर्यंत तुम्हांला ज्ञान होत नाही तोंपर्यंत तुम्ही त्याचा संयम करूं शकणार नाही. मनाला अगदी मोकळें सोडा, त्याला अगदी यथेच्छ भरकटूं द्या. तुमच्या मनांत कदाचित् अत्यंत किळसवाणे विचार येऊं लागतील. आपल्या मनांत इतके गलिच्छ, इतके ओंगळ विचार येऊं शकतात ह्याचें तुम्हांला आश्चर्य वाटेल. परंतु, वर सांगितल्याप्रमाणे स्थिर बसून मनाच्या ह्या सर्व माकडचेष्टा साक्षीभावाने शांतपणें अवलोकीत गेल्यास तुम्हांला आढळून येईल की तुमच्या मनाचा उनाडपणा रोज हळूहळू कमी होत आहे, रोज तें अधिकाधिक निवळत आहे, स्थिरावत आहे. पहिले कांही महिने आपल्या मनांत असंख्य विचार येत असल्याचें तुम्हांला आढळून येईल. नंतर ते कांहीसे कमी झाल्याचें तुम्हांला दिसेल. आणि आणखी कांही महिन्यांत ते अधिकाधिक घटत जाऊन अखेर मन तुमच्या पूर्णपणें ताब्यांत येईल. पण धीर धरून, चिकाटीने आपण रोज ही साधना मात्र करीत जावयास हवी. वाफ सुरू करतांच इंजिन धावूं लागतें, तद्वतच, विषय समोर येतांच आपल्याला ते अनुभवणें भाग पडतें. आपण इंजिनासारखें एखादें यंत्र नाहीं हें सिद्ध करण्यासाठी माणसाने दाखवून द्यावयास हवें की तो कशाच्याहि आधीन नाही—कशाचाहि ताबा त्याच्यावर चालत नाही. एवंच, मनाचा अशा रीतीने संयम साधणें व त्याला विभिन्न इंद्रियकेंद्रांशीं संयुक्त होऊं न देणें हाच 'प्रत्याहार' होय. हा कसा साधेल ?

हा एका दिवसांत साधण्यासारखा नाही, त्यासाठी अनेक दिवस प्रचंड उद्यम करावा लागेल, कठोर साधना करावी लागेल. धीर धरून सतत कित्येक वर्षे अविराम यत्न केल्यासच यश लाभणें शक्य आहे.

'प्रत्याहारा'नंतरची पायरी म्हणजे 'धारणा' होय. कांही काल प्रत्याहाराची साधना केल्यानंतर मग 'धारणे'ची साधना करावयास हवी. धारणा म्हणजे मनाला देहांतील वा देहाबाहेरील एखाद्या विशिष्ट ठिकाणीं स्थापित करणें. मनाला असें विशिष्ट ठिकाणीं स्थापित करणें म्हणजे काय ? म्हणजे असें की मनाला शरीरांतील इतर सर्व भागांवरून काढून घेऊन त्याला एखाद्या विशिष्ट भागाचाच अनुभव घेत राहण्यास भाग पाडणें. उदाहरणार्थ अशी कल्पना करा की मीं माझें मन माझ्या हातावरच स्थापित केलें आहे, मला केवळ त्या हाताचीच जाणीव होत आहे, माझे इतर सर्व अवयव माझ्या जाणिवेंतून वगळले गेले आहेत, इतर कोणत्याहि अवयवाचें मला भान राहिलेलें नाही. याप्रमाणे चित्त, म्हणजेच मनोवृत्ति, ज्या वेळीं एखाद्या विशिष्ट जागेवरच खिळून राहते त्या वेळीं त्याला धारणा म्हणतात. ह्या धारणेचे अनेक प्रकार आहेत. धारणेची साधना करतांना अमळ कल्पकता उपयोगांत आणल्यास चांगलें होईल. समजा की हृदयामधील एका बिंदूवर धारणा करावयाची आहे--त्या विशिष्ट बिंदूवर मन स्थापित करावयाचें आहे. प्रत्यक्षांत हें साधणें फार कठीण आहे. परंतु त्या ठिकाणीं एखाद्या कमलाची कल्पना केली तर मन तिथे स्थापणें सोपें जाईल. अशी कल्पना करावी की तें कमल ज्योतीने भरलेलें असून तिची प्रभा सभोवताल फाकली आहे. अशी कल्पना करून मग मन तिथे स्थापित करावें म्हणजे धारणा साधणें सोपें जाईल. अथवा याचप्रमाणे मेंदूमधील सहस्रदल कमलावर किंवा पूर्वोक्त सुषुम्नामार्गावरील चक्रांवर, तीं ज्योतिर्मय आहेत अशी कल्पना करून धारणा करावी.

योग्याने सतत ध्यानाभ्यास करावयास हवा. त्याने एकान्तांत निःसंगपणें राहण्याचा प्रयत्न करावयास हवा. नानाप्रकारच्या लोकांच्या संगतीने चित्तविक्षेप होतो. योग्याने अधिक बोलूं नये. फार बोलल्याने मन विखुरतें. योग्याने फार काम करणें उचित नाही. फार काम केल्याने चित्त विस्कटून जातें. सारा दिवस खूप श्रम केल्यावर मनाचा

संयम साधूं शकत नाही. जो दृढसंकल्पपूर्वक ह्या नियमांचें पालन करीत जाईल तोच योगी होऊं शकेल. ह्या योगाचा असा प्रभाव आहे की तो अगदी थोडासा साधल्यानेहि महत्कल्याण होतें. त्याने कुणाचें अनिष्ट व्हावयाचें नाही, झालें तर हितच होईल. योगाचें पहिलें सुफल म्हणजे त्याने विक्षोभ शमेल, शांत भाव येईल आणि आपल्यांत कोणतीहि गोष्ट नीट, स्पष्टपणें आकळण्याची शक्ति उपजेल. स्वभावांत मार्दव येईल, प्रकृतिहि हळूहळू चांगली होईल. योगसाधनेने प्रकट होणाऱ्या लक्षणांत प्रकृतिस्वास्थ्य हें सगळयांत पहिलें लक्षण होय. स्वरहि सुरेख होईल. स्वरांतील सर्व दोष नाहीसे होतील. योगसाधनेने अनेक फळें लाभतील, त्यांपैकी हीं प्राथमिक फलें होत. जे उग्र साधना करतील त्यांच्या ठायीं आणखीहि कित्येक लक्षणें प्रकट होतील. कधीकधी दूर होणाऱ्या घंटानादासारखा ध्वनि ऐकूं येईल. दूर कुठेतरी अनेक घंटा निनादत असून ते सगळे ध्वनि एक होऊन अखंडित प्रवाहासारखे तुमच्या कर्णकुहरांत शिरत आहेत असा अनुभव येईल. कधीकधी अद्भुत गोष्टी दिसूं लागतील. दिसूं लागेल की काजव्यासारखे प्रकाशाचे ठिपके तरंगत आहेत नि मोठेमोठे होत आहेत. ह्या साऱ्या गोष्टी दिसूं लागल्या म्हणजे समजा की तुम्ही झपाटयाने मार्ग आक्रमीत आहांत. हीं सारीं द्रुत प्रगतीचीं लक्षणें होत.

ज्यांची योगी होण्याची इच्छा आहे आणि तदनुसार जे खूप कठोर साधना करीत आहेत त्यांनी प्रथमावस्थेंत आपल्या आहाराकडे जरा विशेष लक्ष देणें आवश्यक आहे. परंतु जे आपल्या इतर दैनंदिन कार्यांबरोबरच थोडासा योगाभ्यास करूं इच्छितात ते खाण्यापिण्याच्या बाबतींत तितके चोखंदळ राहिले नाहीत तरी चालण्यासारखें आहे; स्वतःच्या आवडीनावडीनुसार त्यांनी आपला आहार ठेवावा; फक्त फार न खाल्लें म्हणजे झालें. पण ज्यांना झपाटयाने प्रगति करून घेण्याची इच्छा आहे आणि त्यासाठी जे खूप साधना करूं इच्छितात त्यांनी मात्र आहाराच्या बाबतींत अगदी कडक पथ्य पूर्णपणें पाळलें पाहिजे. कांही महिने केवळ दूध आणि धान्य यांवर राहणें त्यांच्यापक्षीं लाभदायक होईल. देहयंत्र उत्तरोत्तर जसजसें जास्तजास्त सूक्ष्म होत जाईल तसतसें आढळून येईल की सुरवातीसुरवातीला थोडासाहि नियमभंग

साऱ्या शरीरभर कशी गडबड माजवीत आहे, तेवढ्यानेच तुमचा कसा तोल बिघडत आहे, सारेंकांही बिनसून जात आहे. मनावर जोंपर्यंत संपूर्ण ताबा बसत नाही तोंपर्यंत एक घासहि कमीजास्त खाल्ल्याने उभ्या शरीरांत बिघाड होईल. मन एकदाचें पूर्णपणें वशीभूत झाल्या-नंतर मग तुम्हीं हवें तें खाल्लेंत तरी कांही बिघडणार नाही.

ज्या वेळीं तुम्ही मन एकाग्र करूं लागाल त्या वेळीं एखादी टाचणी जरी पडली तरी जणुकांही मेंदूमधून वज्र गेल्यासारखें तुम्हांला वाटेल. इंद्रियें जसजशीं सूक्ष्म होऊं लागतात ततशी अनुभूतिहि सूक्ष्म सूक्ष्म होत जाते. असो. साधकाला ह्या सर्व अवस्थांमधून जावें लागतें. जे कुणी शेवटपर्यंत चिकाटी धरून प्रयत्न करतात त्यांनाच यश लाभतें. वादविवाद, आणि ज्या कशाने मन चंचल होईल त्या सर्व गोष्टी सोडून द्या. शुष्क तार्किक बडबडींत कांही अर्थ आहे काय? तिने मनाची समता बिघडून मन विक्षुब्ध होण्याखेरीज आणखी कांहीच साधत नाही. ह्या साऱ्या आहेत सूक्ष्म गोष्टी, त्यांचा प्रत्यक्ष अनुभवच करून घ्यावयास हवा. नुसती बडबड करून काय होणार? तर्काच्या कोलांट्यांनी किंवा बडबडीने का तें साधणार आहे? म्हणून उगाच बडबडणें सोडून द्या. ज्यांना प्रत्यक्ष अनुभव आलेला आहे अशांनी लिहिलेलेच ग्रंथ वाचीत जा.

मोत्याच्या शिंपल्यासारखें व्हा. भारतांत एक मोठी सुंदर दंत-कथा प्रचलित आहे. ती अशी की, स्वाती नक्षत्राच्या वेळीं जर पाऊस पडला आणि त्याचा थेंब जर शिंपल्यांत पडला तर त्या थेंबाचा मोती होतो. मोतशिंपल्यांना हें ठाऊक असतें, आणि म्हणूनच ज्या वेळीं स्वाती नक्षत्र उगवतें त्या वेळीं तीं वर येऊन त्या मौल्यवान थेंबाची वाट पाहत आ वासून पाण्याच्या पृष्ठभागावर तरंगत राहतात. स्वाती नक्षत्राच्या पावसाचा एक थेंब आंत पडतांच मोतशिंपलें झटकन् आपलें कवच मिटतें आणि थेट समुद्राच्या तळाशीं दडी मारून तिथे सावकाश त्या थेंबाचा मोती करण्यांत गुंतून जातें. आपण त्या मोतशिंपल्यासारखें झालें पाहिजे. प्रथम ऐका, नंतर समजून घ्या, आणि मग, ज्यांनी चित्त-विक्षेप होईल अशा सर्व गोष्टींपासून दूर राहून, बाह्य जगतावरील दृष्टि अजीबात काढून घेऊन, बाह्य वस्तूंचें आकर्षण अजीबात झिडका-

रून स्वत:च्या अंतर्यामस्थ सत्याचा विकास करण्यांत गढून जा. एखाद्या कल्पनेच्या नाविन्याने आकृष्ट होऊन केवळ त्या नाविन्यासाठी तिच्या मागे लागायचें, ती अमळ शिळी होतांच ती सोडून आणखी एखाद्या नव्या कल्पनेच्या मागे धावावयाचें—असेंच करीत गेल्याने शक्तीचा अपव्यय होतो, वृथा क्षय होऊन जातो. साधनाकालीं असलें नाविन्यप्रेमाचें संकट ओढवण्याची भीति असते. एक कल्पना घ्या आणि ती तडीस जाईपर्यंत तीच घेऊन राहा. तिची अगदी कड लागेपर्यंत तिला चिकटून राहा, मधेच ती सोडून देऊं नका. जो एखाद्या कल्पनेने वेडा होऊं शकतो त्यालाच प्रकाश लाभत असतो, त्याच्याच हृदयांत सत्याचा उन्मेष होत असतो. जो थोडेसें हें, थोडेसें तें, असेंच सारखें करीत फिरतो त्याला कधी कशाचाच लाभ होत नसतो. अशांना तेवढ्यापुरती हर्षाची शिरशिरी वाटेल, इतकेंच. यापेक्षा आणखी त्यांना कांहीच कधी लाभणार नाही. ते अखेरपर्यंत प्रकृतीचे गुलामच राहतील, इंद्रियांची शीव ओलांडून अतींद्रिय राज्यांत ते कधीच प्रवेश करूं शकणार नाहीत.

ज्यांची खरोखर योगी होण्याची इच्छा आहे त्यांनी 'ह्याचें थोडें, त्याचें थोडें' चाखत फिरण्याची ही वृत्ति कायमची सोडून दिली पाहिजे. एकदा एखादी कल्पना स्वीकारली की मग तिलाच आपलें जीवनसर्वस्व बनवा; सतत तिचाच ध्यास घ्या, तिचींच स्वप्नें बघा, तिच्यावरच जगा. तुमचा मेंदू, तुमचे स्नायु, तुमचे मज्जातंतु, तुमच्या शरीराचा अणुरेणु त्याच कल्पनेने भरला जाऊं द्या. इतर कोणत्याहि विचाराला वा कल्पनेला थारा देऊं नका. यशस्वी होण्याचा हाच मार्ग आहे. थोर थोर धर्मवीर केवळ ह्याच तऱ्हेने निर्माण होत असतात. इतर म्हणजे नुसतीं बडबड करणारीं यंत्रें होत. आपल्याला जर स्वत:ला कृतार्थ व्हावयाचें असेल आणि इतरांचा उद्धार करावयाचा असेल तर केवळ बडबड सोडून आपल्याला आंत आंत शिरावें लागेल—अधिकाधिक खोल जावें लागेल. हें सारें साधण्याची पहिली पायरी म्हणजे मनाला कशानेहि चंचल होऊं न देणें ही होय. आणि, ज्यांच्या विचारांनी तुमचें मन चंचल होतें अशांशीं संग करूं नका. कांही विशिष्ट व्यक्तींचा, कांही विशिष्ट स्थानांचा, कांही विशिष्ट खाद्यपदार्थांचा

आपल्यापैकी प्रत्येकालाच कसा तिटकारा असतो. तीं सारीं टाळा. आणि ज्यांना सर्वोच्च अवस्था प्राप्त करून घेण्याची आकांक्षा आहे त्यांनी तर चांगला नि वाईट दोन्ही प्रकारचा संग टाळलाच पाहिजे. खूप दृढपणें, कठोर साधना करा. जगण्यामरण्याचीहि पर्वा करूं नका. फलाफलाचा विचार न करतां साधनेंत डुबून जावें लागेल. तुम्ही जर पुरेशा धीटपणाने मार्ग आक्रमाल तर सहा महिन्यांमधेच तुम्ही सिद्ध योगी होऊं शकाल. पण जे योगाची थोडीशी साधना करतात आणि त्याचबरोबर ह्याचें थोडें, त्याचें थोडें असें करीत प्रत्येक गोष्टीच्या नादीं लागतात त्यांची कधीहि विशेष प्रगति होत नसते. नुसता उपदेश ऐकत गेल्यानेच कांही व्हावयाचें नाही. तमोगुणाने पुरते झपाटलेले, अज्ञानांत खितपणारे, जडमूढ, आळशी, ज्यांचीं मनें कोणत्याहि कल्पनेवर स्थिर बसू शकत नाहीत, ज्यांना नुसती थोडीशी मौज हवी असते अशांच्या पक्षीं धर्म व तत्त्वज्ञान हीं निव्वळ मनोरंजनाचीं साधनेंच असतात. त्यांना तेवढेंच हवें असतें आणि धर्म व तत्त्वज्ञान यांपासून ते तेवढेंच मिळवीत असतात. चिकाटी धरून साधना करणें ह्यांना माहीत नसतें. असले लोक धार्मिक गोष्टी ऐकतात, तेवढ्या वेळेपुरत्या त्या त्यांना खूप सुरेख वाटतात, पण काय ! नळी फुंकिली सोनारें, इकडुनि तिकडे गेलें वारें, असली गत ! तो धर्मोपदेश ऐकून ते घरीं जातात आणि सारेंकांही साफ विसरून जातात. यश मिळण्यासाठी, सिद्ध होण्यासाठी कमालीची चिकाटी हवी, प्रचंड इच्छाशक्ति हवी, खूप मनोबल हवें. असला चिकाटीचा साधक म्हणत असतो—"मी समुद्र पिऊन जाईन, माझ्या इच्छाशक्तीने पर्वत चूर्ण होऊन जातील." असल्या तऱ्हेचें तेज, असल्या तऱ्हेची इच्छाशक्ति बाळगा, खूप कठोर साधना करा, तुम्हांला त्या परमपदाची प्राप्ति झालीच पाहिजे.

---

## प्रकरण सातवें

# ध्यान आणि समाधि

राजयोगाच्या आठ अंगांपैकी ध्यान आणि समाधि ही राजयोगाचीं दोन सूक्ष्म अंगें सोडून त्याच्या इतर अंगांचें आपण आतापर्यंत

थोडक्यांत विवेचन केलें. ह्या सूक्ष्म अंगांना राजयोगाचीं अंतरंग साधनें म्हणतां येतील. आमच्या मनाला एकाग्रतेचें वळण लावणें हें या अंतरंग साधनांचें कार्य होय. ही एकाग्रता साधणें हाच राजयोगाचा उद्देश होय. राजयोगामुळे आपल्याला हीच एकाग्रतेची शक्ति प्राप्त होत असते.

आपल्याला आढळून येतें की आम्हां मानवांना बुद्धीच्या साहाय्याने होणारें सर्व ज्ञान हें आमच्या अहंबोधाच्या आश्रयानेच होत असतें. मला ह्या टेबलाचें ज्ञान होत आहे, मला तुमच्या अस्तित्वाचें ज्ञान होत आहे, त्याचप्रमाणे इतर वस्तूंचेंहि ज्ञान होत आहे. हें सर्व ज्ञान मला माझ्या अहंबोधाच्या आश्रयानेच होत आहे. ह्या अहंबोधामुळेच मला कळत आहे की हें टेबल येथे आहे, तुम्ही येथे आहांत, जें कांही दिसत वा ऐकू येत आहे तें सारें येथे आहे. ही झाली एक बाजू. दुसऱ्या बाजूला असें आढळून येतें की माझ्या अस्तित्वाचा बराच मोठा भाग असा आहे की जो मला अज्ञात आहे, त्याची मला जाणीव नाही, त्याचा मला बोध नाही. आपल्या शरीरामधलीं निरनिराळीं इंद्रियें, मेंदूचीं भिन्नभिन्न अंगें हीं कुणालाहि ज्ञात नसतात, तीं कुणाच्याहि ज्ञानाचा विषय होत नाहीत.

मी ज्या वेळीं अन्न खातों त्या वेळीं ती क्रिया मी जाणतेपणाने करीत असतों, पण ज्या वेळी मी तें पचवून त्या अन्नाचा सारभूत भाग आत्मसात् करीत असतों त्या वेळीं मी ती क्रिया अजाणतेपणीं करीत असतों. त्या अन्नाचें रक्त तयार होतें तेंहि माझ्या अजाणतेपणींच. आणि त्या रक्ताने माझ्या शरीरांतील भिन्नभिन्न अवयवांना जीवनशक्ति लाभते तीहि माझ्या अजाणतांच. आणि तरीहि ह्या साऱ्या क्रिया करीत असतों मीच; ह्या माझ्या एका शरीरांत हीं सारीं कार्यें करण्यासाठी दहावीसजण असणें अर्थातच शक्य नाही. आता, हें कसें समजायचें की ह्या सगळ्या क्रिया मीच करीत आहें, माझ्याखेरीज अन्य कुणी नाही ? तुम्ही सहजच असें म्हणाल की आपलें काम फक्त खाण्याचें आहे; तें खाल्लेलें अन्न पचविणें, आत्मसात् करणें, त्याने शरीर पुष्ट करणें, सशक्त करणें इत्यादि कामें आपल्या वतीने आणखी कोणीतरी करीत असतो. पण वस्तुस्थिति अशी असणें शक्य नाही.

कारण, ह्या साऱ्यांतील सध्या आपल्या अजाणतेपणीं वा नेणीवपूर्वक घडत असलेल्या क्रियांपैकी जवळजवळ प्रत्येकच क्रिया आपल्याला साधनेच्या जोरावर जाणीवेच्या पातळीवर अणातां येणें म्हणजेच जाणीवपूर्वक करतां येणें शक्य आहे, हें सप्रयोग सिद्ध करतां येईल. वरवर पाहतां आपलें हृदय आपोआप चालत आहे, त्याच्या क्रियेवर आपला ताबा नाही असें वाटतें. आपल्यापैकी कुणीच स्वतःच्या हृत्पिडाचें नियंत्रण करूं शकत नाही, कुणीच तें आपल्या इच्छेप्रमाणे चालवूं शकत नाही, तें स्वतःच्या मर्जीप्रमाणे स्वतःच चालत असतें. परंतु साधनेने आपण ह्या हृदयाच्या क्रियेवरदेखील ताबा बसवूं शकतों. इतका की, अखेर आपल्या इच्छेनुसार आपल्या हृदयाचे ठोके जलद वा हळूहळू पडूं लागतील, एवढेंच काय पण आपल्याला तें तात्पुरतें जवळ जवळ बंदसुद्धा पाडतां येऊं शकेल. ह्याचप्रमाणे आपल्या शरीरांतील जवळजवळ प्रत्येकच अवयव आपल्याला स्वतःच्या ताब्यांत आणतां येणें शक्य आहे असें म्हणतां येईल. ह्यावरून काय सिद्ध होतें ? यावरून हेंच सिद्ध होतें की जीं सारीं कार्यें सध्या यापल्या जाणिवेच्या पातळीच्या खाली चाललीं आहेत, म्हणजेच आपल्या अजाणतां होत आहेत तींहि वस्तुतः आपणच करीत असतों, फक्त तीं आपण अजाणतेपणीं अथवा नेणीवपूर्वक करीत असतों, इतकेंच. यावरून हें स्पष्ट होतें की मानवी मनाच्या दोन अवस्था आहेत—दोन अवस्थांत वा दोन स्तरांवर तें कार्य करीत असतें. पहिली अवस्था वा पहिला स्तर म्हणजे जाणिवेचा. ह्या जाणिवेच्या अवस्थेंत वा स्तरावर जीं जीं म्हणून कामें केलीं जातात तीं सारीं करीत असतांना 'मी करीत आहें' असा अहंबोध सतत, सदैव विद्यमान असतो. दुसरी म्हणजे नेणिवेची अवस्था वा नेणिवेचा स्तर. येथे होणाऱ्या कोणत्याहि कार्यांमधे वरीलप्रमाणे अहंबोध नसतो, हीं सारीं कार्यें जाणिवेच्या पृष्ठभागाच्या खालती चाललेलीं असतात.

आपण करीत असलेल्या क्रियांपैकी ज्या क्रिया अहंबोधयुक्त असतात त्यांना जाणीवपुरस्सर क्रिया म्हणतात, आणि ज्या क्रियांत या अहंबोधाचा संबंध येत नाही त्या क्रियांना नेणीवपुरस्सर क्रिया म्हणत असतात. खालच्या प्रतीच्या प्राण्यांच्या ह्या नेणीवपुरस्सर क्रियांना उपजतप्रेरणा (instinct) म्हणतात. त्यांच्यापेक्षा उच्च

प्रतीच्या प्राण्यांत, आणि सर्वोच्च प्रतीचा प्राणी जो मनुष्य, त्यांत पहिल्या प्रकारचीं म्हणजेच जाणीवपुरस्सर वा अहंबोधयुक्त कार्यंच अधिक प्रमाणांत आढळून येतात.

पण एवढयानेच झालें नाही. मनाच्या केवळ दोनच अवस्था वा केवळ दोनच स्तर वा भूमि आहेत असें नव्हे. ह्या दोहोंच्यापेक्षाहि उच्च अशा अवस्थेंत मन जाऊं शकतें, या दोहोंपेक्षाहि उच्च अशा भूमीवर मन आरूढ होऊं शकतें. मन जाणिवेच्या पलीकडे जाऊं शकतें. नेणीवपुरस्सर कर्म ज्याप्रमाणे जाणिवेच्या खाली असलेल्या भूमी-वर होत असतें त्याचप्रमाणे जाणिवेच्या वर असलेल्या भूमीवरहि एका निराळया प्रकारचें कार्य होत असतें. ह्या जाणिवेच्या पलीकडे होणाऱ्या कार्यांमधेहि अहंबोध स्फुरत नसतो. ह्या अहंबोधाचें स्फुरण केवळ मधल्या अवस्थेंतच होत असतें. मन ज्या वेळीं ह्या अहंबोधरूपी रेषेच्या वर किंवा खाली कार्य करीत असतें त्या वेळीं त्यांत अहंबोधाचें स्फुरण नसतें, आणि तरीहि त्या वेळीं तें कार्य मात्र करीतच असतें, निष्क्रिय झालेलें नसतें. मन ज्या वेळीं ह्या अहंबोधाच्या वा जाणिवेच्या पलीकडे जातें त्या वेळच्या मनाच्या अवस्थेला म्हणत असतात––समाधि. समाधि म्हणजे मनाची जाणिवेपलीकडील पूर्णचेतन वा ज्ञानातीत अवस्था होय. यावर कुणी असें विचारील की समाधि अवस्थेंत गेलेला माणूस हा जाणिवेच्या खालच्या भूमीवर गेलेला नसतो, उन्नत होण्याऐवजी तो अवनत झालेला नसतो हें कसें समजावयाचें ? सारांश, समाधि-अवस्था ही जाणिवेपेक्षा उच्च की हीन हें कसें ओळखावयाचें ? कारण जाणिवेच्या खाली असलेली नेणीव-अवस्था आणि वर असलेली समाधि-अवस्था या दोन्ही अवस्थांमधे मनाचें कार्य अहंबोधरहितच असतें. ह्या प्रश्नाला उत्तर असें की, ह्या दोहोंतील कोणती अवस्था खालची वा हीन आहे आणि कोणती वरची वा उच्च आहे हें आपण त्या उभयतांचीं फळें किंवा परिणाम पाहून ठरवूं शकतों. माणूस ज्या वेळीं गाढ झोपीं जातो त्या वेळीं तो जाणिवेच्या खाली असलेल्या भूमीवर उतरत असतो. त्या गाढ झोपेंत असतांना तो शारीरिक क्रिया, श्वासोच्छ्वास, इतकेंच काय पण शरीराची हालचालसुद्धा करीत असतो. पण हें सारें अजाणतेपणीं, नेणीवपूर्वक. त्या सगळयांत त्याचा अहंबोध नसतो. त्या वेळीं त्याला

कसलीच जाणीव नसते, तो नेणिवेने ग्रासलेला असतो, संज्ञाशून्य असतो. आणि ज्या वेळीं तो त्या गाढ झोपेंतून जागा होतो त्या वेळीं तो झोपीं जाण्यापूर्वी जसा होता तसाच असतो, त्याच्यांत कांहीहि बदल झालेला नसतो. झोपीं जाण्यापूर्वी त्याच्याठायीं ज्ञानाचा जेवढा साठा होता तेवढाच तो झोपून उठल्यानंतरहि असतो, त्यांत थोडीसुद्धा भर पडलेली नसते. त्याला कोणतेंहि नवीन ज्ञान, कांहीहि नवा प्रकाश लाभलेला नसतो. परंतु माणूस ज्या वेळीं समाधींत जातो त्या वेळीं समाधींत जाण्यापूर्वी जर तो अज्ञानी असेल तर महाज्ञानी होऊनच तो समाधींतून भानावर येत असतो.

हा फरक कशामुळे पडतो ? एका अवस्थेंतून ( गाढ निद्रेंतून ) माणूस परत येतो—तो त्या अवस्थेंत प्रवेश करतांना जसा होता तसाच. तर, दुसऱ्या अवस्थेंतून ( समाधींतून ) तो परत येतो—ज्ञानाने उजळून, एका साधूच्या रूपांत, एका द्रष्ट्याच्या रूपांत, एका संताच्या रूपांत—ज्याचें संपूर्ण चारित्र्य, ज्याचा स्वभाव, ज्याचें जीवन पार पालटून गेलें आहे, ज्ञानमय झालेलें आहे अशा स्वरूपांत. ह्या दोन अवस्थांचीं हीं दोन वेगवेगळीं फळें आहेत. आता, हें मानावयासच हवें की त्यांचीं फलें ज्याअर्थी याप्रमाणे भिन्न आहेत त्याअर्थी त्यांचीं कारणेंहि भिन्न असलींच पाहिजेत. आणि समाधि-अवस्थेंतून परततांना माणूस ज्या ज्ञानाने उजळलेला असतो तें ज्ञान ज्याअर्थी नेणिवेंतून परतल्यानंतरच्या अवस्थेपेक्षा अथवा जाणिवावस्थेंत बुद्धिविचारांच्या द्वारा लाभूं शकणाऱ्या ज्ञानापेक्षा कितीतरी श्रेष्ठ असतें त्याअर्थी तें ( समाधि-अवस्थेंत लाभलेलें ज्ञान ) जाणिवेच्या पलीकडे असलेल्या भूमीवरच लाभलेलें असलें पाहिजे. आणि म्हणूनच समाधीला जाणिवेपलीकडील अवस्था अथवा ज्ञानातीत भूमि म्हटलें आहे.

समाधीचें स्वरूप थोडक्यांत हें असें आहे. येथे कुणी विचारील की ही समाधि प्रत्यक्ष जीवनांत कशा तऱ्हेने आपल्या कामीं पडूं शकेल ? यावर उत्तर असें की समाधि आपल्या जीवनांत अतिशय कामीं पडूं शकते. आपल्या बुद्धीचें वा जाणिवेचें क्षेत्र फारच संकुचित आणि मर्यादित असतें. ह्याच सीमाबद्ध क्षेत्रांत आपली बुद्धि विचार करीत असते, मन जाणीवपुरस्सर कर्म करीत असतें. हें एका

छोटयाशा वर्तुळांत घुटमळणें होय. मानवी बुद्धि याप्रमाणे सदा एका लहानशा वर्तुळांत घुटमळत असते. तिचें स्वरूप, तिचा स्वभाव, तिची घडणच मुळी अशी आहे की ह्या लहानशा वर्तुळांतच ती फिरूं शकते, या वर्तुळाचा भेद करून बाहेर जाणें तिला स्वभावतःच शक्य नाही. ह्या वर्तुळाच्या बाहेर जाण्याचा आपण जितका आटापिटा करतों तितकें तें असंभवनीय आहे हें आपल्या चांगलें प्रत्ययास येऊं लागतें. आणि तरीपण गंमत अशी की मनुष्यजातीला अतिशय मोल्यवान, अतिशय आदरणीय, अतिशय प्रिय म्हणून जें काय वाटतें तें सारें ह्या वर्तुळाच्या बाहेर आहे, मानवी बुद्धीच्या ह्या संकुचित, मर्यादित कक्षेच्या बाहेर आहे. अविनाशी आत्मा आहे किंवा नाही, ईश्वर आहे किंवा नाही, ह्या अखिल सृष्टीचा कुणी परम चैतन्यस्वरूप नियंता आहे किंवा नाही--इत्यादि प्रश्न बुद्धीच्या कक्षेबाहेरचे आहेत. बुद्धि त्यांना कदापि निर्णायक उत्तर देऊं शकत नाही. ते सारे बुद्धीच्या आवाक्या-बाहेरचे आहेत. बुद्धि काय म्हणते ? बुद्धि म्हणत असते--"मी अज्ञेय-वादी आहें. ह्या साऱ्या प्रश्नांच्या उत्तरीं मी 'हो' हि म्हणूं शकत नाहीं अथवा 'नाहीं'हि म्हणूं शकत नाहीं." पण असें म्हणून कसें होणार ? हे सारे प्रश्न तर मानवाला अत्यंत महत्त्वाचे, अतिशय जिव्हाळयाचे वाटत असतात. ह्यांचें नीट, समाधानकारक, निर्णायक उत्तर न मिळा-ल्यास मानवी जीवनाला कांही अर्थ, कांही प्रयोजनच उरणार नाही. ह्या वर्तुळाच्या बाहेरून येणारें ज्ञानच आपल्या समग्र नैतिक सिद्धा-न्तांचा, आपल्या समस्त नैतिक मनोभावांचा, नव्हे, मानवीस्वभावांत जें कांही शुभ आहे, महान् आहे त्या साऱ्यांचा पाया होय. म्हणून ह्या प्रश्नांना उत्तर मिळणें अत्यंत महत्त्वाचें आहे. मानवी जीवन जर खरो-खरच निव्वळ दो घडीचा खेळ असेल, हें विश्व जर खरोखरच निव्वळ अणुपरमाणूंचा कसातरी आपोआप बनलेला तात्पुरता मेळावा असेल तर मग मीं दुसऱ्याचें भलें करावयाचें तें काय म्हणून ? काय म्हणून मग मीं दुसऱ्यांचें चांगलें करायचें, दुसऱ्यांवर उपकार करावयाचा ? दया, न्याय, सहानुकंपा इत्यादींची मग काय आवश्यकता आहे ? मग तर मिळालेल्या संधीचा आप्पलपोटेपणाने शक्य तितका फायदा घेणें, स्वतःपलीकडे, स्वतःच्याच सुखापलीकडे मुळीसुद्धा न पाहणें हेंच आपलें

सर्वश्रेष्ठ कर्तव्य होऊन बसेल. मरणानंतर असण्याची, मरणोत्तर जीवनाची जर कांहीच आशा नसेल तर मग मीं आपल्या भावावर प्रेमच कां करावें. त्याचा गळा कां बरें कापूं नये ? जर ह्या जगापलीकडे, ह्या टीचभरच्या जीवनापलीकडे कांही नसेल, ह्या संसारबंधनामधून सुटण्याची, मुक्तीची जर कांही आशाच नसेल, जर जीवन म्हणजे केवळ कित्येक कठोर, अनुल्लंघनीय, अंधळ्या नियमांचा करडा अंमलच असेल तर मग इहलोकीं सुखी होण्याखेरीज आणखी कसलासुद्धा प्रयत्न मीं न करणेंच श्रेयस्कर म्हणावयाचें. मग तर ऐहिक सुखाव्यतिरिक्त आणखी कसला विचारहि मीं मनांत आणणें अयोग्य होईल. सुख, केवळ ऐहिक सुख, हेंच मग माझें एकमेव कर्तव्य ठरेल. आजकाल असें म्हणणारे लोक तुम्हांला पुष्कळ आढळतील की उपयुक्ततावाद हाच नीतीचा पाया होय. काय होतो ह्याचा अर्थ ? ह्याचा अर्थ असा की, जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त सुख ज्याने साधूं शकेल त्यालाच नैतिकता वा नीतिमत्ता म्हणावें. जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त सुख साधणें—हीच ह्या लोकांच्या मतें नीतिमत्ता होय, हाच या लोकांच्या मताने नीतीचा पाया होय. त्यांना माझा प्रश्न आहे की, जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त सुख साधून मीं नीतिमान बनायचें तें कां, कशासाठी ? माझा स्वतःचा मतलब साधत असेल तर मी जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त अनिष्ट कां करूं नये ? उपयुक्ततावाद्याचें माझ्या ह्या प्रश्नाला काय बरें उत्तर आहे ? बरोबर काय आणि चूक काय हें तुम्ही कसें ठरविणार ? माझी सुखाची इच्छा मला खेचत आहे, मी ती पूर्ण करीत आहें, तो माझा स्वभाव आहे, बस्, यापलीकडे मी आणखी कांहीच जाणत नाहीं. माझ्यामधे ह्या वासना सळसळत आहेत आणि मी त्या पूर्ण करून घेणार; त्याने तुमचें कां डोकें उठावें ? मला मनाई करण्याचा तुम्हांला काय अधिकार ? नीति, आत्म्याचें अमरत्व, ईश्वर, प्रेम, सहानुभूति, चांगुलपणा, साधुत्व, आणि यांहिपेक्षा म्हणजे निःस्वार्थता प्रभृति हीं सारीं मानवी जीवनास अलंकारभूत होणारीं महन्मंगल तत्त्वें तुमच्यामाझ्यांत कुठून प्रादुर्भूत होतात ? तीं तुमच्या-माझ्यांत कुठून बरें येतात ?

सगळें नीतिशास्त्र, मानवाचीं सारीं कार्यें, मानवाचे सर्व विचार, समस्त मनोवृत्ति केवळ एका निःस्वार्थपणाच्या पायावरच उभ्या आहेत, अवघ्या मानवीजीवनाचा सारांश एकाच शब्दांत सांगतां येईल, आणि तो एक शब्द म्हणजे—निःस्वार्थता. आता प्रश्न असा आहे—आपण निःस्वार्थी कां बरें व्हावयाचें ? निःस्वार्थ होण्याची काय आवश्यकता ? काय प्रयोजन ? आणि कशाच्या बलानें, कशाच्या जोरावर मीं निःस्वार्थी व्हावयाचें ? तुम्ही स्वतःला 'बुद्धिवादी' म्हणवतां, 'उपयुक्ततावादी' म्हणवतां. चांगली गोष्ट आहे, पण तुम्ही जर मला ह्या तुमच्या 'उपयुक्तते'चें कारण सांगू शकणार नाही, 'जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त सुख' साधण्याचा आटापिटा मीं 'कां' करावा हें जर तुम्ही मला तर्कानें पटवून देऊं शकणार नाही तर मी तुम्हांला 'बुद्धिवादी' मानायला कधीच तयार होणार नाहीं. मीं स्वार्थी काय म्हणून व्हावयाचें नाही हें तुम्ही मला समजावून सांगा. निःस्वार्थता ही काव्यमय कल्पना आहे खरी, पण काव्य म्हणजे तर तर्क किंवा 'बुद्धिवाद' नव्हे ना ? हें सारें तुम्हीं मला तर्कानें पटवून दिलें पाहिजे. मीं निःस्वार्थी काय म्हणून व्हावयाचें, चांगलें काय म्हणून व्हावयाचें ? अमुक अमुक सांगतो म्हणून मीं तसें व्हावयाचें हें मला मुळीच मान्य नाही. निःस्वार्थी झाल्यानें माझा काय फायदा, मला त्यानें काय लाभ, मला त्याची काय उपयुक्तता ? त्यांत माझें काय हित ? 'हित' किंवा 'उपयुक्तता' यांचा अर्थ जर 'जास्तींत जास्त सुख' असा असेल तर स्वार्थीपणाच मला हिताचा किंवा उपयुक्त वाटतो. दुसऱ्यांना फसवून, दुसऱ्यांचें सर्वस्व लुबाडून जर मला 'जास्तींत जास्त सुख' लाभत असेल तर मीं तसें कां करूं नये ? काय उत्तर आहे या प्रश्नाला ? 'उपयुक्ततावादी' ह्या प्रश्नाला उत्तर कधीच देऊं शकणार नाहीत. ह्या प्रश्नाचें खरें उत्तर असें आहे की, हें आपलें दृश्यमान जगत् एका अनंत समुद्रांतील केवळ एक यःकश्चित् बिंदु आहे, एका अनंत साखळीमधील केवळ एक दुवा आहे. ज्यांनी निःस्वार्थतेचा उद्घोष केला, मनुष्यजातीला निःस्वार्थता शिकविली त्यांना तें तत्त्व कुठून मिळालें ? तें त्यांना उपजतप्रेरणेनें लाभलें नाही हें निश्चित. कारण उपजतप्रेरणा तर पशूंच्या ठायींहि असते, पण कुठे, पशूंना तें तत्त्व कुठे अवगत

असतें ? तर्कानें वा बुद्धिनेहि हें तत्त्व त्या व्यक्तींना ज्ञात झालेलें नसतें, कारण तर्काला किंवा बुद्धीला ह्या साऱ्या गोष्टी मुळीच आकळतां येत नाहीत. मग ह्रीं सारीं तत्त्वें त्या व्यक्तींना कशीं गवसलीं, कुठे गवसलीं?

इतिहासाचें अनुशीलन करतांना आपल्या निदर्शनास येतें की जगांत आजपर्यंत होऊन गेलेल्या समस्त थोर थोर धर्माचार्यांनी एक गोष्ट अगदी एकमुखानें प्रतिपादिली आहे. ते सर्वजण म्हणून गेले आहेत की, त्यांनी प्रचारिलेलीं सत्यें त्यांना कुठेतरी ह्या जगाच्या अतीत अशा एका राज्यांत गवसलीं आहेत. आता, आपल्याला हीं सत्यें नक्की कुठून लाभलीं आहेत हें त्यांच्यापैकी पुष्कळांना विदित नव्हतें ही गोष्ट अर्थातच निराळी. आणि म्हणूनच त्यांच्यापैकी एखादा म्हणतो की "एक देवदूत पंख असलेल्या मनुष्याच्या रूपांत मजजवळ येऊन मला म्हणतां झाला की—'हे मानवा, ऐक, हा मी तुला स्वर्गीचा दिव्य संदेश सांगत आहें, तो तूं ग्रहण कर.'" दुसरा एखादा म्हणतो की "एक तेजःपुंज देवता माझ्यासमोर आविर्भूत झाली आणि तिने मला हीं सत्यें उपदेशिलीं." तिसरा कुणी म्हणतो की "माझ्या एका पूर्वजाने माझ्या स्वप्नांत येऊन मला हीं सत्यें सांगितलीं. याविषयी यापलीकडे मला आणखी कांहीच ठाऊक नाही." याप्रमाणे हीं सत्यें आपल्याला कशीं लाभलीं ह्याचें वर्णन त्यांच्यापैकी प्रत्येकजण असें निरनिराळ्या तऱ्हेने करीत असला तरी, तीं आपल्याला आपल्या तर्कबुद्धीच्या द्वारा लाभलेलीं नसून तर्कबुद्धीच्या पलीकडील प्रदेशांतून तीं आपल्याला लाभलीं आहेत असें मात्र ते सगळेच्या सगळेजण म्हणत असतात. या मुद्यावर त्या साऱ्यांचें अगदी एकमत आहे. आता ह्यासंबंधी योग-शास्त्राचें काय म्हणणें आहे हें आपण बघूं या. यासंबंधी योगशास्त्राचें असें मत आहे की, आपल्याला हें ज्ञान तर्कबुद्धीच्या पलीकडील प्रदे-शांतून प्राप्त झालें आहे असें जें हे लोक म्हणतात तें अगदी बरोबर आहे, परंतु त्याचबरोबर हेंहि खरें की तें ज्ञान त्यांना वस्तुतः त्यांच्या स्वतःच्या आंतूनच प्राप्त झालेलें असतें.

योगी म्हणतात की आपल्या ह्या मनाचीच अशी एक उच्च अवस्था आहे की जी तर्कबुद्धीच्या अतीत आहे, जाणिवेच्या पलीकडील आहे त्या उच्चावस्थेंत प्रवेश केल्यास तर्काला अगम्य असलेलें हें ज्ञान

मानवाला प्राप्त होतें. समस्त वैषयिक ज्ञानांच्या पलीकडील परमार्थज्ञान वा अतींद्रियज्ञान मग त्या व्यक्तीला प्राप्त होतें. आता, ही तर्कबुद्धीच्या पलीकडची अवस्था, ही सामान्य मानवाच्या जाणिवेपलीकडील अवस्था, ज्याला तींत प्रवेश करण्याचें शास्त्र अवगत नाही अशा माणसाला कधीकधी दैववशात् अगदी अचानकपणें, अकस्मात् लाभून जाणें शक्य आहे. ठेच लागून पडावें आणि एखादी अमूल्य जिन्नस हातीं सापडावी अशी या अतींद्रियज्ञानलाभाच्या बाबतींत त्या माणसाची स्थिति होऊन जाते. आणि याप्रकारें अडखळून कसा तरी अचानकपणें ह्या अतींद्रियज्ञानाचा लाभ झाल्यास तो माणूस साधारणपणें असेंच समजून बसतो की तें ज्ञान त्याला बाहेरून कुठूनतरी लाभलें आहे. यावरून हें उत्स्फूर्त ज्ञान, हें इंद्रियातीत परमार्थज्ञान वेगवेगळ्या देशांत वस्तुत: एकच असलें तरी कुण्या देशांत तेंच देवदूताकडून, कुण्या देशांत देवतेकडून, तर आणखी एखाद्या देशांत स्वयं ईश्वराकडून प्राप्त झालें आहे असें कां मानण्यांत येतें हें कळूं शकतें. ह्यावरून काय निष्कर्ष निघतो ? ह्यावरून हाच निष्कर्ष निघतो की मनाने स्वत:च्या स्वभावानुसार स्वत:च्या आंतमधूनच हें ज्ञान प्राप्त करून घेतलेलें असतें; पण आपल्याला झालेला हा ज्ञानलाभ कसा झाला याचें स्पष्टीकरण ती ती व्यक्ति स्वत:च्या समजुतीनुसार करीत असते. खरी वस्तुस्थिति अशी असते की, ह्या साऱ्या व्यक्तींना ही बोधातीत अवस्था दैववशात्, अगदी अचानकपणें, अडखळून पडून सापडल्यागत अकस्मात् उपलब्ध झालेली असते.

योगी लोक म्हणतात की ही बोधातीत, अतींद्रिय अवस्था अशी एकाएकी, अचानकपणें लाभणें अत्यंत धोक्याचें आहे. बऱ्याचजणांच्या बाबतींत त्याने डोकें अजीबात बिघडण्याची शक्यता असते. आणि एरवीहि एक गोष्ट तुम्हांला अगदी निरपवादपणें आढळून येईल की ह्या बोधातीत अवस्थेचें शास्त्र अवगत नसतांहि ज्यांना ज्यांना ती अवस्था अशी एकाएकी, अकस्मात् लाभली आहे ते सर्व लोक तसे कितीहि थोर असले तरी एरवी अंधारांतच चाचपडत होते आणि त्यांच्या ह्या ज्ञानाबरोबरच त्या सर्वांच्याच ठायीं कित्येक अतिचमत्कारिक खुळचट समजुती पण वसत होत्या. अनेक भ्रमांना, भास-

आभासांना, मनाच्या खेळांना ते बळी पडले आहेत.

असो तर, अशा व्यक्तींच्या चरित्रांचें अनुशीलन केल्यास समाधी-च्या मार्गावरील ह्या उपरिनिर्दिष्ट विशिष्ट धोक्याची आपल्याला कल्पना येऊं शकते. तथापि त्याबरोबर ह्या सर्व व्यक्तींच्या जीवनांत ही उच्चावस्था स्फुरली होती ह्यांतहि कांही संशय नाही. कसाहि का होईना पण त्या सगळ्यांनी ह्या बोधातीत, अतींद्रिय राज्यांत प्रवेश केला होताच. परंतु असें दिसून येतें की जेव्हा जेव्हा एखाद्या द्रष्टयाला केवळ भावनेच्या जोरावर, केवळ भावनांची वृद्धि होऊन ही अवस्था लाभली आहे तेव्हा तेव्हा कित्येक सत्यांच्या प्राप्तीबरोबरच त्याच्यांत बराचसा कट्टरपणा, बरीचशी स्वमतान्धता, बऱ्याचशा खुळचट सम-जुतीहि शिरल्या आहेत, आणि त्याच्या उपदेशांमधील चांगल्या भागाने जगाचा जितका लाभ झाला आहे तितकीच त्यांमधील स्वमतान्धतेने आणि खुळचट समजुतींनी जगाची हानि पण केली आहे. मानवीजीवना-मधील असंख्य, अनंत विसंगतींची सुबुद्ध संगति लावावयाची झाल्यास त्यासाठी आपल्याला आपल्या तर्कबुद्धीची सीमा ओलांडावी लागेल यांत शंकाच नाही. पण हें सीमोल्लंघन आपण शास्त्रशुद्ध प्रणालीने, हळूहळू, नित्यनियमित साधनेने केलें पाहिजे, आणि त्याबरोबरच खुळ-चट समजुतींना अजीबात थारा मिळणार नाही याविषयीहि खबरदारी बाळगली पाहिजे. इतर कोणत्याहि शास्त्राचें अध्ययन आपण ज्या पद्धतीने करतों त्याच पद्धतीने या बोधातीत, अतींद्रिय अवस्थेचेंहि अनुशीलन आपण करावयास हवें. हें अनुशीलन आपण तर्कबुद्धीच्या पायावरच आधारलें पाहिजे. तर्कबुद्धि आपल्याला जिथवर घेऊन जाऊं शकेल तिथवर आपण तिचेंच अनुसरण केलें पाहिजे. आणि ज्या वेळीं ती थांबेल, जिथून ती आणखी पुढे जाऊं शकणार नाही तिथून, त्या वेळीं तीच आपल्याला ह्या सर्वोच्च अवस्थेची त्यापुढली वाट दाखवून देईल. म्हणून, जो म्हणतो की 'माझ्यांत ज्ञान स्फुरलें आहे' आणि इकडे तर्कविसंगत गोष्टी बोलतो आहे असा माणूस जर तुम्हांला आढळला तर तुम्ही त्याचें मुळीच ऐकूं नका. कां बरें अशाचें ऐकावयाचें नाही ? कारण असें की, वर आपण ज्यांची चर्चा केली आहे त्या उपजतप्रवृत्ति, तर्कबुद्धि आणि बोधातीतता—नेणीव, जाणीव आणि

अतिजाणीव--ह्या तिन्ही एकाच मनाच्या तीन भिन्नभिन्न अवस्था आहेत. असें तर नाही ना की माणसाला तीन वेगवेगळीं मनें असतात? एकाच मनाच्या ह्या तीन वेगवेगळ्या अवस्था आहेत; त्याच मनाची एक अवस्था जाऊन त्याला तदनंतरची दुसरी अवस्था प्राप्त होत असते. मन एकच, तेंच मन एका अवस्थेंतून दुसरींत जात असतें, इतकेंच. उपजतप्रेरणा तर्कबुद्धींत परिणत होते आणि तर्कबुद्धि बोधातीत संज्ञेंत विकसित होते. म्हणून ह्यांतील कोणतीच अवस्था इतर अवस्थांना विरोधी नसते. खरेखरें उत्स्फूर्त ज्ञान कधीच तर्कबुद्धीला विरोधी नसतें, उलट उत्स्फूर्त ज्ञान ही तर्कबुद्धीची परिपूर्णावस्था होय. म्हणून उत्स्फूर्त ज्ञानाच्या नांवावर जर कुणी असंबद्ध, तर्कविसंगत, बुद्धिविरोधी कांही-तरी बरळूं लागला तर अगदी न कचरतां तें खुशाल धुडकावून लावा. खरें उत्स्फूर्त ज्ञान हें तर्कबुद्धीची गळचेपी करीत नसतें, तें तिच्यांतील अपूर्णता दूर करून तिला पूर्णत्व आणीत असतें. पूर्वीच्या थोर द्रष्टयांनी म्हटलेलें तुम्हांला माहीतच आहे की "मी विनाश करण्यासाठी आलों नाहीं, तर पूर्ति करण्यासाठी आलों आहें." उत्स्फूर्त ज्ञानाच्या बाब-तींतहि असेंच म्हणतां येईल. उत्स्फूर्त ज्ञान तर्कबुद्धीला पूर्णत्व देत असतें. साहजिकच त्या दोघांत मेळ असतो, मिलाफ असतो, समन्वय असतो. तें ज्या वेळीं तर्कबुद्धीच्या विरोधी असेल त्या वेळीं निश्चित जाणा की तें मुळी खरेखुरें उत्स्फूर्त ज्ञानच नव्हे.

योगाच्या आतापर्यंत वर्णन केलेल्या पायऱ्यांचा किंवा अंगांचा उद्देश आपल्याला शास्त्रीय प्रणालीनें बोधातीत वा समाधि-अवस्थेप्रत नेऊन पोहोचविणें हाच आहे. याखेरीज या बाबतींत येथे आणखी एक गोष्ट नीट समजून घेणें अत्यंत महत्त्वाचें आहे. ती गोष्ट ही की, उत्स्फूर्त वा अतींद्रियज्ञान प्राप्त करून घेण्याची शक्ति केवळ जुन्या काळच्या द्रष्टयांमधेच होती असें नव्हे, ती प्रत्येक मानवांत स्वभाव-सिद्धपणें वसत असते. जशी ती त्यांच्यांत होती तशीच ती इतर प्रत्येक माणसांतहि स्वभावतःच आहे. ते द्रष्टे म्हणजे तुमच्या–माझ्यापेक्षा अगदी वेगळ्या कोटीचे विचित्र जीव नव्हते, तींहि तुमच्या–माझ्या-सारखींच माणसें होतीं. अर्थातच ते फार मोठे योगी होते. त्यांनी उपर्युक्त बोधातीत, अतींद्रिय अवस्था प्राप्त करून घेतली होती. पण

प्रयत्न केल्यास, यथोचित साधना केल्यास आपणसुद्धा ती अवस्था प्राप्त करून घेऊं शकतों. ती म्हणजे कांही वेगळ्या जातीचीं माणसें होतीं अशांतला भाग नाही. एक व्यक्ति एकदा ती अवस्था प्राप्त करून घेऊं शकली यावरूनच हें सिद्ध होतें की प्रत्येकालाच ती अवस्था प्राप्त करून घेतां येणें शक्य आहे. आणि केवळ शक्य आहे इतकेंच नव्हे तर अखेर प्रत्येकाने ही अवस्था प्राप्त करून घेतली पाहिजेच पाहिजे-- अखेर ती प्रत्येकाला प्राप्त होईलच होईल. ही अवस्था प्राप्त होणें म्हणजेच धर्म होय. प्रत्यक्ष अनुभव हाच आपला एकमेव शिक्षक आहे. प्रत्यक्ष अनुभवाद्वारेंच आपल्याला खरेंखरें ज्ञान होऊं शकतें. आपण सारा जन्म बडबड केली किंवा तर्कविचार केला तरी प्रत्यक्ष अनुभव आल्याखेरीज आपल्याला सत्याचें एक अक्षरहि समजायचें नाही. एखाद्या माणसाला केवळ कित्येक पुस्तकें पढवून त्याला शल्य-वैद्य (सर्जन) बनविण्याची आशा धरणें योग्य होणार नाही. एखादा देश बघण्याची माझी इच्छा, तुम्ही मला त्या देशाचा केवळ एक नकाशा दाखवून तृप्त करूं शकणार नाही. त्या देशांत जाऊन तो प्रत्यक्ष बघितल्यानेच माझें कुतूहल पूर्ण होणें शक्य आहे. प्रत्यक्ष अनुभव हवा. नकाशाने फक्त त्या देशाचें अधिक सर्वांगीण ज्ञान मिळविण्याची आकांक्षा आपल्यांत निर्माण होणें शक्य आहे, इतकेंच. यापलीकडे नकाशांना आणखी कांहीच किंमत नाही. केवळ ग्रंथांना कवटाळून बसल्याने, केवळ पुस्तकांवर भर ठेवल्याने माणसाचें मन अवनत होऊन जात असतें. परमेश्वराविषयीचें सगळेच्या सगळें ज्ञान ह्या पुस्तकांत किंवा त्या शास्त्रांतच साठविलेलें आहे असें म्हणण्यापेक्षा परमेश्वराची आणखी घोर नालस्ती ती कोणती ? एकीकडे ईश्वराला अनंत म्हणावयाचें आणि दुसरीकडे त्याला एखाद्या लहानशा पुस्तकांत कोंबून टाकण्याचा उपद्व्यापहि करावयाचा ! ह्याला काय म्हणावें ? लोक असें करायला कसें धजावूं शकतात हेंच मला कळत नाही. एखाद्या विशिष्ट पुस्तकावर विश्वास ठेवला नाही, ईश्वराविषयीच्या सर्वच्या सर्व ज्ञानाचा गठ्ठा एखाद्या विशिष्ट ग्रंथांतच आहे असें मानावयास राजी झाले नाहींत म्हणून लक्षावधि लोक मारून टाकण्यांत आले आहेत. अर्थातच सुदैवाने ह्या असल्या कत्तलींचे आणि खुनाखुनीचे दिवस आता निघून गेले

आहेत हें खरें, तरीपण जग ह्या ग्रंथनिष्ठेच्या, ह्या पोथीवेडाच्या भीषण मगरमिठींतून मात्र अद्यापहि सुटलेलें नाही.

शास्त्रशुद्ध पद्धतीने ही बोधातीत, अतींद्रिय अवस्था प्राप्त करून घ्यावयाची असल्यास, मीं तुम्हांला राजयोगाचीं जीं अंगें सांगितलीं आहेत त्यांतील प्रत्येक अंगाची तुम्हांला नीट साधना करावी लागेल-- मीं आतापर्यंत वर्णन केलेल्या पायऱ्यापायऱ्यांनीच तुम्हांला त्या अवस्थेप्रत पोहोचावें लागेल. गेल्या प्रकरणांत आपण प्रत्याहार आणि धारणा यांचें विवेचन केलें होतें. प्रत्याहार आणि धारणा यानंतर येतें 'ध्यान'. शरीरामधील किंवा बाहेरील एखाद्या स्थानावर मन स्थिर करण्याचा पुनः पुनः प्रयत्न करीत गेल्यास त्या दिशेने अविच्छिन्नपणें प्रवाहित होण्याची शक्ति मनांत येते. मनाच्या ह्याच अवस्थेला ध्यान म्हणतात. ज्या वेळीं ही ध्यानशक्ति इतकी वृद्धिगत होते की अनुभूतीचें बहिरंग टाकून तिच्या केवळ अंतरंगावर म्हणजेच अर्थावर मन ध्यानस्थ होऊन जातें त्या वेळीं त्या अवस्थेलाच समाधि असें म्हणतात. धारणा, ध्यान आणि समाधि या तिघांना मिळून संयम म्हणतात. म्हणजे असें की, जर कुणी प्रथम एखाद्या वस्तूवर मन एकाग्र करूं शकेल, नंतर ती एकाग्रता दीर्घकाल टिकवूं शकेल, आणि त्यानंतर ह्या संततधार एकाग्रतेद्वारा, ज्या आंतील कारणामुळे त्या बाह्य वस्तूची अनुभूति होत होती, केवळ त्यावर (अनुभूतीच्या त्या अंतरंगावरच) मन केंद्रित करूं शकेल तर त्या मनाला सर्वकांही वशीभूत होऊन जाईल.

ही ध्यानावस्था जीवाला उपलब्ध असलेल्या समस्त अवस्थांमधे सर्वश्रेष्ठ अवस्था होय. जोंवर वासना आहे तोंवर खरें सुख प्राप्त होणें शक्य नाही. जेव्हा ह्या ध्यानावस्थेंतून, म्हणजे साक्षीवत् सर्व वस्तूंकडे बघतां येतें तेव्हाच खराखरा उपभोग, खरेखरें सुख प्राप्त होतें. पशूंचा हर्ष इंद्रियांमधे असतो, मानवाचें सुख बुद्धींत असतें, आणि देवमानवाचा आनंद असतो आध्यात्मिक ध्यानांत--आत्मध्यानांतच. ज्याला ही ध्यानावस्था लाभलेली आहे त्यालाच हें जग खरोखर अतिसुंदर दिसूं लागतें. जो कशाचीहि वासना धरीत नाही, जो ह्या साऱ्यांत लिप्त होत नाही त्याच्यापक्षीं प्रकृतीचीं हीं विविध परिवर्तनें म्हणजे सौंदर्याचा आणि उदात्ततेचा विलासच होय.

ध्यानामधून हीं सारीं तत्त्वें उमजून घ्यावयास हवींत. अशी कल्पना करा की मी एक ध्वनि ऐकत आहें. प्रथमत: म्हणजे बाहेरून एक कंपन आलें. त्यानंतर ज्ञानतंतूंची क्रिया,—ज्ञानतंतूंनी तें कंपन मनापर्यंत पोहोचवून दिलें. त्यानंतर मनांत एक प्रतिक्रिया झाली, आणि तिच्याबरोबरच ताबडतोब मला त्या बाह्यवस्तूचें ज्ञान झालें-- मीं ती वस्तु जाणली. ह्या बाह्यवस्तूनेच आकाश-कंपनांपासून तों मानसिक प्रतिक्रियेपर्यंतच्या नाना परिवर्तनांची परंपरा निर्माण केली होती. योगशास्त्रांत ह्या तिघांना शब्द, अर्थ आणि ज्ञान अशा संज्ञा आहेत. पदार्थविज्ञान आणि शरीररचनाशास्त्र यांच्या भाषेंत यांना आकाशगत कंपन, ज्ञानतंतु व मेंदू यांच्या क्रिया, आणि मानसिक प्रतिक्रिया म्हणतां येईल. आता, ह्या तिन्ही प्रक्रिया अगदी वेगवेगळया, अलगअलग असल्या तरी एकींत एक अशा प्रकारें मिसळून गेल्या आहेत की त्यांचा पृथक्पणा समजणें दुरापास्त होऊन बसलें आहे. त्या अगदी एकजीव, एकसंध होऊन गेल्या आहेत. नव्हे, असें म्हणावें लागतें की वस्तुत: सध्या आपल्याला त्या तिन्हींपैकी कुणाचाहि प्रत्यय येत नसून त्या तिघींच्या संमिश्रणाचें फळ अशा स्वरूपांत बाह्य वस्तूचा अनुभव येत आहे. असा प्रत्येक अनुभव येतांना, अशा प्रत्येक वस्तुज्ञानाच्या वेळीं ह्या तिन्ही प्रक्रिया घडतच असतात, आणि म्हणून त्यांचा प्रत्येकीचा वेगवेगळा, पृथक्पणें प्रत्यय न येऊं शकण्याचें कांहीच कारण नाही.

आधी सांगितलेल्या योगांगांच्या साधनेने मन ज्या वेळीं दृढ आणि संयत होऊन जातें आणि त्याच्यांत सूक्ष्म अनुभवाची शक्ति येते त्या वेळीं मग त्याला ध्यानाच्या साधनेंत लावणें योग्य होईल. हें ध्यान पहिल्याने स्थूल वस्तूवर करणें इष्ट होईल. स्थूल वस्तूच्या साहाय्यानेच ध्यानसाधनेस सुरुवात व्हावयास हवी. त्यानंतर मग हळूहळू आपलें ध्यान उत्तरोत्तर अधिकाधिक सूक्ष्म होत जाईल. असें होतां होतां अखेर आपण विषयरहित अथवा निर्विकल्प ध्यान करण्यास समर्थ होऊं. मनाने पहिल्याने संवेदनांचीं बाह्य कारणें जे विषय, त्यांचा प्रत्यय घेण्याचा प्रयत्न करावा, नंतर ज्ञानतंतूंमधील क्रियांचा आणि अखेर मनानेच मानसिक प्रक्रियांचा प्रत्यय घेण्याचा यत्न करावा. ज्या

वेळीं अनुभवाचीं बाह्य कारणें जे विषय, त्या विषयांचा पृथक्पणें प्रत्यय घेण्याची मनांत शक्ति येईल त्या वेळीं तें मन समस्त सूक्ष्म भौतिक पदार्थ, समस्त सूक्ष्म शरीरें आणि सूक्ष्म रूपें जाणण्यास समर्थ होईल. ज्या वेळीं आंतील, ज्ञानतंतूंच्या क्रिया इतर समग्र विषयांहून पृथक्पणें जाणण्याची तुमच्यांत शक्ति येईल त्या वेळीं स्वत:मधील आणि इतरांमधील मनोवृत्तींचे प्रवाह जाणण्याचें तुमच्यांत सामर्थ्य येईल. फार काय पण मनोवृत्तींचें भौतिक शक्तींत रूपान्तर होण्यापूर्वीच तुम्ही त्या (मनोवृत्ति) जाणूं शकाल. आणि सरतेशेवटीं ज्या वेळीं मानसिक प्रतिक्रिया पृथक्पणें अनुभवणें शक्य होईल त्या वेळीं त्या योग्याला समस्त पदार्थांचें ज्ञान प्राप्त होईल, कारण आपल्या प्रत्ययास येणारी प्रत्येक वस्तु, प्रत्येक चित्तवृत्ति ह्या मानसिक प्रतिक्रियेचेंच फल होय. ही अवस्था लाभली म्हणजे त्याने आपल्या मनाचा अगदी तळ गाठला, त्याला स्वत:च्या मनाचा अगदी पायाच आकळला असें होईल आणि मन त्याला अगदी संपूर्णपणें वश होऊन जाईल. त्या वेळीं योग्याला नानाप्रकारच्या अलौकिक, अद्भुत शक्ति प्राप्त होतील, मात्र तो जर ह्या शक्तींच्या मोहाला बळी पडेल तर त्याच्या उन्नतीचा मार्ग तिथेंच खुंटेल. भोगांमागे धावण्याने असाच अनर्थ उद्भवत असतो ! पण तो जर ह्या साऱ्या अलौकिक शक्तिदेखील झिडकारूं शकेल तर त्याला योगाचें अंतिम फल प्राप्त होईल--मन:सागरावरील समस्त वृत्ति-लाटांचा तो संपूर्ण निरोध करूं शकेल. तेव्हाच मग मनाच्या विक्षेपांनी वा देहाच्या क्रियांनी चलित न होतां आत्म्याचा महिमा पूर्ण उज्ज्वलपणें प्रकट होतो. मग योग्याला स्वत:च्या ज्ञानघन, अविनाशी, सर्वव्यापी स्वरूपाची ओळख पटते,--त्याला कळून येतें की तेंच त्याचें सनातन, चिरंतन स्वरूप होय.

ह्या समाधिसंपदेवर प्रत्येक मानवाचा, नव्हे प्रत्येक प्राण्याचा अधिकार आहे. अगदी खालच्या कोटींतील प्राण्यापासून तों अगदी सर्वोच्च कोटींतील देवतेपर्यंत सर्वांनाच केव्हा ना केव्हा तरी ही अवस्था प्राप्त करून घ्यावी लागेलच, आणि तेव्हा नि तेव्हाच कुणालाहि खराखरा धर्मलाभ झाला असें म्हणतां येईल. तोंपर्यंत आपण जें कांही करीत आहोंत तें सारें ती अवस्था प्राप्त करून घेण्यासाठीचे प्रयत्न होत, इतकेंच. आज तरी आपल्यांत आणि जे लोक धर्म मानीत नाहीत

त्यांच्यांत मोठासा फरक नाही. कारण आपल्याला तरी त्या अतींद्रिय सत्यांची प्रत्यक्ष अनुभूति कुठे आहे? ह्या प्रत्यक्षानुभूतीच्या बाबतींत ते धर्मलंड लोक आणि आपण सारखेच आहोंत. ही प्रत्यक्षानुभूति प्राप्त करून घेण्याखेरीज या एकाग्रतासाधनेचा आणखी काय उपयोग? ह्या समाधीचा लाभ करून घेण्यासाठीच्या प्रत्येक साधनेचा नीट ऊहापोह होऊन गेलेला आहे, त्या निरनिराळ्या सर्व अंगांची नीट जुळणी करण्यांत आलेली आहे आणि त्या सर्वांना एक शास्त्रशुद्ध सुसंबद्ध रूप देण्यांत आलेलें आहे. जर नीट, निष्ठापूर्वक साधना करण्यांत येईल तर आपल्याला आपलें अभीष्ट लाभलेंच पाहिजे. तेव्हाच सर्व दुःखें शमतील, सर्व कष्ट निमतील, कर्माचीं बीजें जळून जातील आणि आत्मा कायमचा मुक्त होईल.

---

## प्रकरण आठवें

# संक्षिप्त राजयोग

कूर्मपुराणामधील राजयोगासंबंधीच्या भागाचा स्वैर अनुवाद खाली दिला आहे:—

योगाग्नि हा माणसाला घेरणारा पापपिंजर दग्ध करून टाकतो, त्याने सत्त्वशुद्धि होऊन निर्वाणाचा प्रत्यक्षपणें लाभ होतो. योगाने ज्ञान लाभतें, तें ज्ञान योग्याला मुक्तिलाभास साहाय्यभूत होतें. ज्याच्याठायीं योग आणि ज्ञान दोन्हीं वसतात त्याच्यावर भगवान प्रसन्न असतात. जे दिवसांतून एकदा, दोनदा, तीनदा वा सर्वदा महायोग करतात त्यांना देवता समजा. योगाचे दोन प्रकार आहेत. एकाला म्हणतात 'अभाव' आणि दुसऱ्याला म्हणतात 'महायोग'. जेव्हा आपण शून्य आहोंत आणि सर्वप्रकारच्या गुणांनी रहित आहोंत असें चिंतन केलें जातें तेव्हा त्याला अभावयोग म्हणतात. आपला आत्मा आनंदपूर्ण, सर्वपापरहित आणि परमेश्वराशीं अभिन्न आहे अशा चिंतनाला म्हणतात महायोग. योगी या दोन्ही प्रकारच्या योगांच्या साहाय्याने आत्मसाक्षात्कार करून घेतो. ज्याने योगी स्वतःला आणि समस्त विश्वाला भगवत्स्वरूप बघूं शकतो त्या महायोगाशीं, आपण ज्या इतर योगांसंबंधी वाचतों वा ऐकतों त्या

योगांची तुलनाच होणें शक्य नाही. ते इतर योग ह्या महायोगाच्या वा ब्रह्मयोगाच्या पासंगालाहि पुरणार नाहीत. समस्त योगांमध्ये हाच योग सर्वश्रेष्ठ होय.

यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि ह्रीं राजयोगाचीं अंगें वा पायऱ्या आहेत. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह यांना यम म्हणतात. या यमाने चित्तशुद्धि होते. कायावाचामनाने कुणाहि प्राण्याला कधी पीडा न देणें याला अहिंसा म्हणतात. अहिंसेपेक्षा श्रेष्ठ दुसरा धर्म नाही. समग्र जीवसृष्टीविषयी ही अहिंसेची वृत्ति बाळगल्याने माणसाला जें सुख लाभतें त्यापरीस श्रेष्ठ सुख आणखी कोणतेंहि नाही. सत्याद्वारा आपल्याला कर्माच्या फलांचा लाभ होतो. सत्याने सर्वकांही लाभतें. सर्वकांही सत्यांत प्रतिष्ठित आहे. जसें आहे तसें सांगणें यालाच सत्य म्हणतात. दुसऱ्याची वस्तु चोरून किंवा बळजबरीने न घेणें यालाच म्हणतात अस्तेय. कायावाचामनाने सर्वदा, सर्व अवस्थांत मैथुन न करणें यालाच ब्रह्मचर्य म्हणतात. आत्यंतिक कष्टांत असतांनासुद्धा कुणाकडूनहि कांहीहि उपहार न ग्रहण करणें यालाच अपरिग्रह म्हणतात. ह्या अपरिग्रहाची साधना करण्यामागे ही कल्पना आहे की दुसऱ्याकडून कांही ग्रहण केल्याने माणसाचें हृदय अपवित्र होतें, तो हीन होऊन जातो, तो आपली स्वाधीनता गमावून बसतो, तो बांधला जातो आणि आसक्त बनतो.

योगांत यश मिळण्यास साहाय्यभूत होणाऱ्या खालील कांही गोष्टींना नियम म्हणतात. नियम शब्दाचा अर्थ आहे नियमित सवयी आणि व्रतें चालविणें. तप, स्वाध्याय, संतोष, शौच व ईश्वरप्रणिधान हे नियम होत. उपवासाने वा इतर उपायांनी देहाचा संयम करण्याला शारीरिक तप म्हणतात. वेदांच्या पाठाने आणि इतर मंत्रांच्या उच्चारणाने सत्त्वशुद्धि होते. अशा वेदपाठाला आणि मंत्रोच्चारणाला स्वाध्याय असें नांव आहे. ह्या मंत्रांच्या जपाच्या तीन पद्धती आहेत. त्या म्हणजे वाचिक, उपांशु व मानस या होत. पैकी वाचिक जप हा सर्वांत निकृष्ट असून मानस जप सर्वांत श्रेष्ठ होय. वाचिक जपापेक्षा उपांशु जप श्रेष्ठ, आणि उपांशु जपापेक्षा मानस जप श्रेष्ठ. इतरांना ऐकूं जाईल एवढ्या मोठ्याने जो जप केला जातो त्याला वाचिक जप म्हणतात.

ज्या जपांत नुसते ओठ हालतात, इतरांना कांही ऐकूं येत नाही त्याला उपांशु जप म्हणतात. जो जप कुणालाहि ऐकूं न जातां केवळ मनांतल्या मनांत केला जातो आणि त्याबरोबरच ज्याच्या अर्थाचेंहि चिंतन केलें जातें त्या जपाला मानस जप म्हणतात. हा मानस जपच सर्व जपांमधे श्रेष्ठ होय. ऋषींनी म्हटलें आहे की शौच दोन प्रकारचें आहे —पहिलें बाह्य, आणि दुसरें आभ्यंतर. मृत्तिका, जल वा इतर द्रव्यांनी शरीर शुद्ध करण्याला बाह्य शौच म्हणतात. उदाहरणार्थ, स्नान करणें, इत्यादि. सत्याच्या आणि इतर धर्मांच्या द्वारा मन शुद्ध करणें म्हणजेच आभ्यंतर वा आंतील शौच होय. बाह्य आणि आभ्यंतर ह्या दोन्ही शुद्धि आवश्यक आहेत. आंत शुचि असून बाहेरून अशुचि असल्याने भागणार नाही. तें संपूर्ण शौच नव्हे. जेव्हा दोन्ही प्रकारचें शौच आचरणें शक्य नसेल तेव्हा नुसतें आंतील शौच आचरणेंच श्रेयस्कर होय. परंतु दोन्ही प्रकारचें शौच आचरणांत आणल्याखेरीज कोणीहि योगी होऊं शकणार नाही. ईश्वराचा स्तव, चिंतन आणि भक्ति करण्यालाच ईश्वरप्रणिधान म्हणतात.

येथवर यम-नियमांसंबंधी सांगून झालें. त्यानंतर म्हणजे आसन. आसनासंबंधी एवढें समजलें म्हणजे झालें की, त्या वेळीं छाती, मान आणि डोकें सरळ ठेवून शरीर मोकळें सोडावयास हवें. त्यानंतर म्हणजे प्राणायाम. प्राण म्हणजे आपल्या शरीरामधील जीवनशक्ति, आणि आयाम म्हणजे तिचा संयम. प्राणायाम तीन प्रकारचे आहेत—कनिष्ठ, मध्यम आणि उत्तम—अगदी सोपा, मधला आणि फार उच्च. प्राणायामाचीं तीन अंगें आहेत—पूरक, कुंभक व रेचक—भरणें, ताब्यांत ठेवणें आणि रिकामें करणें. ज्या प्राणायामांत बारा सेकंद पूरक केला जातो म्हणजेच वायु आंत घेतला जातो तो कनिष्ठ प्राणायाम होय. चोवीस सेकंद पूरक केल्यास तो मध्यम प्राणायाम होतो. आणि ज्यांत बत्तीस सेकंदांचा पूरक असतो त्याला उत्तम प्राणायाम म्हणतात. कनिष्ठ प्राणायामांत घाम येतो, मध्यम प्राणायामांत शरीराला कंप सुटतो, आणि उत्तम प्राणायामांत आसनावरून उत्थान होऊन अतिशय आनंद वाटूं लागतो. वेदामधे गायत्री नांवाचा एक अति पवित्र मंत्र आहे. त्याचा भावार्थ आहे—"ह्या विश्वाला जन्म देणाऱ्या त्या

ज्योतिर्मय परम पुरुषाच्या महिम्याचें आम्ही ध्यान करतों. तो आमच्या बुद्धींत ज्ञानाचा विकास करो." या मंत्राच्या प्रारंभीं आणि शेवटीं प्रणव वा ॐ जोडलेला असतो. एका प्राणायामांत गायत्री मंत्र तीनदा मनांतल्या मनांत उच्चारा. प्राणायामविषयक सर्व ग्रंथांत प्राणायामाचे तीन भाग आहेत असें सांगितल्याचें आढळतें. ते तीन भाग म्हणजे रेचक, पूरक आणि कुंभक हे होत. रेचक म्हणजे श्वास बाहेर सोडणें, पूरक म्हणजे श्वास आंत घेणें आणि कुंभक म्हणजे श्वास आंत धारण करणें, आहे त्याच स्थितींत धरून ठेवणें. संवेदनाशक्तियुक्त इंद्रियें बहिर्मुख होऊन कार्य करीत आहेत आणि त्यांचा बाहेरील वस्तूंशीं संबंध येत आहे. त्यांना स्वतःच्या इच्छेच्या ताब्यांत आणण्यालाच प्रत्याहार म्हणतात. प्रत्याहार शब्दाचा खरा अर्थ आहे--स्वतःकडे ओढून घेणें.

हृदयपद्मावर, मस्तकाच्या मध्यभागावर किंवा देहान्तर्गत अन्य एखाद्या स्थानावर मन केंद्रित करण्याला धारणा म्हणतात. मन एका स्थानाशीं संलग्न करून, त्याच एका स्थानाचा अवलंब करून विशिष्ट वृत्तींचा प्रवाह सुरू केला; अन्यप्रकारच्या वृत्तींचा प्रवाह उद्भवून जेणें-करून या आधीच्या प्रवाहाला नष्ट करणार नाही असा प्रयत्न करीत गेल्याने तो आधीचा वृत्तिप्रवाह हळूहळू प्रबल झाला आणि अन्य वृत्तिप्रवाह क्षीण होत होत अखेर अजीबात नाहीसा झाला; त्यानंतर ह्या आधीच्या अनेक वृत्तिहि शमून अंतीं मनांत फक्त एकच वृत्ति उरली; ह्यालाच ध्यान म्हणतात. ज्या वेळीं ह्या अवलंबनाचीहि कांही गरज उरत नाही, समस्त मन ज्या वेळीं एकाच लाटेसारखें होऊन जातें, त्या वेळीं मनाच्या त्या एकरूपतेलाच समाधि म्हणतात. त्या वेळीं कोणत्याहि विशिष्ट स्थानाच्या वा विशिष्ट चक्राच्या अवलंबनाने ध्यानप्रवाह उत्थापित केला जात नसतो, केवळ ध्येय वस्तूचा अर्थ वा भाव शिल्लक असतो. जर मनाला एखाद्या स्थानावर बारा सेकंद केंद्रित करतां आलें तर ती एक धारणा झाली, ही धारणा बारापट झाली की एक ध्यान होतें. आणि हें ध्यान बारापट झालें की एक समाधि होते.

जिथे अग्नि वा पाणी यापासून कांही धोका आहे अशा जागीं,

वाळक्या पानांनी झाकलेल्या जमिनीवर, वारुळांनी भरलेल्या जागीं, जंगली जनावरें असलेल्या ठिकाणीं, चौरस्त्यावर, जिथे फार आवाज होत असेल अशा स्थानीं, भयावह ठिकाणीं, जिथे फार दुर्जन वसतात अशा स्थळीं योगसाधना करूं नये. हा दंडक भारताला विशेषेंकरून लागू आहे. ज्या वेळीं शरीर खूप आळसावलेलें असेल किंवा बरें नसेल, अथवा मन ज्या वेळीं खूप दुःखीकष्टी असेल त्या वेळीं साधना करूं नये. जिथे लोक येऊन तुम्हांला त्रास देणार नाहीत अशा एखाद्या चांगल्या निर्जन, गुप्त जागीं जाऊन साधना करा. अपवित्र जागीं बसून साधना करूं नका, उलट, सुंदर दृश्य असलेल्या जागीं किंवा तुमच्या घरांतीलच एखाद्या सुंदर खोलींत बसून साधना करा. साधनेस सुरुवात करण्यापूर्वी समस्त प्राचीन योग्यांना, स्वतःच्या गुरुदेवांना आणि भगवंताला प्रणाम करून मग साधनेस प्रारंभ करा.

ध्यानाविषयी पूर्वी सांगितलेंच आहे. येथे ध्यानाच्या कांही पद्धती उदाहरणादाखल सांगण्यांत येत आहेत. सरळ बसा आणि आपल्या नाकाच्या शेंड्यावर दृष्टि लावा. याप्रमाणे नासाग्रीं दृष्टि ठेवल्याने मन स्थिर, एकाग्र होण्यास मदत होत असल्याचें तुम्हांला आढळून येईल. डोळ्यांच्या दोन्ही नाड्यांवर ताबा मिळवूं शकल्यास प्रतिक्रियांच्या केंद्रावरदेखील बराच ताबा मिळूं शकतो आणि तद्द्वारा इच्छाशक्तीवरदेखील आपला बराच ताबा चालूं शकतो. असो. आता येथे ध्यानाचे कांही प्रकार वर्णिले जात आहेत. असें चिंतन करा की, तुमच्या मस्तकाच्या किंचित् वर एक पद्म आहे, धर्म त्याचा मध्यभाग आहे, ज्ञान त्याचा देठ आहे, योग्याच्या अष्टसिद्धि त्या पद्माच्या आठ पाकळ्या आहेत आणि वैराग्य त्याच्या आंतील कोश होय. अष्टसिद्धि लाभूनहि योगी जर त्याचा त्याग करूं शकेल तरच त्याला मुक्ति लाभूं शकेल. म्हणूनच अष्टसिद्धि ह्या त्या पद्माच्या बाहेरच्या आठ पाकळ्या मानल्या गेल्या आहेत, आणि आंतमधील कोशाला परम वैराग्य म्हणजे अष्टसिद्धींविषयी त्यागभावना मानण्यांत आलें आहे. त्या पद्मामधे तो हिरण्मय, सर्वशक्तिमान पुरुष विराजमान आहे असें चिंतन करा. ॐ हें त्याचें नांव आहे, तो अनिर्वचनीय आहे. देदीप्यमान प्रकाशाने तो वेढलेला आहे. त्याच्यावर ध्यान करा. आणखी एका प्रकारच्या

ध्यानाचें वर्णन केलें गेलें आहे. असें चिंतन करा की तुमच्या हृदयामधे एक पोकळी आहे आणि त्या पोकळीमधे एक ज्योत तेवत आहे. ही ज्योत तुमचा स्वत:चा आत्मा होय असें चिंतन करा आणि असें चिंतन करा की त्या ज्योतीमागे आणखी एक देदीप्यमान प्रकाश विद्यमान असून तो म्हणजे तुमच्या आत्म्याचा आत्मा, परमात्मस्वरूप ईश्वर होय. स्वतःच्या हृदयामधे त्यावर ध्यान करा. ब्रह्मचर्य, अहिंसा, आपल्या महाशत्रूलाहि क्षमा करणें, सत्य, आस्तिक्य इत्यादि निरनिराळया वृत्ति आहेत. ह्या सर्व तुमच्या ठायीं पूर्णत्वाने नसल्या तरी खचूं नका. प्रयत्न करा, हळूहळू त्या तुमच्यांत येतील. विषयाभिलाष, आसक्ति, भय आणि क्रोध सोडून जो भगवंताला शरण गेला आहे, तन्मय होऊन गेला आहे, ज्याचें हृदय पवित्र झालें आहे तो भगवंताजवळ जें कांही वांच्छील तें भगवान त्याला देईल. म्हणून ज्ञान-भक्ति-वैराग्यपूर्वक त्याची उपासना करा.

"जो कुणाचाहि द्वेष करीत नाही, जो सर्वांचा मित्र आहे, ज्याच्याठिकाणीं सर्वांविषयी करुणा वसत आहे, ज्याला 'माझें' म्हणायला कांहीच नाही, ज्याचें मीपण निमालें आहे, जो सुखांदु:खांत समचित्त असतो, जो क्षमाशील, तितिक्षु आहे, जो सदा संतुष्ट असतो, जो सर्वदा योगयुक्त आहे, ज्याने स्वत:ला जिंकलें आहे, जो दृढनिश्चयी आहे, ज्याने आपलें मन आणि बुद्धि मला समर्पित केलीं आहेत तोच माझा आवडता भक्त होय. ज्याच्यामुळे लोकांना उद्विग्न व्हावें लागत नाही आणि जो लोकांकारणें उद्विग्न होत नाही, जो हर्ष, क्रोध, भय, चिंता इत्यादींपासून मुक्त आहे तोच माझा आवडता भक्त होय. जो कशाचीहि अपेक्षा बाळगीत नाही, जो पवित्र आणि कार्यतत्पर आहे, सुख-दु:खांविषयी जो उदासीन असतो, जो कधी शोकाने अभिभूत होत नाही, ज्याने स्वत:करता कार्य करण्याचें सोडलें आहे, जो निंदेने वा स्तुतीने मुळीच विचलित होत नाही, जो मौनी आहे, चिंतनशील आहे, यदृच्छेने जें कांही मिळेल त्यांतच जो संतुष्ट असतो, ज्याला घर नाही, कारण सारें जगच ज्याचें घर बनलें आहे, ज्याची बुद्धि स्थिर आहे तोच माझा आवडता भक्त होय." अशाच व्यक्ति योगी होऊं शकतात.

* * *

नारद नांवाचे एक महान् देवर्षि होते. ज्याप्रमाणे मानवांमधे ऋषि किंवा थोर योगी असतात त्याचप्रमाणे देवांमधेहि मोठमोठे योगी असतात. नारदहि तसलेच एक अत्यंत थोर महायोगी होते. नारदांचा सर्वत्र संचार असे. एक दिवस एका अरण्यांतून चालले असतांना त्यांना एक मनुष्य ध्यानस्थ अवस्थेंत आढळला. तो मनुष्य त्या एकाच अवस्थेंत इतके दिवस आणि इतक्या गाढ ध्यानांत होता की त्याच्या शरीराभोवती मुंग्यांनी एक भलेंमोठें वारूळ उभारून टाकलें होतें. नारदांना समोरून जातांना बघून त्या मनुष्याने "महाराज, आपण कुठे निघालांत ?" असें नारदांना विचारलें. "मी वैकुंठांत जात आहें" असें नारदांनी उत्तर दिलें. त्यावर तो मनुष्य त्यांना म्हणाला—"तर मग आपण माझ्या वतीने भगवंतांना विचारा की ते माझ्यावर केव्हा कृपा करणार आहेत, मला मुक्ति कधी लाभणार आहे?" त्यावर त्याला "बरें" म्हणून नारद निघाले. अमळ पुढे गेल्यावर त्यांना आणखी एक माणूस दिसला. तो माणूस नाचत होता, उडत होता, गात होता. नारदांना बघून तो त्यांना म्हणाला—"नारदा, आपण कुठे जातां आहांत ?" त्या माणसाचा स्वर, त्याचे अंगविक्षेप, त्याचा साराच कारभार कसा विचित्र होता. नारदांनी त्याला मागच्याप्रमाणेच उत्तर दिलें —"मी वैकुंठास जायला निघालों आहें," तें ऐकून तो माणूस त्यांना म्हणाला, "मग भगवंताला विचारा की मी केव्हा मुक्त होणार आहें?" नारद निघून गेले. कालान्तराने फिरून त्याच रस्त्याने परततांना तो देहाभोवती वारूळ झालेला ध्यानस्थ योगी त्यांना दिसला. नारदांना फिरून बघून त्याने त्यांना विचारलें, "नारदा, आपण भगवंतांना माझ्यासंबंधी विचारलें काय ?" नारदांनी उत्तर दिलें, "होय, विचारलें." त्यावर तो योगी विचारूं लागला, "मग भगवान काय म्हणाले?" नारदांनी उत्तर दिलें, "भगवान म्हणाले की आणखी चार जन्मांनी तुला मुक्ति लाभेल." तें ऐकून तो मनुष्य अतिशय विलाप करूं लागला आणि म्हणूं लागला, "भोवती वारूळ होईपर्यंत मीं ध्यान केलें, अजून माझे आणखी चार जन्म बाकी आहेतच ?" त्यानंतर नारद मग त्या दुसऱ्या माणसाकडे गेले. नारदांना पाहून त्याने त्यांना विचारलें, "नारदा, माझा प्रश्न तुम्हीं भगवंताला विचारला ना ?" नारदांनी

उत्तर दिलें, "होय, विचारला. भगवंत काय म्हणाले सांगू ? हें समोर चिंचेचें झाड दिसतें आहे ना ? मला भगवंतांनी तुला सांगायला सांगितलें की या चिंचेच्या झाडाला जितकीं पानें आहेत तितक्या वेळा तुला मुक्तीसाठी आणखी जन्म घ्यावे लागतील. त्यानंतर तूं मुक्त होशील." तें ऐकून तो माणूस आनंदाने नाचूं लागला आणि म्हणूं लागला, "काय ! एवढ्या थोड्या वेळांत मला मुक्ति मिळणार आहे ? अहो, केवढें माझें भाग्य !" तात्काळ आकाशवाणी झाली—"बेटा, तुला आत्ताच, ह्याच क्षणीं मुक्ति लाभेल." त्या माणसाला त्याच्या चिकाटीचें हें बक्षीस मिळालें. तो इतके जन्म साधना करावयास तयार होता, कशानेच तो नाउमेद होणार नव्हता. कांहीच त्याला नाउमेद करूं शकणार नव्हतें. पण त्या पहिल्या मनुष्याला आणखी चार जन्मच फार जास्त वाटले. जो माणूस मुक्तीसाठी युगानुयुगें वाट पाहण्यास तयार होता त्या माणसासारखी चिकाटी असेल तरच सर्वश्रेष्ठ फल लाभत असतें.

# पतंजलींचीं योगसूत्रें

( मूल संस्कृत सूत्रें, सूत्रार्थ, आणि स्पष्टीकरण यांसह )

# पतंजलींचीं योगसूत्रें

## प्रस्तावना

पतंजलींच्या योगसूत्रांच्या विवरणास प्रारंभ करण्यापूर्वी, ज्यावर योग्यांचें समग्र धर्मतत्त्व आधारलेलें आहे अशा एका पायाभूत, महत्त्वाच्या प्रश्नाची मी असळ चर्चा करूं इच्छितों. जगांतील थोर थोर विचारवंतांचें ह्या बाबतींत एकमत दिसतें, आणि भौतिक विश्वाच्या संशोधनांनी हें जवळजवळ प्रयोगानें सिद्ध केलें आहे की, आपण आपल्या आजच्या सविशेष, सापेक्ष अवस्थेच्या पाठीशीं असलेल्या एका निर्विशेष, निरपेक्ष सत्तेतून आलों असून आपण त्या सत्तेचे मूर्त आविष्कार आहोंत; आणि त्या निर्विशेष, निरपेक्ष अवस्थेंत परतण्यासाठी आपण सारखे पुढेपुढे चाललों आहोंत. हें जर खरें असलें तर असा प्रश्न येतो की मग ह्या दोहोंत श्रेष्ठ अवस्था कोणती ? ती निर्विशेष, निरपेक्ष अवस्था श्रेष्ठ की आपली आजचीच अवस्था श्रेष्ठ ? आपली ही आजची व्यक्त अवस्थाच मानवाची सर्वश्रेष्ठ, सर्वोच्च अवस्था होय असें मानणाऱ्यांचीहि वाण नाही. कित्येक श्रेष्ठ प्रतीच्या विचारवंतांचें असें मत आहे की, आपण एका अव्यक्त, निर्विशेष सत्तेची अभिव्यक्ति आहोंत आणि आपली ही सविशेष व्यक्तावस्था त्या निर्विशेष, निरपेक्ष अवस्थेहून श्रेष्ठ आहे. त्यांची अशी कल्पना असते की त्या निरपेक्ष, निर्विशेष सत्तेच्याठायीं कोणतेहि गुण असणें शक्य नाही, आणि म्हणून ती अचेतन, जड आणि प्राणशून्यच असली पाहिजे. साहजिकच त्यांच्या मतें सुखभोग ह्या आपल्या आजच्या जीवनांतच संभवनीय आहे, म्हणून इहजीवनाला आणि त्यांतील सुखांनाच आपण चिटकून राहिलें पाहिजे.

असो. प्रथमतः आपण ह्या जीवन-समस्येच्या आणखी कोणकोणत्या मीमांसा आहेत हें पाहूं. या बाबतींत असा एक प्राचीन सिद्धान्त आहे की, मृत्यूनंतर माणूस जसा आहे तसाच राहतो, फक्त त्याचें अशुभ तें सर्व निघून जातें आणि त्याचें चांगलें जें कांही आहे तेवढेंच कायमचें राहून जातें. न्यायशास्त्राच्या कांटेकोर भाषेंत ही गोष्ट

मांडायची म्हणजे अशी मांडतां येईल की हें जगतच माणसाची अंतिम गति होय—ह्या जगांतील अवघें अशुभ वगळलें गेलें आहे अशी ह्याच जगाची एक अमळ उच्च अवस्था ऊर्फ स्वर्ग हीच त्या लोकांच्या मतें मानवाची परम गति होय. हा सिद्धान्त अगदी सकृद्दर्शनींच गावंढळ आणि पोरकट ठरतो, कारण वस्तुस्थिति अशी असणें शक्यच नाही. वाईटाखेरीज चांगलें आणि चांगल्याखेरीज वाईट असूंच शकत नाही. जिथे निव्वळ चांगलेंच आहे, वाईट मुळी नाहीच, अशा ठिकाणीं राहण्याच्या कल्पनेला भारतीय नैयायिक 'आकाशकुसुम' म्हणत असतात. त्यानंतर म्हणजे, आजकाल अनेक संप्रदाय असें मत मांडतांना आढळतात की, सतत, सारखें उन्नत होत जाणें हेंच मानवजीवनाचें उद्दिष्ट आहे, सतत अंतिम लक्ष्याकडे जाण्याचा प्रयत्न करणें परंतु त्याप्रत कधीच न पोहोचतां येणें हाच मानवीजीवनाचा अर्थ आहे. हें मतहि वरवर मोठें गोंडस वाटलें तरी वस्तुत: अगदी खुळचट आहे, कारण सरळ रेषेंत गति नांवाची गोष्टच असू शकत नाही. प्रत्येक गति ही वर्तुळाकृति असते. एखादा दगड घेऊन तुम्हीं जर तो आकाशांत फेकला तर, तुम्हांला पुरेसें आयुष्य असल्यास आणि त्या दगडाला मधे कुठेच अडथळा न आल्यास तो बरोबर तुमच्या हातीं परत येईल. एखादी सरळ रेषा अनंत वाढविली तर तिचें वर्तुळ झालेंच पाहिजे. म्हणून, सारखें प्रगत होत पुढेपुढे जाणें आणि कधीच न थांबणें हेंच माणसाच्या दैवांत आहे हें म्हणणें अगदी मूढपणाचें होय. विषयाला अमळ सोडून असलें तरी मी येथे तुम्हांला सांगूं इच्छितों की, कुणाचाहि द्वेष करूं नका, सर्वांवर प्रेम करा ह्या नैतिक सिद्धान्ताचा अर्थ आपल्याला यावरून नीट समजूं शकतो. कारण, विजेसंबंधी जसा आधुनिक सिद्धान्त आहे की ती शक्ति विद्युत्-आधारापासून निघते आणि वर्तुळ पूर्ण करून फिरून त्या आधारांत परत येते, तसेंच द्वेषाचें आणि प्रेमाचेंहि आहे; तीं देखील आपल्या उगमापाशी परत येतातच. म्हणून कुणाचाहि द्वेष, कुणाचीहि घृणा करूं नका, कारण तुमच्यांतून बाहेर पडलेला हा द्वेष, ही घृणा अखेर तुम्हांला येऊन मिळणारच मिळणार. तुम्ही जर लोकांवर प्रेम कराल तर तें प्रेमहि वर्तुळ पूर्ण करून तुम्हांला येऊन मिळेल. यांत कांहीसुद्धा संशय नाही की माणसाच्या हृदयांतून बाहेर पडलेला

केवढाहि कमीजास्त द्वेष पुऱ्या वेगानें त्या माणसाकडे परतून त्याच्यावर अंमल बसवीत असतो, कांहीच त्याला थोपवूं शकत नाही. हेंच प्रेमालाहि लागू आहे.

असो. अंतहीन प्रगतीसंबंधीचें हें मत इतरहि अनेक कारणांनी आणि कित्येक व्यावहारिक मुद्यांनी खोडून काढतां येईल. ही गोष्ट अगदी उघड आहे, प्रत्यक्षप्रमाणसिद्ध आहे की समस्त भौतिक वस्तूंची अंतिम गति विनाश हीच आहे, प्रत्येक भौतिक वस्तूला अखेर अंत आहे. मग कुठे बरें राहिली 'अंतहीन प्रगति'? आपण करीत असलेली ही सगळी धडपड, आपल्या आशा, आपली भीति, आपलीं सुखें—काय होणार आहे अखेर या सगळयांचें? कुठे नेणार आहेत हीं सगळीं आपल्याला? आपल्या सर्वांचा शेवट मृत्यूनेच होणार आहे. मृत्युच आम्हां सर्वांची परम गति, अंतिम गति. हें अगदी निश्चित आहे. इतकें निश्चित दुसरें आणखी कांहीच नसेल. कुठे राहिली मग ती सरळ रेषेंतील गति—ती अंतहीन, अनंत प्रगति? हें म्हणजे थोडेसें अंतर जाणें आणि जिथून सुरुवात केली होती तिथेंच फिरून परत येणें, एवढेंच नाही काय? बघा ना, तेजाळ बाष्पांतून सूर्य, चंद्र, तारे हे उत्पन्न होतात आणि फिरून वितळून त्याच तेजाळ बाष्पावस्थेप्रत जातात. सर्वत्र हाच प्रकार घडत आहे. रोपें मातींतून सत्त्व घेतात आणि अखेर कुजून मातींत मिळतात. आकार असलेली प्रत्येक वस्तु सभोवतालच्या परमाणूंतून निर्मिली गेली आहे आणि अखेर परमाणुच बनत आहे. एकच नियम वेगवेगळया ठिकाणीं वेगवेगळया रीतीनें कार्य करील हें संभवत नाही. नियम सर्वत्र समरूपच असतो. हें अगदी निःसंशय आहे, यापेक्षा निःसंशय दुसरें आणखी कांहीच नसेल. हा जर निसर्गाचा नियम असेल तर मग तो मनोजगताला वा अंतर्जगताला लागू असलाच पाहिजे. मन लय पावून आपल्या उत्पत्तिस्थानांत विलीन होईल. आपली इच्छा असो किंवा नसो, ज्याला ईश्वर किंवा निरपेक्ष सत्ता म्हणतात त्या आपल्या उत्पत्तिस्थानांत, आपल्या त्या आदिकारणांत आपल्याला परतावें लागणारच लागणार. आपण सगळे ईश्वरांतून आलों आहोंत, आणि फिरून ईश्वराप्रत परत जाणें आपल्याला भाग आहे. आता त्याला तुम्ही ईश्वर म्हणा, की निरपेक्ष ब्रह्मसत्ता म्हणा,

की प्रकृति म्हणा, की आणखी काय वाटेल तें नांव द्या--वस्तु आहे तीच असणार. "यतो वा इमानि भूतानि जायन्ते, येन जातानि जीवन्ति यत् प्रयन्त्यभिसंविशन्ति"--"ज्याच्यापासून हीं समग्र भूतें जन्मतात, जन्मास आलेलीं सर्व भूतें ज्याच्यामधे जगतात, आणि अखेर ज्याच्यामधे तीं परत जातात" (तेंच ब्रह्म होय). वस्तुस्थिति ही अशी आहे यांत कांहीच संदेह नाही. निसर्ग किंवा प्रकृति सर्वत्र एकाच नियमानुसार कार्य करीत असते. ह्या लोकांत जें घडत आहे, इतर लक्षावधि लोकांतहि त्याचीच पुनरावृत्ति होत आहे. ग्रहांच्या बाबतींत जें दिसत आहे तोच प्रकार ह्या पृथ्वीच्या बाबतींत, माणसांच्या बाबतींत, झाडून सगळ्यांच्या बाबतींत आढळून येईल. मोठी लाट ही लहानलहान लाखोगणती तरंगांची एक प्रचंड समष्टि असते; संपूर्ण जगाचें जीवन म्हणजे लाखोगणती लहानलहान जीवनांची समष्टि होय, आणि ह्या लक्षावधि समस्त लहानलहान जीवांचा मृत्यु म्हणजेच जगाचा मृत्यु होय.

आता असा प्रश्न उद्‌भवतो की परमेश्वराकडे परतणें ही उच्च अवस्था आहे किंवा नाही? योगमतावलंबी तत्त्वज्ञ या प्रश्नाचें अगदी ठासून उत्तर देतात की, होय, ती अवस्था उच्चच आहे. ते म्हणतात की माणसाची सध्याची अवस्था ही अवनतावस्था आहे. माणसाची वर्तमान अवस्था ही त्याच्या पूर्वावस्थेपेक्षा सुधारलेली वा उन्नत अवस्था आहे असें म्हणणारा एकहि धर्म ह्या पृथ्वीच्या पाठीवर नाही. सर्वच धर्मांचें ह्या मुद्यावर एकमत आहे की, माणूस हा आधी शुद्ध आणि पूर्ण असतो; त्यानंतर तो हळूहळू अवनत होऊं लागतो. अखेर तो इतका अवनत होतो की त्यापेक्षा आणखी अवनत होणें त्याला शक्य नसतें. त्यानंतर मग अशी एक वेळ येतेच की ज्या वेळीं तो वर्तुळ पूर्ण करून वर वर जाऊं लागतो आणि अखेर फिरून आपल्या पूर्वावस्थेस प्राप्त होतो. माणसाची गति वर्तुळाकार झालीच पाहिजे. तो कितीहि खाली जाईना का, त्याची कितीहि अवनति होईना का, सरतेशेवटीं तो वर जायला निघेलच, आणि अंतीं आपलें आदिकारण जो ईश्वर, त्याला तो जाऊन मिळेलच. माणूस प्रथम ईश्वरापासून निघतो, मधे तो मनुष्य होतो, आणि अंतीं ईश्वराप्रत परत जातो. द्वैतवादाच्या भाषेंत

हें तत्त्व याप्रमाणे मांडतां येतें. तेंच अद्वैतवादाच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे म्हणावें लागेल की माणूस ईश्वरच आहे आणि फिरून ईश्वराप्रतच जातो. जर आपली ही वर्तमान अवस्थाच उच्चावस्था असेल तर मग तींत इतकी भयानकता, इतकें दुःख कां आहे, आणि अखेर तिचा शेवट होतो, ती संपते, तें तरी कां? ही जर उच्च अवस्था असेल तर मग तिचा अंत का बरें होतो ? जी विकृत होते, अवनत होते ती सर्वोच्च अवस्था असणें कधीच शक्य नाही. ती इतकी सैतानी, इतकी अतृप्तिकर, इतकी असमाधानकारक कां असावी ? तिला क्षम्य मानावयाचें, ती सोसायला तयार असावयाचें तें एवढ्याचकरता की तिच्यामधून आपण एका उच्च मार्गाला लागत आहोंत; नवजीवनाच्या लाभामाठी आपल्याला तिच्यामधून जाणें भाग आहे. जमिनींत एक बी पेरा, ती भंग पावू। कांही कालाने मातीशीं एक झाल्यासारखी होऊन जाते, आणि म। मातीशीं एकरूप झालेल्या त्या अवस्थेंतून एक सुंदर झाड उगवतें. महावृक्ष होण्यासाठी प्रत्येक बीजाला ज्याप्रमाणे असें कुजावें लागतें त्याप्रमाणेच ईश्वराशीं एक होण्यासाठी, ब्रह्मस्वरूप होण्यासाठी प्रत्येक जीवात्म्याला अवनतीच्या अवस्थेमधून जावेंच लागतें. यावरून हेंच निष्पन्न होतें की आपण जिला 'मनुष्य' म्हणतों त्या अवस्थेमधून आपण जितक्या लवकर बाहेर पडूं तितकें तें आपल्यापक्षीं श्रेयस्कर होय. यावर कुणी विचारील की, आत्महत्या करून आपण या अवस्थेबाहेर निघून जाऊं शकूं काय ? यावर उत्तर आहे की, नाही, तसें मुळीच नाही. उलट त्याने आपली अवस्था आणखीच वाईट होईल. देहाला विनाकारण दंड देणें किंवा जगाला उगाच शिव्या देत बसणें हा कांही या संसारांतून तरून जाण्याचा उपाय नाही. त्यासाठी आपल्याला ह्या निराशेच्या दलदलींतून जावेंच लागणार आहे, मग जितक्या लवकर आपण तिच्यांतून बाहेर पडूं तितकें चांगलेंच नव्हे काय ? आपण ह्याची नेहमी आठवण असू द्यावयास हवी की आपली ही विद्यमान अवस्था, ही 'मनुष्य' अवस्था कांही सर्वोच्च अवस्था नव्हे.

ह्या साऱ्यांत आकलन होण्यास खरोखर कठीण गोष्ट ही की, सर्वोच्च गणली जाणारी ही निर्विशेष वा निरपेक्ष अवस्था, कांही लोकांना भीति वाटते त्याप्रमाणे अर्धवट प्राणी अर्धवट वृक्ष अशी, किंवा

दगडाची अवस्था नव्हे. असें वाटणें अगदीं चुकीचें आहे. ज्यांना असें वाटतें त्यांच्या मतें जगांत अस्तित्वाच्या फक्त दोनच अवस्था आहेत--पहिली म्हणजे दगडासारखी जडावस्था आणि दुसरी म्हणजे विचाराचें सामर्थ्य असण्याची अवस्था. परंतु हे लोक याप्रमाणे अस्तित्वाला फक्त या दोन अवस्थांतच कशाच्या आधारावर मर्यादित करूं जातात ? असें करण्याचा त्यांना काय अधिकार आहे ? विचारापेक्षा अनंतपट श्रेष्ठ अशी अवस्था नाहीच की काय ? प्रकाशाचीं स्पंदनें ज्या वेळीं अत्यंत मंद असतात त्या वेळीं तीं आपल्याला दिसत नाहीत; तीं ज्या वेळीं अमळ अधिक तीव्र होतात त्या वेळीं तीं आपल्याला प्रकाशाच्या रूपानें दिसूं लागतात; ज्या वेळीं तीं आणखी जास्त तीव्र होतात त्या वेळीं तीं आपल्याला दिसत नाहीत--आपल्यापक्षीं तीं अंधारासारखीं होतात. परंतु म्हणून हा अखेरचा अंधार त्या सुरवातीच्या अंधारासारखाच म्हणावयाचा की काय ? केव्हाहि नाही. ते दोन्ही दोन ध्रुवांइतके एकमेकांपासून निराळे आहेत. दगडाची विचाररहितता आणि ईश्वराची विचाररहितता काय एकच होत ? अलबत नाही. ईश्वर विचार करीत नाही, तो तर्क करीत नाही. कशासाठी करील ? त्याला अज्ञात असें कांहीतरी आहे काय की जें जाणण्यासाठी त्याने तर्कविचार करावा ! दगड विचार 'करूं शकत' नाही, ईश्वर विचार 'करीत' नाही. एवढा फरक आहे. ह्या वर उल्लेखिलेल्या तत्त्वज्ञांना विचारांच्या पलीकडे जाणें भयंकर वाटतें, विचारांच्या पलीकडे त्यांना कांहीच आढळत नाही.

तर्क-विचाराच्या पलीकडे त्यापरीस कितीतरी श्रेष्ठ अशा अवस्था आहेत. वास्तविक पाहतां बुद्धीचें शिवार ओलांडल्यानंतरच धर्मराज्यांत आपलें पहिलें पाऊल पडत असतें. बुद्धीच्या अतीत गेल्यानंतरच खरोखर धर्मजीवनाला प्रारंभ होत असतो. माणूस जेव्हा बुद्धीच्या, विचारांच्या, तर्कांच्या पलीकडे जाईल तेव्हाच तो परमेश्वराप्रत पोहोचण्याची पहिली पायरी चढला असें म्हणतां येईल. आणि तोच खऱ्याखऱ्या जीवनाचा प्रारंभ होय. आपण ज्याला साधारणतः जीवन म्हणतों तें म्हणजे ह्या खऱ्याखऱ्या जीवनाची केवळ गर्भावस्था म्हणतां येईल.

यानंतरचा प्रश्न म्हणजे--ही विचारांच्या आणि तर्कांच्या पलीकडील अवस्थाच सर्वोच्च अवस्था होय ह्याला प्रमाण काय ? प्रथमतः

म्हणजे, जगांतील सर्व थोरथोर महापुरुषांनी, नुसती बडबड करणाऱ्यां-पेक्षा कितीतरी थोर अशा महापुरुषांनी, ज्यांनी आपल्या पावन प्रभावाने ह्या जगाची गति बदलून टाकली आहे अशा महापुरुषांनी, ज्यांना कधी कसलाहि स्वार्थ शिवलादेखील नाही अशा महापुरुषांनी घोषणा केली आहे की आपलें हें जीवन त्या सर्वातीत अनंतत्वाच्या मार्गावरील केवळ एक मामुली टप्पा आहे, इतकेंच. द्वितीयत: म्हणजे, ते नुसती अशी घोषणा करूनच थांबत नाहीत, तर ते प्रत्येकाला तिथे पोहोचण्याचा मार्ग दाखवून देतात, आणि सगळ्यांना त्यांचें अनुसरण करतां यावें म्हणून ते आपापल्या साधनापद्धती सर्वांना नीट स्पष्ट करून समजावून सांगतात. तृतीयत: म्हणजे, याखेरीज आणखी कोणताच मार्ग नाही, ह्या खेरीज ह्या जीवनाच्या कोड्याचें आणखी कोणतेंच समाधान-कारक उत्तर नाही. ह्या जीवनापलीकडे आणखी कांही उच्च अवस्था नाही असें जर क्षणभर गृहीत धरलें तर मग प्रश्न आहे की आपण सदा ह्या वर्तुळामधे, ह्या चक्रामधे फिरत आहोंत तें कां? ह्या दृश्यमान जगाचें, ह्या आपल्या जगांतील घटनांचें आणखी कोणतें तर्कसंगत स्पष्टीकरण तुम्ही देऊं शकतां? आपण जर पुढे जाऊं शकणार नसूं, आपण जर यापेक्षा अधिक कांही इच्छावयाचेंच नसेल तर हें पंचेंद्रियग्राह्य जगतच आपल्या ज्ञानाची लक्ष्मणरेखा होऊन बसेल. यालाच म्हणतात अज्ञेयवाद. परंतु, प्रश्न आहे की आपण आपल्या इंद्रियांच्या सांगीवर विश्वास ठेवायचा तो काय म्हणून? इंद्रियांची साक्ष ग्राह्य मानण्याचें कारण काय? मी तरी त्यालाच बावनकशी अज्ञेयवादी मानेन की जो रस्त्यांत खुशाल निश्चळ उभा राहून बेदिक्कत मरूं शकेल. जर बुद्धिच आपलें सर्वस्व असेल तर ती आपल्याला शून्यवादाचा आसरा घेऊन या जगांत स्थिरपणें कुठेहि उभें राहूं देणार नाही. फक्त पैसा, नांवलौकिक वगैरेंच्या बाबतींत आस्तिक, आणि ईश्वर वगैरेच्या बाबतींत मात्र नास्तिक, अज्ञेयवादी---असा इसम पक्का लुच्चा आहे म्हणून समजा. कांटने अगदी नि:संदेहपणें सिद्ध करून दाखविलें आहे की, आपण तर्काची किंवा बुद्धीची अभेद्य भिंत भेदून तिच्या पलीकडे जाऊं शकत नाहीं. परंतु, बुद्धीच्या पलीकडे जायचें---हा तर भारतांत उदयास आलेल्या प्रत्येक तत्त्वज्ञानांचा अगदी

श्रीगणेशाच म्हणतां येईल. योगीजन साहसपूर्वक त्या अवस्थेचा मागोवा घेत निघतात आणि अखेर ते अशी एक वस्तु लाभून कृतकृत्य होतात की जी तर्काच्या वा बुद्धीच्या पलीकडची आहे आणि केवळ जिच्या-योगेंच ह्या आपल्या आजच्या अवस्थेचें, ह्या दृश्यमान जगाचें गूढ उकलूं शकतें. जें शास्त्र आपल्याला ह्या टीचभर जगाच्या पलीकडे घेऊन जाईल त्याच्या अध्ययन-अनुशीलनाचें हेंच सुफल होय. "**त्वं हि नः पिता, यः अस्माकम् अविद्यायाः परं पारं तारयसि इति**"—"आम्हांला ह्या अज्ञानाच्या पैलथडीस घेऊन जाणारा तूंच आमचा पिता आहेस." ह्यालाच धर्माचें शास्त्र म्हणतां येईल, अन्य कांहीहि त्या संज्ञेस पात्र होऊं शकणार नाही.

---

## प्रथम अध्याय

# समाधिपाद

**अथ योगानुशासनम् ॥ १ ॥**

**१. सूत्रार्थ—आता योगाचें स्पष्टीकरण केलें जात आहे.**

**योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ २ ॥**

**२. सूत्रार्थ—योग म्हणजे मनस्तत्त्वाला ( चित्ताला ) निरनिराळीं रूपें ( वृत्ति ) धारण न करूं देणें.**

स्पष्टीकरण:—यासंबंधी बरेंच स्पष्टीकरण आवश्यक आहे. आपल्याला चित्त म्हणजे काय व वृत्ति कशाला म्हणतात हें समजून घेतलें पाहिजे. उदाहरणार्थ, मला डोळे आहेत, पण डोळे पाहण्याची क्रिया करीत नाहीत. मेंदूतील दर्शनेंद्रिय वा दृष्टिकेंद्र काढून घ्या, मग डोळे पाहत राहोत, नेत्रपटलें (नेत्रगोलकांमागील ज्ञानतंतूंचे पडदे वा Retinae) आपल्या जागीं असोत व त्यांच्यावर वस्तूंचीं चित्रें उमटोत, पण डोळयांना दिसणार मात्र कांही नाही. म्हणून डोळे हे दृष्टीचीं फक्त गौण साधनें होत. ते खरीं दर्शनेंद्रियें नव्हत. खरें दर्शनेंद्रिय मेंदूतील एका मज्जाकेंद्रांत विद्यमान आहे. पाहण्यासाठी नुसते डोळेच पुरेसे नाहीत. केव्हा केव्हा पुष्कळांचे दोन्ही डोळे झोपेंत सताड उघडे असतात. अशा वेळीं दिसण्यासाठी प्रकाशाव्यतिरिक्त व नेत्रपटलांवरील बाह्य वस्तूंच्या चित्रांव्यतिरिक्त एका तिसऱ्या गोष्टीची आवश्यकता असते—ती म्हणजे मनाचा दर्शनेंद्रियाशीं संयोग. डोळे म्हणजे दर्शनक्रियेचें बाह्य उपकरण आहे. दर्शनासाठी मेंदूतील दर्शनेंद्रियें व मन या दोहोंचीहि अपेक्षा असतेच. उदाहरणार्थ रस्त्यावरून अनेक वाहनें धडधडत जात आहेत, पण कित्येक वेळां जवळ असूनहि त्यांचा आवाज ऐकूं येत नाही. कां ?—तर त्या वेळीं मन श्रवणेंद्रियाशीं संलग्न झालेलें नसतें. म्हणून दर्शन-श्रवणादि कोणत्याहि इंद्रियज्ञानासाठी प्रथम बाह्य उपकरणें, नंतर मेंदूतील ज्ञानेंद्रियें व त्यानंतर या दोहोंशीं मनाचा संयोग, इतक्या गोष्टींची आवश्यकता असते. मन हें बाह्य वस्तूंचा ठसा किंवा संवेदना आणखी आंत घेऊन जाऊन निश्चयात्मिका बुद्धीपर्यंत पोहोचवितें. मग

त्यावर बुद्धीची प्रतिक्रिया घडून येते. या प्रतिक्रियेबरोबर 'अहं'भाव अभिव्यक्त होतो व त्यानंतर या क्रिया-प्रतिक्रियांचें संमिश्रण अंतःस्थ 'पुरुषा'ला म्हणजेच खऱ्या आत्म्याला सादर केलें जातें. तें संमिश्रण त्याला मग एका मूर्त वस्तूच्या रूपांत प्रत्ययास येतें. इंद्रियें (इंद्रियान्तर्गत शक्ति), मन, निश्चयात्मिका बुद्धि व अहंकार या सर्वांना मिळून 'अंतःकरण' असें म्हणतात. ह्या सगळ्या म्हणजे चित्तांत चालणाऱ्या निरनिराळ्या प्रक्रिया होत. चित्तांत उठणाऱ्या विचार-तरंगांनाच 'वृत्ति' (भोवरे) म्हणतात. विचार म्हणजे काय? गुरुत्वाकर्षण किंवा विकर्षण यांच्याप्रमाणे विचार ही एक शक्ति आहे. प्रकृतीच्या अनंत शक्तिभांडारांतून 'चित्त' नांवाचें हें यंत्र थोडी शक्ति काढून घेऊन तिला आत्मसात् करतें व मग त्याच शक्तीला विचाराच्या रूपांत बाहेर सोडतें. अन्नाच्या द्वारें आपल्याला शक्ति प्राप्त होत असते. ह्या अन्नामधूनच शरीराला सर्व प्रकारच्या हालचाली करण्याचें सामर्थ्य लाभतें. आणि विचारादि सूक्ष्म शक्तिहि त्यापासूनच उत्पन्न होतात. यावरून असें स्पष्ट दिसतें की मन हें चेतन नसूनहि तें चेतनासारखें भासतें. असें कां?—तर चेतन आत्मा त्याच्या मागे असतो म्हणून. खरें पाहतां चेतन फक्त तुम्हीच आहांत; मन तर बाह्य विश्वाच्या आकलनाचें तुमचें केवळ एक साधन आहे. उदाहरणार्थ हें पुस्तक घ्या. 'पुस्तक' या रूपांत त्याला बाह्य विश्वांत कांहीच अस्तित्व नाही. बाहेर वास्तविक दृष्टया जें कांही आहे तें अज्ञात व अज्ञेय आहे. बाहेरील तें 'अज्ञेय' केवळ एक उद्दीपक कारण असतें, इतकेंच. ज्याप्रमाणे एखादा दगड पाण्यांत टाकल्यावर पाणी त्याच्यावर तरंगांच्या रूपाने प्रतिक्रिया करीत असतें त्याचप्रमाणे तें बाहेरील अज्ञेय ज्या वेळीं मनावर आघात करतें त्या वेळीं मनांत प्रतिक्रिया निर्माण होऊन 'हें पुस्तक' अशी 'वृत्ति' उत्पन्न होते. सारांश, बाहेर खरोखर जें कांही आहे तें, म्हणजेच खरें बाह्य जगत्, हें मनांत असली वृत्तींची प्रतिक्रिया निर्माण करणारें केवळ उद्दीपक कारण असतें. पुस्तक-रूपाचा, हत्ती-रूपाचा किंवा मनुष्य-रूपाचा कोणताहि पदार्थ बाहेर अस्तित्वांत नाही; बाहेरील उद्दीपक कारणाने आपल्या मनांत निर्माण केलेली प्रतिक्रियाच फक्त आपण जाणूं शकतों. "संवेदनांची नित्य शक्यता ज्याच्यामुळे असते

त्याचेंच नांव जड वा स्थूल भूत" असें जॉन स्टुअर्ट मिल यांनी म्हटलें आहे. बाहेर असतें फक्त प्रतिक्रिया निर्माण करणारें उद्दीपक कारण. उदाहरणार्थ मोतशिपल्याचा दृष्टान्त घ्या. मोती कसे निर्माण होत असतात हें तुम्हांला ठाऊक असेलच. वाळूचा एखादा कण किंवा असेंच कांहीतरी शिपल्यांत शिरतें आणि तिला ( आंतील जीवाला ) डिवचतें. मग शिपल्यांतला तो जीव लुकणामारखा एक पदार्थ त्या वाळूच्या कणाभोवती स्रवूं लागतो आणि त्याचाच मोती बनतो. आपल्या अनुभवाला येणारें विश्व म्हणजे जणुकांही आपण स्वतःच स्रवलेलें लुकण आहे, आणि बाहेरचें खरें जग हें शिपल्यांत शिरलेल्या त्या वाळूच्या कणाचें कार्य करीत असतें. सामान्य मनुष्य हें कधीच समजूं शकणार नाही, कारण जेव्हा जेव्हा तो तें समजण्याचा प्रयत्न करील तेव्हा तेव्हा तो हें 'लुकण' स्रवेल. आणि तें त्याचें स्वतःचें लुकणच त्याच्या प्रत्ययास येत जाईल. वृत्ति म्हणजे काय हें आता आपल्याला कळूं शकेल. माणसाचें जें खरें स्व-रूप आहे तें, म्हणजेच 'खरा मनुष्य' हा मनाच्या पलीकडे असतो; मन त्याचें एक साधन वा उपकरण असतें; त्याचेंच चैतन्य या मनामधून पाझरत असतें. जेव्हा तुम्ही या मनामागे 'द्रष्टा'-रूपाने उभे राहतां तेव्हाच तें सचेतन होतें. माणूस ज्या वेळीं या मनाचा त्याग करतो त्या वेळीं मनाचा अजीवात नाश होऊन जातो, त्याचें अस्तित्व उरत नाही. असो. यावरून चित्त कशाला म्हणतात हें तुमच्या लक्षांत आलें असेल. चित्त हें मनाचें उपादान वा घटकद्रव्य वा तत्त्व होय, आणि वृत्ति म्हणजे बाह्य कारणांची त्यावर क्रिया झाल्याने त्यांत उठणाऱ्या लाटा वा तरंग होत. आपण ज्याला जग म्हणतों तें म्हणजे बाह्य उद्दीपक कारणांनी आपल्या चित्तांत उठलेल्या विभिन्न वृत्तिच होत.

तलावाचा तळ आपल्याला दिसत नाही, कारण त्याचा पृष्ठभाग तरंगांनी झाकलेला असतो. या तळाचें दर्शन, हे तरंग विरून पाणी शांत झालें म्हणजे होतें. पाणी गढूळ किंवा सारखें हिंदकळत असेल तर तळ दिसणार नाही. पण जर तें स्वच्छ असून त्यांत लाटा उसळत नसतील तर तळ दिसेल. आपलें खरें स्व-रूप, आपला आत्मा तलावाच्या तळासारखा आहे; चित्त हें तलावासारखें आहे आणि त्याच्या वृत्ति या

तलावावरील तरंगांप्रमाणे आहेत. ह्याचप्रमाणे आणखी एक गोष्ट आढळून येते ती ही की मनाच्या तीन अवस्था असतात. पहिली अवस्था अंधकाराची किंवा तमाची; ही पशूंत व मूढ व्यक्तींत दिसून येते. लोकांचें फक्त अनिष्ट करीत राहणें हेंच या अवस्थेंतील कार्य असतें —यावांचून मनांत दुसरा कोणताच विचार या अवस्थेंत येत नाही. त्यानंतर दुसरी अवस्था म्हणजे मनाची क्रियाशील अवस्था. हिला म्हणतात रज. मुख्यत: सत्ता आणि भोग हे दोनच हेतु या अवस्थेमधे मनांत सळसळत असतात. 'मी सामर्थ्यवान होईन व इतरांवर सत्ता गाजवीन' असें या अवस्थेंत वाटत असतें. मनाची तिसरी अवस्था सत्त्व या नांवाची असते. हिच्यांत प्रसन्नता व शांति यांचा अनुभव येतो, सर्व तरंग नाहीसे होतात आणि मनरूपी तलावाचें पाणी स्वच्छ, नितळ होतें. ही कांही निष्क्रियतेची अवस्था नसून उलट ती अत्युत्कट क्रिया-शीलतेची अवस्था आहे. शांत राहणें ही शक्तीची सर्वश्रेष्ठ अभिव्यक्ति आहे. वळवळ करीत राहणें, क्रियाशील असणें कठीण नाही. जरा लगाम ढिला सोडला की घोडे चौखूर उधळलेच समजा. हें कोणीहि करूं शकतो. पण जो बेफाम घोड्यांना आवरूं शकतो तोच खरा शक्तिमान म्हणावयाचा. घोडे आवरायला जास्त ताकत लागते की ते मोकळे सोडून द्यायला ? शांत माणूस हा आळशी असत नाही. सत्त्व म्हणजे जाड्य किंवा आळस असा कोणीं ग्रह करून घेऊं नये. शांत माणूस तोच की ज्याने आपल्या मनस्तरंगांना आपल्या कह्यांत ठेवलें आहे. म्हणून क्रियाशीलता ही कनिष्ठ प्रतीच्या सामर्थ्याची व शांति ही श्रेष्ठ प्रतीच्या सामर्थ्याची अभिव्यक्ति आहे.

चित्त हें नेहमीच आपल्या शुद्धस्वरूपाप्रत जाण्याचा प्रयत्न करीत असतें, पण इंद्रियें त्याला बाहेर खेंचीत असतात. चित्ताचा संयम करणें, त्याच्या बहिर्मुख प्रवृत्तीला आळा घालणें आणि त्याला त्या चिद्घन पुरुषाकडे परत फिरावयास लावणें हीच योगाची पहिली पायरी आहे. कारण यामुळेच तें आपल्या उचित मार्गाने वाटचाल करूं शकेल.

अगदी निकृष्ट प्राण्यांपासून तों अगदी उत्कृष्ट प्राण्यांपर्यंत सर्वांच्याच ठायीं चित्त असलें तरी फक्त मनुष्यशरीरांतच तें बुद्धीच्या रूपांत विकसित झालेलें आपल्याला दिसून येतें. जोंपर्यंत चित्त बुद्धीचें

रूप धारण करीत नाही तोंपर्यंत या सर्व अवस्थांतून पार पडून त्याला आत्म्याचा बंध नाहीसा करतां येत नाही. गाईला किंवा कुत्र्याला मन असलें तरी त्यांना एकदम मुक्ति लाभणें अशक्य आहे, कारण त्यांच्या चित्ताने, आपण ज्याला बुद्धि म्हणतों तें रूप अजून धारण केलेलें नसतें.

चित्त हें पुढील रूपांनी व्यक्त होत असतें. तें विखुरलेलें (क्षिप्त), अंधारून आलेलें (मूढ), जमा झालेलें (विक्षिप्त) आणि एकाग्र बनलेलें (विवेकख्याति वा प्रसंख्यान * अवस्थेंत) असूं शकतें. या चार अवस्थांत मन चार प्रकारचें असतें, तें चार वेगवेगळीं रूपें धारण करीत असतें. पहिल्या म्हणजे विखुरलेल्या वा क्षिप्त अवस्थेंत मन चहूकडे विखुरलेलें असतें. या अवस्थेंत कर्मवासना म्हणजे कर्म करण्याची इच्छा प्रबल असते. या अवस्थेंत मनाची प्रवृत्ति सारखी सुख आणि दुःख या रूपांत अभिव्यक्त होण्याची असते. त्यानंतर म्हणजे मनाची अंधारलेली वा मूढ अवस्था. ही जाड्याची वा तमोगुणात्मक अवस्था असते. ही माणसाला केवळ दुसऱ्यांचें अनिष्ट करण्यास प्रवृत्त करते. मनाची जमा झालेली वा विक्षिप्त अवस्था ही की जिच्यांत मन आपल्या केंद्राकडे जाण्याचा प्रयत्न करीत असतें. या ठिकाणीं टीकाकाराने असें विधान केलें आहे की, विक्षिप्त अवस्था ही देवांची, आणि मूढावस्था ही असुरांची स्वाभाविक अवस्था होय. मन ज्या वेळीं एकाग्र बनण्याचा प्रयत्न करतें त्या वेळच्या अवस्थेला एकाग्रावस्था म्हणतात, आणि चित्ताची ही एकाग्रावस्थाच आपल्याला समाधीप्रत घेऊन जाते.

**तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम् ॥ ३ ॥**

३. **सूत्रार्थः—तेव्हा (मन एकाग्र झाल्यावर) द्रष्टा (पुरुष) आपल्या (शुद्ध) स्वरूपांत स्थिर होतो.**

स्पष्टीकरणः—तरंग थांबल्यानंतर तलाव जसा शांत होतो व त्याचा तळ दिसूं लागतो तसेंच मनाचेंहि असतें. मन शांत झालें की आपलें स्वरूप आपल्याला दिसूं लागतें. आपण मग या तरंगांमधे न मिसळतां आपल्याच स्वरूपांत स्थिर राहतों.

---

* येथे चित्ताची रोधलेली म्हणजेच निरुद्ध (धर्ममेघ वा परप्रसंख्यान) अवस्था उल्लेखिली नाही, कारण वास्तविक दृष्टया निरुद्धावस्थेला चित्तवृत्ति म्हणणें योग्य होणार नाही.

**वृत्तिसारूप्यमितरत्र ॥ ४ ॥**

**४. सूत्रार्थः--इतर वेळीं (एकाग्रतेहून वेगळ्या अवस्थेंत) द्रष्टा हा वृत्तींशीं एकरूप होऊन जात असतो--तद्रूप बनत असतो.**

स्पष्टीकरणः--उदाहरणार्थ, कोणी माझी निंदा करतो. त्यामुळे माझ्या मनांत एक बदल घडून येतो. हीच वृत्ति. या वृत्तीशीं मी एकरूप होतों आणि त्याचा परिणाम म्हणजे दुःख.

**वृत्तयः पञ्चतय्यः क्लिष्टा अक्लिष्टाः ॥ ५ ॥**

**५. सूत्रार्थः--पांच प्रकारच्या वृत्ति असतात. त्यांपैकी (कांही) क्लेशकारक असतात व (कांही) क्लेशकारक नसतात (म्हणजेच क्लेशरहित असतात).**

**प्रमाण-विपर्यय-विकल्प-निद्रा-स्मृतयः ॥ ६ ॥**

**६. सूत्रार्थः--या पांच वृत्ति पुढीलप्रमाणे आहेत--सत्य ज्ञान (प्रमाण), भ्रम (विपर्यय), शब्दजन्य भ्रम (विकल्प), निद्रा आणि स्मृति.**

**प्रत्यक्षानुमानागमाः प्रमाणानि ॥ ७ ॥**

**७. सूत्रार्थः--प्रत्यक्षानुभव, अनुमान व आप्तवचन (अधिकारी व्यक्तींचे शब्द) हीं प्रमाणें होत.**

स्पष्टीकरणः--जेव्हा कोणत्याहि दोन प्रत्यक्ष अनुभवांत विरोध उद्भवत नाही तेव्हा त्यांना आपण प्रमाण म्हणतों. उदाहरणार्थ मीं कांहीतरी ऐकलें पण तें माझ्या पूर्वीच्या प्रत्यक्षानुभवाच्या विरुद्ध जर असेल तर मी तें लागलीच खोडून काढतों, त्यावर मी विश्वास ठेवीत नाहीं. तीन प्रकारचीं प्रमाणें असतात. प्रत्यक्षप्रमाण किंवा प्रत्यक्षानुभव म्हणजे जें कांही आपण पाहतों किंवा अनुभवतों तें. इंद्रियांना भ्रमांत पाडणारी कोणतीहि गोष्ट न घडल्यास मला जें दिसेल वा अनुभवास येईल तें प्रमाण मानलें पाहिजे. मी हें जग पाहतों, अनुभवतों. हाच जगाच्या अस्तित्वाचा पुरेसा पुरावा आहे. याला म्हणतात प्रत्यक्ष-प्रमाण. यानंतर अनुमान किंवा तर्क. तुम्ही एक चिन्ह पाहतां. त्या चिन्हावरून त्याने सुचविलेल्या वस्तूचें तुम्हांला ज्ञान झालें. जसें दुरून धूर पाहून तिथे अग्नि आहे असें तुम्हांला ज्ञान झालें. याला म्हणतात अनुमानप्रमाण. तिसरें प्रमाण म्हणजे आप्तवाक्य; म्हणजे ज्यांना सत्याचा मूर्त साक्षात्कार झालेला आहे अशा योग्यांची प्रत्यक्ष अनुभूति. आपण सगळेच ज्ञानप्राप्तीसाठी धडपडत असतों. पण तुम्हांआम्हांला

यासाठी बरेच प्रयत्न करावे लागतात व तर्काच्या कंटाळवाण्या प्रक्रियांच्या द्वारें ज्ञानापर्यंत पोहोचावें लागतें. पण विशुद्ध सत्त्वाचा योगी या सगळयांच्या पलीकडे गेलेला असतो. त्याच्या मनश्चक्षूपुढे भूत, भविष्य, वर्तमान हीं सारखींच उपस्थित असतात. त्याला हें सर्व उघडया पुस्तकासारखें वाचतां येतें. त्याला आपल्याप्रमाणे ज्ञानाच्या कंटाळवाण्या प्रक्रियांतून जावें लागत नाही. त्याचे शब्द प्रमाण असतात, कारण ज्ञानाचा त्याला स्वतःच्या अंतर्यामींच साक्षात्कार झालेला असतो. तो सर्वज्ञ असतो. असेच पुरुष शास्त्रांचे प्रणेते असतात; आणि म्हणूनच शास्त्रें हीं प्रमाण होत. जर अशा कांही व्यक्ति आजहि विद्यमान असतील तर त्यांचे शब्दहि प्रमाण ठरतील. इतर दर्शनकार आप्तवाक्याची विस्तृत चर्चा करतात व विचारतात की, "हीं आप्तवाक्यें खरीं आहेत याचें प्रमाण काय?" या प्रश्नाचें उत्तर हेंच की आप्तवाक्यें प्रमाण आहेत, कारण तीं म्हणजे प्रत्यक्ष अनुभव होत. आधीच्या कोणत्याहि ज्ञानाला विरोधी नसेल तर तुम्हांला जें दिसतें, मला जें दिसतें तें जसें प्रमाण मानलें जातें तसेंच योग्यांच्याहि ज्ञानाचें आहे. इंद्रियातीत असेंहि ज्ञान असतें. आणि जर तें तर्काला वा मानवी पूर्वानुभवांना विरोधी नसेल तर तेंहि प्रमाणच होय. एखादा वेडा माणूस या खोलींत येऊन जर म्हणूं लागेल की मला भोवताली देवदूतच देवदूत दिसत आहेत तर त्याचें तें म्हणणें कांही प्रमाणभूत ठरावयाचें नाही. प्रथम म्हणजे ज्ञान हें सत्यज्ञान असलें पाहिजे. दुसरें म्हणजे तें आपल्या पूर्वज्ञानाला विरोधी नसलें पाहिजे, आणि तिसरें म्हणजे जी व्यक्ति तें ज्ञान आम्हांला देत आहे तिच्या चारित्र्यावर तें आधारलेलें असलें पाहिजे. कांही लोकांचें असें म्हणणें आहे की एखादा माणूस काय म्हणतो हें महत्त्वाचें आहे. त्याचें चारित्र्य तितकेसें महत्त्वाचें नाही. तो काय सांगत आहे याकडेच आपण प्रथम लक्ष दिलें पाहिजे. कांही बाबतींत हें खरें असेल. एखादा माणूस वाईट असूनहि खगोल शास्त्रासंबंधी तो एखादा शोध लावूं शकेल. पण धर्माची गोष्ट वेगळी आहे; कारण अपवित्र माणसांत धार्मिक सत्याप्रत पोहोचण्याचें सामर्थ्य कधीहि असूं शकणार नाही. म्हणून आपण प्रथम हें बघितलें पाहिजे की जो माणूस स्वतःस 'आप्त' म्हणवतो तो पूर्णपणें निःस्वार्थ व

पवित्र आहे किंवा नाही. त्यानंतर त्याला अतींद्रिय ज्ञान लाभलेलें आहे किंवा नाही हें बघावयास हवें. तिसरी गोष्ट म्हणजे, तो जें सांगतो तें मानवजातीच्या आधीच्या खऱ्या ज्ञानाला विरोधी आहे किंवा काय हें आपण पाहिलें पाहिजे. सत्याविषयीचा कोणताहि नवा शोध पूर्वीच्या सत्याला विरोधी नसतो, उलट तो त्याच्याशीं तंतोतंत जुळत असतो. आणखी चवथी गोष्ट म्हणजे सत्य हें सर्वांना पडताळून पाहतां आलें पाहिजे. जर कोणी असें म्हणेल की 'मला एक दिव्य अनुभव आला आहे, पण तो मिळवण्याचा तुम्हांला मात्र अधिकार नाही' तर मी त्याच्यावर विश्वास ठेवणार नाहीं. प्रत्येकाला सत्य पडताळून पाहण्याची शक्यता असली पाहिजे. तसेंच, जो आपलें ज्ञान विकतो तो 'आप्त' नव्हे. या सर्व अटी पूर्ण होत असतील तरच त्या व्यक्तीला 'आप्त' म्हणावें. 'आप्त' हा प्रथम पवित्र असावा; त्याच्यांत स्वार्थभावना असतां कामा नये; त्याला नांवाची किंवा कीर्तीची हाव नसावी. तसेंच इंद्रियातीत ज्ञान असल्याचा त्याने पुरावा दिला पाहिजे. जें आपल्याला इंद्रियांकडून मिळूं शकत नाही आणि ज्यामुळे जगाचें कल्याण होतें असें ज्ञान त्याने आपल्यास द्यावयास हवें. हें ज्ञान इतर सत्यांच्या विरुद्ध नसावें; जर हें इतर वैज्ञानिक सत्यांच्या विरुद्ध असेल तर तें ताबडतोब टाकून द्यावें. त्याचप्रमाणे त्या व्यक्तीने असें म्हणतां कामा नये की सत्यावर फक्त माझाच अधिकार आहे, इतरांचा नाही. त्या व्यक्तीचें ज्ञान हें सर्वजनसुलभ असावें. म्हणून प्रत्यक्ष, अनुमान व आप्तवचन हीं तीन प्रमाणें ठरतात. 'आप्त' ह्या शब्दाचा इंग्रजींत अनुवाद करणें शक्य नाही. 'Inspired' (उत्स्फूर्त) हा कांही 'आप्त' शब्दाचा प्रतिशब्द नव्हे, कारण स्फूर्ति ही बाहेरून येते असा समज आहे. पण ज्या ज्ञानासंबंधी आपण बोलत आहोंत तें ज्ञान माणसाच्या आंतूनच प्रकट होत असतें. 'आप्त' शब्दाचा शब्दशः अर्थ आहे—"ज्याला लाभलें आहे तो."

**विपर्ययो मिथ्याज्ञानमतद्रूपप्रतिष्ठम् ॥८॥**

८. **सूत्रार्थः—विपर्यय म्हणजे मिथ्या वा खोटें ज्ञान. तें वस्तूच्या खऱ्या स्वरूपाशीं जुळत नाही. (त्याचे तीन प्रकार आहेत—संशय, विपर्यय आणि तर्क.)**

स्पष्टीकरणः—एका गोष्टीला चुकीने वा भ्रांतीने दुसरीच समजणें

हा आपल्या चित्तांत उठणाऱ्या वृत्तींचा (६ व्या सूत्रांत सांगितल्या-प्रमाणे) दुसरा वर्ग होय. उदाहरणार्थ शिंपल्याला चांदीचा तुकडा समजणें.

**शब्दज्ञानानुपाती वस्तुशून्यो विकल्पः ॥९॥**

**९. सूत्रार्थः--शब्द आहे पण त्याने सूचित होणारी वस्तु मात्र अस्तित्वांत नाही, अशा शब्दाने होणाऱ्या ज्ञानाला विकल्प किंवा शब्दजन्य भ्रांति म्हणतात. (हा विकल्प तीन प्रकारचा असतो — वस्तुविकल्प, क्रियाविकल्प आणि अभावविकल्प.)**

स्पष्टीकरणः–विकल्प नांवाच्या आणखी कांही वृत्ति असतात. उदाहरणार्थ कोणीं एक शब्द उच्चारला. आपण शांतपणें त्याचा अर्थ ठरवण्याच्या भानगडींत न पडतां चट्कन निष्कर्ष काढून बसतों. हें चित्ताच्या दुर्बलतेचें लक्षण आहे. यावरून तुम्हांला संयमाचा सिद्धान्त समजू शकेल. माणूस जितका दुर्बळ, तितका त्याच्या ठायीं संयम कमी असतो. नेहमी याच कसोटीवर प्रत्येकाने आपली परीक्षा करावी. जेव्हा तुम्हांला राग येत असेल किंवा वाईट वाटत असेल त्या वेळीं 'हें असें कसें होत आहे?' याविषयी विचार करून पाहा, तुम्हांला त्रस्त करणारी एखादी बातमी तुमच्या मनांत वृत्ति कशी उत्पन्न करते, हें तपासून पाहा.

**अभाव-प्रत्ययालम्बना वृत्तिर्निद्रा ॥१०॥**

**१०. सूत्रार्थः–शून्यत्वबोध हा ज्या वृत्तीचा आधार वा विषय असतो तिला निद्रा म्हणतात.**

स्पष्टीकरणः–यानंतरचा वृत्तींचा प्रकार म्हणजे निद्रा (स्वप्न आणि सुषुप्ति). आपण जागे झाल्यावर आपल्याला कळतें की आपण झोपलों होतों. आता, जें आपण प्रत्यक्ष पाहिलें वा अनुभवलें आहे त्याचीच आपल्याला आठवण होत असते. जें आपण पाहिलें वा अनुभवलें नाही त्याची आपल्याला आठवण होऊं शकत नाही. प्रत्येक प्रतिक्रिया ही चित्तरूपी तलावावरील एकेका तरंगासारखी असते. आपण झोपेंत असतांना आपल्या मनांत जर कोणताहि तरंग वा वृत्ति उठली नसती तर मग झोपेंत आपल्याला भावात्मक किंवा अभावात्मक कोणत्याहि प्रकारचा अनुभव आला नसता आणि म्हणून आपल्याला त्याचें स्मरणहि राहिलें

नसतें. पण आपल्याला निद्रावस्थेचें स्मरण असतें. याचा अर्थ असा की निद्रावस्थेंत आपल्या मनांत एका विशिष्ट प्रकारच्या वृत्ति होत्या. आठवणें हीहि एकप्रकारची वृत्तिच आहे. तिला 'स्मृति' म्हणतात.

**अनुभूतविषयासम्प्रमोषः स्मृतिः ॥११॥**

**११. सूत्रार्थः—प्रत्यक्ष अनुभवलेले विषय (त्यांच्या वृत्ति) मनांतून नाहीसे न होतां संस्कारांच्या रूपाने जाणीवेंत परत येण्याला स्मृति म्हणतात. (हिचे दोन प्रकार आहेत–भावित आणि अनुद्भावित.)**

स्पष्टीकरणः—प्रत्यक्ष, विपर्यय (मिथ्याज्ञान), विकल्प (शब्द-जनित भ्रांति) व निद्रा या सगळ्या वृत्तींपासून स्मृति उद्भवूं शकते. उदाहरणार्थ तुम्ही एक शब्द ऐकतां. हा शब्द तुमच्या चित्तरूपी सरोवरांत फेकल्या गेलेल्या दगडासारखा आहे. त्यामुळे त्यांत एक तरंग (प्रत्यय) निर्माण होतो व त्या तरंगामुळे अनेक लहान लहान तरंग उत्पन्न होतात. हीच स्मृति. निद्रेंतहि असेंच घडत असतें. जेव्हा निद्रा नामक विशिष्ट वृत्ति स्मृतिरूपी अनेक तरंगांची परंपरा निर्माण करते तेव्हा त्याला 'स्वप्न' असें नांव देण्यांत येतें. जाग्रत्कालीं ज्यांना स्मृति म्हणतात तसल्या तरंगांनाच निद्राकालीं 'स्वप्न' म्हणत असतात.

**अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः ॥१२॥**

**१२. सूत्रार्थः—या वृत्तींचा निरोध अभ्यास (पुनःपुनः प्रयत्न) व वैराग्य यांनी होतो.**

स्पष्टीकरणः—वैराग्य येण्यासाठी, अनासक्त होण्यासाठी मन हें शुद्ध, सात्त्विक व विवेकी असावयास हवें. अभ्यास वा पुनःपुनः प्रयत्न कां करावा ? त्याचें कारण असें:—आपली प्रत्येक कृति ही तलावाच्या पृष्ठभागावर आंदुळणाऱ्या तरंगासारखी असते. आपल्या प्रत्येक क्रियेने चित्तसरोवरावर जणु एक तरंग येऊन जात असतो. हे तरंग विरून गेल्यावर काय उरतें ? संस्कार. असे अनेक संस्कार मनावर पडले म्हणजे ते एक होतात आणि 'सवय' बनतात. "सवय हा माणसाचा दुसरा स्वभावच होय" (Habit is second nature) असें म्हणण्याचा प्रघात आहे. केवळ दुसराच नव्हे, तर सवय ही माणसाचा प्रधान स्वभाव होय—नव्हे, ती माणसाचा पुरा स्वभाव म्हणतां येईल. आपण जें काय आहोंत—आपला आजचा पुरा स्वभाव हा आपल्या सवयींचें फळ होय. ही

वस्तुस्थिति तुम्हां-आम्हांला केवढा तरी दिलासा देते, कारण आमचा स्वभाव जर केवळ आमच्याच सवयींनी बनलेला असेल तर आपण तो केव्हाहि बदलून टाकूं शकतों—तसें करणें आपल्याच हातीं आहे. आमच्या मनामधें हे जे तरंग वा लाटा उठत असतात त्यांचा प्रत्येकाचा परिणाम असें एक एक चिन्ह मागे राहून जात असतें. मागे राहिलेल्या या चिन्हालाच 'संस्कार' म्हणतात. आपलें चारित्र्य म्हणजे या सगळ्या चिन्हांची म्हणजे संस्कारांची गोळाबेरीज होय. जो विशिष्ट प्रवाह वरचढ ठरतो तसा एकूण माणूस बनतो. जर चांगल्याचा प्रभाव पडेल तर माणूस चांगला होईल, वाइटाचा वरचष्मा होईल तर माणूस वाईट बनेल. जर आनंदीपणाचें प्राबल्य होईल तर माणूस सुखी बनेल वाईट सवयींवर एकमेव उपाय आहे—त्यांविरुद्ध सवयी अंगीं बाणवून घेणें. ज्या साऱ्या वाईट सवयी आमच्यांत संस्कारबद्ध होऊन बसल्या आहेत, त्या चांगल्या सवयींनी कह्यांत आणून दूर करावयास हव्यात. सदा चांगलीं कामें करीत चला, सदैव पवित्र विचार बाळगीत चला; हीन संस्कार निवारण्याचा हाच एकमेव मार्ग आहे. अमुक माणसाच्या उद्धाराची आता कांही आशा नाही असें कदापि म्हणूं नका, कारण वाईट मनुष्य म्हणजे एक विशिष्ट प्रकारचें चारित्र्य आणि चारित्र्य म्हणजे कांही विशिष्ट सवयींची गोळाबेरीज; आणि या सवयी नव्या व चांगल्या सवयींनी काबूंत आणतां येतात, दूर करतां येतात. चारित्र्य म्हणजे सवयींची पुनरावृत्ति, आणि म्हणूनच फक्त सवयींच्या पुनरावृत्तीनेच तें बदलूं शकेल—सुधरूं शकेल.

**तत्र स्थितौ यत्नोऽभ्यासः ॥१३॥**

**१३. सूत्रार्थः—या वृत्तींना पूर्णपणें कह्यांत ठेवण्यासाठी सतत झटण्यालाच अभ्यास म्हणतात.**

स्पष्टीकरणः—अभ्यास म्हणजे काय? मनाचें दमन करण्याच्या प्रयत्नाला म्हणजेच चित्तांत तरंग उठून तें बहिर्गामी होऊं न देण्याच्या प्रयत्नालाच अभ्यास म्हणतात.

**स तु दीर्घकालनैरन्तर्यसत्कारासेवितो दृढभूमिः ॥ १४ ॥**

**१४. सूत्रार्थः—सतत दीर्घ काल व अत्यंत श्रद्धाभक्तिपूर्वक (त्या परमपद-प्राप्तीसाठी) प्रयत्न करीत गेल्याने हा अभ्यास दृढ होतो.**

स्पष्टीकरण:–संयम एका दिवसांत साधत नाही. त्यासाठी दीर्घ काल अखंड अभ्यास वा प्रयत्न करावा लागतो.

**दृष्टानुश्रविकविषयवितृष्णस्य वशीकारसंज्ञा वैराग्यम् ॥१५॥**

**१५. सूत्रार्थः—दृष्ट आणि श्रुत सर्व विषयांसंबंधीच्या आकांक्षेचा ज्याने त्याग केला आहे त्याच्या ठायीं एक अपूर्व मनोभाव उदयास येत असतो. त्या मनोभावामुळे तो समस्त विषयवासनांचें दमन करूं शकतो. त्या मनोभावालाच वैराग्य वा अनासक्ति म्हणतात. (हें वैराग्य चार प्रकारचें असतें--यतमान, व्यतिरेक, एकेंद्रिय आणि वशीकार.)**

स्पष्टीकरण:–आपल्या सर्व कार्यांच्या दोन प्रेरक शक्ति असतात. (१) आपलें स्वतःचें ज्ञान व (२) इतरांचे अनुभव. या दोन शक्ति आपल्या मनोरूपी तलावाच्या पृष्ठभागावर अनेक प्रकारचे तरंग उत्पन्न करतात. वैराग्य ही अशी शक्ति आहे की जी या दोन शक्तींच्या विरुद्ध झगडून मनाला कह्यांत ठेवण्यास आपल्याला समर्थ बनवते. या दोन्ही शक्तींचा आपण त्याग केला पाहिजे. उदाहरणार्थमी—-रस्त्याने जात असतां एक माणूस येतो व माझें घडयाळ हिसकावून घेतो. हा माझाच अनुभव आहे. ही घटना मी स्वतःच अनुभवतों. यामुळे माझ्या चित्तांत तात्काळ तरंग उठतात व ते क्रोधाचें रूप धारण करतात. या क्रोधाला चित्तांत शिरूं देऊं नका. जर या क्रोधाचा संयम करतां आला नाही तर तुमच्यांत कांही तथ्य नाही; जर तुम्ही त्याचा संयम करूं शकलां तर तुमच्या ठायीं वैराग्य आहे असें म्हणतां येईल. तसेंच संसारासक्त लोकांचा अनुभव आपल्याला असें शिकवितो की विषयभोग हेंच जीवनाचें सर्वश्रेष्ठ लक्ष्य आहे. या साऱ्या गोष्टी म्हणजे फार मोठी प्रलोभनें होत. त्याच्याविषयी उदासीन राहणें, आणि त्यांच्याशीं संबंधित कोणतेहि तरंग मनांत उठूं न देणें म्हणजे वैराग्य होय. आपल्या अनुभवांतून व दुसऱ्यांच्या अनुभवांतून उद्भवणाऱ्या प्रेरक शक्तींचें दमन करून चित्ताला त्यांच्या कह्यांत जाऊं न देणें म्हणजेच वैराग्य होय. या दोन्ही प्रेरक शक्ति माझ्या ताब्यांत असल्या पाहिजेत; मी त्यांच्या ताब्यांत असतां कामा नये. अशा तऱ्हेच्या मानसिक शक्तीला वैराग्य म्हणतात. हें वैराग्यच मोक्षाचें एकमेव साधन आहे.

**तत्परं पुरुषख्यातेर्गुणवैतृष्ण्यम् ॥ १६ ॥**

**१६. सूत्रार्थ—पुरुषाच्या (वास्तविक स्वरूपाच्या) ज्ञानापासूनच जें उत्पन्न**

**होतें व जें गुणांचाहि पूर्णपणें त्याग करतें त्याला पूर्ण वैराग्य असें म्हणतात.**

स्पष्टीकरण:—जेव्हा गुणाविषयीची देखील आपली ओढ नाहीशी होते तेव्हा वैराग्याच्या शक्तीची पूर्ण अभिव्यक्ति झाली असें समजावें. यासाठी अगोदर पुरुष किंवा आत्मा व गुण यांचें स्वरूप काय आहे हें समजलें पाहिजे. योगदर्शनाप्रमाणे सर्व विश्व हें तीन गुणांचें किंवा शक्तींचें बनलेलें आहे. एकाला तम हें नांव आहे, दुसऱ्याला रजस् आणि तिसऱ्याला सत्त्व. हे तीन गुण भौतिक विश्वांत अनुक्रमें अंधकार किंवा जाड्य, आकर्षण किंवा विकर्षण, आणि या दोघांचें संतुलन या रूपांत व्यक्त होतात. समस्त प्रकृति, जगांतील साऱ्या वस्तु या तीन शक्तींच्या विभिन्न प्रमाणांतील मिश्रणामुळे उत्पन्न झाल्या आहेत. सांख्यांनी ही प्रकृति अनेक प्रकारच्या तत्त्वांमधे विभागली आहे. मनुष्याचा आत्मा या सगळ्यांच्या—या प्रकृतीच्या—पलीकडे आहे. तो स्वयंप्रकाश, शुद्ध व पूर्णस्वरूप आहे. जगांत—प्रकृतींत—जें कांही चैतन्ययुक्त दिसतें तें सर्व प्रकृतींत पडलेलें या आत्म्याचें प्रतिबिंबच आहे. प्रकृति ही स्वत: अचेतन आहे, जड आहे. येथे हें लक्षांत ठेवलें पाहिजे की मनाचाहि या प्रकृतींत समावेश होतो. मन हें प्रकृतींतच असतें. आपले विचारहि प्रकृतीच्या अंतर्गत असतात. विचारापासून तों अति स्थूल जड पदार्थांपर्यंत सगळें कांही प्रकृतीच्या अंतर्गत आहे. हीं सारीं प्रकृतीचींच विभिन्न अभिव्यक्त रूपें आहेत. या प्रकृतीने मनुष्याच्या आत्म्याला झाकून टाकलें आहे आणि जेव्हा ती आपलें आवरण दूर करते तेव्हा हा आत्मा स्वप्रकाशाने प्रकाशमान होतो. पंधराव्या सूत्रांत वर्णिलेलें वैराग्य (ज्याच्या द्वारें समस्त विषयांना म्हणजेच प्रकृतीला जिंकतां येतें) हें आत्म्याच्या अभिव्यक्तीचें सर्वश्रेष्ठ असें साधन आहे. यापुढच्या सूत्रांत योग्याचें अंतिम ध्येय जी समाधि वा पूर्ण एकाग्रता तिचें लक्षण सांगितलें आहे.

**वितर्कविचारानन्दास्मितानुगमात् संप्रज्ञातः ॥ १७ ॥**

**१७. सूत्रार्थ:—वितर्क, विचार, आनंद आणि अस्मिता—या चाऱ्ही गोष्टींशीं संबद्ध असलेली जी समाधि आहे तिला सम्प्रज्ञात वा सम्यक् ज्ञानयुक्त समाधि म्हणतात.**

स्पष्टीकरण:—समाधि दोन प्रकारची आहे. एक, सम्प्रज्ञात व

दुसरी, असम्प्रज्ञात. सम्प्रज्ञात समाधींत प्रकृतीचें दमन करण्याचें सर्व सामर्थ्य अंगीं येतें. ही समाधि चार प्रकारची असते. हिच्या पहिल्या प्रकारास 'सवितर्क समाधि' असें म्हणतात. सर्व तऱ्हेच्या समाधीमधे मनाला इतर साऱ्या विषयांपासून हटवून एका विशिष्ट विषयाच्या ध्यानांत पुन: पुन: नियुक्त करावें लागतें. या ध्यानाचे विषय दोन प्रकारचे आहेत--(१) चोवीस प्राकृतिक जडतत्त्वें, (२) चेतन पुरुष. योगाचा हा भाग संपूर्णतया सांख्यदर्शनावर आधारलेला आहे. या सांख्य-दर्शनासंबंधी मीं आधीच विवेचन केलें आहे. आपल्याला आठवत असेलच की मन, बुद्धि आणि अहंकार यांची एक आधारभूमि आहे. तिला चित्त म्हणतात; चित्तापासूनच त्यांची उत्पत्ति आहे. हें चित्त विभिन्न प्राकृतिक शक्ति ग्रहण करतें, आणि त्यांना विचारांच्या रूपांत परिणत करतें. शक्ति आणि जडपदार्थ या दोहोंचें कारणस्वरूप अशी एक अवस्था आहे की जिथे हीं दोन्ही एक होतात. या अवस्थेचें अस्तित्व आपल्याला मानावेंच लागेल. हिलाच 'अव्यक्त' किंवा प्रकृतीची सृष्टीपूर्वीची अव्यक्त अवस्था असें म्हणतात. या अव्यक्तांतच, एक कल्प संपल्यानंतर सगळें विश्व विलीन होतें व फिरून दुसऱ्या कल्पांत त्यांतूनच नवी सृष्टि उत्पन्न होते. या सर्वांच्या पलीकडे चैतन्यघन पुरुष विद्यमान आहे. ज्ञान ही शक्ति आहे. कोणत्याहि वस्तूचें ज्ञान झालें की तिचें आपल्याला नियंत्रण करतां येतें. याचप्रमाणे जेव्हा आपलें मन निरनिराळ्या तत्त्वांचें ध्यान करूं लागतें तेव्हा त्याला त्यांचें नियंत्रण करतां येतें. ज्या समाधींत बाह्य स्थूलभूतें ध्यानाचे विषय असतात तिला 'सवितर्क समाधि' असें म्हणतात. वितर्क म्हणजे प्रश्न. सवितर्क म्हणजे प्रश्नासहित. या समाधीच्या वेळीं ध्याता या स्थूल भूतांमधील सारी शक्ति आणि त्यांच्यांत निहित असलेलें सत्य आपल्याला प्राप्त व्हावें म्हणून जणुकांही त्यांना प्रश्न विचारीत असतो. परंतु केवळ शक्ति प्राप्त करून घेतल्याने मुक्तिलाभ होत नाही. ही शक्ति म्हणजे केवळ भोगाचें साधन आहे. पण या जीवनांत यथार्थ भोगसुख मिळत नाही. 'या जगांत, या जीवनांत भोगसुखाचा शोध व्यर्थ आहे,' ही फार प्राचीन शिकवण आहे. पण माणसाला तिचें मर्म आकळणें अत्यंत कठीण आहे. ज्या वेळीं त्याला तिचें यथार्थ ज्ञान

होतें तेव्हा तो या जगत्प्रपंचाच्या पलीकडे जाऊन मुक्त होऊन जातो. ज्यांना आपण सामान्यतः 'सिद्धि' म्हणतों त्यांच्या लाभाने माणूस संसाराच्या जंजाळांतच जास्त गुरफूटन जातो. शेवटीं या सिद्धींमुळे दुःखच अधिक वाढतें. शास्त्रवेत्त्याच्या नात्याने पतंजलींनी अशा प्रकारच्या सिद्धिलाभाची शक्यता जरी सांगितली असली तरी त्याबरोबरच या सर्व सिद्धींच्या प्रलोभनांपासून सावध राहण्यास ते आपल्याला निक्षून सांगतात.

तसेंच याच ध्यानांत ध्याता जेव्हा या भूतांना स्थल-कालापासून वेगळें करून त्यांच्या स्वरूपाचें ध्यान करतो तेव्हा त्या समाधीला 'निर्वितर्क समाधि' म्हणतात. आणखी एक पाऊल पुढे जाऊन जेव्हा तन्मात्रा या ध्यानाचा विषय बनतात आणि त्यांना देशकालाच्या अंतर्गत मानून त्यांचें ध्यान केलें जातें तेव्हा तिला 'सविचार समाधि' म्हणतात. नंतर जेव्हा या समाधींत देश-कालाच्या पलीकडे जाऊन त्या सूक्ष्मभूतांच्या स्वरूपाचें ध्यान केलें जातें तेव्हा तिला 'निर्विचार समाधि' म्हणतात. यापुढची पायरी म्हणजे जिच्यांत स्थूल व सूक्ष्म हीं दोन्ही भूतें वा तत्त्वें बाजूला सारून अंतःकरणाचेंच ध्यान केलें जातें ती होय. जेव्हा अंतःकरणाचें, रज व तम या गुणांनी रहित अशा स्वरूपांत ध्यान केलें जातें तेव्हा तिला 'आनंद समाधि' म्हणतात. जेव्हा मन स्वतःच ध्यानाचा विषय बनतें आणि ध्यान पूर्णपणें परिपक्व व एकाग्र होतें, जेव्हा स्थूल व सूक्ष्म विषयांचे सर्व विचार मनांतून नाहीसे होतात आणि जेव्हा अन्य साऱ्या विषयांपासून पृथक् होऊन अहंकाराची केवळ सत्त्वावस्थाच शिल्लक उरते तेव्हा तिला 'अस्मिता समाधि' म्हणतात. या अवस्थेंत देखील मनाच्या पूर्णपणें अतीत होणें शक्य होत नाही. जो माणूस या अवस्थेला पोहोचतो त्याला वेदांमधे 'विदेह' असें म्हटलें आहे. असा माणूस स्वतःचें स्थूलदेहरहित रूपांत चिंतन करूं शकतो, पण त्याला आपलें शरीर सूक्ष्म आहे असें मानावेंच लागतें. या अवस्थेंत असलेले जे लोक परमपदाची प्राप्ति न करतां प्रकृतीमधेंच विलीन होऊन जातात त्यांना 'प्रकृतिलीन' असें म्हणतात. पण जे लोक असल्या सूक्ष्म भोगसुखाने संतुष्ट होत नाहीत तेच अंतिम लक्ष्य जी मुक्ति ती प्राप्त करून घेतात.

**विरामप्रत्ययाभ्यासपूर्वः संस्कारशेषोऽन्यः ॥ १८ ॥**

**१८. सूत्रार्थः—याहून निराळी अशी समाधि, सर्व मानसिक क्रिया थांबविण्याच्या सतत अभ्यासाने साध्य करतां येते. हिच्यामधे चित्तांत फक्त अनभिव्यक्त संस्कारच शिल्लक राहतात.**

स्पष्टीकरण:—ही पूर्ण ज्ञानातीत अशी असम्प्रज्ञात समाधीची अवस्था असून हिच्यामुळे मोक्षप्राप्ति होते. याच्या आधी ज्या समाधींसंबंधी सांगितलें त्यांच्यापासून मोक्ष किंवा मुक्ति प्राप्त होत नाही. एखाद्याला सर्व शक्ति प्राप्त होऊनहि त्याचा अधःपात होणें शक्य आहे. जोंपर्यंत आत्मा प्रकृतीच्या अतीत होऊन सम्प्रज्ञात समाधीच्याहि पलीकडे जात नाही तोंपर्यंत पतनाचें भय उरतेंच. ही अवस्था प्राप्त करून घेण्याचा उपाय जरी सोपा वाटला तरी तो साध्य करणें कठीण आहे. या साधनाप्रणालींत स्वतः मनावरच ध्यान करावें लागतें आणि कोणताहि विचार मनांत आल्याबरोबर तो तत्क्षणीं दाबून टाकावा लागतो. कसल्याहि विचारांना मनांत स्थान न देतां तें पूर्णपणें शून्य करावें लागतें. ज्या क्षणीं आपल्याला हें यथार्थपणें करतां येईल त्याच क्षणीं आपण मुक्त होऊन जाऊं. या गोष्टींचें शिक्षण घेतल्याशिवाय व पूर्वतयारी केल्याशिवाय जे लोक मन शून्य करण्याचा प्रयत्न करतात ते बहुधा स्वतःला तमोगुणाच्या ताब्यांत जाऊं देतात. तमोगुण हा अज्ञानात्मक असून तो मनाला निष्क्रिय व आळशी करून टाकतो व त्यामुळे या लोकांचा गैरसमज होतो की त्यांचें मन शून्य झालें आहे. खरोखरच मन शून्य करूं शकणें ही फार मोठ्या सामर्थ्याची व संयमाची गोष्ट आहे. जेव्हा या असम्प्रज्ञात वा ज्ञानातीत अवस्थेची प्राप्ति होते तेव्हा ही समाधि निर्बीज रूप धारण करते. बीजरहित समाधि म्हणजे काय? सम्प्रज्ञात समाधींत चित्तवृत्तींचें फक्त दमनच होतें, पण त्या संस्कारांच्या वा बीजाच्या रूपाने कायम असतात. हे संस्कार (किंवा बीजें) फिरून योग्य अवसर मिळाल्यास तरंगांचें रूप धारण करतात. पण जेव्हा हे सर्व संस्कार निर्मूल केले जातात व मनहि जवळजवळ नाहीसें झालेलें असतें तेव्हा समाधि निर्बीज होते. तेव्हा मनांत असें कोणतेंहि संस्कारबीज उरत नाही की ज्याच्यापासून जीवनाचा वृक्ष पुनः उत्पन्न होऊं शकेल आणि जीवनमरणाचें हें चक्र चालू राहूं शकेल,

यावर तुम्ही विचारूं शकतां की ही कोणती अवस्था आहे की जिच्यांत मन किंवा ज्ञान शिल्लक राहत नाही. आपण ज्याला सामान्यत: ज्ञान म्हणतों ती ज्ञानापलीकडल्या अवस्थेच्या तुलनेने खालची अवस्था आहे. तुम्ही नेहमी लक्षांत ठेवलें पाहिजे की सर्वांत उच्च अवस्था व सर्वांत खालची अवस्था ह्या नेहमी सारख्याच दिसत असतात. ईथरचें कंपन अत्यंत मंद झालें म्हणजे त्याला अंधार म्हणतात, आणि त्याचें अत्यंत तीव्र स्पंदन देखील अंधारासारखेंच दिसतें. हे दोन्ही प्रकारचे अंधार एकच आहेत काय ? नाही, ते एकच नाहीत. जरी ते दोन्ही सारखे दिसत असले तरी त्यांच्यापैकी एक हा खरा अंधार आहे आणि दुसरा अत्यंत तीव्र प्रकारचा प्रकाश आहे. तद्वतच अज्ञान ही सर्वांत खालची अवस्था आहे, ज्ञान ही मध्यावस्था आहे आणि या ज्ञानाहूनहि अतीत अशी एक सर्वोच्च अवस्था आहे. पण अज्ञानावस्था आणि ज्ञानातीत अवस्था या दोन्ही समान दिसतात. ज्याला आपण सामान्यत: ज्ञान म्हणतों तो एक उत्पन्न झालेला पदार्थ आहे--एक मिश्र पदार्थ आहे; ती कांही सत्य वस्तु नव्हे.

या उच्चतर समाधीच्या सतत अभ्यासाचा काय परिणाम होतो? त्यामुळे मनाची आधी जी चंचलतेकडे व जडतेकडे प्रवृत्ति होती ती तर नष्ट होईलच, पण त्याबरोबरच सत्प्रवृत्ति देखील नाहीशी होऊन जाईल. हें सोन्यांतील भेसळ व दोष नाहीसे करण्यासाठी वापरलेल्या रसायनासारखेंच आहे. अशुद्ध सोनें वितळवलें की त्यांत मिसळलेले हिणकस पदार्थ व त्याबरोबरच ती रासायनिक द्रव्यें हीं दोन्ही जळून जातात. याचप्रमाणे पूर्वोक्त समाधीच्या सतत अभ्यासाने जी संयमशक्ति प्राप्त होते तिच्यामुळे आधीच्या असत्प्रवृत्ति नष्ट होतात आणि शेवटीं सत्प्रवृत्ति देखील नाहीशा होतात. याप्रमाणे सत् व असत् अशा दोन्ही प्रकारच्या प्रवृत्तींचा निरोध झाल्यामुळे आत्मा सर्वप्रकारच्या बंधनांतून विमुक्त होऊन तो आपल्या सर्वज्ञ, सर्वव्यापी व सर्वशक्तिमान स्वरूपाने प्रकट होतो. तेव्हा मानवाला बोध होतो की तो अजरामर आहे, त्याला इहलोकाची किंवा परलोकाची कांही जरूरी नाही व तो कधीहि कुठून आला नाही किंवा कुठे गेला नाही. प्रकृतिच सर्व येणें-जाणें वा हालचाली करीत होती व ही हालचाल आत्म्यावर प्रतिबिंबित होत होती.

कांचेने परावर्तित केलेल्या प्रकाशाची आकृति भिंतीवर हलावी व भिंतीला उगीचच वाटावें की आपण हालचाल करीत आहोंत, असेंच आपणां सगळ्यांचें आहे. चित्तच निरनिराळीं रूपें धारण करून हालचाल करीत असतें आणि आपल्याला वाटतें की आपलींच हीं रूपें आहेत. असम्प्रज्ञात समाधीच्या अभ्यासाने हे सगळे भ्रम नाहीसे होतील. जेव्हा तो मुक्त आत्मा आज्ञा करील--भिकाऱ्याप्रमाणे याचना करणार नाही तर आज्ञा करील--तेव्हा त्याला जें पाहिजे असेल तें ताबडतोब मिळेल. त्याला जें कांही करावेंसें वाटेल तें त्याला करतां येईल. सांख्य तत्त्वज्ञानाला ईश्वर मान्य नाही. सांख्यांचें म्हणणें आहे की या विश्वाचा कर्ता ईश्वर असूं शकत नाही, कारण असा ईश्वर असता तर तो एक आत्मा असता व आत्मा हा एक तर बद्ध असतो किंवा तो मुक्त असतो. जो आत्मा प्रकृतीने बद्ध किंवा नियंत्रित आहे तो सृष्टि कशी उत्पन्न करूं शकेल ? तो तर स्वतःच परतंत्र आहे. याच्या उलट जर हा आत्मा मुक्त असेल तर तो कां म्हणून या जगाची रचना करील व त्याचें नियंत्रण करील? त्याला कोणतीहि इच्छा नसते, म्हणून त्याला सृष्टि उत्पन्न करण्याची वा ती चालविण्याची कांहीच आवश्यकता नाही. तसेंच, सांख्यांचें मत आहे की ईश्वरवाद हा अनावश्यक आहे, कारण प्रकृतीनेच सगळ्या गोष्टींचें स्पष्टीकरण करतां येतें मग ईश्वराची काय जरूरी ? कपिल म्हणतात की अशा अनेक व्यक्ति असतात की ज्या जवळजवळ सिद्धावस्थेपर्यंत पोहोचूनहि विभूतिलाभाची वासना त्यागूं न शकल्यामुळे योगभ्रष्ट होतात. त्यांचीं मनें कांही काळ प्रकृतीमधे लीन होऊन राहतात आणि पुन: जेव्हा त्या व्यक्ति जन्म घेतात तेव्हा प्रकृतीचे स्वामी होऊनच त्या येत असतात. जर यांनाच तुम्ही ईश्वर म्हणत असाल तर असे ईश्वर अवश्य आहेत. आपण सर्वजण कधी ना कधी असे ईश्वर होणार आहोंत. सांख्यमताप्रमाणे वेदांमधे सांगितलेला ईश्वर हा अशा मुक्त आत्म्यांपैकीच एक आहे. त्याच्या व्यतिरिक्त कोणी नित्य मुक्त व आनंदमय असा जगत्स्रष्टा नाही. याच्या उलट योग्यांचें म्हणणें आहे की, "हें बरोबर नाही; ईश्वर आहे; इतर सर्व आत्म्यांहून वेगळा, सर्व विश्वाचा शाश्वत नियन्ता, नित्यमुक्त व सर्व गुरूंचा गुरु असा ईश्वर आहे." योगदर्शनाच्या अनुयायांचें मत आहे की ज्यांना सांख्य-

दर्शन 'प्रकृतिलीन' मानतें त्यांचें देखील अस्तित्व आहे. ते म्हणतात की हे सर्व योगभ्रष्ट योगी होत व जरी कांही काळ हे मुक्ति मिळवूं शकले नाहीत तरी विश्वाच्या कांही भागांच्या शासकांच्या रूपाने हे वास करीत असतात.

**भवप्रत्ययो विदेहप्रकृतिलयानाम् ॥१९॥**

१९. सूत्रार्थः—(**ही समाधि जर परम वैराग्यासहित अनुष्ठिली गेली नसेल तर) ती देवतांच्या व प्रकृतिलीनांच्या पुनरुत्पत्तीचें कारण बनते.**

स्पष्टीकरणः—भारतीय धर्मप्रणालीनुसार 'देवता' शब्दाचा अर्थ आहे 'कांही उच्चपदांवरील व्यक्ति.' भिन्न भिन्न जीवात्मे एकामागून एक या पदांवर बसविले जातात, पण त्यांच्यापैकी कोणीहि पूर्ण नसतो.

**श्रद्धा-वीर्य-स्मृति-समाधि-प्रज्ञापूर्वक इतरेषाम् ॥२०॥**

२०. सूत्रार्थः—**इतर लोक श्रद्धा (विश्वास), वीर्य (मनाचें तेज), स्मृति, समाधि (एकाग्रता) आणि प्रज्ञा (सत्य वस्तूचा विवेक) यांच्या साहाय्यानें ही समाधिअवस्था प्राप्त करून घेतात.**

स्पष्टीकरणः—या ठिकाणीं अशा लोकांविषयी सांगितलें आहे की जे देवतापदाची किंवा एखाद्या कल्पाचा शासनकर्ता होण्याची देखील कामना करीत नाहीत. अशा लोकांनाच मुक्तिलाभ होतो.

**तीव्रसंवेगानामासन्नः ॥ २१ ॥**

२१. सूत्रार्थः—**जो फार प्रयत्नशील असतो त्याला ( या योगांत ) लवकर यश मिळतें.**

**मृदुमध्याधिमात्रत्वात् ततोऽपि विशेषः ॥२२॥**

२२. सूत्रार्थः—**साधनेंतील मंद प्रयत्न, मध्यम प्रयत्न व उत्कट प्रयत्न यांच्या अनुसार योग्यांना प्राप्त होणाऱ्या यशामध्येहि फरक पडतो.**

**ईश्वरप्रणिधानाद्वा ॥२३॥**

२३. सूत्रार्थः—**किंवा ईश्वराच्या भक्तीमुळे देखील (समाधिलाभ होतो).**

**क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः ॥२४॥**

२४. सूत्रार्थः—**दुःख, कर्म, कर्मफल व वासना यांचा उपसर्ग नसलेला विशिष्ट पुरुष म्हणजे ईश्वर (परम नियंता) होय.**

स्पष्टीकरणः—आपण फिरून हें लक्षांत घेतलें पाहिजे की पातंजलयोगाचें तत्त्वज्ञान हें सांख्य तत्त्वज्ञानावर आधारलेलें आहे. फक्त

सांख्यांत ईश्वराला स्थान नाही व योगांत ईश्वराचें अस्तित्व स्वीकारलें आहे. पण योगांत ईश्वरासंबंधी सृष्टिकर्तृत्व इत्यादि कल्पनांचा उल्लेख केलेला नाही. योगदर्शनांत ईश्वर हा सृष्टिकर्ता मानलेला नाही. वेदांच्या मतें ईश्वर हा सृष्टिकर्ता आहे. ज्याअर्थी विश्व हें सुसंबद्ध आहे त्याअर्थी तें एका इच्छाशक्तीची अभिव्यक्ति असलेंच पाहिजे.

योगदर्शनाचे पुरस्कर्ते ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करण्यासाठी एक वेगळाच मुद्दा पुढे मांडतात. ते म्हणतात--

**तत्र निरतिशयं सर्वज्ञत्वबीजम् ॥ २५ ॥**

२५. **सूत्रार्थः--जी सर्वज्ञता, इतरांमधे बीजरूपांतच असते ती ईश्वरामधे अमर्याद असते.**

स्पष्टीकरणः--मन नेहमी अति विस्तीर्ण व अति क्षुद्र या दोन टोकांच्या अवस्थांमधे फिरत असतें. तुम्ही परिमित 'देशा'ची (स्थलाची) कल्पना करूं शकतां, पण त्या कल्पनेंतूनच अपरिमित 'देशा'चेंहि तुम्हांला ज्ञान होतें. डोळे मिटून एखाद्या लहान 'देशा'ची कल्पना करा. या लहान 'देश'रूपी वर्तुळावरोबरच त्याच्या भोवताली एक असीम विस्तार असलेलें दुसरें वर्तुळ देखील प्रत्ययास येईल. असेंच 'काला'चेंहि आहे. समजा, तुम्ही एका सेकंदाची कल्पना करीत आहांत. ही कल्पना करीत असतांनाच अनंत कालाची देखील तुम्हांला कल्पना करावी लागेल. ज्ञानाच्या बाबतींतहि असेंच आहे. मानवांत ज्ञान हें केवळ बीजरूपांतच असतें. पण या स्वल्प ज्ञानाचा विचार करतांना त्याच्या-बरोबरच अनंत ज्ञानाचाहि विचार करणें भाग आहे. म्हणून आपल्या मनाच्या घडणीवरूनच स्पष्ट होतें की ज्ञान हें अनंत आहे. या अनंत ज्ञानालाच योगी 'ईश्वर' म्हणतात.

**स पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात् ॥ २६ ॥**

२६. **सूत्रार्थः--तो प्राचीन गुरूंचाहि गुरु आहे, कारण तो कालानें मर्यादित नाही.**

स्पष्टीकरणः--हें खरें आहे की सगळें ज्ञान आपल्यांतच स्थित असतें. पण तें दुसऱ्या ज्ञानाच्या द्वारें जागृत करावें लागतें. जरी जाण-ण्याची शक्ति आपल्यांतच असते तरी ती जागृत करावी लागते आणि हें जागृत करणें, योग्यांच्या मतें, दुसऱ्या ज्ञानानेंच होऊं शकतें. जड व

अचेतन पदार्थामुळे ज्ञान जागृत होऊं शकत नाही. ज्ञानाच्या शक्तीनेच ज्ञान जागृत होऊं शकतें. आपल्यांत जें ज्ञान आहे तें जागृत करण्यासाठी ज्ञानी व्यक्तींचें सान्निध्य आवश्यक आहे आणि म्हणूनच या ज्ञानी गुरूंची नेहमीच आवश्यकता असते. जग हें त्यांनी रहित असें कधीच नव्हतें आणि ज्ञान हें त्यांच्या मदतीशिवाय कधीच लाभूं शकत नाही. ईश्वर सर्व गुरूंचा गुरु आहे, कारण हे सर्व गुरु कितीहि उन्नत असले, ते देवता वा देवदूत जरी असले तरी ते सर्व कालाने बद्ध व सीमित असतात. पण ईश्वर हा कालाने मर्यादित नाही. योग्यांचे दोन विशेष सिद्धान्त आहेत. एक हा की, सान्ताचा विचार करतांच मनाला अनंताचाहि विचार करणें भाग पडतें, आणि जर या मानसिक अनुभूतीचा एक भाग सत्य असेल तर तिचा दुसरा भागहि सत्य असलाच पाहिजे, कारण एकाच मनाच्या या दोन्ही अनुभूति असल्यामुळे दोहोंचें मूल्य सारखेंच आहे. मानवाचें ज्ञान परिमित आहे ही गोष्टच ईश्वराचें ज्ञान अपरिमित आहे, अनंत आहे हें सिद्ध करतें. जर मी यांपैकी एक गोष्ट मान्य करीन तर मला दुसरीहि मान्य करावयास हवी. दोन्ही गोष्टी मान्य करण्यास किंवा दोन्ही सोडण्यास तर्क मला भाग पाडतो. मला जर असें वाटतें की माणूस हा अल्पज्ञ आहे तर मला असें मानावयासच पाहिजे की या माणसाच्या पश्चातीं अनंत ज्ञानसंपन्न असा कुणी एक पुरुष आहे. योग्यांचा दुसरा सिद्धान्त हा की कोणतेंहि ज्ञान गुरूशिवाय प्राप्त होऊं शकत नाही. आधुनिक तत्त्वज्ञांच्या म्हणण्याप्रमाणे ही गोष्ट खरी आहे की माणसाचें ज्ञान त्याच्या आंतूनच विकसित होतें. सर्व ज्ञान माणसामधेंच आहे, पण त्याच्या विकासासाठी विशिष्ट परिस्थिति अपेक्षित असते. गुरूशिवाय आपल्याला ज्ञान मिळूं शकत नाही. जरी मानव, देवता वा देवदूत कोणीहि आपले गुरु असले तरी ते सगळे सीमाबद्ध आहेत. मग त्यांच्याहि आधी त्यांचे गुरु कोण होते ? यासाठी अंतिम सिद्धान्त म्हणून कालाने मर्यादित नसलेला असा एक गुरु मानणें आपल्याला भाग आहे आणि त्या अनंतज्ञानसंपन्न आणि अनादि व अनंत गुरूलाच 'ईश्वर' म्हणतात.

**तस्य वाचकः प्रणवः ॥२७॥**

**२७. सूत्रार्थः—त्याचें स्वरूप व्यक्त करणारा शब्द आहे ॐ.**

स्पष्टीकरण:—तुमच्या मनांत येणाऱ्या कोणत्याहि विचाराचा प्रतिरूप असा एक शब्द असतोच. शब्द व विचार हे अविभाज्य आहेत. एकाच वस्तूच्या बाह्य भागाला 'शब्द' व अंतर्भागाला 'विचार' वा 'भाव' म्हणतात. कोणीहि विश्लेषणाने भाव व शब्द यांना वेगळें करूं शकणार नाही. कांही लोकांनी एकत्र बसून कोणत्या भावासाठी कोणता शब्द वापरला पाहिजे याचा विचार करून भाषा बनविली आहे ही कल्पना आता खोटी ठरली आहे. जेव्हापासून माणूस अस्तित्वांत आहे तेव्हापासून शब्द व भाषा हीं देखील अस्तित्वांत आहेत. भाव आणि शब्द यांचा संबंध काय आहे? जरी भावाबरोबर शब्द हा असलाच पाहिजे असें आपण पाहतों तरी एखादा भाव व्यक्त करण्यासाठी एकच शब्द असला पाहिजे असें नाही. वेगवेगळ्या देशांत, भाव एकच असूनहि तो व्यक्तविणारे शब्द वेगवेगळे असतात. प्रत्येक भाव व्यक्तविण्यासाठी शब्द पाहिजे, पण हे शब्द सारख्याच उच्चाराचे असण्याची जरूरी नाही. निरनिराळ्या देशांत भिन्न भिन्न उच्चाराचे शब्द असतील. म्हणूनच भाष्यकार म्हणतात, "जरी भाव व शब्द यांचा परस्पर संबंध स्वाभाविक आहे तरी एखादा विशिष्ट शब्द आणि एखादा भाव यांच्यामधे अगदी अविच्छेद्य असा संबंध राहिलाच पाहिजे असें नाही." जरी हे शब्द भिन्न भिन्न असतात तरी शब्द आणि भाव यांमधील संबंध स्वाभाविक असतो. जर वाच्य आणि वाचक यांच्यामधे यथार्थ संबंध असेल तरच भाव आणि शब्द यांच्यांत परस्पर संबंध आहे असें म्हणतां येईल, एरवी त्या वाचक शब्दाचा सर्वजण कधीच प्रयोग करूं शकणार नाहीत. वाचकशब्द हा वाच्यवस्तूचा प्रकाशक असतो. जर ती वाच्यवस्तु आधीपासूनच अस्तित्वांत असेल आणि वारंवार आलेल्या अनुभवाने आपल्याला ठाऊक झालें असेल की त्या वाचकशब्दाच्या द्वारें ती वाच्यवस्तु अनेक वेळां अभिव्यक्त झाली आहे, तर या दोघांमधे यथार्थ संबंध आहे असें आपल्याला निश्चितपणें मानतां येईल. जरी या वाच्यवस्तु समोर नसतील तरी हजारो लोकांना वाचकशब्दांद्वारें त्यांचें ज्ञान होईल. वाच्य आणि वाचक यांच्यामधे स्वाभाविक संबंध असणें अत्यावश्यक आहे, तो संबंध असला की वाचक शब्दाचें उच्चारण करतांच त्याच्यामुळे वाच्यवस्तूची आठवण होईल. सूत्रकार म्हणतात की ओंकार हाच ईश्वराचा वाचक शब्द

आहे. ह्या शब्दावर ते कां भर देतात ? ईश्वरवाचक असे इतर शेकडो शब्द आहेत. एक विचार हजारो शब्दांशीं संबंधित असतो. 'ईश्वर' हा भाव शेकडो शब्दांशीं संबंधित आहे व यांपैकी प्रत्येक शब्द ईश्वराचा वाचक आहे. मग त्यांनी 'ॐ'लाच कां निवडलें ? शेकडो शब्द ईश्वर-वाचक असले तरी या सर्व शब्दांमधून एक सर्वसामान्य शब्द निवडला पाहिजे. या सर्व वाचक शब्दांचा एक सर्वसामान्य आधार शोधून काढला पाहिजे. जो वाचक शब्द सर्वांचा सामान्य वाचक होईल तोच सर्वश्रेष्ठ ठरेल व सर्वांचा प्रतिनिधिहि ठरेल. कोणत्याहि शब्दाचें उच्चारण करण्यासाठी आपण कंठनलिका आणि टाळू यांचा, उच्चार-णाचा आधार म्हणून उपयोग करीत असतों. इतर सर्व शब्द ज्याची स्वाभाविक अभिव्यक्ति होत असा एखादा भौतिक शब्द आहे काय ? होय 'ओम्' (अउम्) हाच तो शब्द आहे. तोच साऱ्या शब्दांचा आधार आहे. त्याचें पहिलें अक्षर 'अ' सर्व शब्दांचें मूळ आहे. या मूलभूत अक्षराचें उच्चारण जिभेच्या किंवा टाळूच्या कोणत्याहि भागाला स्पर्श न करतां होतें. 'म्' हें त्यांतील सर्वांत अंतिम अक्षर वा ध्वनि आहे, त्याचें उच्चारण करतांना दोन्ही ओठ बंद करावे लागतात. आणि 'उ' हा ध्वनि तोंडांतल्या स्वरयंत्राच्या एका टोकापासून तों दुसऱ्या टोकापर्यंत वेटोळे घेत जातो. याप्रमाणे, 'ओम्' हा शब्द शब्दोच्चारा-च्या संपूर्ण प्रक्रियेचें प्रतिनिधित्व करतो. म्हणून तोच स्वाभाविक वाचक शब्द आहे, तोच सर्व शब्दांची जणुकांही जननी आहे. तोच सर्व संभाव्य व उच्चार्य शब्दांचा निदर्शक आहे. हें सर्व विवरण बाजूला ठेवलें तरी या ॐकारांत भारतांतील निरनिराळे धर्मभाव केंद्रित झालेले आहेत असें आपल्याला दिसून येतें. वेदांतील सारे धर्मभाव या शब्दा-भोवतीच एकत्रित झाले आहेत. पण या गोष्टीचा अमेरिका, इंग्लंड किंवा इतर कोणत्याहि देशाशीं काय संबंध आहे ? याचें उत्तर हेंच की सर्व देशांमधे या ओंकाराचा उपयोग होऊं शकतो. कारण, भारतांतील धार्मिक विकासाच्या प्रत्येक अवस्थेंत हा शब्द वापरला जात होता व ईश्वरासंबंधीचे विभिन्न भाव व्यक्तविण्यासाठी हा शब्द उपयोगांत आणला जात होता. अद्वैती, द्वैती, द्वैताद्वैती, भेदाभेदवादी या सगळ्यांनी, एवढेंच नव्हे तर निरीश्वरवाद्यांनी देखील हा शब्द वापरला आहे.

अधिकांश मानवसमाजाच्या धार्मिक स्पृहेचा 'ओम्' हा शब्द प्रतीक बनलेला आहे. म्हणून इतर सर्व देश देखील त्याचें अवलंबन करूं शकतील. इंग्रजींत 'गॉड' (God—ईश्वर) हा शब्द घ्या. त्याच्या द्वारें जो भाव प्रकट होतो तो फार मर्यादित स्वरूपाचा आहे. त्याच्या व्यतिरिक्त अन्य एखादा भाव प्रकट करावयाचा असल्यास या शब्दाला' विशेषणें जोडावीं लागतात—जशीं Personal (सगुण), Impersonal (निर्गुण), Absolute (केवल) वगैरे वगैरे. हीच गोष्ट इतर भाषेंतील ईश्वर-बोधक शब्दांची आहे, कारण त्यांच्या ठिकाणीं मर्यादित भावच प्रकट करण्याची शक्ति आहे. पण ह्या 'ॐ' शब्दांत मात्र हे सर्व प्रकारचे भाव विद्यमान आहेत. म्हणून सर्वांनी हा शब्द ग्रहण केला पाहिजे.

**तज्जपस्तदर्थभावनम् ॥ २८ ॥**

२८. **सूत्रार्थः—याचा (या ओंकाराचा) जप व याच्या अर्थाचें मनन (हाच समाधिलाभाचा उपाय आहे).**

स्पष्टीकरणः—जप वा पुनरावृत्ति कशासाठी करावयाची? संस्कारांसंबंधी जो सिद्धान्त मीं आपल्यासमोर मांडला तो आपण विसरला नसाल. अनुभवांचा एकवटलेला ठसा मनांत कायम राहतो. हे संस्कार अधिकाधिक सूक्ष्म होऊन अव्यक्त झाले तरी मनांत शिल्लक राहतात व योग्य उद्दीपक कारण समोर आल्याबरोबर ते मनाच्या पृष्ठभागावर प्रकट होतात. परमाणूंमधील स्पंदन हें कधीच नाहीसें होत नाही. जेव्हा हें विश्व नष्ट होतें तेव्हा त्यांतील सर्व मोठमोठीं स्पंदनें नाहीशीं होतात; सूर्य, चंद्र, तारे, पृथ्वी हीं सर्व विरून जातात, पण हीं स्पंदनें परमाणूंमधे शिल्लक राहतात. मोठमोठीं ब्रह्माण्डें जें कार्य करतात तेंच कार्य प्रत्येक परमाणु करीत असतो. चित्ताचेंहि असेंच आहे. जेव्हा चित्तांतील स्पंदनें विरून जातात तेव्हा परमाणूंतील स्पंदनांप्रमाणे चित्तांतील सूक्ष्म स्पंदनें चालत असतात, आणि त्यांना जेव्हा प्रेरणा मिळते तेव्हा तीं प्रकट होतात. आता आपण जपाचा अर्थ समजूं शकूं. आध्यात्मिक संस्कारांना बलशाली करण्याचा हा एकमेव मार्ग आहे. 'सत्संगाचा एक क्षणहि हा भवसागर तरून जाण्यासाठी साहाय्यक होणाऱ्या नौकेप्रमाणे आहे.' सत्संगाचें असें सामर्थ्य आहे. बाह्य सत्संगाची जशी शक्ति आहे तशीच आंतील सत्संगाची देखील

आहे. या ओंकाराचा वारंवार जप करणें व त्याच्या अर्थाचें मनन करणें हा आंतील सत्संग आहे. जप करा आणि त्याबरोबरच त्यांतील शब्दांच्या अर्थाचें मनन करा. असें केल्याने हृदयांत ज्ञान प्रकट होईल आणि आत्मसाक्षात्कार घडेल.

ॐ शब्दाबरोबरच त्याच्या अर्थाचेंहि मनन केलें पाहिजे. कुसंगति सोडा, कारण जुन्या व्रणांचीं चिन्हें अजून तुमच्यांत आहेत आणि कुसंगति घडतांच हे व्रण पुनः प्रकट होतील. त्याचप्रमाणे सत्संगतीमुळे आपल्यांतील अव्यक्त सत्संस्कार प्रकट होतील. जगांत सत्संगतीपेक्षा पवित्र असें कांही नाही, कारण त्यामुळे सत्संस्कार प्रकट होऊं लागतात.

**ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तरायाभावश्च ॥ २९ ॥**

२९. **सूत्रार्थः—त्यापासून अन्तर्दृष्टि प्राप्त होते व ( योगांतील ) सर्व अडथळे दूर होतात.**

स्पष्टीकरणः—'ओम्'च्या जपाचा व मननाचा पहिला मूर्त परिणाम हा होईल की अंतर्दृष्टि क्रमशः अधिकाधिक विकसित होऊं लागेल आणि योगांतील सर्व मानसिक व शारीरिक अडथळे दूर होऊं लागतील. योगांतील हे अडथळे कोणते ?

**व्याधि-स्त्यान-संशय-प्रमादालस्याविरति-भ्रान्तिदर्शनालब्ध-भूमिकत्वानवस्थितत्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तरायः ॥ ३० ॥**

३०. **सूत्रार्थः—रोग, मानसिक जडता, संशय, निरुत्साह, आलस्य, भोगासक्ति, भ्रम, एकाग्रता न साधणें व प्राप्त केलेल्या अवस्थेपासून च्युत होणें हीं अडथळा आणणारीं विघ्नें आहेत.**

स्पष्टीकरणः—रोगः—जीवनसमुद्राच्या पैलतीरावर जाण्यासाठी आपलें हें शरीर म्हणजे जणु एक नौका आहे. या शरीराची विशेष काळजी घेतली पाहिजे. रोगी व्यक्ति योगी होऊं शकत नाही. मानसिक जडता असल्यास योगाविषयी उत्कट आवड वाटणार नाही आणि आवडीशिवाय अभ्यासासाठी आवश्यक इच्छा व शक्ति (उत्साह) प्राप्त होणार नाहीत. मग या शास्त्राच्या सत्यतेबद्दल संशय वाटूं लागेल. या शास्त्रावरील आपला तर्काधिष्ठित विश्वास कितीहि दृढ असला तरी जोंपर्यंत दूरच्या गोष्टी पाहणें व ऐकणें यांसारखे असामान्य अनुभव प्राप्त होत नाहीत तोंपर्यंत वरील संदेह जाणार नाही. या अनुभूति

मनाला दृढ करतात व साधकांत चिकाटी उत्पन्न करतात. प्राप्त झालेल्या स्थितीपासून च्युत होणें हा देखील एक अडथळा आहे. अभ्यास करीत असतांना कांही दिवस किंवा कांही आठवडे मन हें शांत व अनायासें एकाग्र होईल आणि तुम्हांला आपली प्रगति जोराने होत आहेसें वाटेल. पण अकस्मात् एक दिवस ही प्रगति खुंटेल आणि तुम्हांला असें वाटूं लागेल की तुम्ही (कुठेतरी) अडकून पडलां आहांत. परंतु त्या वेळीं हताश होऊं नका, आपला प्रयत्न सोडूं नका. सर्वप्रकारची प्रगति अशा उत्कर्षापकर्षांतूनच होत असते.

**दु:खदौर्मनस्याङ्गमेजयत्व-श्वासप्रश्वासा विक्षेपसहभुवः ।। ३१ ।।**

**३१. सूत्रार्थ:--दुःख, मानसिक कष्ट, शरीरकंप व अनियमित श्वासोच्छ्वास या साऱ्या गोष्टी, एकाग्रता स्थिर न झाल्यास होऊं लागतात.**

स्पष्टीकरण:--एकाग्रतेचा जेव्हा जेव्हा अभ्यास केला जातो तेव्हा तेव्हा मन व शरीर या दोघांना पूर्ण स्थिरता प्राप्त होते. पण हा अभ्यास अनियंत्रित असला किंवा भलत्याच दिशेने होत असला तर हे सर्व अडथळे उत्पन्न होतात. ओंकाराचा जप केल्याने व ईश्वराला आत्मसमर्पण केल्याने मनाला बळ येतें व उत्साह वाटतो. साधनामार्गांत मज्जातंतूंचा कंप प्राय: सर्वांच्याच अनुभवास येतो पण तिकडे लक्ष न देतां अभ्यास चालू ठेवा. अभ्यासाने तो नाहीसा होईल आणि मग आसन स्थिर होईल.

**तत्प्रतिषेधार्थमेकतत्त्वाभ्यासः ।।३२।।**

**३२. सूत्रार्थ:--हे अडथळे दूर व्हावेत म्हणून एकाच तत्त्वाचा सतत अभ्यास केला पाहिजे.**

स्पष्टीकरण:--मनाला कांही वेळ एकाच वस्तूशीं तदाकार व्हायला लावल्यास या अडचणींचें निरसन होईल. हा उपदेश अत्यंत सामान्य रूपांत सांगितला आहे. खालील सूत्रांत त्याचें विशेष स्पष्टीकरण केलें जाईल. एकच पद्धत सर्वांना सोयीची होऊं शकत नसल्यामुळे अनेक पद्धति पुढे सांगितल्या जातील व प्रत्येक व्यक्ति अनुभवाने स्वत:ला कोणती पद्धत उपयुक्त आहे हें ठरवील.

**मैत्रीकरुणामुदितोपेक्षाणां सुखदुःखपुण्यापुण्यविषयाणां भावनातश्चित्तप्रसादनम् ।।३३।।**

**३३. सूत्रार्थः—मैत्री, दया, आनंद व उपेक्षा या भावना अनुक्रमें सुख, दुःख, पुण्य व पाप या गोष्टींच्या बाबतींत मनांत बाळगिल्यास चित्त प्रसन्न होतें.**

स्पष्टीकरणः—हे वरील चार प्रकारचे भाव आपण मनांत वागविले पाहिजेत. सर्वांविषयी आपण मैत्रीचा भाव ठेवला पाहिजे. दुःखितांबद्दल दयाभाव ठेवला पाहिजे. जेव्हा इतर लोक आनंदांत असतील तेव्हा आपणहि आनंदित व्हायला पाहिजे आणि दुष्टांची आपण उपेक्षा केली पाहिजे. याचप्रमाणे समोर येणाऱ्या सर्व गोष्टींविषयी आपण वागलें पाहिजे. जर एखादी सुखकारक गोष्ट असेल तर तिच्याविषयी आपल्याला मैत्री वाटावयास हवी. तसेंच दुःख बघून आपल्याला करुणा वाटावयास हवी; शुभ बघून आपण आनंदित व्हावें आणि अशुभाची उपेक्षा करावी. मनापुढे येणाऱ्या निरनिराळ्या विषयांसंबंधीच्या या दृष्टींमुळे मन शांत होतें. मनाचें अशा तऱ्हेने नियंत्रण करूं न शकल्यामुळेच आपल्या दैनंदिन जीवनांतील अशांति व बहुतेक अडचणी उद्भवत असतात. उदाहरणार्थ—जर एखाद्या माणसाने आपलें कांही वाईट केलें तर आपण तात्काळ त्याचा प्रतिकार करण्यास तयार होतों. या वाईट प्रतिक्रियेवरून दिसून येतें की आपण चित्ताचें नियंत्रण करण्यास असमर्थ आहोंत. चित्त हें (अशा परिस्थितींत) तरंगांच्या रूपाने विषयाकडे झेप घेतें आणि आपण संयम घालवून बसतों. द्वेषरूप कोणतीहि प्रतिक्रिया केल्याने मनाचें नुकसानच होतें. आणि प्रत्येक असद्विचार, द्वेषमूलक आचरण किंवा तशा आचरणाची इच्छा जर नियंत्रित करतां आली तर त्यामुळे आपला फायदाच होणार आहे. अशा तऱ्हेने स्वतःला आवरल्याने आपली कांहीच क्षति होत नाही, उलट त्यामुळे आपला कल्पनातीत लाभच होत असतो. प्रत्येक वेळीं द्वेषाची किंवा क्रोधाची वृत्ति संयत केल्याने तितक्याच प्रमाणांत कल्याणकारी शक्ति आपल्या ठायीं साठविली जाते. ही शक्ति उच्चतर शक्तींच्या रूपांत परिणत होत असते.

**प्रच्छर्दनविधारणाभ्यां वा प्राणस्य ॥३४॥**

**३४. सूत्रार्थः—प्राणवायु बाहेर सोडून किंवा आंत रोधून ( चित्त शांत होतें ).**

स्पष्टीकरणः—येथे 'प्राण' हा शब्द वापरला आहे. प्राण म्हणजे

केवळ श्वास नव्हे. विश्वांत व्याप्त असलेल्या शक्तीचें नांव 'प्राण' आहे. जें कांही जगांत आपण पाहतों, जें कांही हालचाल किंवा कांही कार्य करतें व ज्यांत जीव आहे तें सर्व प्राणाची अभिव्यक्ति आहे. विश्वांत व्यक्त होणाऱ्या सर्व शक्तींची समष्टि म्हणजेच प्राण. कल्पाचा प्रारंभ होण्यापूर्वी हा प्राण निश्चल अवस्थेंत असतो आणि जेव्हा कल्पाची सुरुवात होते तेव्हा हा प्राण प्रकट होऊं लागतो. प्राणच गतीच्या रूपाने —प्राणी व माणसें यांच्या स्नायविक गतीच्या रूपाने अभिव्यक्त होतो; आणि हा प्राणच विचारादि शक्तींच्या रूपानेहि अभिव्यक्त होत असतो. संपूर्ण विश्व हें प्राण व आकाश यांचा संयोग आहे. तसेंच मानवी शरीरहि प्राण व आकाश यांचा संयोग आहे. आकाशापासूनच दृश्य व स्पृश्य पदार्थ उत्पन्न होतात व प्राणापासून विभिन्न प्रकारच्या सर्व शक्ति उद्भवतात. ह्या प्राणाला बाहेर सोडणें व आंत रोधणें या प्रक्रियेलाच प्राणायाम असें म्हणतात. योगदर्शनाचे जनक पतंजलि यांनी प्राणायामाचे विशेष प्रकार सांगितलेले नाहीत, पण त्यांच्यानंतरच्या योग्यांनी या प्राणायामासंबंधी बरेंच ज्ञान मिळविलें व त्याचें एक मोठें शास्त्र तयार केलें. पतंजलींच्या दृष्टीने प्राणायाम हा चित्तवृत्तिनिरोधाच्या अनेक उपायांपैकी एक उपाय आहे, पण ते त्याच्यावर फारसा भर देत नाहीत. त्यांचें असें म्हणणें आहे की तुम्ही कांही वेळ श्वास बाहेर सोडा, मग आंत ओढा आणि थोडा वेळ त्याला कोंडून ठेवा, बस्, येवढयानेच मन थोडें शांत होईल. पण तुम्हांला असें दिसून येईल की यांतूनच नंतर 'प्राणायाम' नांवाचें एक विशिष्ट शास्त्र विकसित झालें. यानंतरच्या योग्यांचें काय म्हणणें आहे हें आपण आता पाहूं.

यासंबंधी थोडें विवेचन मीं पूर्वी केलेंच होतें पण त्याची किंचित् उजळणी केल्यास तें मनांत पक्कें ठसेल. प्रथम आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे की प्राण म्हणजे श्वास-प्रश्वास नसून तो त्यांच्या गतीचें कारण व त्यांतील शक्ति आहे. तसेंच 'प्राण' हा शब्द सर्व इंद्रियांसाठी वापरला जातो. त्यांना व मनालाहि 'प्राण' म्हणतात. यावरून प्राण ही शक्ति आहे हें दिसून येतें. तरी पण प्राणाला शक्ति म्हणतां येत नाही, कारण शक्ति ही त्याची अभिव्यक्ति आहे. प्राण हें शक्तीच्या व सर्व वस्तूंच्या गतीच्या रूपाने अभिव्यक्त होणारें तत्त्व आहे. चित्त हें साधन-

रूप होऊन चोहोकडून तें प्राणाला आंतमध्ये ओढून घेतें आणि त्यापासून शरीराला सुस्थितींत ठेवणाऱ्या विचार, इच्छा व इतर सर्व जीवन-शक्ति निर्माण करतें. वर सांगितलेल्या प्राणायामाच्या प्रक्रियेने शरी-राच्या सर्व हालचाली व शरीरांतील ज्ञानतंतूंमधील सर्व शक्तिप्रवाह नियंत्रित करतां येतात. प्रथम आपण या शक्तिप्रवाहांचें अस्तित्व ओळखूं लागतों व नंतर क्रमाने त्यांचें नियंत्रण करूं लागतों.

पतंजलीनंतर झालेल्या योग्यांच्या मतें मानवी शरीरांत प्राणाचे तीन मुख्य प्रवाह आहेत. एकाला 'इडा', दुसऱ्याला 'पिंगला' व तिस-ऱ्याला 'सुषुम्ना' म्हणतात. त्यांच्या मतें मेरुदंडाच्या (पाठीच्या कण्याच्या) उजव्या बाजूला 'पिंगला' आणि डाव्या बाजूला 'इडा' आहे, आणि मेरुदंडाच्या मध्यांतून जाणारा 'सुषुम्ना' नामक एक पोकळ मार्ग आहे. त्यांच्या मतें प्रत्येक माणसांत इडा व पिंगला यांचे प्रवाह वाहत असतात व या प्रवाहांच्या द्वारें जीवनोपयुक्त सर्व कामें आपण करीत असतों. सुषुम्ना ही शक्तीच्या रूपाने सर्व माणसांत वसत असते, पण योग्यांमधेच ती कार्यक्षम होते. हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे की योगाने शरीर बदलून जातें. जसजसा तुमचा अभ्यास वाढतो तसतसा तुमच्या शरीरांत फरक पडत जातो. अभ्यासानंतरचें शरीर हें अभ्यासापूर्वीचें शरीर राहत नाही. हें सयुक्तिक आहे व त्याचें कारणहि सांगणें शक्य आहे. प्रत्येक नवा विचार स्वतःसाठी मेंदूंत सदा जणु एक नवा मार्ग तयार करतो. हेंच मानवी स्वभावाच्या अपरिवर्तन-शीलतेचें वा रूढिप्रियतेचें कारण आहे. मानवी स्वभावाला रुळलेल्या मार्गानें जाणें आवडतें, कारण तें सोपें असतें. उदाहरणादाखल आपण जर अशी कल्पना केली की मन हें सुईसारखें आहे व मेंदू हा त्याच्या समोर असलेला एक मऊ गोळा आहे, तर मनांत येणारा प्रत्येक विचार हा मेंदूच्या या गोळ्यांत स्वतःसाठी जणुकांही एक वाट कोरीत असतो. जर मेंदूंतील धूसर रंगाच्या एका विशिष्ट पदार्थाच्या द्वारें ही वाट व्यवस्थित राखली गेली नाही तर ती बंद होऊन जाईल. जर हा धूसर रंगाचा पदार्थ नसेल तर स्मृतिच शक्य होणार नाही. कारण स्मृति म्हणजे या जुन्या रुळलेल्या वाटांवरून जाणें किंवा पूर्वीचेच विचार गिरविणें. कदाचित् आपल्या लक्षांत आलें असेल की जेव्हा मी

सर्व लोकांना परिचित असणाऱ्या विषयांवर बोलतों व तेच विषय विभिन्न तऱ्हेने आपणांसमोर मांडतों तेव्हा ते आपणांस सहज समजतात. याचें कारण हेंच की विचारांच्या रेघा वा मार्ग प्रत्येकाच्या मेंदूत असतात, फक्त त्यांच्यावरून पुन: जाण्यायेण्याचीच काय ती गरज असते. पण जेव्हा जेव्हा बोलण्यांत नवे विषय येतात तेव्हा मेंदूत नवे मार्ग निर्माण करावे लागतात, म्हणून हे विचार अनायासें लक्षांत येत नाहीत; आणि म्हणूनच मेंदू (माणूस नव्हे, मेंदूच) नव्या विचारांनी प्रभावित होण्याचें न कळत नाकारतो. तो जणु या विचारांना विरोध करीत असतो. प्राण हा नवे मार्ग बनवण्यासाठी झटत असतो व मेंदू त्याला विरोध करतो, हेंच रूढिप्रियतेचें गुपित आहे. मेंदूंत जितके कमी मार्ग असतील, आणि प्राणाच्या सुईने हे मार्ग जितके कमी कोरलेले असतील तितकाच मेंदू रूढिप्रिय बनेल व नव्या विचारांना विरोध करील. माणूस जितका जास्त विचारशील असतो तितकेच त्याच्या मेंदूतील मार्ग हे गुंतागुंतीचे असतात आणि तितके त्याला नवीन विचार आकळणें व स्वीकारणें सोपें जातें. म्हणून प्रत्येक नव्या विचाराबरोबर आपण मेंदूंत एक नवा ठसा उमटवतों व त्यांत नवे मार्ग कोरतों. आणि म्हणूनच योगाभ्यासांत (हा अभ्यास म्हणजे अगदी नवीन प्रकारचे विचार व प्रेरणा असल्यामुळे) सुरवातीला शारीरिक प्रतिरोध होत असतो. म्हणूनच धर्माची जी बाह्य प्रकृतिविषयक बाजू आहे तिचा सर्वजण स्वीकार करतात, पण तत्त्वज्ञानात्मक किंवा मानसशास्त्रात्मक जी दुसरी बाजू आहे--जिच्यांत मानवाच्या अंत:प्रकृतीचें विवेचन असतें--ती साधारणत: लोकांकडून ग्रहण केली जात नाही.

या आपल्या जगताचें स्वरूप आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. हें विश्व म्हणजे ज्ञानाच्या पातळीवर व्यक्त झालेली अनंत सत्ताच आहे. अनंताचा एक अंश, जो आपल्या ज्ञानांत व्यक्त झाला आहे, त्यालाच आपण विश्व असें म्हणतों. म्हणून या विश्वापलीकडे एक अनंत सत्ता आहे. हा विश्व नांवाचा एक क्षुद्र पिंड व त्यापलीकडील अनंत सत्ता या दोघांचाहि विचार धर्माला करावा लागतो. कोणताहि धर्म जर या दोहोंपैकी फक्त एकाचाच विचार करील तर तो अपूर्ण ठरेल. धर्माला या दोघांचाहि विचार केला पाहिजे. अनंताचा जो अंश आपल्या

ज्ञानाच्या पातळीवर व्यक्त झाला आहे आणि जो देश-काल-निमित्तांनी मर्यादित झाला आहे त्याचा विचार करणारी धर्माची जी बाजू आहे ती आपल्या परिचयाचीच आहे, कारण आपण सुरवातीपासून त्या विश्वांतच आहोंत व त्यासंबंधीच्या भाव-भावनांशीं अनंत काळापासून आपण परिचित आहोंत. पण यापलीकडच्या अनंताचा विचार करणारी धर्माची दुसरी बाजू आपल्याला अगदी नवी वाटते. म्हणून त्यासंबंधीचे विचार मेंदूंत नवे मार्ग कोरतात. त्यामुळे सर्व शरीरांत अनेक फेरफार घडून येतात आणि म्हणूनच सुरवातीला योगाभ्यासांत सामान्य माणसें आपल्या नेहमीच्या रुळलेल्या मार्गापासून कशीं ढळल्यासारखीं वाटतात. हीं विघ्नें शक्य तितकीं कमी करण्यासाठी पतंजलींनी अनेक उपाय शोधून काढले आहेत. त्यांपैकी आपल्या जास्तींत जास्त सोयीचा कोणताहि उपाय आपण स्वीकारूं शकतों.

**विषयवती वा प्रवृत्तिरुत्पन्ना मनसः स्थितिनिबन्धिनी ॥३५॥**

३५. **सूत्रार्थः--ज्या सर्व समाधि-अवस्थांत इंद्रियविषयांचे अलौकिक अनुभव येतात त्या अवस्था मनाच्या चिकाटीस कारणीभूत होतात.**

स्पष्टीकरणः--हें आपोआप धारणेने किंवा एकाग्रतेने येतें. योगी म्हणतात की नासाग्रावर मन एकाग्र झालें की कांही दिवसांनंतर आश्चर्यकारक सुवास अनुभवास येतो. जर जिभेच्या मुळाशीं मन एकाग्र झालें तर तऱ्हतऱ्हेचे मधुर शब्द ऐकूं येऊं लागतात. जिभेच्या टोकावर मन एकाग्र झाल्यास आश्चर्यकारक स्वाद अनुभवास येतात. जिभेच्या मध्यभागावर मन एकाग्र झाल्यास कशाचा तरी स्पर्श झाल्यासारखी प्रतीति येते. टाळूवर मन एकाग्र झाल्यास दिव्य रूपें दिसूं लागतात. ज्या माणसाचें मन अस्थिर आहे आणि योगाचा अभ्यास केल्यानंतरहि ज्याला त्याची सत्यता पटत नाही, त्याने कांही दिवस अभ्यास चालूं ठेवल्यास हे सर्व अनुभव त्याला साध्य होतात आणि मग त्याचे संदेह दूर होऊन साधनेंत चिकाटी येते.

**विशोका वा ज्योतिष्मती ॥३६॥**

३६. **सूत्रार्थः—किंवा दुःखरहित असलेल्या उज्ज्वल प्रकाशमान वस्तूवर ध्यान केल्याने देखील समाधि प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—समाधीचा हा आणखी एक प्रकार आहेः—हृदयांत जणु एक कमल आहे असें ध्यान करा. त्याच्या पाकळ्या अधोमुख

असून त्यांतून सुषुम्ना गेली आहे असें ध्यान करा. नंतर श्वास आंत ओढा आणि मग तो बाहेर सोडतांना कल्पना करा की तें कमल पाकळयांसहित ऊर्ध्वमुख झालें आहे आणि त्या कमलांत एक महाज्योति विद्यमान आहे. त्या ज्योतीचें ध्यान करा.

**वीतरागविषयं वा चित्तम् ॥३७॥**

३७. सूत्रार्थः—**किंवा सर्व इंद्रियविषयांसंबंधीची आसक्ति ज्या हृदयांतून निघून गेली आहे त्या हृदयाचें ध्यान केल्याने चित्त स्थिर होतें.**

स्पष्टीकरणः—ज्यावर तुमची श्रद्धा असेल, किंवा जो तुम्हांला पूर्ण अनासक्त वाटत असेल असा एखादा महापुरुष घ्या आणि त्याच्या हृदयाचें चिंतन करा. त्याचें अंतःकरण पूर्ण अनासक्त असतें आणि म्हणून त्या अंतःकरणाचें चिंतन केल्याने तुमचेंहि अंतःकरण शांत होईल. हें जर तुम्ही करूं शकत नसाल तर दुसराहि उपाय आहे.

**स्वप्ननिद्राज्ञानालम्बनं वा ॥३८॥**

३८. सूत्रार्थ—**किंवा स्वप्नावस्थेंत कधीकधी जो अपूर्व ज्ञानलाभ होतो त्याचें आणि सुषुप्ति-अवस्थेंत जें सात्त्विक सुख प्राप्त होतें त्याचें ध्यान केल्याने देखील चित्त शांत होतें.**

स्पष्टीकरणः—केव्हा केव्हा माणसाला असें स्वप्न पडतें की त्याच्या जवळ देवता येऊन त्या त्याच्याशीं बोलत आहेत, तो स्वतः एकप्रकारच्या भावावेशांत मग्न झाला आहे व वाऱ्यावर वाहत येणाऱ्या गोड स्वरलहरी त्याला ऐकूं येत आहेत. त्या स्वप्नांत त्याला अत्यंत आनंद होतो आणि जेव्हा तो जागा होतो तेव्हा त्याच्या मनावर त्या स्वप्नाचा खोल परिणाम झालेला असतो. हें असें स्वप्न सत्य समजून त्याचें ध्यान करा. हेंहि जर तुम्ही करूं शकत नसाल तर कोणत्याहि आवडत्या पवित्र वस्तूचें ध्यान करा.

**यथाभिमतध्यानाद्वा ॥३९॥**

३९. सूत्रार्थः—**किंवा स्वतःला जें कांही चांगलें वाटेल त्याचें ध्यान केल्यानेहि समाधि प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—याचा अर्थ 'वाईट वस्तु' नाही, तर तुमच्या आवडीची कोणतीहि चांगली वस्तु—उदाहरणार्थ तुम्हांला फार आवडणारी एखादी जागा, दृश्य किंवा विचार. जें कांही तुमच्या मनाची तंद्री लावूं शकतें, त्याचें चिंतन करा.

**परमाणुपरममहत्त्वान्तोऽस्य वशीकारः ॥४०॥**

४०. **सूत्रार्थः—अशा तऱ्हेने ध्यान करूं शकणाऱ्या योग्याच्या मनाच्या गतीला परमाणूपासून तों अनंतापर्यंत कोणत्याहि वस्तूचा अडथळा होत नाही.**

स्पष्टीकरणः—या अभ्यासाने मन लहानांत लहान व मोठ्यांत मोठ्या वस्तूंचें सहज मनन करूं शकतें. अशाने मनांतील वृत्तितरंग हळूहळू क्षीण होतात.

**क्षीणवृत्तेरभिजातस्येव मणेर्ग्रहीतृग्रहणग्राह्येषु तत्स्थतदञ्जनता-समापत्तिः ॥ ४१ ॥**

४१. **सूत्रार्थः—ज्या योग्याच्या वृत्ति अशा तऱ्हेने क्षीण वा संयत झाल्या आहेत त्याला त्या वेळीं ग्रहीता (आत्मा), ग्रहण (मन) आणि ग्राह्य (बाह्य वस्तु) यांच्या बाबतींत अनेकरंगी वस्तूंच्या समोर ठेवलेल्या स्फटिकाप्रमाणे एकाग्रता व एकरूपता प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—या सतत ध्यानाने काय होतें ? आपणांस आठवत असेल की पूर्वीच्या एका सूत्रांत पतंजलींनी समाधीच्या अनेक अवस्था वर्णिल्या आहेत त्यांतील पहिली स्थूल वस्तूसंबंधीची व दुसरी सूक्ष्म वस्तूंसंबंधीची आहे व या सूक्ष्म वस्तूंपासून अधिक सूक्ष्म वस्तूंकडे जातां येतें आणि त्यांचें ध्यान करतां येतें असें सांगितलें होतें. या ध्यानांचा परिणाम असा होतो की त्यांच्या द्वारें स्थूल व सूक्ष्म दोन्ही प्रकारच्या वस्तूंचें ध्यान करतां येतें. या अवस्थेंत योग्याला ज्ञानप्राप्तीचें साधन, ज्ञेय वस्तु व ज्ञानाचा आधार—म्हणजेच मन, बाह्य वस्तु व आत्मा—या तिन्ही गोष्टी दिसतात. ध्यानांचे विषय असणाऱ्या अशा तीन वस्तु असतात. पहिली, स्थूल वस्तु, जसें शरीर व इतर जड द्रव्यें. दुसरी, मन, चित्त इत्यादि सूक्ष्म वस्तु आणि तिसरी, सविशेष पुरुष अर्थात् अस्मिता वा अहंकार. इथे पुरुष म्हणजे यथार्थ स्वरूपांतील पुरुष नव्हे. सवयीने योग्याला या सर्व वस्तूंचें ध्यान करतां येतें. जेव्हा जेव्हा तो ध्यान करतो तेव्हा तो इतर विचारांना मज्जाव करूं शकतो. ज्या वस्तूचें तो ध्यान करतो तिच्याशीं तो एकरूप होऊन जातो. ध्यान करतांना तो जणु एखाद्या स्फटिकाच्या तुकड्यासारखा होऊन जातो. फुलें समोर असतांना स्फटिक जवळजवळ त्यांच्याशीं एकरूप होऊन जातो. फूल लाल असलें तर स्फटिक लाल होतो व फूल निळें असलें तर

स्फटिकहि निळा होतो.

**तत्र शब्दार्थज्ञानविकल्पैः संकीर्णा सवितर्का समापत्तिः ॥४२॥**

४२. **सूत्रार्थ:—शब्द, अर्थ व त्यापासून उत्पन्न झालेलें ज्ञान हीं जेव्हा मिश्रित रूपांत विद्यमान असतात तेव्हा तिला सवितर्क समाधि म्हणतात.**

स्पष्टीकरण:—येथे शब्द म्हणजे 'स्पंदन'. 'अर्थ' म्हणजे हें स्पंदन आंतमधे वाहून नेणारा ज्ञानतंतूमधील शक्तिप्रवाह. तसेंच ज्ञान म्हणजे प्रतिक्रिया. येथपर्यंत ज्या सर्व समाधींचा आपण विचार केला त्यांना पतंजलि 'सवितर्क समाधि' असें म्हणतात. पुढे यापेक्षा अधिकाधिक श्रेष्ठ अशा ध्यानांचें ते वर्णन करणार आहेत. या सवितर्क समाधींत द्रष्टा व दृश्य यांचा भेद कायम असतो. हा भेद शब्द, त्याचा अर्थ व तत्प्रसूत ज्ञान यांच्या मिश्रणांतून उत्पन्न होतो. प्रथम असतें बाह्य स्पंदन—शब्द. संवेदनाप्रवाहांच्या द्वारें तें आंतमधे प्रवाहित झालें की त्याला 'अर्थ' म्हणतात. त्यानंतर चित्तांत प्रतिक्रियात्मक तरंग उठतात. हेंच 'ज्ञान' होय. पण या तिन्ही गोष्टींच्या मिश्रणालाच आपण 'ज्ञान' असें म्हणतों. येथपर्यंत वर्णिलेल्या समाधींत हें मिश्रणच ध्यानाचा विषय असतें. यापुढची समाधि यापेक्षा श्रेष्ठ आहे.

**स्मृतिपरिशुद्धौ स्वरूपशून्येवार्थमात्रनिर्भासा निर्वितर्का ॥४३॥**

४३. **सूत्रार्थ:—जेव्हा स्मृति शुद्ध किंवा गुणशून्य होते आणि जेव्हा ती केवळ ध्येय वस्तूचा अर्थ प्रकट करते तेव्हा तिला निर्वितर्क अर्थात् वितर्कशून्य समाधि म्हणतात.**

स्पष्टीकरण:—शब्द, अर्थ व ज्ञान ह्या तीन विषयांच्या एकत्र ध्यानाचा अभ्यास केल्याने आपण अशा अवस्थेप्रत पोहोचतों की जिथे त्यांचें मग मिश्रण होत नाही. तेव्हा त्यांना परस्परापासून अलग करणें शक्य होतें. प्रथम हे तीन विषय कसे आहेत हें आपण पाहूं. अगोदर हें चित्त घ्या. चित्ताला व मनस्तत्त्वाला दिलेली सरोवराची उपमा तुम्हांला आठवत असेल. त्या सरोवरावर शब्दरूपी कंप किंवा तरंग उठत असतात. हें शांत सरोवर तुमच्यांतच विद्यमान आहे. मी 'गाय' हा शब्द उच्चारतों. हा शब्द तुमच्या कानांतून आंत शिरल्याबरोबर तुमच्या चित्तरूपी सरोवरावर एक तरंग उत्पन्न होतो. हा तरंग म्हणजेच 'गाय' या शब्दाने सूचित झालेला भाव वा अर्थ होय. जी दृश्य

गाय आपण पाहतों ती मनांतला तरंगच आहे व हा तरंग बाह्य व आंतरिक स्पंदनाची प्रतिक्रियाच होय. शब्दाबरोबर तरंग नाहीसे होतात. शब्दाशिवाय ते टिकूं शकत नाहीत. तुम्ही विचारूं शकतां की जेव्हा आपण गायीचा फक्त विचारच करतों व जेव्हा बाहेरून कोणताच शब्द कानांत पोहोचत नाही तेव्हा शब्द कुठे असतो ? याचें उत्तर हें की तेव्हा तुम्ही स्वतःच तो शब्द मनांतल्या मनांत उच्चारतां. तुम्ही मनांत 'गाय' असा सूक्ष्म शब्द उच्चारतां आणि त्याबरोबर एक तरंग उद्भवतो. शब्दाशिवाय तरंग उठूं शकत नाही. आणि जर बाहेरून शब्द आला नाही तर आंतून तो उद्भवतो. जेव्हा शब्द नष्ट होतो तेव्हा तरंगहि विरून जातो. मग काय शिल्लक राहतें ? या प्रतिक्रियेचा परिणाम—म्हणजे ज्ञान. हे तिन्ही आपल्या मनांत परस्परांशीं इतके मिश्रित झालेले आहेत की आपण त्यांना अलग करूं शकत नाहीं. जेव्हा शब्द होतो तेव्हा इंद्रियें कंपित होतात; आणि त्याची प्रतिक्रिया म्हणून तरंग उद्भवतात. या तिन्ही क्रिया एकानंतर एक इतक्या जलद होत असतात की त्यांना एकमेकांपासून अलग करणें शक्य नाहीं. जेव्हा दीर्घ काळ या ध्यानाचा अभ्यास केला जातो तेव्हा सर्व अनुभवांची आधारभूमि जी स्मृति ती शुद्ध होते आणि तेव्हा आपण या तिघांना परस्परांपासून अलग करूं शकतों. हिलाच निर्वितर्क समाधि म्हणतात.

**एतयैव सविचारा निर्विचारा च सूक्ष्मविषया व्याख्याता ॥४४॥**

४४. **सूत्रार्थः—वरील दोन सूत्रांत सवितर्क व निर्वितर्क अशा ज्या दोन समाधींसंबंधी सांगितलें त्याच्याच द्वारें अधिक सूक्ष्म विषय असणाऱ्या सविचार व निर्विचार समाधींचें देखील स्पष्टीकरण झालें.**

स्पष्टीकरणः—पूर्वीसारखीच प्रक्रिया फिरून येथे होत असते. फक्त पूर्वीच्या दोन समाधींचे विषय स्थूल असतात व या समाधींचे विषय सूक्ष्म असतात.

**सूक्ष्मविषयत्वञ्चालिङ्गपर्यवसानम् ॥४५॥**

४५. **सूत्रार्थः—सूक्ष्म वस्तूंचा शेवट 'प्रधानां'त होतो.**

स्पष्टीकरणः—पंचमहाभूतांना व त्यांपासून उत्पन्न झालेल्या सर्व पदार्थांना 'स्थूल' म्हणतात. सूक्ष्म वस्तूंची सुरवात तन्मात्रांपासून होते. इंद्रियें, मन (अर्थात् सामान्य ज्ञानसाधन—सर्व इंद्रियांची समष्टि),

अहंकार, महत्तत्त्व (सर्व व्यक्त जगताचें कारण), सत्त्व-रज-तम या गुणांची साम्यावस्था, जिला 'प्रधान' 'प्रकृति' किंवा 'अव्यक्त' म्हणतात, हीं सारीं सूक्ष्म वस्तूंच्या वर्गांत मोडतात. फक्त पुरुषच (आत्माच) यांहून वेगळा असतो.

**ता एव सबीजः समाधिः ॥४६॥**

४६. **सूत्रार्थः—या साऱ्या समाधि बीजयुक्त होत.**

स्पष्टीकरणः—या सर्व समाधींत पूर्वकर्मांचें बीज नष्ट होत नाही व म्हणून त्यांच्यामुळे मुक्ति प्राप्त होऊं शकत नाही. पण त्यांच्यामुळे योग्याला जें प्राप्त होतें त्याचें खालील सूत्रांत वर्णन केलें आहे.

**निर्विचार-वैशारद्येऽध्यात्मप्रसादः ॥४७॥**

४७. **सूत्रार्थः—निर्विचार समाधींत शुद्धता आल्यावर चित्त दृढ होतें.**

**ऋतम्भरा तत्र प्रज्ञा ॥४८॥**

४८. **सूत्रार्थः—त्यांतील ज्ञानाला ऋतम्भर अर्थात् सत्यपूर्ण ज्ञान म्हणतात.**

स्पष्टीकरणः—पुढच्या सूत्रांत याचें स्पष्टीकरण आहे.

**श्रुतानुमानप्रज्ञाभ्यामन्यविषया विशेषार्थत्वात् ॥४९॥**

४९. **सूत्रार्थः—अधिकारी व्यक्तींचे शब्द व अनुमान यांच्या द्वारें प्राप्त होणारें ज्ञान हें सामान्य वस्तूंसंबंधीचें असतें. आगम व अनुमान यांपासून उत्पन्न झालेल्या ज्ञानाला जे विषय गोचर नाहीत ते पूर्वोक्त समाधीद्वारा प्रकाशित होतात.**

स्पष्टीकरणः—यांतील कल्पना अशी आहे की सामान्य वस्तूंचें ज्ञान आपण प्रत्यक्ष अनुभवानें, त्यावर आधारलेल्या अनुमानानें व अधिकारी व्यक्तींच्या शब्दांच्या द्वारें मिळवीत असतों. 'अधिकारी व्यक्ति' या शब्दांचा अर्थ, योगीलोक नेहमी 'ऋषि किंवा वेदादि धर्मग्रंथांत सांगितलेल्या सत्यांचे द्रष्टे' असा घेतात. त्यांच्या मतें धर्मग्रंथांच्या सत्यत्वाचा एकमेव पुरावा हा आहे की अधिकारी व्यक्तींच्या वाणींतून ते निघाले आहेत. तरीपण योग्यांचें असें मत आहे की वेद साक्षात्कारापर्यंत आपल्याला नेऊं शकत नाहीत. आपण सगळे वेद वाचूनहि साक्षात्कार प्राप्त करून घेऊं शकणार नाहीं, पण जेव्हा आपण त्यांची शिकवण कृतींत उतरवूं तेव्हाच आपण त्यांनी वर्णिलेल्या अवस्थेप्रत पोहोचूं शकूं. ही अवस्था अशी आहे की हिच्यापर्यंत बुद्धि, प्रत्यक्ष, अनुमान किंवा इतरांचा शाब्दिक पुरावा पोहोचूंच शकत नाही. हा या

सूत्राचा अर्थ आहे.

आत्मसाक्षात्कार हा खरा धर्म आहे. उपदेश ऐकणें, पुस्तकें वाचणें, किंवा तर्क करणें ही केवळ प्रारंभिक तयारी आहे. हा कांही यथार्थ धर्म नव्हे. बुद्धीने केवळ रुकार देणें किंवा न देणें हा कांही धर्म नव्हे. योग्यांची मुख्य कल्पना अशी आहे की इंद्रियविषयांशीं जसा आपला प्रत्यक्ष संबंध येतो तसाच आपल्याला धर्माचा देखील अत्यंत उत्कटत्वाने, प्रत्यक्ष साक्षात्कार होऊं शकतो. धार्मिक सत्यें--उदाहरणार्थ ईश्वर, आत्मा वगैरे--बाह्य इंद्रियांच्या द्वारें पाहिलीं जाऊं शकत नाहीत. मी डोळ्याने ईश्वर पाहूं शकत नाहीं व हाताने त्याला स्पर्शहि करूं शकत नाहीं, आणि हेंहि आपण जाणतोंच की इंद्रियातीत वस्तूविषयी तर्क करणें शक्य नाही. बुद्धि आपल्याला अनिर्णीत अशा स्थितींत सोडून देते. सगळें जग हजारो वर्षांपासून तर्क करीत आहे तसें आपण जन्मभर तर्क करीत राहूं, आणि तरी देखील आपण धार्मिक गोष्टी सत्य किंवा असत्य ठरविण्यास असमर्थ ठरूं. जें आपण प्रत्यक्ष पाहतों त्याचा आधार घेऊन आपण तर्क करतों. म्हणून हें स्पष्ट आहे की तर्काला प्रत्यक्षाच्या या मर्यादा संभाळूनच पुढे गेलें पाहिजे. तर्क त्यापलीकडे जाऊं शकत नाही. म्हणून साक्षात्काराचें स्थान हें प्रत्यक्षापलीकडील आहे. योगी म्हणतात की माणूस प्रत्यक्षाच्या व बुद्धीच्याहि पलीकडे जाऊं शकतो. माणसांत व प्रत्येक प्राण्यांत तें साधन किंवा ती शक्ति आहे की जिच्या मदतीने तो बुद्धीच्याहि पलीकडे जाऊं शकतो. योगाच्या अभ्यासाने ती शक्ति जागृत होते आणि मग माणूस बुद्धीच्या नेहमीच्या मर्यादा ओलांडून बुद्धीच्या अगदी पलीकडील सर्व वस्तु प्रत्यक्ष पाहूं लागतो.

**तज्जः संस्कारोऽन्यसंस्कारप्रतिबन्धी ॥५०॥**

५०. **सूत्रार्थः—या समाधीपासून उत्पन्न होणारा संस्कार इतर संस्कारांचा प्रतिरोध करतो.**

स्पष्टीकरणः--पूर्वीच्या सूत्रांत आपण पाहिलें की ज्ञानातीत अवस्थेप्रत जाण्याचा एकमेव उपाय समाधि हा आहे आणि आपण हेंहि पाहिलें की आपले पूर्व संस्कार समाधींत अडथळा उत्पन्न करतात. तुम्हीं सगळ्यांनी अनुभविलें असेल की मन एकाग्र करण्याचा आपण

प्रयत्न करूं लागलों की तें इतस्ततः धावूं लागतें. जेव्हा तुम्ही ईश्वराचा विचार करूं इच्छितां तेव्हाच हे संस्कारहि प्रकट होतात. इतर वेळीं ते इतके प्रभावशाली नसतात; पण जेव्हा तुम्हांला ते नको असतात तेव्हाच ते प्रकट होतात व तुमच्या मनांत गोंधळ उत्पन्न करतात. असें कां व्हावें ? ध्यानाच्या वेळीं ते इतके जास्त सामर्थ्यवान कां व्हावेत ? कारण तुम्ही त्यांना त्या वेळीं दाबतां आणि म्हणून ते सर्व शक्ति एकवटून प्रतिकार करतात. इतर वेळीं ते अशी प्रतिक्रिया करीत नाहीत. हे जुने संस्कार असंख्य आहेत. ते सगळे चित्तांत कुठे तरी एकवटलेले असतात व वाघासारखे केव्हाहि झेप घेण्यासाठी टपून बसलेले असतात. या सगळ्यांचा आपण प्रतिरोध केला पाहिजे. त्यायोगें आपल्याला अनुकूल असा भावच आपल्या मनांत प्रकट होईल आणि इतर सारे भाव नाहीसे होतील. हे सर्व संस्कार एकाच वेळीं डोकें वर काढण्याचा प्रयत्न करीत असतात. एकाग्रतेला वा ध्यानाला बाधक अशा संस्कारांच्या ज्या विभिन्न शक्ति आहेत त्या ह्याच होत. म्हणून आताच सांगितलेला समाधीचा प्रकार अभ्यासासाठी सर्वाहून उत्तम आहे. कारण तो पूर्वसंस्कारांना हतप्रभ करून टाकतो. या समाधीपासून जो संस्कार उत्पन्न होतो तो इतका शक्तिशाली असतो की तो इतर सर्व संस्कारांना अडवून धरतो व त्यांचें नियंत्रण करतो.

**तस्यापि निरोधे सर्वनिरोधान्निर्बीजः समाधिः ॥५१॥**

५१. सूत्रार्थः—**या इतर सर्व संस्कारांना प्रतिरोध करणाऱ्या संस्कारांचा प्रतिरोध केल्याने सगळ्याच संस्कारांचा प्रतिरोध होतो व त्यामुळे निर्बीज समाधीची अवस्था प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—तुम्हांला आठवत असेल की आपलें ध्येय आत्मानुभूति हेंच आहे. आपण आत्म्याची उपलब्धि करून घेऊं शकत नाहीं, कारण तो प्रकृति, मन, शरीर इत्यादींत मिसळलेला आहे. अज्ञ माणूस शरीरालाच आत्मा समजतो. त्याच्यापेक्षा अमळ उन्नत मनुष्य मनाला आत्मा मानतो. पण हे दोघेहि भ्रमांत आहेत. आत्मा या सगळ्यांशीं कशामुळे मिश्रित होतो ? चित्तांत विविध तरंग उठतात व ते आत्म्याला झाकून टाकतात. आपल्याला या तरंगांतून आत्म्याचें किंचित् प्रतिबिंबच फक्त दिसतें. म्हणून जर रागाचा तरंग असेल तर आत्मा

रागावलेला दिसतो. जसें कोणी म्हणतो, 'मी रागावलों आहें.' प्रेमाचा तरंग असेल तर आपण स्वतःला या तरंगांत प्रतिबिंबित झालेले पाहतों व म्हणतों की 'आम्ही प्रेम करतों.' जर हा तरंग दुर्बलतेचा असेल व आत्मा त्यांत प्रतिबिंबित होईल तर आपण दुर्बल आहोंत असें आपल्याला वाटेल. हे सर्व विचार आत्म्याला आच्छादित करणाऱ्या पूर्वसंस्कारांतून उद्भवतात. जोंपर्यंत चित्तांत एक देखील तरंग आहे तोंपर्यंत आत्म्याचें खरें स्वरूप अनुभवास येऊं शकत नाही. म्हणून, पतंजलि प्रथम आपल्याला या तरंगांचा अर्थ सांगतात, नंतर त्यांच्या दमनाचा श्रेष्ठ उपाय दर्शवितात व त्यानंतर एकच तरंग कशा तऱ्हेने जास्तींत जास्त शक्तिमान करून त्याच्या द्वारें इतर सर्व तरंगांचें दमन करावें हें ते सांगतात. ज्याप्रमाणे मोठी आग लहान लहान जाळांना गिळून टाकते तसेंच हें आहे. जेव्हा एकच तरंग शिल्लक राहील तेव्हा त्याचेंहि दमन करणें शक्य आहे. आणि जेव्हा हा तरंग नाहीसा होईल तेव्हा निर्बीज समाधीची अवस्था प्राप्त होईल. या अवस्थेंत कांहींहि शिल्लक उरत नाही. आणि आत्मा स्वतःच्या शुद्ध निर्मल स्वरूपांत प्रकट होतो. तेव्हाच आपल्याला कळून येतें की आत्मा हा मिश्र पदार्थ नसून विश्वांत तोच एक नित्य अमिश्र पदार्थ आहे. तो उत्पन्न होऊं शकत नाही, नष्ट होऊं शकत नाही. तो अमर, अविनाशी व नित्य चैतन्यघन सत्तास्वरूप आहे.

---

## द्वितीय अध्याय

# साधनपाद

**तपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि क्रियायोगः ॥१॥**

**१. सूत्रार्थः—तपश्चर्या, स्वाध्याय आणि ईश्वराला कर्मफल अर्पण करणें यांना क्रियायोग असें म्हणतात.**

स्पष्टीकरणः—ज्या समाधींचें विवेचन करून आपण मागील प्रकरण संपविलें त्या प्राप्त करणें फार कठीण आहे. म्हणून हळूहळू आपण त्या हाताळल्या पाहिजेत. याचें पहिलें किंवा सुरवातीचें पाऊल 'क्रियायोग' या नांवाने ओळखलें जातें. शब्दशः याचा अर्थ होतो

कर्मांच्या साहाय्याने 'योगा'च्या दिशेने प्रयत्न करणें. इंद्रियें जणु घोडे आहेत, मन लगाम आहे, बुद्धि सारथि आहे, आत्मा रथी ( रथांत बसणारा ) आहे आणि शरीर रथ आहे. हा गृहस्वामी, हा राजा, माणसाचा हा आत्मा रथांत बसला आहे. जर घोडे फार आडदांड असून लगामाने आवरेनासे होतील, किंवा बुद्धिरूपी सारथ्याला घोड्यांना कसें आवरावें हें कळत नसेल तर रथ खड्ड्यांत पडल्याशिवाय राहणार नाही. पण जर इंद्रियरूपी घोडे काबूंत राहतील आणि जर मनरूपी लगाम बुद्धिरूपी सारथ्याने घट्ट आवळून धरला असेल तर हा रथ मुक्कामापर्यंत पोहोचल्याशिवाय राहणार नाही. मग या तपाचा काय अर्थ आहे ? हाच की हातांत लगाम घट्ट धरून ठेवून शरीर व इंद्रियें यांना योग्य दिशेने चालविणें, त्यांना वाटेल तसें वागूं न देतां योग्य नियंत्रणांत ठेवणें. आता स्वाध्यायाचा विचार करूं. इथे स्वाध्यायाचा अर्थ काय आहे ?—कादंबऱ्या किंवा गोष्टी वाचणें नव्हे, तर ज्या पुस्तकांत आत्म्याच्या मोक्षाबद्दल विवेचन केलें आहे त्या पुस्तकांचें अध्ययन करणें. पण हा अभ्यास वादविवादात्मक असतां कामा नये. योगी हा वादविवादांपलीकडे गेलेला असला पाहिजे. त्याचें मन वादांना विटलें असून त्यांची त्याला आवड उरत नाही. तो फक्त आपली धारणा दृढ करण्यासाठीच अध्ययन करतो. वाद आणि सिद्धान्त हे शास्त्रीय ज्ञानाचे दोन प्रकार होत. एक आहे चर्चात्मक व दुसरा आहे निश्चयात्मक. जेव्हा माणूस अगदी अज्ञ असतो तेव्हा तो पहिल्याचा म्हणजे चर्चात्मक वादाचा व उलटसुलट तर्काचा आश्रय घेतो आणि जेव्हा त्याचा हा वाद संपतो तेव्हा तो निश्चयात्मक सिद्धान्ताप्रत पोहोचतो. सिद्धान्ताप्रत पोहोचल्यानेच काम भागत नही. या सिद्धान्तासंबंधीची मनाची धारणा दृढ झाली पाहिजे. पुस्तकें अनंत आहेत व काळ फार थोडा आहे. म्हणून ज्ञानाचें गुपित हें आहे की जें महत्त्वाचें असेल तेंच निवडावें. तेवढें घ्या व त्याप्रमाणे वागण्याचा प्रयत्न करा. भारतांत एक जुनी समजूत आहे की तुम्ही जर दूध व पाणी यांचें पेलाभर मिश्रण एखाद्या राजहंसापुढे ठेवलें तर तो सगळें दूध पिऊन घेईल व पाणी टाकून देईल. त्याचप्रमाणे आपणहि ज्ञानामधे जेवढें मूल्यवान आहे तेवढेंच घ्यावें व गाळ सर्व टाकून द्यावा.

बौद्धिक कसरत सुरवातीला आवश्यक असते. आपण आंधळ्याप्रमाणे कोणत्याहि गोष्टीमागे लागूं नये. योगी चर्चात्मक अवस्थेच्या पलीकडे गेलेला असून तो पर्वताप्रमाणे निश्चल अशा सिद्धान्ताप्रत पोहोचलेला असतो. आता तो फक्त या सिद्धान्ताला जास्तींत जास्त दृढ करण्याचा प्रयत्न करीत असतो. तो म्हणतो की कोणी मुद्दाम वाद घालूं लागल्यास त्याच्यांशीं वाद करूं नका, स्वस्थ बसा. कोणत्याहि चर्चेचें उत्तर देऊं नका, तर शांतपणें तेथून निघून जा; कारण वादाने मन क्षुब्ध होतें. बुद्धीला वळण लावण्याचीच फक्त गरज आहे. उगाच तिला प्रक्षुब्ध करण्यांत काय अर्थ आहे ? बुद्धि हें एक दुबळें साधन आहे आणि तें इंद्रियांनी मर्यादित असें ज्ञानच आपल्याला देऊं शकतें. योगी इंद्रियांच्या पलीकडे जाऊं इच्छितो, म्हणून बुद्धीचा शेवटपर्यंत उपयोग करण्याची त्याला आवश्यकता उरत नाही. त्याला ही गोष्ट चांगली माहीत असते, म्हणूनच तो शांत राहतो व चर्चा करीत नाही. प्रत्येक चर्चा त्याच्या मनाचा समतोलपणा बिघडविण्यासच कारणीभूत होते व चित्तामधे क्षोभ उत्पन्न करते. क्षोभ हा एक दोष आहे. वादविवाद व तर्क करणें हें केवळ प्रारंभिक अवस्थेसाठीच आहे. यांच्या पलीकडे व यांच्याहून श्रेष्ठ अशा अनेक गोष्टी आहेत. सगळेंच जीवन हें पोरकट भांडणें व वादविवाद यांसाठी नसतें. 'ईश्वराला कर्मफल अर्पण करणें' म्हणजे स्वतःकडे कशाचेंहि श्रेय किंवा कशाचाहि दोष न घेतां दोन्ही ईश्वरार्पण करून स्वतः शांत राहणें.

**समाधिभावनार्थः क्लेशतनूकरणार्थश्च ॥२॥**

२. **सूत्रार्थः—हें समाधीच्या अभ्यासासाठी व क्लेशदायक अडथळे कमी करण्यासाठी आहे.**

स्पष्टीकरणः—आपल्यापैकी बऱ्याच लोकांनी आपल्या मनाला लाडावलेल्या मुलासारखें करून टाकलें आहे. ते त्याला वाटेल तसें वागूं देतात. म्हणून क्रियायोगाचा सतत अभ्यास करणें आवश्यक आहे. त्यामुळे मनावर ताबा मिळवतां येतो व तें कह्यांत ठेवतां येतें. योगाला अडथळे अ-संयमामुळे उत्पन्न होतात व हे अडथळे कष्ट देऊं लागतात. मन आवरल्यास व क्रियायोगाच्या द्वारें त्याचें नियंत्रण केल्यास हे अड-थळे नाहीसे करतां येतात.

**अविद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशाः क्लेशाः ॥३॥**

**३. सूत्रार्थः—अज्ञान, अस्मिता ( अहंकार ), आसक्ति, द्वेष व जीवनासक्ति हे पांच क्लेश ( दुःखकारक बंधनें ) होत.**

स्पष्टीकरणः—हीं पांच दुःखें किंवा पांच प्रकारचीं बंधनें होत. हीं आपल्याला जखडून टाकतात. यांमधील अविद्या हें कारण आहे व उरलेलीं सर्व कार्यें आहेत. अविद्याच सर्व दुःखांचें कारण आहे. आणखी कशाने आपण दुःखी होऊं शकतों ? आत्मा तर शाश्वत आनंदस्वरूप आहे. त्या आत्म्याला अज्ञान, अध्यास व भ्रम यांशिवाय इतर कोणती गोष्ट दुःखांत पाडूं शकते ? आत्म्याचीं सर्व दुःखें भ्रममूलकच होत.

**अविद्या क्षेत्रमुत्तरेषां प्रसुप्ततनुविच्छिन्नोदाराणाम् ॥४॥**

**४. सूत्रार्थः—अज्ञान हें उरलेल्या चार क्लेशांचें उत्पादक क्षेत्र आहे. हे क्लेश अस्फुट, क्षीण, अभिभूत व विस्तृत या विभिन्न रूपांत विद्यमान असतात.**

स्पष्टीकरणः—अज्ञान हें अहंकार, आसक्ति द्वेष व जीवनासक्ति या सगळ्यांचें कारण आहे. हे संस्कार माणसाच्या मनांत विभिन्न रूपांत विद्यमान असतात. ते कधी अस्फुट किंवा प्रसुप्त असतात. पुष्कळदा तुम्ही 'लहान मुलासारखा निष्पाप' हे शब्द ऐकतां. पण त्या लहान मुलामधे देवाचा वा असुराचाहि भाव असूं शकतो व तो हळूहळू व्यक्त होऊं शकतो. योग्यामधे पूर्वकर्मांचे हे संस्कार क्षीण झालेले असतात, म्हणजे, ते फार सूक्ष्म अवस्थेंत राहतात आणि तो त्यांचें नियंत्रण करून त्यांना अभिव्यक्त होऊं देत नाही. 'अभिभूत' म्हणजे कांही संस्कार थोडया वेळापुरते इतर बलवत्तर संस्कारांमुळे दडपले जातात. पण हें दडपण नाहीसें झाल्याबरोबर हे संस्कार फिरून डोकें वर काढतात. शेवटची अवस्था विस्ताराची आहे. या अवस्थेंत अनुकूल परिस्थिति लाभल्यामुळे संस्कार अत्यंत सक्रिय होऊनच चांगले किंवा वाईट परिणाम घडवून आणतात.

**अनित्याशुचिदुःखानात्मसु नित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या ॥५॥**

**५. सूत्रार्थः—अनित्य, अशुद्ध, दुःखपूर्ण व अनात्म अशा वस्तूंना अनुक्रमें नित्य, शुद्ध, सुखपूर्ण आणि आत्मरूप समजणें म्हणजेच अज्ञान होय.**

स्पष्टीकरणः—विभिन्न प्रकारच्या संस्कारांचें एकच कारण आहे —अज्ञान. प्रथम अज्ञान काय आहे हें आपण समजून घेतलें पाहिजे.

आपण सगळेजण असें समजतों की 'मी शुद्ध, ज्योतिर्मय, नित्य आनंद-स्वरूप आत्मा नसून मी शरीर आहें,' आणि हेंच अज्ञान आहे. आपण माणसाला शरीररूपांत पाहतों व शरीररूपानेच त्याचा विचार करतों. हा सर्वांत मोठा भ्रम आहे.

**दृग्दर्शनशक्त्योरेकात्मतैवास्मिता ॥६॥**

**६. सूत्रार्थः—द्रष्टा व दर्शनाचें साधन यांना एकच समजणें हा अहंकार होय.**

स्पष्टीकरण:—आत्मा हाच खरा द्रष्टा आहे. तो शुद्ध, सदा पवित्र, अनंत व अविनाशी आहे. आणि साधनें कोणतीं ? चित्त किंवा मनस्तत्त्व, बुद्धि किंवा निश्चयात्मिका वृत्ति, मन आणि इंद्रियें हीं सर्व साधनें होत. बाह्य विश्व अनुभवण्याचीं हींच साधनें होत. आणि आत्म्याने या साधनांशीं एकरूप होणें यालाच अहंकाररूप अज्ञान असें म्हणतात. आपण म्हणतों 'मी मन आहें, मी विचार आहें, मी रागावलों आहें, मी प्रसन्न आहें.' वस्तुत: आपण कसें बरें क्रुद्ध होऊं शकतों किंवा द्वेष करूं शकतों ? आपण स्वत:ला अपरिवर्तनशील अशा आत्म्याशीं एकरूप केलें पाहिजे. जर आत्मा अपरिवर्तनशील आहे तर तो एका क्षणीं सुखी व दुसऱ्या क्षणीं दु:खी कसा होऊं शकेल ? तो निराकार, अनंत व सर्वव्यापी आहे. त्याला कोण बदलूं शकतो ? तो सर्व नियमांच्या पलीकडे आहे. तो कशाने विकृत होईल ? जगांतली कोणतीहि गोष्ट त्यावर परिणाम करूं शकत नाही. तरी पण अज्ञानामुळे स्वत:च्या मनोवृत्तीशीं तादात्म्य पावून आपण असा ग्रह करून घेतों की आपण सुखी किंवा दु:खी आहों.

**सुखानुशयी रागः ॥७॥**

**७. सूत्रार्थ—राग या आसक्ति ही सुखावर आधारलेली असते.**

स्पष्टीकरण:—कांही वस्तूंत आपल्याला गोडी वाटते आणि मन प्रवाहाप्रमाणे या वस्तूंकडे वाहत जातें. या सुखरूप केंद्राकडे वाहत जाण्यालाच राग वा 'आसक्ति' म्हणतात. जिथे सुख वाटत नाही तिथे आपलें मन कधीच आकृष्ट होत नाही. कधी कधी फारच चमत्कारिक वस्तूंमधे आपल्याला सुख वाटूं लागतें. पण त्यांनाहि हेंच तत्त्व लागूं पडतें. ज्या ज्या वस्तूंत सुख वाटतें त्या त्या ठिकाणीं मन जडतें.

**दुःखानुशयी द्वेषः ॥८॥**

८. **सूत्रार्थः—द्वेष हा दुःखावर आधारलेला असतो.**

स्पष्टीकरणः—ज्यामुळे दुःख होतें तें तावडतोब टाळण्याचा आपण प्रयत्न करतों.

**स्वरसवाही विदुषोऽपि तथारूढोऽभिनिवेशः ॥९॥**

९. **सूत्रार्थ—( पूर्वीच्या मरणानुभवांमुळे ) स्वभावतः प्रवाहित होणारा आणि शहाण्या लोकांतहि वसणारा असा हा जीवनाभिनिवेश आहे.**

स्पष्टीकरणः—जीवनाची ओढ ही प्रत्येक प्राण्यांत दिसून येते. याच्या आधारावर भविष्यजीवनासंबंधीचे कांही सिद्धान्त बसविण्याचे अनेक प्रयत्न केले गेले आहेत, कारण लोकांना जीवनाची इतकी ओढ असते की त्यांना भविष्यजीवन देखील हवें असतें. वास्तविक पाहतां हें सांगण्याची गरज नाही की हा युक्तिवाद अर्थशून्य आहे. पण आश्चर्याची गोष्ट ही की पाश्चात्त्य देशांत जीवनासक्तीवरून भविष्यजीवनाच्या शक्यतेची कल्पना फक्त माणसाच्या बाबतींतच मानली जाते, जनावरांच्या बाबतींत नव्हे. भारतांत ह्या जीवनासक्तीवरून पूर्वजन्माचे अनुभव व त्याचें अस्तित्व सिद्ध केलें जातें. उदाहरणार्थ, जर हें खरें असेल की आपलें सगळें ज्ञान अनुभवांतून निघालें आहे तर हें निश्चित आहे की जें आपण अनुभवलें नाहीं तें समजणें व त्याची कल्पना करणें शक्य नाही. कोंबडीचीं पिलें जन्मल्याबरोबरच दाणे टिपूं लागतात. कित्येकदा असें दिसून आलें आहे की कोंबडीने वाढवलेलीं बदकांचीं पिलेंहि अंड्यांतून निघाल्याबरोबरच पाण्याकडे धांव घेतात आणि त्यांच्या आईला (कोंबडीला) वाटतें की ती आता पाण्यांत बुडतील ! जर अनुभव हें ज्ञानाचें एकमात्र साधन असेल तर कोंबडीच्या पिलांना दाणे टिपणें कसें कळलें आणि बदकाच्या पिलांना हें कसें समजलें की पाणी हें त्यांचें नैसर्गिक स्थान आहे ? ही सहजप्रवृत्ति आहे असें जर म्हणाल तर याला कांही अर्थ नाही. हा फक्त एक शब्दप्रयोग आहे—हें कांही स्पष्टीकरण नव्हे. ही सहजप्रवृत्ति काय आहे ? आपल्यांतच अनेक सहजप्रवृत्ति आहेत. उदाहरणार्थ, तुमच्यापैकी पियानो वाजविणाऱ्या अनेक स्त्रियांना आठवत असेल की सुरवातीला पियानो वाजविणें शिकत असतांना तुम्हांला किती सावधगिरीने काळ्या व पांढऱ्या पट्ट्यांवरून

बोटें फिरवावीं लागत असत; पण आता पुष्कळ वर्षांच्या सवयीनंतर, आपल्या मित्रांशीं बोलत असतांना सुद्धा तुमचीं बोटें आपोआपच या पट्ट्यांवरून फिरत असतात. आता ही गोष्ट अगदी स्वाभाविक होऊन गेली आहे. आपण करीत असलेल्या सर्व गोष्टींचेंहि असेंच आहे. सवयीने या गोष्टी स्वाभाविक होऊन जातात व त्या मग आपोआप होऊं लागतात. आपल्या माहितीप्रमाणे आज ज्या क्रियांना आपण सहजप्रवृत्तीमुळे घडणाऱ्या क्रिया म्हणतों त्या पूर्वी विचारयुक्त ज्ञानाच्या क्रिया होत्या आणि आता त्या खालच्या पातळीवर येऊन स्वाभाविक बनल्या आहेत. योग्यांच्या भाषेंत सांगायचें म्हणजे सहजप्रवृत्ति ही विचाराची वा बुद्धीची क्रमसंकोचाची अवस्था (involved state) आहे. विचारजनित ज्ञान खालच्या पातळीवर येऊन, आपोआप कार्य करणाऱ्या संस्कारांचें रूप धारण करतें. म्हणून हें मत पूर्णपणें तर्कशुद्ध आहे की या जगांत ज्या क्रियेला आपण सहजप्रवृत्तिमूलक म्हणतों ती विचारजनित ज्ञानाची केवळ खालच्या पातळीवरील अभिव्यक्ति आहे. ज्याअर्थीं अनुभवाशिवाय विचार वा बुद्धि वाढूं शकत नाही त्याअर्थी सर्व सहजप्रवृत्ति पूर्वानुभवांचाच परिणाम आहेत. कोंबडीचीं पिलें ससाण्याला भितात व बदकाचीं पिलें पाण्याकडे आकृष्ट होतात. या दोन्ही गोष्टी पूर्वानुभवाचाच परिणाम आहेत मग प्रश्न असा उद्‌भवतो की, हा अनुभव त्या जीवात्म्याचा असतो की केवळ शरीराचा ? म्हणजे हा अनुभव बदकाच्या पूर्वजांचा आहे की त्याचा स्वतःचाच आहे ? आधुनिक वैज्ञानिकांचें मत आहे की हा अनुभव केवळ शरीराचा धर्म आहे, पण योग्यांच्या मतें तो मनाचा असून शरीरांतून संक्रमित होतो. यालाच पुनर्जन्माचा सिद्धान्त म्हणतात.

आपण हें पाहिलें की आपलें सर्व ज्ञान, मग तें प्रत्यक्ष असो की अनुमानजनित असो की सहजप्रवृत्तिमूलक असो, तें अनुभवाच्या एकाच मार्गानें आलेलें असतें आणि ज्याला आपण सहजप्रवृत्तिमूलक ज्ञान म्हणतों तें पूर्वानुभवाचा परिणाम असून हा पूर्वानुभवच आज खालच्या पातळीवर येऊन सहजप्रवृत्तीच्या रूपांत प्रकट झाला आहे. ही सहजप्रवृत्ति फिरून विचारजनित ज्ञानांत परिणत होऊं शकते. असेंच सर्व विश्वांत चालूं असतें आणि या गोष्टीवरच भारतीयांचा पुनर्जन्मा-

संबंधीचा एक महत्त्वाचा मुद्दा आधारलेला आहे. पूर्वानुभूत अनेक भयांचे संस्कार कालान्तराने या जीवनासक्तींत परिणत होतात, म्हणूनच लहान मूल आपोआपच भिऊं लागतें, कारण त्याच्या मनांत पूर्वानुभवजनित दुःखाचे संस्कार वसत असतात. ज्यांना हें शरीर नश्वर आहे हें ठाऊक असतें व जे म्हणतहि असतात की, 'कांही पर्वा करूं नका, आपण शेकडो जन्म घेतले आहेत व आत्मा अमर आहे' अशा विद्वान् लोकांच्या ठायीं देखील, त्यांच्यांत विवेक असून देखील, प्रबल जीवनासक्ति दिसून येते. जीवनासंबंधीची ही आसक्ति कुठून आली ? आपण पाहिलेंच आहे की ही आसक्ति आता स्वाभाविक होऊन बसली आहे. योग्याच्या मानसशास्त्रीय भाषेंत म्हणतां येईल की हा एक संस्कार होऊन बसला आहे. हे सर्व संस्कार सूक्ष्म व प्रसुप्त रूपांत चित्तामधे दडलेले असतात. ज्याला आपण सहजप्रवृत्ति समजतों तो मृत्यूचा सगळा पूर्वानुभव आपल्या नेणीवेंत पोहोचलेला असतो. तो चित्तांतच वास करीत असतो आणि त्या ठिकाणीं तो निष्क्रिय न राहतां, खालच्या-खाली कार्य करीत असतो.

ज्या चित्तवृत्ति स्थूल असतात त्यांचें अस्तित्व आपण ओळखतों व अनुभवतों. त्यांचें नियंत्रण सोप्या उपायाने होऊं शकतें, पण सूक्ष्म सहजप्रवृत्तींबद्दल असें म्हणतां येईल काय ? त्यांचें नियंत्रण कसें करावें ? जेव्हा मी रागावतों तेव्हा माझें संपूर्ण मन क्रोधाचा एक मोठा तरंग होऊन बसतें. मी हें अनुभवतों, पाहतों, हा तरंग मी सहज-पणें हाताळूं शकतों व त्यांच्याशीं झगडूंहि शकतों. पण जोंपर्यंत मी त्याच्या मूळ कारणापर्यंत पोहचत नाहीं तोंपर्यंत या संघर्षांत मी पूर्णपणें विजयी होऊं शकणार नाहीं. एखादा माणूस मला कांही अपशब्द बोलतो तेव्हा मला जाणवतें की मी रागावत आहें. तो माणूस आणखी कांही बोलतच राहतो आणि मी अत्यंत क्रुद्ध होऊन आपल्या क्रोध-वृत्तीशीं जगु एकरूप होऊन जातों. जेव्हा या माणसाने मला शिव्या देण्यास आरंभ केला तेव्हा मला जाणवलें होतें की मी रागावणार आहें. तेव्हा क्रोध वेगळा व मी वेगळा अशी स्थिति होती. पण जेव्हा मी क्रुद्ध झालों तेव्हा मी स्वतःच क्रोधरूप होऊन बसलों. म्हणून ह्या वृत्ति मुळांतच—त्या सूक्ष्म असतांनाच संयत केल्या पाहिजेत, आपल्या-

वर त्या कार्य करीत आहेत याची जाणीव होण्यापूर्वीच त्यांचें दमन केलें पाहिजे. अधिकांश मानवांना या वृत्तींचें सूक्ष्म रूपांतील म्हणजेच ज्यांतून त्या पुढे प्रकट होतात त्या नेणीवेंतील अस्तित्व माहीतच नसतें. जेव्हा सरोवराच्या तळापासून एखादा बुडबुडा उठतो तेव्हा तो दिसत नाही व त्यानंतर तो पृष्ठभागावर येत असतांना देखील दिसत नाही. तो जेव्हा फुटतो व त्यांतून एक तरंग पसरतो तेव्हाच त्याचें अस्तित्व आपल्याला जाणवतें. आपण या तरंगांचें तेव्हाच यशस्वीपणें नियंत्रण करूं शकूं की जेव्हा आपण त्यांना त्यांच्या सूक्ष्म अवस्थेंतच पकडूं शकूं. स्थूल रूपांत येण्यापूर्वीच आपण त्यांचें नियंत्रण करूं शकलों नाहीं तर त्यांच्यावर पूर्णपणें विजय मिळविण्याची आशा नको. वासनांचें नियंत्रण करण्यासाठी आपण त्यांच्या मुळाशींच गेलें पाहिजे. तेव्हाच आपण त्यांचीं बीजें जाळून टाकूं शकूं. ज्याप्रमाणे भाजलेल्या बिया जमिनींत पेरूनहि उगवत नाहीत त्याचप्रमाणे ह्या वासनादेखील मग अंकुरित होत नाहीत.

**ते प्रतिप्रसवहेयाः सूक्ष्माः ॥१०॥**

**१०. सूत्रार्थ--सूक्ष्म संस्कारांचें निरसन त्यांना त्यांच्या कारणावस्थेंत विलीन केल्यानें होतें.**

स्पष्टीकरणः--संस्कार हे सूक्ष्म दशाच्या स्वरूपाचे असतात व ते मागाहून स्थूल रूप धारण करतात. हे सूक्ष्म संस्कार कसे आवरावेत? त्यासाठी कार्याचा कारणांत लय करावा लागतो. जेव्हा समाधीच्या द्वारें चित्तरूप कार्य अस्मिता वा अहंकाररूप आपल्या कारणांत विलीन होतें तेव्हा चित्तावरोबरच हे सूक्ष्म संस्कारहि नाहीसे होतात.

**ध्यानहेयास्तद्वृत्तयः ॥११॥**

**११. सूत्रार्थः--ध्यानाने त्यांच्या स्थूल रूपांचें निराकरण केलें जाऊं शकतें.**

स्पष्टीकरणः--तरंग वर येऊं न देण्याचें ध्यान हें एक मोठें साधन आहे. तुम्ही ध्यानाने मनाला या तरंगांचा विरोध करायला लावूं शकतां, आणि जर तुम्ही ध्यानाचा अभ्यास अनेक दिवस, महिने आणि वर्षे चालूं ठेवाल तर क्रोधाचें व द्वेषाचें नियंत्रण व त्यांचा प्रतिरोध तुम्ही करूं शकाल. तुमचा हा ध्यानाचा अभ्यास सतत चालला पाहिजे आणि त्यामुळे हें ध्यान तुमच्या अंगवळणीं पडून गेलें पाहिजे व तुमची

इच्छा नसतांनाहि आपोआपच ही ध्यानावस्था तुम्हांला प्राप्त झाली पाहिजे.

**क्लेशमूलः कर्माशयो दृष्टादृष्टजन्मवेदनीयः ॥१२॥**

१२. **सूत्रार्थः—पूर्वी सांगितलेले सर्व 'क्लेश'च कर्मसंस्कारांच्या समूहाचें मूळ होय. वर्तमान वा भावी जीवनांत त्यांचें फल प्राप्त होतें.**

स्पष्टीकरणः—'कर्माशय' याचा अर्थ 'सर्व संस्कारांचा समूह' असा होतो. जें कांही आपण करतों त्यामुळे मनांत तरंग उठतात आणि तें काम संपल्यावर आपण समजतों की हे तरंग नाहीसे झाले. पण तसें होत नाही. ते फक्त सूक्ष्म होऊन बसतात व तेथेच कायम असतात. जेव्हा आपण केलेली एखादी गोष्ट आठवूं लागतों तेव्हा हे तरंग वर येतात वा स्थूल होतात. म्हणून हे तिथेच असले पाहिजेत हें उघड आहे. ते जर तिथे नसते तर स्मृति अशक्य झाली असती. याप्रमाणे प्रत्येक क्रिया वा प्रत्येक विचार, मग ते चांगले असोत की वाईट असोत, मनाच्या खोल भागांत जातात व सूक्ष्म बनून तिथेच संचित होतात. सुखकारक व दुःखकारक अशा दोन्ही प्रकारच्या विचारांना 'क्लेश' म्हणतात, कारण योग्यांच्या मतें ते दोन्हीहि शेवटीं दुःखदायकच ठरतात. इंद्रियांपासून मिळणारीं सर्व सुखें शेवटी दुःखच देतात; कारण सर्व प्रकारचे भोग हे अधिकाधिक भोगाची हाव उत्पन्न करतात आणि याचा परिणाम होतो दुःख. मानवी इच्छांना मर्यादा नाही. माणूस सारखा इच्छा करीत असतो, आणि जेव्हा तो अशा अवस्थेपर्यंत येऊन पोहोचतो की जिथे त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होऊं शकत नाहीत, तेव्हा तो दुःखी होतो. म्हणून योगी चांगल्या किंवा वाईट संस्कारांच्या समूहाला 'क्लेश' वा दुःखकारक बंधनें मानतात. हे 'क्लेश' आत्म्याच्या मुक्तीच्या आड येतात.

सर्व क्रियांचें सूक्ष्म कारण असणाऱ्या संस्कारांना देखील हीच गोष्ट लागू आहे. हे संस्कार कारणाचें रूप घेतात आणि त्यांचा परिणाम या जन्मांत किंवा पुढील जन्मांत दिसून येतो. कांही विशेष प्रसंगीं संस्कार जर फार प्रबळ असतील तर त्यांचा तात्काळ परिणाम होतो. असामान्य वाईट कृत्य किंवा असामान्य चांगलें कृत्य या जन्मांतच फलद्रूप होतें. योग्यांचें म्हणणें आहे की जे लोक या जीवनांतच अत्यंत

प्रबळ असे शुभ संस्कार प्राप्त करतात त्यांना मृत्यूपर्यंत वाट बघावी लागत नाही, तर याच जन्मांत ते आपलें शरीर देव-शरीरांत परिवर्तित करूं शकतात. अशा प्रकारचीं अनेक उदाहरणें योग्यांनी आपल्या ग्रंथांत नमूद केलेलीं आहेत. हे लोक आपल्या शरीरांचे घटकच बदलून टाकतात. ते या शरीरांतील परमाणु अशा तऱ्हेने बदलून टाकतात की त्यांना आजार होत नाहीत व ज्याला आपण मृत्यु म्हणतों तो त्यांच्या-जवळ फटकत नाही. असें कां होऊं नये ? शरीरक्रियाशास्त्र (Physiology) सांगतें की 'अन्न' म्हणजे सूर्यापासून शक्ति ग्रहण करणें. ही शक्ति प्रथम वनस्पतींत शिरते; जनावरें वनस्पति खातात व माणूस जनावरांना खातो. याचा शास्त्रीय अर्थ असा की सूर्यापासून कांही शक्ति घेऊन आपण ती आत्मसात् केली आहे. असें जर असेल तर शक्ति आत्मसात् करण्याचा एकच प्रकार कां असावा ? वनस्पति आपल्याप्रमाणे शक्ति ग्रहण करीत नाहीत, आणि शक्ति आत्मसात् करण्याची पृथ्वीची पद्धति आपल्याहून वेगळीच आहे. पण सगळेच जण कोणत्या ना कोणत्या रीतीने शक्ति ग्रहण करीत असतात. योगी म्हणतात की मानसिक सामर्थ्याच्या द्वारें ते योगी शक्ति ग्रहण करीत असतात व सामान्य उपायांखेरीजहि ते हवी तेवढी शक्ति प्राप्त करूं शकतात. ज्याप्रमाणे कोळी आपल्या शरीरांतल्या पदार्थापासूनच आपलें जाळें विणतो, त्यांतच अडकून राहतो आणि त्या जाळ्यांतील धागे धरूनच इकडेतिकडे फिरूं शकतो, त्याचप्रमाणे आपण आपल्यांतच ज्ञान-तंतूंचें जाळें निर्माण करतों, व या ज्ञानतंतूंच्या मदतीनेच सगळीं कामें करीत असतों; योगी म्हणतात की आपण या ज्ञानतंतूंनी बद्ध होण्याचें कांही कारण नाही.

त्याचप्रमाणे आपण जगाच्या कोणत्याहि भागांत विद्युत्शक्ति पाठवूं शकतों, पण हें तारांच्या द्वारेंच करतां येईल. निसर्ग फार मोठा विद्युत्प्रवाह तारांशिवायच पाठवूं शकतो. आपणहि तसें कां करूं शक-णार नाही ? आपण मानस-विद्युत् एका जागेहून दुसऱ्या जागीं पाठवूं शकतों. आपण ज्याला 'मन' म्हणतों तें बहुतांशीं विजेसारखेंच असतें. आपल्या ज्ञानतंतूंत वाहणाऱ्या तरल द्रवांत बरीच विद्युत्शक्ति असते यांत शंका नाही, कारण विजेप्रमाणेच त्यांच्याहि दोन्ही टोकांस दोन

विरुद्ध शक्ति दिसून येतात आणि विजेचे इतरहि गुणधर्म त्यांत आढळतात. आपण आपली वीज या ज्ञानतंतूंच्या मार्गानें प्रवाहित करूं शकतों. पण या साधनाशिवायहि मानसिक वीज कां प्रवाहित करतां येऊं नये ? योगी म्हणतात की हें पूर्णपणें शक्य व व्यवहार्य आहे आणि जेव्हा तुम्ही हें करूं शकाल तेव्हा तुम्ही सर्व विश्वभर ती पाठविण्यास समर्थ व्हाल, तेव्हा तुम्ही ज्ञानतंतूंच्या मदतीशिवायच कोणत्याहि ठिकाणीं कोणत्याहि शरीराच्या द्वारें कार्य करूं शकाल. जेव्हा आत्मा या ज्ञानतंतूंमधून कार्य करीत असतो तेव्हा आपण म्हणतों की माणूस जिवंत आहे व जेव्हा हें कार्य बंद पडतें तेव्हा माणूस मेला असें आपण समजतों. पण जेव्हा माणूस या साधनांनी किंवा त्यांच्याशिवायहि सर्व कामें करण्यास समर्थ होतो तेव्हा जन्म, मृत्यु यांचा त्याच्या पक्षीं कांही अर्थ उरत नाही. विश्वांतलीं सर्व शरीरें तन्मात्रांपासून बनलीं आहेत. त्यांच्यांतले भेद हे तन्मात्रांच्या भिन्न भिन्न रचनांमुळेच आहेत. ज्याअर्थी तुम्हीच या रचनेचे कर्ते आहांत त्याअर्थी तुम्ही आपल्या इच्छेनुसार कसल्याहि शरीराची रचना करूं शकाल. हें शरीर तुम्ही नव्हे तर कोणीं तयार केलें आहे? कोण अन्न सेवन करतो ? जर तुमच्यासाठी तुमच्याऐवजी दुसरा कुणी जेवूं लागला तर तुम्ही जास्त दिवस जगणार नाही. अन्नापासून रक्त कोण तयार करतो ? तुम्हीच. कोण रक्त शुद्ध करून तें नसांतून खेळवतो ? तुम्हीच. आपण शरीराचे मालक आहोंत व आपण त्यांत राहतों. या शरीराचें पुनर्गठन कसें करावयाचें हें आपण विसरून गेलों आहोंत. आपण अवनत होऊन स्वयंचालित यंत्रासारखे झालों आहोंत. आपण शरीराच्या परमाणूंच्या रचनेची प्रक्रिया विसरून गेलों आहोंत. म्हणून जें कांही आज आपण यंत्रवत् करीत आहोंत तें समजून उमजून आपणांस करावें लागेल. आपण मालक आहोंत व आपणच या रचनेचें नियंत्रण केलें पाहिजे, आणि आपण असें करूं लागल्यावर वाटेल तेव्हा आपण शरीराची पुनर्घटना करूं शकूं आणि मग जन्म, रोग किंवा मृत्यु हे आपल्याला सतावणार नाहीत.

**सति मूले तद्विपाको जात्यायुर्भोगाः ॥१३॥**

**१३. सूत्रार्थः—जोंवर मनांत संस्काररूपी मूळ राहील तोंवर त्याचा परिणाम मनुष्य आदि विभिन्न योनि, कमी-जास्त आयुष्य व सुखदुःखांचा भोग यांच्या रूपानें होत राहील.**

स्पष्टीकरण:—संस्काररूपी मूळ वा कारण असेपर्यंत ते अभिव्यक्त होतातच व फल वा परिणाम उत्पन्न करतात. कारण नष्ट होऊन त्यांतून कार्य तयार होतें. मग हें कार्य सूक्ष्म झालें की पुढच्या कार्याचें तें कारण होतें. झाडापासून बिया उत्पन्न होतात व याच बिया दुसरीं झाडें उत्पन्न करतात. असाच हा क्रम चालतो. आताचीं आपलीं सर्व कर्में भूतकाळांतल्या संस्कारांचा परिणाम आहेत. फिरून हीं कर्में संस्काररूप झाल्यावर याच क्रमाने पुढच्या कर्मांचीं जनक होतील. याप्रमाणे कार्य-कारणाची ही मालिका चालू राहते, म्हणून हें सूत्र म्हणतें की कारण विद्यमान असेल तर त्यापासून फल वा कार्य उत्पन्न होईलच. प्रथम हें फल विभिन्न योनींच्या रूपांत प्रकट होतें. कोणी माणूस होईल, तर कोणी देवता; कोणी पशु होईल तर कोणी राक्षस. तसेंच हें कर्म आयुष्याचेंहि नियमन करतें. एखादा माणूस पन्नास वर्षें जगतो तर दुसरा शंभर वर्षें. आणि एखादा तर दोनच वर्षांत मरतो. आयुष्याचे हे सर्व भेद भूतकाळांतील कर्मांनें नियंत्रित होतात. एखादा माणूस जणुकांही सुखासाठीच जन्माला येतो. तो जंगलांत दडून राहिला तरी सुख त्याचा पाठलाग करीत तेथे जातें. दुसरा माणूस, तो मग कुठेहि जावो, दुःख त्याचा पिच्छा सोडीत नाही; त्याच्या पक्षीं प्रत्येक गोष्ट दुःखकारकच ठरते. हें ज्याच्या त्याच्या पूर्वकर्माचें फल आहे. योग्यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे सर्व सत्कर्मांपासून सुख व सर्व असत्कर्मांपासून दुःख निर्माण होत असतें. वाईट कर्में करणाऱ्या माणसाला त्यांचीं दुःखरूप फळें भोगावीं लागणारच.

**ते ल्हादपरितापफलाः पुण्यापुण्यहेतुत्वात् ॥१४॥**

**१४. सूत्रार्थ:—तीं (योनि, आयुष्य व भोग) हर्ष व शोकरूप फल देतात, कारण पुण्यकर्म व पापकर्म हें त्यांचें कारण आहे.**

**परिणामतापसंस्कारदुःखैर्गुणवृत्तिविरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेकिनः ॥१५॥**

**१५. सूत्रार्थ:—सारेंकांही परिणामीं दुःखच देतें, भोगाच्या वेळीं भोगांत विघ्न निर्माण होईल की काय या आशंकेने दुःख उत्पन्न होतें, सुखाच्या संस्कारापासून तृष्णारूपी दुःख उत्पन्न होतें आणि सत्त्व, रज व तम या गुणांमधे परस्पर विरोध असतो म्हणून विवेकी पुरुषाला सर्वकांही दुःखरूपच वाटतें.**

स्पष्टीकरणः——योगी म्हणतात की जो माणूस सारासार विचार करूं शकतो व ज्याच्या ठायीं थोडी अंतर्दृष्टि आहे त्याला सुखाचें व दुःखाचें खरें स्वरूप कळत असतें, व त्याला माहीत असतें की प्रत्येकाच्या जीवनांत सुखदुःखें येतातच आणि तीं एकामागून एक अशीं येत असतात व एकमेकांत तीं जणु गुंतलेलीं असतात. तो हेंहि जाणतो की माणूस हा जन्मभर मृगजळामागे लागलेला असतो व त्याच्या सर्व इच्छा कधीच पूर्ण होत नाहीत. महाराज युधिष्ठिर एकदा म्हणाले होते की, सर्वांत आश्चर्यकारक गोष्ट ही आहे की आपण इतर माणसें मरत असलेलीं नेहमी पाहतों तरी पण आपण मरणार नाहीं असेंच आपल्याला वाटत असतें. चोहो बाजूंनी मूर्खांनी वेढलेलों असूनहि आपण समजतों की आपणच फक्त त्यांतील अपवादभूत शहाणीं माणसें आहोंत. क्षणभंगुरतेचें विविध अनुभव येत असतांनाहि आपण समजतों की आपलेंच प्रेम शाश्वत आहे. हें कसें शक्य आहे ? प्रेम देखील स्वार्थी असतें. योगी म्हणतात की शेवटीं असें दिसून येतें की पतिपत्नींचें प्रेम किंवा मुलें व मित्र यांवरील प्रेम देखील क्षीण होत जातें. जीवनांतील प्रत्येक गोष्ट जीर्ण होते. म्हणून जेव्हा सर्वच गोष्टींत——प्रेमांत देखील——माणूस निराश होतो तेव्हा एकाएकी आश्चर्य वाटून त्याला जाणवतें की हें जग किती पोकळ, किती स्वप्नवत् आहे. तेव्हा त्याला वैराग्याचा थोडासा अनुभव येतो व विश्वापलीकडील सत्तेचें ओझरतें दर्शन होतें. हें विश्व टाकून दिल्यावरच पारलौकिक तत्त्व हृदयांत उद्भासित होतें, याच विश्वाला चिकटून राहिल्याने नव्हे. असा कोणी महापुरुष आजपर्यंत निपजला नाही की ज्याला मोठेंपण प्राप्त करण्यासाठी इंद्रियसुखें सोडावीं लागलीं नाहीत. विभिन्न प्राकृतिक शक्तींमधील (सत्त्व-रज-तमांमधील) संघर्षच दुःखाचें कारण आहे. एक शक्ति मानवाला एकीकडे ओढते, तर दुसरी दुसरीकडे; आणि त्यामुळे शाश्वत सुख हें अप्राप्य होऊन बसतें.

**हेयं दुःखमनागतम् ॥१६॥**

१६. **सूत्रार्थः—— जें दुःख अजून उत्पन्न झालें नाही तें टाळलें पाहिजे.**

स्पष्टीकरणः——कांही कर्मे आपण भोगलीं आहेत, कांही वर्तमानकाळांत आपण भोगीत आहोंत, आणि कांही भविष्यकाळांत भोगाची वाट पाहत आहेत. यांतलें पहिलें कर्म होऊन गेलें आहे. दुसरें आप-

त्याला भोगावयाचें आहे, आणि जें कर्म भविष्यकाळांत फल प्रसविणार आहे तेंच आपण जिंकूं व आवरूं शकतों. म्हणून या दिशेनेच आपण आपल्या सर्व शक्ति वळविल्या पाहिजेत. पतंजलि जें म्हणतात की सर्व संस्कारांचें कारणावस्थेंत विलीनीकरण करून त्यांचें नियंत्रण करावें, त्याचा हाच अर्थ आहे.

**द्रष्टृदृश्ययोः संयोगो हेयहेतुः ॥१७॥**

१७. **सूत्रार्थः--आपण टाळावयाच्या या भावी दुःखाचें कारण द्रष्टा व दृश्य यांचा संयोग हें होय.**

स्पष्टीकरणः--द्रष्टा कोण?--माणसाचा आत्मा, पुरुष. दृश्य काय?--मनापासून तों स्थूल द्रव्यापर्यंत सर्व विश्व. सर्व सुखदुःखें या पुरुषाच्या व मनाच्या संयोगापासून उत्पन्न होतात. तुम्हीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे की या योगदर्शनानुसार पुरुष हा शुद्ध आहे. तो जेव्हा प्रकृतीशीं संयुक्त होतो आणि प्रकृतींत प्रतिबिंबित होतो तेव्हा तो सुखदुःखांचा अनुभव घेत असल्यासारखा भासतो.

**प्रकाशक्रियास्थितिशीलं भूतेन्द्रियात्मकं भोगापवर्गार्थं दृश्यम् ॥१८॥**

१८. **सूत्रार्थः--प्रकाश, क्रिया व जडता हा ज्याचा स्वभाव आहे, भूतें व इंद्रियें हें ज्याचें (प्रकट) स्वरूप आहे, जें (पुरुषाच्या) भोग व मुक्ति यांसाठीच आहे त्याला दृश्य म्हणतात.**

स्पष्टीकरणः--दृश्य अथवा प्रकृति म्हणजे भूतें (सूक्ष्म व स्थूल भूतें) आणि इंद्रियें (ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, मन वगैरे) यांची समष्टि होय. आणि प्रकाश (सत्त्व), क्रिया (रज) आणि जडता (तम) हे तिचे गुण आहेत. संपूर्ण प्रकृतीचें उद्दिष्ट काय असतें?--पुरुषाला अनुभव मिळावा आणि त्याने अभिज्ञ व्हावें हें. पुरुष आपलें महान्, दैवी स्वरूप जणुकांही विसरून गेला आहे. यासंबंधी एक गोष्ट सांगतात की देवांचा राजा इंद्र एकदा शूकर (डुक्कर) होऊन गटारांत लोळूं लागला. त्याची एक शूकरी होती, त्याला अनेक पिलें होतीं व तो फार सुखी होता. कांही देवांनी इंद्राची ही दुर्दशा पाहिली व त्याच्याकडे जाऊन ते त्याला म्हणाले, "आपण देवांचे राजे आहांत, सर्व देव आपल्या अधिकारांत आहेत, आपण येथे कसे?" पण इंद्र म्हणाला, "तुम्ही काळजी करूं नका. मी इथे फार

सुखांत आहें. शूकरी व हीं पिलें माझ्याजवळ असेपर्यंत मला स्वर्गाची देखील पर्वा नाही." गरीब बिचारे देव किंकर्तव्यमूढ होऊन गेले. कांही काळानंतर त्यांनी सर्व पिलें मारण्याचें ठरविलें. जेव्हा शूकरी व सगळीं पिलें मरून गेलीं तेव्हा इंद्र शोक करूं लागला. तेव्हा देवांनी त्याचें डुकराचें शरीर कापून टाकल्याबरोबर इंद्र त्यांतून हसत हसत बाहेर पडला. त्या वेळीं त्याला ज्ञान झालें की तो किती हिडीस असें स्वप्न पाहत होता. हा देवांचा राजा डुक्कर व्हावा व त्याने डुकराचें जीवनच सर्वश्रेष्ठ समजावें, इतकेंच नव्हे तर सगळ्या जगाने डुकराचा देह धारण करावा असेंहि त्याला वाटावें हें केवढें आश्चर्य आहे ! याचप्रमाणे जेव्हा पुरुष स्वतःला प्रकृतीशीं एकरूप करून टाकतो तेव्हा तो विसरून जातो की तो शुद्ध व अनंतस्वरूप आहे. पुरुष प्रेम करणारा नसून तो प्रेमस्वरूपच असतो. तो अस्तित्ववान् नसून अस्तित्वस्वरूपच आहे. तो ज्ञाता नसून ज्ञानस्वरूपच आहे. आत्मा प्रेम करतो, तो असतो, तो जाणतो, असें म्हणणें चूक आहे. प्रेम, अस्तित्व आणि ज्ञान पुरुषाचे गुण नसून त्याचें तें स्वरूपच आहे. जेव्हा ते एखाद्या वस्तूंत प्रतिबिंबित होतात तेव्हा तुम्ही त्यांना त्या वस्तूचे गुण म्हणूं शकतां. ते आत्म्याचे गुण नसून या अनंत, अजरामर व स्वयंप्रकाश परमात्मरूप पुरुषाचें तें स्वरूपच आहे. पण हा आत्मा इतका पतित झाल्यासारखा वाटतो की तुम्ही जर त्याच्या जवळ जाऊन म्हणाल की 'तूं डुक्कर नाहीस,' तर तो ओरडूं व चावूं लागतो!

या मायेंत, या स्वप्नविश्वांत आपली देखील अशीच दशा झाली आहे. इथे आहे केवळ रुदन, दुःख, हाहाकार ! इथे कांही सुवर्णपिंड पडलेले पाहून ते मिळविण्यासाठी सगळे झटापट करीत असतात. तुम्ही कधीच नियमांनी बद्ध नव्हतां, प्रकृतीने तुम्हांला कधीच बांधलें नव्हतें. योगी तुम्हांला हेंच सांगतात. शांतपणें हें समजून घ्या. तसेंच योगी तुम्हांला दाखवून देतात की प्रकृतीशीं संयुक्त झाल्याने, मन आणि विश्व यांच्याशीं तादात्म्य पावल्याने पुरुष स्वतःला कसा दुःखी समजूं लागतो. नंतर ते तुम्हांला सांगतात की अनुभवानेच यांतून वाट काढतां येऊं शकते. हा सर्व अनुभव तुम्हीं मिळविला पाहिजे. पण हें सर्व लवकर आटोपलें पाहिजे. आपण स्वतःला या जाळ्यांत अडकवून घेतलें आहे, आता यांतून आपण सुटलें पाहिजे. या पिंजऱ्यांत आपण सापडलों

आहोंत. आता आपण आपलें स्वातंत्र्य मिळविलें पाहिजे. म्हणून पति, पत्नी, मित्र इत्यादिकांच्या क्षुद्र प्रेमांचे सर्व अनुभव प्राप्त करून घ्या. जर तुम्हांला आपल्या स्वरूपाचें सर्वदा स्मरण राहील तर तुम्ही या सगळयांतून अनायासें पार पडाल. हें कधीच विसरूं नका की ही एक तात्पुरती अवस्था आहे व हिच्यांतून तुम्हांला पार पडावयाचें आहे. अनुभव--सुखदु:खांचा अनुभव--हा सर्वांत मोठा शिक्षक आहे. पण हें लक्षांत असूं द्या की हे अनुभव म्हणजे मार्गांतील केवळ तात्पुरत्या घटना आहेत. हे अनुभव आपल्याला पायरीपायरीने अशा स्थितीप्रत पोहोचवितात की जिथे सगळें कांही क्षुद्र वाटूं लागतें आणि पुरुष इतका मोठा असल्याचें प्रत्ययास येतें की त्याच्यापुढे सगळें जग महासागरांतील एखाद्या थेंबाप्रमाणे दिसूं लागतें व आपल्या क्षुद्रत्वानेच तें गळून पडतें. आपल्याला अनेक अनुभवांतून जावयाचें आहे, पण हा उद्देश आपण कधीच विसरतां कामा नये.

**विशेषाविशेषलिंगमात्रालिंगानि गुणपर्वाणि ।।१९।।**

१९. **सूत्रार्थ:--स्फुट (भूतेंद्रियें), अस्फुट (तन्मात्रा, अस्मिता), केवळ निर्दिष्ट (महत्), आणि अनिर्देश्य (प्रकृति) या चार सत्त्वादि गुणांच्या अवस्था होत.**

स्पष्टीकरण:--योगदर्शन हें पूर्णपणें सांख्यतत्त्वज्ञानावर उभारलें आहे हें मीं पूर्वीच सांगितलें आहे आणि फिरून येथे तुम्हांला सांख्यांच्या सृष्टिक्रमाची आठवण करून देतों. सांख्यांच्या मतें प्रकृति ही विश्वाचें उपादान व निमित्त कारण दोन्ही आहे. प्रकृति ही तीन प्रकारच्या घटकांची बनलेली आहे--सत्त्व, रज आणि तम. जें कांही अंधकारमय, अज्ञानमय व जड आहे तें तमोरूप आहे. रज हें क्रियात्मक आहे. सत्त्व हें शांत आणि प्रकाशात्मक आहे. सृष्टीच्या पूर्वी प्रकृति अव्यक्त, अस्फुट किंवा अविशिष्ट असते. याचा अर्थ असा की प्रकृतींत त्या अवस्थेंत नामरूपात्मक भेद नसतो. ही स्थिति अशी असते की जिच्यांत वरील तिन्ही घटक पूर्णपणें समतोल अवस्थेंत असतात. नंतर हा समतोलपणा भंग पावतो, हे तीन घटक वेगवेगळ्या प्रकारें एकमेकांत मिसळूं लागतात आणि त्याचा परिणाम म्हणजेच हें विश्व. प्रत्येक माणसांत देखील हे तीन घटक विद्यमान असतात. जेव्हा सत्त्व वरचढ होतें तेव्हा ज्ञान

उत्पन्न होतें. रज वरचढ झाल्यास क्रिया, व तम वरचढ झाल्यास अंधकार, आलस्य व अज्ञान हीं उत्पन्न होतात. सांख्य सिद्धान्ताप्रमाणे त्रिगुणमयी प्रकृतीचें सर्वोच्च व्यक्त रूप आहे महत् किंवा बुद्धितत्त्व. यालाच सर्वव्यापी बुद्धितत्त्व म्हणतात. प्रत्येक माणसाची बुद्धि या सर्वव्यापी बुद्धितत्त्वाचाच एक अंश आहे. सांख्यांच्या मानसशास्त्रानुसार मन व बुद्धि यांच्यांत अगदी स्पष्ट भेद केलेला असतो. मनाचें कार्य केवळ संवेदना एकत्र करणें व बुद्धीपुढे म्हणजेच व्यष्टि वा व्यक्तिगत महत्पुढे त्या मांडणें हेंच आहे. मग ही बुद्धि त्यांचें निर्धारण करते--निश्चय करते. महत्पासून अहंतत्त्व उत्पन्न होतें व अहंतत्त्वापासून सूक्ष्म भूतें निर्माण होतात. सूक्ष्म भूतें परस्पर संयुक्त होऊन स्थूल भूतांत परिणत होतात आणि त्यांपासूनच या स्थूल विश्वाची उत्पत्ति होते. सांख्यदर्शनाचें म्हणणें आहे की बुद्धीपासून तों दगडाच्या एखाद्या तुकड्यापर्यंत सर्वकांही एकाच पदार्थापासून उद्भूत झालें असून त्यांच्यांत सूक्ष्म व स्थूल हाच काय तो अवस्थाभेद असतो. सूक्ष्म हें कारण व स्थूल हें कार्य असतें. सांख्य तत्त्वज्ञानाप्रमाणे पुरुष हा समग्र प्रकृतीच्या पलीकडे असून तो जड नसतो. पुरुष हा बुद्धि, मन, तन्मात्रा किंवा स्थूल भूतें यांपैकी एकासारखाहि नसतो. तो अगदी वेगळा व वेगळ्या स्वभावाचा असतो आणि यावरून सांख्य असा निष्कर्ष काढतात की पुरुष हा अविनाशी असला पाहिजे, कारण तो कोणत्याहि प्रकारच्या मिश्रणापासून उत्पन्न झालेला नाही. जें मिश्रणापासून उत्पन्न झालेलें नाही तें नष्ट होऊं शकत नाही. या पुरुषांची किंवा आत्म्यांची संख्या अनंत आहे.

आता आपण 'गुणाच्या अवस्था स्फुट, अस्फुट, केवळ निर्दिष्ट आणि अनिर्देश्य अशा असतात' या सूत्राचा अर्थ समजूं शकूं. 'स्फुट' याचा अर्थ 'स्थूल पदार्थ--जे आपण इंद्रियांच्या द्वारें अनुभवतों ते' असा आहे. 'अस्फुट' याचा अर्थ आहे सूक्ष्म पदार्थ किंवा तन्मात्रा--ज्या सामान्य माणसांना दिसूं शकत नाहीत. पतंजलि म्हणतात की जर तुम्ही योगाभ्यास कराल तर कांही काळानंतर तुमचें प्रत्यक्षज्ञान इतकें सूक्ष्मग्राही होईल की तुम्हांला खरोखरच या तन्मात्रा दिसतील. उदाहरणार्थ तुम्हीं ऐकलें असेल की प्रत्येक माणसाभोवती एकप्रकारचा प्रकाश असतो, प्रत्येक चेतन प्राण्यापासून एकप्रकारचा प्रकाश निघतो व हा

प्रकाश योग्यांना दिसतो. आपणां सगळ्यांना हा प्रकाश दिसत नाही, पण ज्याप्रमाणे फुलांतून सर्वदा अत्यंत सूक्ष्म परमाणूंच्या रूपाने तन्मात्रा बाहेर पडत असतात आणि त्यांच्यामुळे आपल्याला त्या फुलांचा वास येतो त्याचप्रमाणे आपण सगळेच तन्मात्रा बाहेर टाकीत असतों. प्रतिदिन आपण कितीतरी शुभ वा अशुभ शक्ति बाहेर टाकीत असतों आणि जिथे जिथे आपण जातों तेथील वातावरण या तन्मात्रांनी भरून जातें. अशा तऱ्हेनेच मानवी मनांत नकळत देवळें व प्रार्थनागृहें बांधण्याची कल्पना आली. ईश्वराची पूजा करण्यासाठी माणसाने प्रार्थनागृहें कां बांधावींत ? वाटेल तिथे त्याने ईश्वराची उपासना कां करूं नये ? याचें कारण त्याला माहीत नसलें तरी त्याला एवढें मात्र कळून आलें की ज्या जागीं लोक ईश्वराची आराधना करतात ती जागा चांगल्या तन्मात्रांनी भरून जात असते. लोक रोज तेथे जातात. आणि जितके ते तेथे जातात तितकेच ते जास्त पवित्र होतात व ती जागाहि तितकीच जास्त पवित्र होते. जर एखादा फारसा सत्त्वगुणी नसलेला माणूस तेथे जाईल तर ती जागा त्याला प्रभावित करील व त्याच्यांतील सत्त्वगुण जागृत करील. म्हणूनच या पवित्र स्थानांचें, देवळें इत्यादिकांचें महत्त्व आहे. पण तुम्हीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे की पवित्र स्थानाचें पावित्र्य हें पवित्र माणसें तेथे एकत्रित होण्यावर अवलंबून आहे. पण मानवाचा हा एक दोषच आहे की तो कोणत्याहि गोष्टीचा मुळांतला अर्थ विसरून जातो व कार्य-कारणाची उलटापालट करूं लागतो. माणसांनीच हीं स्थानें पवित्र बनविलीं आणि मग मानवी कृतींचीं हीं कार्यें स्वत: कारण बनून त्यांनी मानवांना पवित्र केलें. जर दुष्ट लोकच तेथे जात असते तर ह्या जागाहि इतर जागांसारख्याच वाईट झाल्या असत्या. इमारतीमुळे प्रार्थनागृह बनत नसून माणसामुळेच तें बनतें, पण नेमकी हीच गोष्ट आपण विसरतों. म्हणूनच ज्यांच्यांत सत्त्वगुणाचें आधिक्य आहे अशा सज्जन व पवित्र व्यक्ति हा सत्त्वगुण चोहोकडे पसरवूं शकतात व त्यांच्या द्वारें भोवतालच्या लोकांवर फार मोठा प्रभाव पाडूं शकतात. एखादा माणूस इतका शुद्ध असूं शकतो की त्याची शुद्धता इतरांना प्रत्यक्ष अनुभवास येते. जो कोणी त्याच्या संपर्कांत येतो तो शुद्ध होऊन जातो.

'केवळ निर्दिष्ट' याचा अर्थ 'बुद्धि' (महत्तत्त्व) असा आहे. 'केवळ निर्दिष्ट' ही प्रकृतीची पहिली अभिव्यक्ति आहे. तिच्यापासून इतर सर्व अभिव्यक्ति होत असतात. गुणाची शेवटची अवस्था आहे 'अनिर्देश्य' (चिन्हरहित). या बाबतींत सर्व धर्म व आधुनिक विज्ञान यांमधे फार मोठा फरक दिसून येतो. प्रत्येक धर्मांत हें सामान्य सत्य सांगितलेलें आढळून येतें की जग हें चैतन्यापासून उत्पन्न झालें आहे. ईश्वरासंबंधीची साकारतेची कल्पना वगळून ईश्वराचा फक्त मानसशास्त्रीय अर्थ घेतला तर सृष्टिक्रमांत चैतन्य हें सर्वप्रथम आहे व चैतन्यापासूनच स्थूल भूतें प्रकट झालीं आहेत. आधुनिक तत्त्वज्ञ म्हणतात की चैतन्य सगळयांत शेवटीं उत्पन्न होतें. ते म्हणतात की अचेतन जड वस्तु हळूहळू चेतन प्राण्यांत क्रमविकसित होतात, व चेतन प्राण्यांचा विकास मानवांत होतो. त्यांचें मत आहे की चैतन्यांतून सर्व वस्तु उत्पन्न होण्याच्या ऐवजी चैतन्यच सगळयांच्या शेवटीं निर्माण होतें. तरी पण धार्मिक व वैज्ञानिक विधानें वरकरणीं एकमेकांच्या अगदी विरुद्ध वाटलीं तरी तीं दोन्हीं खरींच आहेत. एक अनंत श्रेणी वा शृंखला घ्या. क-ख-क-ख-क-ख इ०. आता प्रश्न असा की या श्रेणीचें पहिलें पद कोणतें ?—क की ख ? जर तुम्ही क–ख अशी श्रेणी घ्याल तर तुम्ही म्हणाल की क पहिला आहे; पण जर तुम्ही ख–क अशी श्रेणी घ्याल तर तुम्हांला ख पहिला मानावा लागेल. तुमच्या यासंबंधीच्या दृष्टिकोनावर ही सर्व गोष्ट अवलंबून आहे. चैतन्य हें अनुलोमपरिणामास प्राप्त होऊन स्थूल भूतांचा आकार धारण करतें आणि स्थूल भूतें मग विलोमपरिणामाच्या द्वारें चैतन्यांत परिणत होतात; याप्रमाणे हा सारा क्रम चालू असतो. सांख्य आणि अन्य धर्मांचे आचार्य चैतन्यालाच पहिलें स्थान देतात. त्यामुळे चैतन्य व नंतर भूतें—याप्रमाणे ही श्रेणी आपल्या निदर्शनास येते. वैज्ञानिक हे जड भूतांना पहिलें स्थान देतात व म्हणतात की प्रथम भूतें आणि नंतर चैतन्य. पण ते दोघेहि वास्तविक पाहतां एकाच श्रेणीसंबंधी बोलत असतात. परंतु भारतीय तत्त्वज्ञान चैतन्य व भूतें या दोघांच्याहि पलीकडे जाऊन, ज्ञानापलीकडच्या पुरुषाचा किंवा आत्म्याचा साक्षात्कार करून घेतें. हें ज्ञान म्हणजे त्या ज्ञानस्वरूप आत्म्यापासून प्राप्त झालेल्या प्रकाशासारखें आहे.

**द्रष्टा दृशिमात्रः शुद्धोऽपि प्रत्ययानुपश्यः ॥२०॥**

**२०. सूत्रार्थः—द्रष्टा केवळ चैतन्य आहे. जरी तो स्वतः शुद्धस्वरूप आहे तरी तो बुद्धीमधून पाहत असतो.**

स्पष्टीकरणः—हें देखील सांख्यतत्त्वज्ञानच आहे. आपण याच तत्त्वज्ञानांत पाहिलें की अगदी क्षुद्र वस्तूपासून तों बुद्धीपर्यंत सगळेंकांही प्रकृतीच्या अंतर्गत आहे. प्रकृतीपलीकडे पुरुष (आत्मे) असून ते गुण-रहित असतात. मग आत्मा सुखी किंवा दुःखी कसा भासतो ?—प्रति-बिंबामुळे. जर एखाद्या शुभ्र स्फटिकापुढे लाल फूल ठेवलें तर स्फटिकहि जसा लाल दिसेल तशींच आत्म्याचीं सुखदुःखें हीं प्रतिबिंबरूपच आहेत. आत्मा स्वतः रंगरहित आहे. आत्मा प्रकृतीहून निराळा आहे. प्रकृति निराळी व आत्मा निराळा, तो तिच्याहून सदाच वेगळा असतो. सांख्य-तत्त्वज्ञान म्हणतें की ज्ञान ही एक मिश्र वस्तु आहे, तें वाढतें व कमी होतें. ज्याप्रमाणे शरीर बदलतें त्याप्रमाणे ज्ञानहि बदलत असतें आणि त्याचे गुणधर्म शरीरासारखेच असतात. ज्याप्रमाणे शरीर व नखें यांचा संबंध असतो त्याचप्रमाणे ज्ञान व शरीर यांचा संबंध आहे. नखें शरीराचाच भाग आहेत, पण तीं शेकडोवेळां कापल्यानंतरहि शरीर कायमच राहतें. त्याचप्रमाणे ज्ञान युगानुयुगें कायम राहिलें तरी हें शरीर नष्ट होऊं शकतें, फेकून दिलें जाऊं शकतें. पण ज्ञान हें अविनाशी असूं शकत नाही, कारण तें बदलतें, कमी किंवा जास्त होतें. जें बदल-णारें आहे तें अविनाशी असूं शकत नाही. खरोखरीच ज्ञान हा एक सृष्ट पदार्थ आहे आणि यावरूनच दिसून येतें की ज्ञानाच्या पलीकडे ज्ञानाहून श्रेष्ठ असा पदार्थ असला पाहिजे. ज्ञान हें मुक्त असूं शकत नाही. जें जें भूतांशीं वा द्रव्याशीं संश्लिष्ट आहे तें प्रकृतीच्या अंतर्गत आहे, म्हणून तें नेहमीच बद्ध असतें. मग मुक्त काय असतें ? जें मुक्त असतें तें कार्य-कारणांच्या पलीकडचें असलें पाहिजे. जर तुम्ही म्हणाल की मुक्तीची कल्पना हा भ्रम आहे, तर मी म्हणेन की बंधनाची कल्पनाहि भ्रमच आहे. या दोन्ही गोष्टी ज्ञानाच्या क्षेत्रांत येतात व म्हणून त्या दोन्ही सारख्याच खऱ्या किंवा खोट्या असल्या पाहिजेत. या दोन्ही गोष्टी परस्परांच्या आश्रित आहेत, म्हणून त्यांच्यापैकी एक नाहीशी झाल्यास दुसरीहि नाहीशी होईल. या दोन गोष्टींपैकी एक गोष्ट

वा भाव हा आहे की आपण बद्ध आहोंत. समजा आपल्या मनांत इच्छा निर्माण झाली की आपण या भितींतून पलीकडे जाऊं. आपण तसा प्रयत्न करतों आणि आपलें डोकें भितीवर आपटतें. तेव्हा आपल्याला दिसून येतें की आपण त्या भितीमुळे मर्यादित आहोंत, आपण सीमाबद्ध आहोंत. पण याबरोबरच आपल्याला हाहि अनुभव गेतो की आपल्या ठायीं एक इच्छाशक्ति आहे आणि आपल्याला वाटत असतें की आपण तिचा वाटेल त्या ठिकाणीं प्रयोग करूं शकतों. पदोपदीं हे दोन विरोधी भाव आपल्यासमोर उपस्थित होत असतात. आपला विश्वास असतो की आपण मुक्त आहोंत, पण इकडे प्रतिक्षणीं आपल्याला अनुभव मात्र येत असतो की आपण मुक्त नाहीं. या दोन भावांपैकी एक जर भ्रमात्मक असेल तर दुसराहि भ्रमात्मक ठरेल आणि त्यांच्यापैकी एक जर सत्य असेल तर दुसराहि सत्य ठरेल, कारण हे दोन्ही भाव अनुभवरूपी एकाच पायावर आधारित आहेत. योगी म्हणतात की हे दोन्ही भाव खरे आहेत. बुद्धीचा संबंध आहे तोंवर आपण बद्ध आहोंत, पण आत्म्याच्या दृष्टीने मुक्त आहोंत. मनुष्याचें यथार्थ स्वरूप म्हणजेच आत्मा किंवा पुरुष हा कार्य-कारणशृंखलेच्या पलीकडे आहे. आत्म्याचा हा मुक्तस्वभावच भूतांच्या विभिन्न स्तरांतून--बुद्धि, मन आदि नाना रूपांतून प्रकट होत आहे. बुद्धीला स्वतःचा प्रकाश नसतो. मेंदूमधे प्रत्येक इंद्रियाचें एक विशिष्ट केंद्र असतें. याचा अर्थ असा नव्हे की सगळचा इंद्रियांचें एकच केंद्र असतें. प्रत्येक इंद्रियाचें केंद्र वेगवेगळें असतें. तर मग आपल्या भिन्न भिन्न अनुभवांमधे एकता कुठून येते ? ही जर मेंदूंत असती तर सर्व इंद्रियांचें—डोळे, नाक कान इत्यादिकांचें एकच केंद्र असतें. पण आपल्याला निश्चितपणें माहीत आहे की सर्वांचीं वेगवेगळीं केंद्रें आहेत. तरी पण माणूस एकाच वेळीं पाहूं व ऐकूं शकतो, म्हणून बुद्धीच्या मागे एकत्व असलेंच पाहिजे. बुद्धि ही मेंदूशीं संबद्ध आहे, पण बुद्धीच्याहि मागे पुरुष विद्यमान आहे आणि तोच एकत्वस्वरूप आहे. त्याच्याचपाशी जाऊन हे सर्व अनुभव एकीकृत होतात. तिथेच सर्व संवेदना एकीभूत होतात. आत्मा मुक्तस्वभाव आहे आणि त्याचा हा मुक्तस्वभावच तुमच्यांत प्रतिक्षणीं मुक्तीची जाणीव उत्पन्न करतो. पण चुकीने तुम्ही मुक्तस्वभावाचा

बुद्धीशीं व मनाशीं संबंध जोडतां. तुम्ही हा मुक्त स्वभाव बुद्धीवर आरोपित करूं इच्छितां आणि ताबडतोब तुम्हांला कळून येतें की बुद्धि ही मुक्त नाही. तसेंच शरीरावर तुम्ही मुक्तस्वभावाचा आरोप करूं पाहतां आणि तात्काळ प्रकृति तुम्हांला तुमची चूक दाखवून देते. म्हणूनच मुक्ति व बंधन यांची एकाच वेळीं संमिश्र अनुभूति तुम्हांला होत असते. योगी मुक्ति व बंधन या दोहोंचेंहि विश्लेषण करतात. त्यामुळे त्यांचें अज्ञान नाहीसें होतें. त्यांना कळतें की पुरुष हा स्वतंत्र आहे, मुक्तस्वभाव आहे, ज्ञानघन आहे; तो बुद्धिरूपी उपाधीमधून सान्त-ज्ञानाच्या रूपांत प्रकट होत असतो आणि याच दृष्टीने तो बद्ध आहे.

**तदर्थ एव दृश्यस्यात्मा ॥२१॥**

**२१. सूत्रार्थः—दृश्याचें स्वरूप त्याच्यासाठीच आहे.**

स्पष्टीकरणः—प्रकृतीला आपला स्वतःचा प्रकाश नाही. जोंपर्यंत पुरुष तिच्याजवळ उपस्थित आहे तोंपर्यंत ती प्रकाशमय दिसते. पण हा प्रकाश उसना आहे. ज्याप्रमाणे चंद्राचा प्रकाश हा सूर्यापासून घेतलेला असतो त्याप्रमाणे प्रकृतीमधील प्रकाश हा पुरुषापासून प्राप्त झालेला असतो. योग्यांच्या मतें सारें व्यक्त जगत् प्रकृतीपासूनच उत्पन्न झालें आहे, पण पुरुषाला मुक्त करण्याशिवाय प्रकृतीचें दुसरें कोणतेंहि प्रयोजन नाही.

**कृतार्थं प्रति नष्टमप्यनष्टं तदन्यसाधारणत्वात् ॥२२॥**

**२२. सूत्रार्थः—ज्याने ध्येय (परमपद) गाठलें त्याच्या दृष्टीने प्रकृति नष्ट झाली असली तरी इतरांसाठी ती कार्य करीत असल्यामुळे नष्ट झालेली नसते.**

स्पष्टीकरणः— प्रकृतीचें सर्व कार्य हें आत्म्यांत 'मी प्रकृतीहून अगदी वेगळा आहें' अशी जाणीव उत्पन्न करण्यासाठीच आहे. जेव्हा आत्म्याला हें ज्ञान होतें तेव्हा प्रकृतीविषयी त्याला आकर्षण वाटेनासें होतें. पण जो मुक्त झाला आहे त्याच्या दृष्टीनेच प्रकृतीचा पूर्ण विनाश होतो. पण दुसरे असे असंख्य लोक शिल्लक राहतीलच की ज्यांच्यासाठी प्रकृति कार्य करीत राहील.

**स्वस्वामिशक्त्योः स्वरूपोपलब्धिहेतुः संयोगः ॥२३॥**

**२३. सूत्रार्थः—दृश्य (प्रकृति) व त्याचा अधिपति द्रष्टा पुरुष या दोहोंच्या शक्तींच्या स्वरूपाच्या उपलब्धीचें कारण 'संयोग' हें आहे.**

स्पष्टीकरण:—या सूत्राप्रमाणे आत्मा व प्रकृति या दोघांच्या शक्ति (द्रष्टृत्व व दृश्यत्व) ते दोघे परस्पर संयुक्त असतांना प्रकट होतात. तेव्हा सर्व जगत्प्रपंच विकास पावतो. अज्ञान या संयोगाचें कारण आहे. आपण नेहमीच पाहतों की आपल्या सुखदु:खाचें कारण म्हणजे शरीराशीं आपला संयोग हेंच होय. जर माझा पूर्ण निश्चय होईल की मी हें शरीर नाहीं तर उष्णता, थंडी किंवा यांसारख्या इतर गोष्टींची मी पर्वा करणार नाहीं. हें शरीर समुच्चयात्मक आहे. माझें शरीर एक आहे, तुमचें दुसरें आहे व सूर्याचें तिसरेंच आहे असें म्हणणें काल्पनिक आहे. संपूर्ण विश्व म्हणजे एका जडद्रव्याचा महासागर आहे आणि तुम्ही या सागरांतील एक लहान बिंदु आहांत, मी एक दुसरा बिंदु आहे आणि सूर्य हा तिसरा बिंदु आहे. आपण जाणतों की हें द्रव्य सारखें भिन्न भिन्न रूपें धारण करीत असतें. आज जें सूर्याचें घटकद्रव्य आहे तेंच उद्या आपल्या शरीराचें घटकद्रव्य होऊं शकतें.

**तस्य हेतुरविद्या ॥२४॥**

२४. **सूत्रार्थ:—अज्ञान हें त्या संयोगाचें कारण आहे.**

स्पष्टीकरण:—अज्ञानामुळे आपण स्वत:ला एका विशिष्ट शरीराशीं बांधून घेतलें आहे आणि स्वत:ला दु:खांत लोटून घेतलें आहे. शरीराची ही कल्पना एक खुळचट समजूत वा भ्रम आहे. त्यामुळेच आपण सुखी किंवा दु:खी होतों. अज्ञाननिर्मित खुळचट समजुतीमुळेच आपण उष्णता व थंडी, दु:ख किंवा सुख ह्या गोष्टी अनुभवतों. ही समजूत दूर करणें हें आपलें कर्तव्य आहे, आणि योगी हें कसें करावें हें आपल्याला दाखवून देतो. मनाच्या एका विशिष्ट अवस्थेंत देहबोध मुळीच उरत नाही—त्या वेळीं शरीर जळत जरी असलें तरी त्याला दु:खाचा अनुभव येत नाही. ही गोष्ट सिद्ध केली गेली आहे. पण येथे अडचण अशी आहे की मनाची ही उच्चावस्था वावटळीप्रमाणे अकस्मात् अनुभवास येते व दुसऱ्याच क्षणीं ती नाहीशी होते. पण योगाच्या द्वारें ही अवस्था प्राप्त करून घेतल्यास आपण आत्म्याला शरीरापासून कायमचेच पृथक् करूं शकूं.

**तदभावात् संयोगाभावो हानं तद्दृशे: कैवल्यम् ॥२५॥**

२५. **सूत्रार्थ:—अज्ञान नाहीसें झाल्यावर, त्याज्य जो संयोग तोहि नाहीसा**

होतो. हीच द्रष्टयाची कैवल्यपदप्राप्ति (मुक्ति) होय.

स्पष्टीकरण:—योगदर्शनाच्या मतें, अज्ञानामुळेच आत्मा प्रकृतीशीं संयुक्त झाला आहे. म्हणून प्रकृतीचें आपल्यावरील जें नियंत्रण आहे तें नाहीसें करणें हेंच आपलें उद्दिष्ट असलें पाहिजे. हेंच सर्व धर्मांचें ध्येय आहे. प्रत्येक जीव अव्यक्त ब्रह्म होय. बाह्य आणि आंतर प्रकृतीला वशीभूत करून स्वत:चें हें अ-व्यक्त ब्रह्मस्वरूप व्यक्त करणेंच जीवनाचें परम उद्दिष्ट होय. कर्म, उपासना, मन:संयम वा ज्ञान यांपैकी कोणत्याहि एकाचा वा एकापेक्षा अधिकांचा किंवा सर्वच उपायांचा अवलंब करून तें उद्दिष्ट साधा आणि मुक्त व्हा. यांतच सगळा धर्म आला. मतें, वाद, क्रियाकांड, अनुष्ठानें, शास्त्रें, मंदिरें वा इतर बाह्य गोष्टी केवळ गौण तपशीलाच्या बाबी होत. योगी मानसिक संयमाच्या मदतीने हें ध्येय गाठण्याचा प्रयत्न करतो. जोंपर्यंत आपण प्रकृतीपासून आपली सुटका करून घेत नाहीं तोंपर्यंत आपण बद्धच राहतों, तिच्या आदेशाप्रमाणेच आपल्याला वागावें लागतें. योग्यांचें म्हणणें आहे की जो मनावर ताबा मिळवतो तो प्रकृतीवरहि ताबा मिळवूं शकतो. अंत:प्रकृति ही बाह्य प्रकृतीहून फार श्रेष्ठ आहे व ती हाताळणें व तिचें नियंत्रण करणें फार कठीण आहे. म्हणून ज्याने अंत:प्रकृति जिंकली त्याने सगळें जग जिंकलें. मग सारें जग त्याचा दास होतें. राजयोगांत प्रकृतीला वशीभूत करण्याचे उपाय सांगितले आहेत. भौतिक प्रकृतींतील शक्तींपेक्षा श्रेष्ठ असलेल्या शक्तींचें दमन करणें आवश्यक आहे. हें शरीर मनाचें निव्वळ बाह्य असें कवच आहे. या दोन वेगळ्या वस्तु नाहीत. शिंपलें व त्यांतील किडा यांच्याप्रमाणे त्या एकमेकांशीं संबंधित आहेत. त्या एकाच वस्तूच्या दोन विभिन्न अवस्था आहेत. शिंपल्यांतील किडा बाहेरून आवश्यक द्रव्यें घेऊन त्यांचें शिंपलें तयार करतो. त्याचप्रमाणे अंत:करण नामक आपल्या सूक्ष्म अंत:शक्ति बाहेरून स्थूल द्रव्य ग्रहण करून त्यापासून हें शरीररूपी कवच तयार करतात. म्हणून आपण जर या अंतर्जगताला जिंकूं शकलों तर बाह्य जगताला जिंकणें फार सोपें आहे. तसेंच या दोन शक्ति वेगवेगळ्या नाहीत. कांही शक्ति भौतिक आहेत व कांही शक्ति मानसिक आहेत असें नाही. ज्याप्रमाणे भौतिक जग सूक्ष्म जगाचें स्थूल, अभिव्यक्त रूप आहे त्याचप्रमाणे

भौतिक शक्ति ह्या सूक्ष्म शक्तीच्या केवळ स्थूल अभिव्यक्ति आहेत.

**विवेकख्यातिरविप्लवा हानोपायः ॥२६॥**

**२६. सूत्रार्थः—अज्ञानाच्या विनाशाचा उपाय विवेकाचा सतत अभ्यास करणें हा आहे.**

स्पष्टीकरण:—योगाभ्यासाचें खरें ध्येय पुढीलप्रमाणे आहे. पुरुष प्रकृतीहून वेगळा आहे, तो भूतें किंवा मन यांहून भिन्न आहे आणि तो प्रकृतीहून वेगळा असल्यामुळे अपरिवर्तनशील आहे. हें सर्व ओळखून सत्य व असत्य यांमधे विवेक करावा. प्रकृतिच संश्लेषणविश्लेषण करीत सतत बदलत असते. जेव्हा सतत अभ्यासामुळे आपण विवेक करूं लागूं तेव्हा अज्ञान नाहीसें होईल आणि पुरुष आपल्या सर्वज्ञ, सर्वशक्तिमान व सर्वव्यापी स्वरूपाने प्रकट होऊं लागेल.

**तस्य सप्तधा प्रान्तभूमिः प्रज्ञा ॥२७॥**

**२७. सूत्रार्थः—त्याचें (ज्ञानी व्यक्तीचें) विवेकज्ञान सात प्रकारच्या अत्युच्च भूमिकांसंबंधीचें असतें.**

स्पष्टीकरण:—जेव्हा हें ज्ञान होतें तेव्हा तें एकानंतर एक अशा सात अवस्थांमधून प्राप्त होतें आणि जेव्हा यांपैकी एखादी अवस्था सुरू होते तेव्हा आपल्याला ज्ञान होत असल्याची जाणीव उत्पन्न होते. सर्वप्रथम अशी जाणीव उत्पन्न होते की जें कांही जाणण्यासारखें आहे तें आपण जाणलें आहे. तेव्हा मन असंतुष्ट राहत नाही. जेव्हा ज्ञानाची आपल्या मनांत ओढ असते तेव्हा आपण जिथ जिथे सत्य सापडण्याची शक्यता असेल तिथे तिथे शोध घेत असतों व तिथे सत्य न गवसल्यास असंतुष्ट मनाने आपण निराळ्या ठिकाणीं तोच शोध चालूं ठेवतों. पण जोंपर्यंत आपण सर्व ज्ञान आपल्यांतच आहे हें ओळखत नाहीं तोंपर्यंत आपला सगळा शोध फुकटच जाणार. याचबरोबर, दुसरा कोणी आपल्यास मदत करूं शकणार नाही, आपण स्वतःच्या पायावरच उभें राहिलें पाहिजे हेंहि समजणें आवश्यक आहे. विवेकाभ्यास करीत असतांना आपण सत्याच्या जवळ जात असल्याचें चिन्ह हें आहे की आपल्या मनांतला असंतोष नाहीसा होतो. तेव्हा आपल्याला निश्चयपूर्वक वाटूं लागेल की आपल्याला सत्य गवसलें आहे व तें सत्य आहे याबद्दल आपल्याला मुळीच संदेह उरणार नाही. तेव्हा असें वाटूं लागेल की पहाट होत

आहे व सूर्य उगवणाराच आहे. आणि मग ध्येय प्राप्त होईपर्यंत आपण धैर्याने प्रयत्न चालू ठेवायला हवा. दुसऱ्या अवस्थेंत सर्व कष्ट नाहीसे होतात. जगांतल्या कोणत्याहि बाह्य किंवा आंतील गोष्टीमुळे आपल्याला त्रास होणें अशक्य होऊन जातें. तिसरी अवस्था पूर्ण ज्ञानाच्या प्राप्तीची आहे. या अवस्थेंत आपण सर्वज्ञ होतों. चवथ्या अवस्थेंत विवेकामुळे सर्व कर्तव्यांचा अंत होतो. यानंतर चित्ताला स्वातंत्र्याची अवस्था प्राप्त होते. तेव्हा आपल्या मनांत अशी जाणीव उत्पन्न होते की ज्याप्रमाणे एखादा दगड डोंगरकड्यावरून गडगडत खाली पायथ्याशीं येऊन पडला की मग तिथून पुन: वर चढत नसतो त्याचप्रमाणे आपल्या सर्व अडचणी, आपले सर्व संघर्ष व आपली सर्वप्रकारची अस्थिरता हीं सारीं गळून पडलीं आहेत. यानंतरच्या स्थितींत चित्तालाच असें जाणवूं लागेल की हवा तेव्हा त्याचा कारणावस्थेंत विलय होत आहे. शेवटीं आपल्याला असा अनुभव येतो की आपण स्व-स्वरूपांत अवस्थित झालों आहोंत आणि सर्वदा जगांत आपणच एकमेव अवस्थित होतों. मन किंवा शरीर यांच्याशीं एकजीव होण्याची गोष्ट तर दूरच राहो, पण त्यांच्याशीं आपला संबंध देखील आला नव्हता. हें (शरीर, मन इत्यादि) आपल्या स्वभावानुसार हालचाल करीत होतें व आपण अज्ञानामुळे स्वत:ला त्यांच्याशीं संयुक्त करून घेतलें होतें. आपण सर्वदा एकटेच होतों. या जगांत आपणच सर्वशक्तिमान, सर्वव्यापी व सदानंदस्वरूप आहोंत. आपला हा आत्मा इतका शुद्ध व पूर्ण आहे की त्याला दुसऱ्या कोणा-चीहि गरज नाही व नव्हती. आपण आनंदरूप असल्यामुळे आपल्याला सुखासाठी इतर कोणाचीहि गरज नाही. आपल्याला हें दिसून येईल की हें ज्ञान दुसऱ्या कशावरहि अवलंबून नाही. संपूर्ण विश्वांत असें कांही देखील नाही की जें आपल्या ज्ञानामुळे प्रकाशमान होणार नाही. हीच शेवटची अवस्था आहे. या अवस्थेंत योगी शांत असतो, तो कधीहि दु:खाक्रान्त होत नाही, भ्रमांत पडत नाही. त्याला हें ज्ञान होतें की तो सर्वशक्तिमान, नित्यपूर्ण व नित्यतृप्त असाच आहे.

**योगांगानुष्ठानादशुद्धिक्षये ज्ञानदीप्तिराविवेकख्याते: ॥२८॥**

२८. **सूत्रार्थ:—योगाच्या विभिन्न अंगांच्या अभ्यासाद्वारें सगळे दोष नष्ट झाल्यावर ज्ञान प्रदीप्त होतें. 'विवेकख्याति' ही त्याची अंतिम सीमा आहे.**

स्पष्टीकरण:——आता साधनेचा विचार केला जात आहे. आतापर्यंत आपण जिच्याबद्दल बोलत होतों ती फार उच्च गोष्ट आहे. ती सध्या आपल्यापासून पुष्कळ दूर आहे, परंतु तेंच आपलें साध्य आहे. त्यासाठी सर्वप्रथम शारीरिक व मानसिक संयम प्राप्त करून घेतला पाहिजे. त्यानंतरच ती आदर्श स्थिति लाभून स्थिर होईल. याप्रमाणे आदर्श स्थितीचें वा आपल्या लक्ष्याचें ज्ञान झाल्यावर तेथपर्यंत पोहोचण्यासाठी आपण सतत साधना केली पाहिजे.

**यमनियमासनप्राणायामप्रत्याहारधारणाध्यानसमाधयोऽष्टावङ्गानि ॥२९॥**

२९. सूत्रार्थ:——**यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि हीं योगाचीं आठ अंगें आहेत.**

**अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहा यमा: ॥३०॥**

३०. सूत्रार्थ:——**हिंसा न करणें, सत्य बोलणें, चोरी न करणें, ब्रह्मचर्य पालन करणें व दुसऱ्यापासून कांही न घेणें (अपरिग्रह) यांना 'यम' असें म्हणतात.**

स्पष्टीकरण:——जो माणूस पूर्ण होऊं इच्छितो त्याने कामवासना (स्त्री-पुरुष भेदाचा भाव) टाकली पाहिजे. आत्मा हा लिंगभेदाच्या अतीत आहे, मग त्याने या भेदज्ञानामुळे स्वत:चें पतन कां होऊं द्यावें ? पुढे आपल्याला नीट समजून येईल की आपण या भेदज्ञानाचा त्याग कां करावयाचा आहे. जो माणूस दान घेतो त्याच्या मनावर दात्याच्या मनाचा प्रभाव पडतो. त्यामुळे दान घेणारा पतित होऊं शकतो. दान घेतल्याने मनाचें स्वातंत्र्य नष्ट होऊन आपल्याला हीनपणा येण्याची शक्यता आहे. म्हणून दान घेऊं नका.

**एते जातिदेशकालसमयानवच्छिन्ना: सार्वभौमा महाव्रतम् ॥३१॥**

३१. सूत्रार्थ:——**याच गोष्टी (उपरोक्त 'यम') स्थल, काल, हेतु व जातीचे नियम यांच्यामुळे खंड न पडूं देतां करीत राहणें यालाच 'सार्वभौम महाव्रतें' असें म्हणतात.**

स्पष्टीकरण:——अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह हीं व्रतें प्रत्येक पुरुषाने, स्त्रीने व मुलाने——प्रत्येक माणसाने——मग तो कोणत्याहि जातीचा, राष्ट्राचा असो व कशाहि स्थितींत असो, आचरिलीं पाहिजेत.

**शौचसन्तोषतपःस्वाध्यायेश्वरप्रणिधानानि नियमाः ॥३२॥**

३२. **सूत्रार्थः——आंतील व बाह्य शुद्धता, समाधान, तपश्चर्या, स्वाध्याय आणि ईश्वरोपासना हे 'नियम' होत.**

स्पष्टीकरणः——बाह्य शुद्धता म्हणजे शरीर स्वच्छ ठेवणें. गलिच्छ माणूस कधीहि योगी होऊं शकत नाही. आंतील शुद्धता देखील आवश्यक आहे. ही पहिल्या पादांतील ३३ व्या सूत्रांत वर्णिलेल्या व्रतांच्या द्वारें प्राप्त होते. खरें पाहतां आंतील शुद्धता बाह्य शुद्धतेपेक्षा जास्त महत्त्वाची आहे. पण दोन्ही आवश्यक आहेत आणि आंतील शुद्धतेशिवाय नुसती बाह्य शुद्धता कुचकामाची आहे.

**वितर्कबाधने प्रतिपक्षभावनम् ॥३३॥**

३३. **सूत्रार्थ;——योगविरोधी विचार रोधण्यासाठी त्यांच्या विरुद्ध असलेले विचार मनांत आणले पाहिजेत.**

स्पष्टीकरणः——वर सांगितलेले नियम अभ्यासण्याचा हा उपाय आहे. उदाहरणार्थ जर मनांत क्रोधाची एक मोठी लाट उसळली तर तिचें नियंत्रण कसें करावें?——प्रेमाची भावना मनांत आणून. केव्हा केव्हा पत्नी आपल्या पतीवर खूप रागावलेली असते आणि त्या अवस्थेंत तिचें मूल तिच्यापुढे आलें की ती त्याचे मुके घेते. त्यामुळे क्रोधाची लाट नाहीशी होऊन तिच्या जागीं मुलाबद्दलच्या प्रेमाची लाट तिच्या मनांत येते. ही लाट पूर्वीच्या लाटेला दाबून टाकते. प्रेम हें क्रोधाच्या उलट आहे. तसेंच, चोरीचा विचार मनांत आल्यावर अस्तेयाचा भाव मनांत आणावा. दान घेण्याचा विचार मनांत आल्यास त्याच्या विरुद्ध प्रकारचा भाव मनांत आणावा.

**वितर्का हिंसादयः कृतकारितानुमोदिता लोभक्रोधमोहपूर्वका मृदुमध्याधिमात्रा दुःखाज्ञानानन्तफला इति प्रतिपक्षभावनम् ॥३४॥**

३४. **सूत्रार्थः——योगांतील अडथळे पुढीलप्रमाणे आहेत. हिंसा, खोटे बोलणें इत्यादि——मग तें स्वतः केलेलें असो, दुसऱ्याकडून करविलेलें असो, किंवा अनुमोदिलेलें असो; तसेंच तें लोभानें, क्रोधानें किंवा अज्ञानानें प्रेरित होऊन केलेलें असो, किंवा तें थोड्या, साधारण अथवा मोठ्या प्रमाणांत असो; या सगळ्यांपासून अनंत अज्ञान व दुःख उत्पन्न होतें. अशाप्रकारें चिंतन करणें हा विरुद्ध प्रकारचा विचार करण्याचा उपाय आहे.**

स्पष्टीकरणः––जर मी खोटें बोलेन किंवा दुसऱ्याकडून खोटें वदवीन किंवा दुसरा खोटें बोलत असल्यास संमति दाखवीन तर मी सारखाच दोषी आहें. हें खोटें बोलणें क्षुल्लक असलें तरी तें खोटेंच आहे. प्रत्येक वाईट विचाराची कांही ना कांही प्रतिक्रिया होतेच. एखाद्या गुहेंत बसून जरी एखादा द्वेषाचा विचार मनांत आणला तरी तो संचित होऊन बसतो आणि एखाद्या दिवशीं कोणत्या ना कोणत्या दुःखाच्या रूपाने तो फार प्रचंड अशी प्रतिक्रिया केल्याशिवाय राहत नाही. जर तुम्ही कोणाहिविषयी द्वेष व असूयाभाव प्रकट केला तर तो चक्रवाढ व्याजानिशी तुमच्याकडे परत येईल. कोणतीहि शक्ति याचा प्रतिकार करूं शकत नाही. एकदा तुम्हीं त्यांना चालना दिली की त्यांचा परिणाम तुम्हांला भोगावाच लागेल. हें लक्षांत ठेवल्यास तुमच्या हातून वाईट गोष्टी घडणार नाहीत.

**अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः ॥३५॥**

३५. **सूत्रार्थः––अहिंसेंत सुप्रतिष्ठित झाला की त्या माणसासमोर इतर सर्व प्राण्यांतील शत्रुत्वभाव नाहीसे होतात.**

स्पष्टीकरणः––जर एखादा माणूस अहिंसेची चरम सीमा गाठील तर त्याच्यासमोर स्वभावतः क्रूर असलेलीं श्वापदें देखील सौम्य बनतात. वाघ आणि शेळी योग्यासमोर एकमेकांबरोबर खेळूं लागतात. जेव्हा तुम्ही अशा अवस्थेस पोहोचाल तेव्हाच समजा की तुम्ही अहिंसाव्रतांत स्थिर झाला आहांत.

**सत्यप्रतिष्ठायां क्रियाफलाश्रयत्वम् ॥३६॥**

३६. **सूत्रार्थः––सत्य अंगवळणीं पडल्याने योग्याला आपल्यासाठी व इतरांसाठी कर्माशिवायच कर्मफल मिळविण्याचें सामर्थ्य येतें.**

स्पष्टीकरणः––जेव्हा सत्याचें हें सामर्थ्य तुमच्यांत दृढमूल होतें तेव्हा स्वप्नांत देखील तुम्ही खोटें बोलणार नाही. कायावाचामनेंकरून तुम्ही सत्यनिष्ठ व्हाल. जें तुम्ही बोलाल तेंच खरें ठरेल. तुम्हीं कोणाला 'तुझें कल्याण होवो' असा आशीर्वाद दिला तर त्या माणसाचें कल्याण होईल. जर एखाद्या आजारी माणसाला तुम्हीं म्हटलें की 'तूं बरा हो' तर तो ताबडतोब बरा झाल्याशिवाय राहणार नाही.

**अस्तेयप्रतिष्ठायां सर्वरत्नोपस्थानम् ॥३७॥**

**३७. सूत्रार्थः—चोरी न करणें हें व्रत सिद्ध झाल्याने योग्याला सर्व संपत्ति आपोआप प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—तुम्ही प्रकृतीपासून जितकें दूर पळतां तितकीच प्रकृति तुमचा जास्त जास्त पाठलाग करते आणि जर तुम्ही तिची अजीबात पर्वा करणार नाही तर ती तुमची गुलाम होईल.

**ब्रह्मचर्यप्रतिष्ठायां वीर्यलाभः ॥३८॥**

**३८. सूत्रार्थः—ब्रह्मचर्य सिद्ध झाल्याने शक्ति प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—ब्रह्मचर्यवान् व्यक्तीच्या मेंदूत विलक्षण सामर्थ्य वास करीत असतें आणि तिच्या ठिकाणीं प्रचंड इच्छाशक्ति उत्पन्न होत असते. ब्रह्मचर्यावांचून आध्यात्मिक शक्ति लाभणें शक्य नाही. ब्रह्मचर्याने मानवजातीवर असामान्य प्रभुत्व प्राप्त होत असतें. मानवसमाजाचे सर्व आध्यात्मिक पुढारी अत्यंत ब्रह्मचर्यवान् होते आणि त्यामुळेच ते एवढे शक्तिसंपन्न झाले होते. म्हणून योग्याने ब्रह्मचर्याचें पालन केलेंच पाहिजे.

**अपरिग्रहस्थैर्ये जन्मकथन्तासंबोधः ॥३९॥**

**३९. सूत्रार्थः—अपरिग्रहांत प्रतिष्ठित झाल्याने पूर्वजन्माची स्मृति लाभते.**

स्पष्टीकरणः—जर माणूस इतरांकडून कोणत्याहि देणग्या घेणार नाही तर तो त्यांचा उपकृत होणार नाही व स्वतंत्र वृत्तीने राहूं शकेल. त्याचें मन शुद्ध होऊन जाईल. प्रत्येक देणगीबरोबर वा दानाबरोबर ती घेणाऱ्याकडे देणाऱ्याचें पाप येतें. जर तो देणग्या स्वीकारणार नाही तर त्याचें मन शुद्ध होईल व त्याला पूर्वजन्मांच्या स्मृतीचें सामर्थ्य प्राप्त होईल. तेव्हा योगी आपल्या आदर्शांत स्थिर होतो. त्याला कळून येतें की तो अनेकदा जन्ममरणाच्या चक्रांतून गेला आहे. आणि म्हणून या वेळीं तो ठरवून टाकतो की आपण मुक्त झालेंच पाहिजे व फिरून या फेऱ्यांत सापडून प्रकृतीचें दास्य पत्करावयाचें नाही.

**शौचात्स्वाङ्गजुगुप्सा परैरसंसर्गः ॥ ४० ॥**

**४०. सूत्रार्थः—आंतर व बाह्य शुद्धतेची सवय जडल्यावर स्वतःच्या शरीराविषयी घृणा वाटूं लागते व इतरांच्या शरीराचा संबंध टाळण्याची वृत्ति उत्पन्न होते.**

स्पष्टीकरणः—जेव्हा शरीराचें खरें अन्तर्बाह्य शुद्धीकरण होतें

तेव्हा शरीराविषयी उपेक्षा निर्माण होते व तें सजविण्याची इच्छा नाहीशी होते. ज्या चेहऱ्याला इतर लोक फार सुंदर समजतात त्यावर जर ज्ञानाचें तेज नसेल तर त्याला योगी निव्वळ पाशवी समजेल. याउलट व्यवहारी माणसाला जें रूप अगदी सामान्य वाटेल त्यावर जर आत्म्याचा प्रकाश झळकत असेल तर योग्याला तें स्वर्गीय् वाटेल. भौतिक शरीराचें हें आकर्षण मानवी जीवनाचा अभिशाप आहे. म्हणून शुद्धता दृढ झाल्याचें पहिलें चिन्ह हें आहे की त्या अवस्थेंत तुमच्या ठायीं शरीरतादात्म्य राहत नाही. शुद्धता आल्यानेच शरीर आपल्याहून वेगळें आहे हा बोध होतो.

**सत्त्वशुद्धिसौमनस्यैकाग्र्येन्द्रियजयात्मदर्शनयोग्यत्वानि च ॥४१॥**

**४१. सूत्रार्थः——याबरोबरच सत्त्वशुद्धि, मानसिक प्रसन्नता, एकाग्रता, इंद्रियजय आणि आत्मसाक्षात्काराची योग्यता याहि गोष्टी उद्भवतात.**

स्पष्टीकरणः——शुद्धतेच्या अभ्यासाने सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो आणि मन प्रसन्न व एकाग्र होतें. तुम्ही धर्माकडे वळत आहांत याचें पहिलें चिन्ह म्हणजे तुमची वाढती प्रसन्नता हें होय. उदास असणें हें अग्निमांद्याचें लक्षण आहे, धर्माचें नव्हे. सात्त्विक माणसाला सर्वच गोष्टी आनंद देतात. म्हणून आनंदी वृत्ति निर्माण झाली की योगाच्या दिशेने प्रगति होत आहे असें समजावें. सर्वप्रकारचीं दुःखें तमामुळे होत असतात, म्हणून तमाचा नायनाट केला पाहिजे. विषण्णपणा देखील तमाचेंच चिन्ह आहे. सशक्त, तरुण, निरोगी, धाडसी व चांगल्या हाडापेराच्या व्यक्तिच योगी होण्याच्या लायकीच्या असतात. योग्याला सगळेंच आनंदरूप असतें, कोणाचाहि चेहरा पाहिला तरी त्याला आनंदच होतो. हेंच पुण्यवानाचें लक्षण आहे. दुःख-दैन्य म्हणजे केवळ पापाचाच परिणाम होय. तुमचा चेहरा उदास कां असावा ? त्या वेळीं तो किती भयानक असतो ? जर कधी तुमचा चेहरा उदास असेल तर त्या दिवशीं तुम्ही स्वतःला आपल्या खोलींत कोंडून घ्या; त्या दिवशीं तुम्ही बाहेर जाऊं नका. तुमचा हा रोग जगांत पसरविण्याचा तुम्हांला काय अधिकार आहे ? जेव्हा तुमचें मन आवरलें जाईल तेव्हा तुमचें शरीरहि तुमच्या ताब्यांत येईल. त्या वेळीं या शरीररूपी यंत्राच्या आधीन न होतां तुम्ही त्याच्यावर प्रभुत्व मिळवाल. तेव्हा हें शरीररूपी यंत्र

आत्म्याला खाली ओढण्याऐवजी तें त्याचें फार मोठें साहाय्यक बनेल.

**सन्तोषादनुत्तमः सुखलाभः ॥४२॥**

**४२. सूत्रार्थः—संतोषापासून परम सुख प्राप्त होतें.**

**कायेन्द्रियसिद्धिरशुद्धिक्षयात्तपसः ॥४३॥**

**४३. सूत्रार्थः—तपश्चर्येमुळे शरीर व इंद्रियें यांच्यांतली अपवित्रता नाहीशी होते व त्यांना नानाप्रकारच्या शक्ति प्राप्त होतात.**

स्पष्टीकरणः—तपश्चर्येचे परिणाम दृष्टिशक्तीच्या अभिवृद्धीच्या (दूरदर्शनाच्या) रूपाने किंवा फार दूरचे शब्द ऐकण्याच्या सामर्थ्याच्या (दूरश्रवणाच्या) रूपाने तात्काळ अनुभवास येतात.

**स्वाध्यायादिष्टदेवतासम्प्रयोगः ॥४४॥**

**४४. सूत्रार्थः—मंत्रजपाने इष्टदेवतेचा साक्षात्कार होतो.**

स्पष्टीकरणः—जितक्या वरच्या दर्जाच्या देव-देवतांचा साक्षात्कार हवा असतो तितकाच खडतर अभ्यासहि करावा लागतो.

**समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात् ॥४५॥**

**४५. सूत्रार्थः—ईश्वराच्या चरणीं सर्वकांही अर्पण केल्याने समाधि प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—ईश्वरार्पणाने समाधीला पूर्णता येते.

**स्थिरसुखमासनम् ॥ ४६ ॥**

**४६. सूत्रार्थः—निश्चलपणें व सुखकारक पद्धतीने बसण्यालाच 'आसन' असें म्हणतात.**

स्पष्टीकरणः—आता आपण 'आसना'चा विचार करूं या. जोंपर्यंत तुम्ही स्थिरपणें बसूं शकत नाही तोंपर्यंत प्राणायाम व इतर अभ्यास तुम्ही करूं शकणार नाही. आसनाची स्थिरता याचा अर्थ तुम्हांला शरीराची जाणीव न होणें असा आहे. सामान्य अवस्थेंत, तुम्हांला आढळून येईल की तुम्ही थोडा वेळ एका जागीं बसलां असतांना तऱ्हतऱ्हेचे प्रक्षोभ शरीरांत उत्पन्न होतात. पण स्थूल शरीराच्या जाणीवेच्या पलीकडे गेल्यावर शरीराची जाणीवहि नाहीशी होते. तेव्हा तुम्हांला सुख किंवा दुःख होत नाही. आणि फिरून जेव्हा तुमचा देहबोध परत येईल तेव्हा तुम्हांला बरीच विश्रांति मिळाल्यासारखें वाटेल. हीच शरीराची खरी व पूर्ण विश्रांति होय. याप्रमाणे शरीरावर विजय

मिळवून तें दृढ करण्यांत तुम्ही यशस्वी झालांत तर तुमचा अभ्यासहि दृढतेने चालू राहील आणि जर शरीरामुळे तुम्ही प्रक्षुब्ध व्हाल तर तुमचे स्नायुहि प्रक्षुब्ध होतील व मग तुम्ही मन एकाग्र करूं शकणार नाही.

**प्रयत्नशैथिल्यानन्तसमापत्तिभ्याम् ॥४७॥**

**४७. सूत्रार्थः—अस्थिरतेची नैसर्गिक प्रवृत्ति आवरल्याने व अनंतावर ध्यान केल्याने आसन दृढ व आनंददायक होतें.**

स्पष्टीकरणः—अनंताचें चिंतन करीत राहिल्याने आसन स्थिर होतें. निरपेक्ष अनंताचा विचार करणें जरी शक्य नसलें तरी अनंत आकाशाचा विचार शक्य आहे.

**ततो द्वन्द्वानभिघातः ॥४८॥**

**४८. सूत्रार्थः—'आसन' सिद्ध झाल्यावर द्वंद्वांचा अडथळा होत नाही.**

स्पष्टीकरणः—चांगलें-वाईट, शीत-उष्ण व इतर सर्व द्वंद्वांचा तुमच्यावर कांही परिणाम होणार नाही.

**तस्मिन् सति श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः ॥४९॥**

**४९. सूत्रार्थः—श्वास व उच्छ्वास यांच्या गतींचें नियमन यानंतर होऊं लागतें. यालाच प्राणायाम म्हणतात.**

स्पष्टीकरणः—'आसन' सिद्ध झाल्यावर श्वासोच्छ्वासाच्या गतींचें नियमन करावें लागेल. म्हणून आपण आता प्राणायामाकडे वळूं या. 'प्राण' याचा श्वास असा जरी बहुधा अर्थ केला जात असला तरी प्राण हा श्वास नाही. सर्व विश्वांतील शक्तींची समष्टि हाच प्राण आहे. हीच शक्ति सगळ्या शरीरांत असते व हिची दृश्य अभिव्यक्ति फुप्फुसांच्या हालचालींच्या द्वारें होते. ही हालचाल प्राणाने श्वास आंत ओढल्यामुळे होते आणि प्राणायामांत या हालचालीचेंच नियंत्रण करावयाचें असतें. प्राणाच्या नियंत्रणाचा सगळ्यांत सोपा उपाय म्हणून आपण श्वासाचें नियंत्रण करूं लागतों.

**बाह्याभ्यन्तरस्तंभवृत्तिः देशकालसंख्याभिः परिदृष्टो दीर्घसूक्ष्मः ॥५०॥**

**५०. सूत्रार्थः—प्राणायामाचे बाह्य, आभ्यन्तर आणि स्थिर असे तीन प्रकार आहेत. तसेंच, स्थल-काल-संख्याभेदाने व दीर्घ वा सूक्ष्म झाल्याने त्याचे फिरून अनेक प्रकार होतात.**

स्पष्टीकरण:—प्राणायामाच्या त्रिविध गति पुढीलप्रमाणे आहेत. एक, हिच्यामुळे आपण श्वास आंत घेतों; दुसरी, हिच्यामुळे आपण श्वास बाहेर सोडतों व तिसरी, हिच्यामुळे आपण श्वास फुफ्फुसांच्या बाहेर जाऊं देत नाहीं किंवा बाहेरून तो फुफ्फुसांत शिरूं देत नाहीं. या गति स्थलकालानुसार विभिन्न असतात. स्थलाचा अर्थ असा की प्राण हा शरीराच्या एखाद्या विशिष्ट भागांत रोधला जातो. कालाचा अर्थ असा की शरीराच्या कोणत्या भागांत प्राण हा किती काळ रोधून ठेवायचा याचें ज्ञान. म्हणून कोणती गति किती सेकंद चालू ठेवावयाची यासंबंधी आपल्याला सांगण्यांत आलें आहे. या प्राणायामामुळे 'उद्घात' किंवा कुंडलिनीची जागृति होते.

**बाह्याभ्यन्तरविषयाक्षेपी चतुर्थः ॥५१॥**

**५१. सूत्रार्थः--प्राणायामाचा चवथा प्रकार बाह्य वा आंतर विषयाच्या चिंतनावर आधारलेला आहे.**

स्पष्टीकरण:—हा प्राणायामाचा चवथा प्रकार आहे. यांत चिंतनासहित बराच काळ अभ्यास केल्याने कुंभक साधतो. हें चिंतन इतर प्रकारांत नसतें.

**ततः क्षीयते प्रकाशावरणम् ॥५२॥**

**५२. सूत्रार्थः--त्यामुळे चित्ताच्या प्रकाशावरील आवरण क्षीण होतें.**

स्पष्टीकरण:—स्वभावतःच चित्तांत सगळें ज्ञान असतें. चित्त हें सत्त्वद्रव्याने बनलेलें असतें; पण तें तम व रज यांनी झाकलेलें असतें. प्राणायामाने हें आवरण दूर सारलें जातें.

**धारणासु च योग्यता मनसः ॥५३॥**

**५३. सूत्रार्थः--मन हें धारणेला लायक होतें.**

स्पष्टीकरण:—हें आवरण नाहीसें झाल्यावर मन एकाग्र करतां येतें.

**स्वस्वविषयासम्प्रयोगे चित्तस्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहारः ॥५४॥**

**५४. सूत्रार्थः--जेव्हा इंद्रियें आपापले विषय सोडून जणुकांही चित्ताचा आकार धारण करतात तेव्हा त्यास 'प्रत्याहार' असें म्हणतात.**

स्पष्टीकरण:—इंद्रियें हीं मनाच्याच वेगवेगळ्या अवस्था होत. मी एक पुस्तक पाहतों. या पुस्तकाचा आकार पुस्तकांत नाही, तो

माझ्या मनांत आहे. बाहेरील वस्तु त्या आकाराचें केवळ उद्दीपन करते, कारण खरा आकार चित्तांतच असतो. आपल्यापुढे येणाऱ्या सर्व विषयांशीं इंद्रियें एकरूप होतात व त्यांचाच आकार धारण करतात. जर मनाला हे आकार घेऊं दिले नाहीत तर तें शांत होईल. यालाच प्रत्याहार म्हणतात.

**ततः परमा वश्यतेन्द्रियाणाम् ॥५५॥**

**५५. सूत्रार्थः--त्याच्या द्वारें इंद्रियांवर पूर्ण ताबा मिळवितां येतो.**

स्पष्टीकरणः--इंद्रियांना बाह्य विषयांचा आकार घेऊं न देतां त्यांना चित्ताशीं एकरूप करून ठेवण्यांत योगी जेव्हा समर्थ होतो तेव्हा तो इंद्रियांवर पूर्ण विजय मिळवितो. इंद्रियें पूर्णपणें आपल्या कह्यांत आलीं की प्रत्येक मज्जातंतु व स्नायु हे आपल्या कह्यांत येतात; कारण इंद्रियेंच सर्व संवेदना व हालचाली यांचीं केंद्रें असतात. हीं इंद्रियें ज्ञानेन्द्रियें व कर्मेन्द्रियें अशीं दोन प्रकारचीं असतात. इंद्रियें नियंत्रित केल्याने योगी सर्व भावनांचें व हालचालींचें नियंत्रण करूं शकतो. त्याचें सर्व शरीर त्याच्या नियंत्रणाखाली येतें. तेव्हाच जन्मास आल्याचा खरा आनंद अनुभवायला मिळतो व तेव्हाच योगी खरोखर म्हणूं शकतो की 'धन्य मी, माझ्या जन्मण्याचें सार्थक झालें.' जेव्हा इंद्रियांवर विजय मिळेल तेव्हाच कळून येईल की हें शरीर किती अद्भुत आहे.

---

## तृतीय अध्याय

# विभूतिपाद

आता आपण योगाने प्राप्त होणाऱ्या शक्तींकडे वा सिद्धींकडे वळूं.

**देशबन्धश्चित्तस्य धारणा ॥ १ ॥**

**१. सूत्रार्थः--एखाद्या विशिष्ट वस्तूवर मन स्थिर करण्याला 'धारणा' म्हणतात.**

स्पष्टीकरणः--शरीरांतल्या किंवा शरीराबाहेरच्या एखाद्या वस्तूवर मन लावणें व तिथें तें स्थिर ठेवणें याला धारणा (एकाग्रता)

असें म्हणतात.

**तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ॥ २ ॥**

२. **सूत्रार्थ:—वस्तुविषयक ज्ञान अविच्छिन्नपणें होत राहणें यालाच ध्यान असें म्हणतात.**

स्पष्टीकरण:—समजा की मन एखाद्या विषयाचा विचार करण्याचा प्रयत्न करीत आहे, तें एकाच स्थानाला ( जसें डोक्याचा वरचा भाग, हृदय वगैरेला ) चिकटून राहण्याचा प्रयत्न करीत आहे. तें जर शरीराच्या तेवढ्याच भागांत संवेदनक्षम राहिलें व शरीराच्या इतर सर्व भागांना तें विषय-ग्रहणापासून निवृत्त ठेवूं शकलें तर त्या अवस्थेला धारणा असें म्हणतात. जर कांही काळ मन या अवस्थेंत टिकून राहूं शकलें तर त्या स्थितीला ध्यान असें म्हणतात.

**तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधि: ॥ ३ ॥**

३. **सूत्रार्थ:—जेव्हा या अवस्थेंतून सर्व रूपें वा बाह्य उपाधि नाहीशा होतात व फक्त त्यांचा अर्थच मळकत राहतो तेव्हा तिला समाधि असें म्हणतात.**

स्पष्टीकरण:—जेव्हा वस्तूची आकृति किंवा बाह्य भाव (ध्यानांतून) वगळला जातो तेव्हा या अवस्थेचा उदय होतो. समजा की मी एका पुस्तकाचें ध्यान करीत आहें आणि मी त्या पुस्तकावर मन एकाग्र करून ठेवण्यांत सफल झालों. त्या वेळीं कोणत्याहि विशिष्ट आकाराने प्रकट न झालेल्या, ज्याला अर्थ म्हणतात त्या आंतील अनुभूतींचेंच मला ज्ञान होऊं लागतें. ध्यानाच्या या अवस्थेला समाधि असें म्हणतात.

**त्रयमेकत्र संयम: ॥ ४ ॥**

४. **सूत्रार्थ:—या तिघांचा जेव्हा एकाच वेळीं अर्थात् एकाच वस्तूच्या बाबतींत अभ्यास केला जातो तेव्हा त्याला संयम असें म्हणतात.**

स्पष्टीकरण:—जर एखादा माणूस आपलें मन एकाच वस्तूवर लावून तिच्यावर कांही काळ तें टिकवून ठेवूं शकला आणि तिच्या अंतर्भागाला तिच्या बाह्य आकारापासून दीर्घकाळ वेगळें करूं शकला तर त्या स्थितीचें 'संयम' असें नांव आहे. म्हणजेच एखाद्या वस्तूच्या बाबतींत धारणा, ध्यान व समाधि हीं तिन्हीं जेव्हा क्रमाने होऊन कीभूत होतात तेव्हा त्या अवस्थेला 'संयम' असें म्हणतात. त्या वेळीं

त्या वस्तूचा बाह्य आकार मनांतून नाहीसा होतो व तिचा फक्त अर्थच मनांत शिल्लक उरतो.

**तज्जयात् प्रज्ञालोकः ॥ ५ ॥**

**५. सूत्रार्थः—तो ( संयम ) प्राप्त झाल्यावर ज्ञानाचा प्रकाश लाभतो.**

स्पष्टीकरण:—हा संयम प्राप्त झाल्यावर सर्व शक्ति योग्याच्या आधीन होतात. हा संयमच योग्याचें फार मोठें साधन आहे. ज्ञानाचे विषय अनंत आहेत व ते स्थूल, स्थूलतर व स्थूलतम आणि सूक्ष्म, सूक्ष्मतर व सूक्ष्मतम इत्यादि प्रकारचे असतात. आधी स्थूल विषयांच्या बाबतींत संयम केला पाहिजे. जेव्हा या स्थूल विषयांचें ज्ञान व्हायला लागेल तेव्हा क्रमाक्रमाने सूक्ष्म विषयांकडे वळावें.

**तस्य भूमिषु विनियोगः ॥ ६ ॥**

**६. सूत्रार्थः—हा संयम क्रमाक्रमाने केला पाहिजे.**

स्पष्टीकरण:—फार घाई किंवा उतावळेपणा करूं नये. हें सूत्र आपल्याला अशी ताकीद देत आहे.

**त्रयमन्तरङ्गं पूर्वेभ्यः ॥ ७ ॥**

**७. सूत्रार्थः—पूर्वीच्यापेक्षा हीं तिन्हीं (साधनें) जास्त आभ्यंतरीण आहेत.**

स्पष्टीकरण:—यापूर्वी आपण प्रत्याहार, प्राणायाम, आसन, यमनियम इत्यादींचा विचार केला होता. हीं सर्व धारणा, ध्यान व समाधि यांचीं बाह्य अंगें होत. हीं धारणा आदि साधनें सिद्ध झाल्यावर सर्वज्ञता व सर्वशक्तिमत्ता प्राप्त होतात, पण हा कांही मोक्ष नाही. या तिघांमुळे मन निर्विकल्प होणार नाही. त्यांत फिरून शरीर निर्माण करणारीं बीजें राहतीलच. योगी म्हणतो त्याप्रमाणे जेव्हा हीं बीजें जळून जातील तेव्हाच त्यांच्यापासून पुढे रोपें उगवण्याची शक्यता नाहीशी होईल. या शक्ति या बीजांना जाळू शकत नाहीत.

**तदपि बहिरङ्गं निर्बीजस्य ॥ ८ ॥**

**८. सूत्रार्थः– पण तीं ( धारणा आदि तिन्हीं ) देखील निर्बीज समाधीच्या दृष्टीने बाह्यच होत.**

स्पष्टीकरण:—म्हणून त्या निर्बीज समाधीच्या तुलनेने या तिन्ही अवस्था देखील बाह्यच होत. अजून आपण खऱ्या समाधीच्या उच्चतम अवस्थेपर्यंत पोहोचलों नाहीं, तर जिच्यांत हें जग, जसें तें आपल्यास

दिसतें तसें तें कायम असतें व या शक्तिहि कायम असतात, अशा एका खालच्या अवस्थेंतच आपण अजून राहत व वावरत असतों.

**व्युत्थाननिरोधसंस्कारयोरभिभवप्रादुर्भावौ निरोधक्षणचित्तान्वयो निरोधपरिणामः ॥ ९ ॥**

**९. सूत्रार्थ—प्रक्षुब्ध संस्कारांच्या दमनाने व संयमाच्या संस्कारांच्या उदयाने मन जेव्हा संयमाच्या वृत्तीच्या आधीन होतें तेव्हा तें संयमात्मक अवस्था प्राप्त करतें.**

स्पष्टीकरणः—याचा अर्थ असा की समाधीच्या या पहिल्या अवस्थेंत मनाच्या वृत्ति आवरल्या गेल्या, पण पूर्णपणें नव्हे. कारण तसें झालें असतें तर सर्व वृत्ति नाहीशा झाल्या असत्या. जर कोणतीहि वृत्ति इंद्रियांच्या द्वारें मनाला बाहेर उडी घेण्यास प्रवृत्त करील व जर योगी तिचें नियंत्रण करूं लागेल तर हें नियंत्रणच एक वृत्ति होईल. एका तरंगास दुसरा तरंग आवरेल. म्हणून ज्या समाधींत सर्व तरंग विरून जातात अशी ही समाधि ठरणार नाही; कारण संयम देखील एक तरंगच आहे. पण ही खालच्या दर्ज्याची समाधि मनाच्या प्रक्षुब्ध अवस्थेपेक्षा वरच्या दर्ज्याच्या समाधीच्या पुष्कळ जवळ आहे.

**तस्य प्रशान्तवाहिता संस्कारात् ॥१०॥**

**१०. सूत्रार्थः—अभ्यासाने तिचा प्रवाह स्थिर होतो.**

स्पष्टीकरणः—दिवसेंदिवस सतत अभ्यास केल्याने मनाचा संयम स्थिर होतो व स्थिर एकाग्रतेची शक्ति मनाला प्राप्त होते.

**सर्वार्थतैकाग्रतयोः क्षयोदयौ चित्तस्य समाधिपरिणामः ॥११॥**

**११. सूत्रार्थः—सर्व तऱ्हेच्या विषयांचें चिंतन करण्याच्या वृत्तींचा क्षय होऊन एकच ध्येयविषयाचें चिंतन करणाऱ्या एकाग्रताशक्तीचा जेव्हा उदय होतो तेव्हा चित्ताला समाधि-अवस्था प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—तऱ्हेतऱ्हेच्या वस्तूंकडे मन आकृष्ट होतें व त्यांच्यांत गुरफटतें. मनाची ही निकृष्ट अवस्था होय. याहून वरची जी अवस्था आहे तिच्यांत, इतर सर्व वस्तु टाकून मन फक्त एकाच वस्तूवर केंद्रित होतें. याचा परिणाम आहे—समाधि.

**शान्तोदितौ तुल्यप्रत्ययौ चित्तस्यैकाग्रतापरिणामः ॥१२॥**

**१२. सूत्रार्थः—अतीत व वर्तमान संस्कार मनांत जेव्हा समरूप वा एकीभूत होतात तेव्हा चित्ताला एकाग्रता प्राप्त होते.**

स्पष्टीकरण:—मन एकाग्र झालें हें कसें समजावयाचें ?—कालाची कल्पना नाहीशी झाल्याने. जितका जास्त काळ नकळत निघून जाईल तितकीच एकाग्रता तीव्र समजावयाची. रोजच्या जीवनांत आपण पाहतोंच की एखादें पुस्तक तल्लीन होऊन वाचतांना आपल्याला वेळेचें भान राहत नाही. पुस्तक खाली ठेवल्यावर कित्येकदा इतका वेळ कसा निघून गेला याचें आपल्याला आश्चर्य वाटतें. एकाग्रतेंत सगळा काळ वर्तमानकाळांतच येऊन केंद्रित होऊं लागतो. म्हणूनच हें लक्षण सांगितलें आहे की जेव्हा अतीत व वर्तमान एक होऊं लागतील तेव्हा मन एकाग्र झालें असें म्हणतां येईल.

**एतेन भूतेन्द्रियेषु धर्मलक्षणावस्थापरिणामा व्याख्याता ॥१३॥**

**१३. सूत्रार्थ:—यावरून सूक्ष्म किंवा स्थूल भूतांचे आणि इंद्रियांचे आकृति, काल व अवस्था हे तीन परिणाम आपोआप स्पष्ट होतात.**

स्पष्टीकरण:—चित्ताच्या आकृति, काल व अवस्था या तीन प्रकारच्या परिणामांवरून स्थूल व सूक्ष्म भूतें आणि इंद्रियें यांतील अशाच प्रकारचे बदलहि स्पष्ट होतात. कल्पना करा की सोन्याचा एक तुकडा आहे. त्याच्या कधी बांगड्या केल्या जातात तर कधी कर्णफुलें. हीं आकृतीचीं परिवर्तनें होत. हीच घटना कालाच्या दृष्टिकोनांतून पाहिली की कालमूलक परिवर्तनाचें स्वरूप कळून येतें. तसेंच या बांगड्या किंवा कर्णफुलें चकचकीत किंवा मळकट, ठोकळ किंवा बारीक वगैरे असूं शकतात. हें अवस्थापरिवर्तन आहे. आता ९, ११ व १२ या सूत्रांत सांगितल्याप्रमाणे मनांत सारखा वृत्तिरूप बदल होत असतो. हें आकृतिपरिवर्तन आहे. मनाचें भूत, वर्तमान व भविष्य या कालांतून जाणें हेंच त्याचें कालपरिवर्तन आहे. तसेंच मनाचे एकाच काळांतले संस्कार कमी-अधिक उत्कट असतात. हेंच त्याचें अवस्थापरिवर्तन होय. आधीच्या सूत्रांत सांगितलेल्या एकाग्रतेच्या द्वारें योग्याला स्वेच्छेने मनाचीं परिवर्तनें आवरणें शक्य होतें व त्यामुळेच ह्या तृतीय पादांतील चौथ्या सूत्रामधे सांगितलेला संयम त्याला साध्य होतो.

**शान्तोदिताव्यपदेश्यधर्मानुपाती धर्मी ॥१४॥**

**१४. सूत्रार्थ:—जें अतीत, वर्तमान किंवा अजून व्यक्त न झालेल्या परिणामांनी प्रभावित होतें तें 'धर्मी' होय.**

स्पष्टीकरणः--अर्थात् 'धर्मी' त्याला म्हणतात की जें काळ व संस्कार यांनी प्रभावित होतें व जें सारखें बदलत व व्यक्त होत राहतें.

**क्रमान्यत्वं परिणामान्यत्वे हेतुः ॥१५॥**

**१५. सूत्रार्थः—परिवर्तनांची परंपरा ही विविध विकासांचें कारण आहे.**

**परिणामत्रयसंयमादतीतानागतज्ञानम् ॥१६॥**

**१६. सूत्रार्थः—तिन्ही प्रकारच्या परिणामांवर ( परिवर्तनांवर ) संयम केल्याने अतीत व भविष्य कालांचें ज्ञान होतें.**

स्पष्टीकरणः--येथे पूर्वी सांगितलेली संयमाची परिभाषा विसरतां कामा नये. जेव्हा मन वस्तूचा बाह्य भाग टाकून देऊन तिच्या आभ्यंतरीण भावांशीं एकरूप होतें आणि जेव्हा सतत अभ्यासाने ही एकरूपता टिकवतां येते व मनाला केव्हाहि चटकन् त्या अवस्थेंत शिरतां येतें तेव्हा संयम पूर्ण होतो. या अवस्थेंत असतांना जर एखाद्या माणसाला भूत-भविष्याचें ज्ञान हवें असेल तर त्याने फक्त संस्कारांच्या परिवर्तनांवर संयम करावा. (३. १३.) कांही संस्कार सध्या क्रियाशील आहेत; कांहींची क्रिया होऊन गेलेली आहे व कांही पुढे क्रिया करणार आहेत. म्हणून या संस्कारांवर संयम केल्याने योग्याला भूत-भविष्याचें ज्ञान होतें.

**शब्दार्थप्रत्ययानामितरेतराध्यासात् सङ्करस्तत्प्रविभागसंयमात् सर्वभूतरुतज्ञानम् ॥१७॥**

**१७. सूत्रार्थः—ज्यांची सामान्यपणें सरमिसळ केली जाते त्या शब्द, अर्थ व ज्ञान यांच्यावरील संयमाने सर्व प्राण्यांच्या शब्दांचें ज्ञान होतें.**

स्पष्टीकरणः--'शब्द' म्हणजे बाह्य विषय होत. शब्दांपासून निघून इंद्रियांच्या मार्गाने मेंदूपर्यंत जाऊन पोहोचणारीं स्पंदनें म्हणजेच अर्थ. हीं स्पंदनें बाह्य वस्तूंच्या संवेदना मनापर्यंत पोहोचवितात. 'ज्ञान' ही मनाची ती प्रतिक्रिया आहे की जिच्यामुळे वस्तूची प्रतीति होते. हीं तिन्हीं एकमेकांत मिसळल्याने इंद्रियविषय बनतात. उदाहरणार्थ मी एखादा शब्द ऐकतों. प्रथम बाह्य स्पंदनें उत्पन्न होतात. नंतर श्रवणेंद्रियाने मनापर्यंत पोहोचविलेल्या शब्दसंवेदना उत्पन्न होतात. त्यानंतर मन प्रतिक्रिया करतें व मला तो शब्द कळतो. मला कळणारा हा शब्द स्पंदनें, संवेदना व प्रतिक्रिया या तिघांचा मिळून बनलेला आहे.

साधारणपणें हीं तिन्हीं अविभाज्य असतात. पण अभ्यासाने योगी त्यांना परस्परांपासून अलग करूं शकतो. हें करूं शकल्यावर योगी जर एखाद्या शब्दावर—मग तो शब्द माणसाचा असो किंवा जनावराचा असो—संयम करील तर त्याचा अभिप्रेत अर्थ त्याला ताबडतोब कळेल.

**संस्कारसाक्षात्करणात् पूर्वजातिज्ञानम् ॥१८॥**

१८. **सूत्रार्थ:—संस्कारांचें प्रत्यक्ष ज्ञान झाल्याने पूर्वजन्मांचें ज्ञान होतें.**

स्पष्टीकरण:—आपले सर्व अनुभव चित्तांतील तरंगांच्या रूपाने उद्भवत असतात. हे तरंग मंद पडून सूक्ष्म, सूक्ष्मतर असे होत जातात, पण ते पूर्णपणें कधीहि नाहीसे होत नाहीत. हे तरंग सूक्ष्म रूपांत मनांत वास करतात. जर ते मनाच्या पृष्ठभागावर आणतां आले तर ते स्मृतीच्या रूपाने व्यक्त होतात. म्हणून जर योगी मनांतील या अतीत संस्कारांवर संयम करूं शकला तर त्याला आपल्या पूर्वीच्या सर्व जन्मांची आठवण होईल.

**प्रत्ययस्य परचित्तज्ञानम् ॥१९॥**

१९. **सूत्रार्थ:—इतरांच्या शरीरांवरील लक्षणांवर संयम केल्याने त्यांच्या मनाचें ज्ञान होतें.**

स्पष्टीकरण:—प्रत्येक माणसाच्या शरीरावर कांही लक्षणें असतात. त्यांच्यामुळे एक माणूस दुसऱ्यापासून वेगळा दिसतो. या लक्षणांवर संयम केल्याने योग्याला दुसऱ्या माणसाचें मन कळतें.

**न च तत्सालम्बनं तस्याविषयीभूतत्वात् ॥२०॥**

२०. **सूत्रार्थ:—पण त्याचे (मनाचे) घटक कळत नाहीत, कारण तें (मन) संयमाचा विषय नव्हतें.**

स्पष्टीकरण:—शरीरावर संयम केल्याने मनाच्या घटकांचें ज्ञान होत नाही. म्हणून दोन प्रकारच्या संयमांची जरूरी आहे. एक, शरीरावरील लक्षणांवरचा व दुसरा, त्या मनावरचा. असें केल्याने त्या मनांत असलेलें सर्वकांही योग्याला कळून येईल.

**कायरूपसंयमात्तद्ग्राह्यशक्तिस्तंभे चक्षुःप्रकाशासंयोगेऽन्तर्धानम् ॥२१॥**

२१. **सूत्रार्थ:—शरीराच्या आकृतीवर संयम केल्याने आकृतीची दृश्यता कुंठित होते व त्यामुळे डोळ्यांच्या दर्शनशक्तीचा त्याच्याशीं संबंध तुटल्यामुळे योग्याचें शरीर अदृश्य होतें.**

स्पष्टीकरण:—या खोलीमधे उभा असलेला योगी अदृश्य होऊं शकतो. खरोखरीच तो नाहीसा होत नसून तो फक्त इतरांना दिसेनासा होतो. शरीराची आकृति आणि शरीर यांना जणु तो पृथक् करून टाकतो. तुम्ही हें लक्षांत ठेवलें पाहिजे की जेव्हा योग्याला वस्तु व तिची आकृति या दोन्ही एकमेकांपासून अलग करण्याइतकी एकाग्रता प्राप्त होते तेव्हाच त्याला ही अंतर्धानाची शक्ति लाभत असते. तेव्हा तो त्यावर म्हणजे आकार व आकारवान वस्तूंच्या पृथक्पणावर संयम करतो. त्यामुळे ती आकृति पाहण्याची इतरांची शक्ति बाधित होते, कारण आकृति व वस्तु यांच्या संयोगामुळेच डोळयांना आकृति पाहण्याची शक्ति येत असते.

**एतेन शब्दाद्यन्तर्धानमुक्तम् ॥२२॥**

२२. सूत्रार्थ:—**यावरून बोललेले शब्द लपवणें किंवा इतरांना ते ऐकूं न येऊं देणें व यांसारख्या इतर गोष्टी देखील स्पष्ट होतात.**

**सोपक्रमं निरुपक्रमञ्च कर्म तत्संयमादपरान्तज्ञानमरिष्टेभ्यो वा ॥२३॥**

२३. सूत्रार्थ:—**कर्मे दोन प्रकारचीं असतात—लवकर फळणारीं व उशिरा फळणारीं. यांवर संयम केल्याने किंवा अरिष्ट नांवाच्या मृत्युलक्षणावर संयम केल्याने योग्यांना देहपाताची अचूक वेळ समजते.**

स्पष्टीकरण:—जेव्हा योगी स्वत:च्याच कर्मावर संयम करतो, अर्थात् स्वत:च्या वर्तमान क्रियाशील संस्कारांवर व पुढे क्रियात्मक होणाऱ्या संस्कारांवरहि संयम करतो, तेव्हा त्याला क्रियात्मक होण्या-साठी वाट पाहणाऱ्या संस्कारांवरून अचूकपणें कळतें की त्याचा देह केव्हा पडेल. त्याला कळून येतें की कोणत्या तासाला, कोणत्या मिनि-टाला त्याचा मृत्यु ओढवणार आहे. हिंदुलोक मृत्यु जवळ आला आहे हें समजून घेण्याला बरेंच महत्त्व देतात, कारण गीतेंत असें म्हटलें आहे की मृत्युसमयींच्या विचारांवरच पुढील जन्म अवलंबून असतो.

**मैत्र्यादिषु बलानि ॥२४॥**

२४. सूत्रार्थ:—**मैत्री, करुणा इत्यादिकांवर (१.३३) संयम केल्याने योग्याच्या ठायीं हे गुण उत्कर्ष पावतात.**

**बलेषु हस्तिबलादीनि ॥२५॥**

२५. सूत्रार्थ:—**हत्तीच्या व इतरांच्या शक्तीवर संयम केल्याने त्या प्राण्यांचें**

**सामर्थ्य योग्याला प्राप्त होतें.**

स्पष्टीकरण:—संयम प्राप्त झाल्यावर जर योग्याला शक्ति हवी असें वाटलें तर तो हत्तीच्या शक्तीवर संयम करतो व ती त्याला प्राप्त होते. प्रत्येक माणसाच्या ठायीं अनंत शक्ति आहे—फक्त ती कशी मिळवावी हें त्याला समजलें पाहिजे. योग्याला ही शक्ति मिळविण्याचें शास्त्र माहीत झालेलें असतें.

**प्रवृत्त्यालोकन्यासात् सूक्ष्मव्यवहितविप्रकृष्टज्ञानम् ॥२६॥**

२६. **सूत्रार्थ:**—( १.३६ मधे सांगितलेल्या ) **महाज्योतीवर संयम केल्याने व्यवहित व दूरच्या वस्तूंचें ज्ञान होतें.**

स्पष्टीकरण:—जेव्हा योगी हृदयांतील महाज्योतीवर संयम करतो तेव्हा त्याला दूरच्या वस्तु, उदाहरणार्थ दूरच्या ठिकाणीं घडत असलेल्या गोष्टी व डोंगर वगैरे व्यवधानांच्या आड असलेल्या वस्तु व सूक्ष्म अशा वस्तुहि दिसूं लागतात.

**भुवनज्ञानं सूर्ये संयमात् ॥२७॥**

२७. **सूत्रार्थ:—सूर्यावर संयम केल्याने अखिल जगाचें ज्ञान होतें.**

**चन्द्रे ताराव्यूहज्ञानम् ॥२८॥**

२८. **सूत्रार्थ:—चंद्रावर संयम केल्याने सर्व तार्‍यांचें ज्ञान होतें.**

**ध्रुवे तद्गतिज्ञानम् ॥२९॥**

२९. **सूत्रार्थ:—ध्रुवावर संयम केल्याने तार्‍यांच्या गतींचें ज्ञान होतें.**

**नाभिचक्रे कायव्यूहज्ञानम् ॥३०॥**

३०. **सूत्रार्थ:—नाभिचक्रावर संयम केल्याने शरीररचनेचें ज्ञान होतें.**

**कण्ठकूपे क्षुत्पिपासानिवृत्तिः ॥३१॥**

३१. **सूत्रार्थ:—कंठकूपावर संयम केल्याने भूक-तहान नाहीशी होते.**

स्पष्टीकरण:—जर कोणी फार भुकेलेला असेल तर त्याने गळ्यांतील पोकळीवर संयम करावा. असें करूं शकल्यास त्याची भूक नाहीशी होईल.

**कूर्मनाड्यां स्थैर्यम् ॥३२॥**

३२. **सूत्रार्थ:—कूर्म नांवाच्या नाडीवर संयम केल्याने शरीराला स्थैर्य येतें.**

स्पष्टीकरण:—जेव्हा तो साधनाभ्यास करतो तेव्हा त्याचें शरीर चंचल होत नाही.

**मूर्धज्योतिषि सिद्धदर्शनम् ॥३३॥**

**३३. सूत्रार्थ:—मस्तकाच्या ऊर्ध्वभागांतून निघणाऱ्या ज्योतीवर संयम केल्यास सिद्धांचें दर्शन होतें.**

स्पष्टीकरण:—भुताखेतांहून थोड्या उच्च अशा जीवांना 'सिद्ध' म्हणतात. जेव्हा योगी डोक्याच्या वरच्या भागावर मन एकाग्र करतो तेव्हा त्याला हे सिद्ध लोक दिसतात. या ठिकाणीं 'सिद्ध' या शब्दाचा अर्थ 'मुक्त' असा नव्हे. या अर्थानें जरी तो पुष्कळदा वापरला जातो तरी या ठिकाणीं त्याचा अर्थ तसा नाही.

**प्रातिभाद्वा सर्वम् ॥३४॥**

**३४. सूत्रार्थ:—किंवा प्रतिभेच्या सामर्थ्यानें सगळें ज्ञान प्राप्त होतें.**

स्पष्टीकरण:—प्रातिभज्ञान अर्थात् शुचितेमुळे लाभणारें उत्स्फूर्त-ज्ञान ज्याला प्राप्त झालें आहे त्याला संयमावांचूनहि या सर्व गोष्टी मिळू शकतात. जेव्हा माणूस प्रतिभेच्या उच्च स्थितीप्रत पोहोचतो तेव्हा त्याला हा महान् प्रकाश प्राप्त होतो. मग त्याला सर्व गोष्टी स्पष्ट होतात. संयमाशिवायच सर्व गोष्टी त्याला समजतात.

**हृदये चित्तसंवित् ॥३५॥**

**३५. सूत्रार्थ:—हृदयावर संयम केल्याने मनांचें ज्ञान प्राप्त होतें.**

**सत्त्वपुरुषयोरत्यन्तासंकीर्णयोः प्रत्ययाविशेषाद्भोगः परार्थत्वादन्यस्वार्थ-संयमात् पुरुषज्ञानम् ॥३६॥**

**३६. सूत्रार्थ:—पुरुष व बुद्धि हीं अगदी वेगवेगळीं आहेत याचा विवेक नसेल तर भोग प्राप्त होतो. हा भोग 'परार्थ' असतो अर्थात् तो पुरुषासाठी असतो. बुद्धीच्या दुसऱ्या एका अवस्थेचें नांव 'स्वार्थ' असें आहे. तिच्यावर संयम केल्याने पुरुषाचें ज्ञान प्राप्त होतें.**

स्पष्टीकरण:—पुरुष आणि बुद्धि हीं वास्तविक पाहतां सर्वस्वी भिन्न आहेत. असें असूनहि पुरुष बुद्धींत प्रतिबिंबित होऊन स्वतःला तिच्याशीं अभिन्न समजतो आणि त्यामुळेच तो स्वतःला सुखी वा दुःखी समजत असतो. बुद्धीच्या या अवस्थेला 'परार्थ' असें म्हणतात, कारण तिचे सारे भोग स्वतःसाठी नसून पुरुषासाठी असतात. याशिवाय बुद्धीची आणखी एक अवस्था आहे. तिचें नांव आहे 'स्वार्थ'. जेव्हा बुद्धि सत्त्वप्रधान होऊन अत्यंत निर्मल होते आणि तिच्यांत पुरुष विशेष-

रूपाने प्रतिबिंबित होतो त्या वेळीं बुद्धि अंतर्मुख होऊन केवळ पुरुषाचाच अवलंब करते. या 'स्वार्थ' नामक बुद्धीवर संयम केल्याने पुरुषाचें ज्ञान प्राप्त होतें. केवळ पुरुषाचा अवलंब करणाऱ्या बुद्धीवर संयम यासाठी सांगितला आहे की शुद्ध पुरुष ज्ञाता असल्यामुळे तो कधीहि ज्ञानाचा विषय होऊं शकत नाही.

**ततः प्रातिभश्रावणवेदनादर्शास्वादवार्ता जायन्ते ।।३७।।**

**३७. सूत्रार्थः—त्यापासून प्रातिभ ज्ञान प्राप्त होतें आणि श्रवण, स्पर्श, दर्शन, स्वाद व घ्राण यासंबंधीची अलौकिक शक्ति लाभते.**

**ते समाधावुपसर्गा व्युत्थाने सिद्धयः ।।३८।।**

**३८. सूत्रार्थः—हे समाधींतील अडथळे आहेत; पण ऐहिक जीवनांतील ह्या सिद्धि होत.**

स्पष्टीकरणः—योग्याला पुरुष व मन यांच्या संयोगामुळे सर्व विषयभोगांचें ज्ञान प्राप्त होतें. तो जर प्रकृति व आत्मा हीं वेगवेगळीं आहेत या ज्ञानावर संयम करील तर त्याला पुरुषाचें ज्ञान होईल. त्यापासून विवेक उत्पन्न होतो. विवेक प्राप्त झाल्याने प्रतिभा अर्थात् दैवी बुद्धीचा प्रकाश प्राप्त होतो. पण आपलें सर्वश्रेष्ठ ध्येय जें शुद्ध आत्म्याचें ज्ञान किंवा मुक्ति तिच्या प्राप्तीला ह्या सिद्धि बाधक आहेत. या सिद्धि जणुकांही वाटेने (साधनामार्गाने) जातां जातां सापडणाऱ्या गोष्टी आहेत. जर योगी त्यांचा त्याग करील तरच त्याला सर्वोच्च फल मिळेल. पण या सिद्धि मिळविण्याचा त्याला जर मोह पडेल तर त्याची पुढची प्रगति खुंटेल.

**बन्धकारणशैथिल्यात् प्रचारसंवेदनाच्च चित्तस्य परशरीरावेशः ।।३९।।**

**३९. सूत्रार्थः—चित्ताच्या बंधनाचीं कारणें ढिलीं पडल्यावर, चित्ताच्या हालचालींचीं साधनें असलेले जे ज्ञानतंतु आहेत त्यांच्या संबंधीच्या ज्ञानाने योगी इतरांच्या शरीरांत प्रवेश करूं शकतो.**

स्पष्टीकरणः—एका शरीरांत कार्य करीत असतांनाच योगी दुसऱ्या एखाद्या मृत शरीरांत शिरून त्याला उठवून चालावयास लावूं शकतो. किंवा तो एखाद्या माणसाच्या सजीव देहांत शिरून त्या माणसाच्या मनाला व इंद्रियांना आपल्या ताब्यांत घेऊन कांही काळ त्या शरीराच्या द्वारें कार्य करूं शकतो. ज्याला पुरुष व प्रकृति यांचा भेद

उमजला आहे असा योगीच हें कार्य करूं शकतो. योग्याला दुसऱ्याच्या शरीरांत शिरावयाचें असल्यास तो त्या शरीरावर संयम करतो व त्यांत शिरतो. कारण योग्यांच्या मतानुसार केवळ त्यांचा आत्माच नव्हे तर त्यांचें मनहि सर्वव्यापी असतें. तें सर्वव्यापी (समष्टि) मनाचाच एक अंश असतें, पण सध्या तें या शरीरांतील ज्ञानतंतूंच्या द्वारेंच कार्य करूं शकतें. पण या ज्ञानतंतुगत शक्तिप्रवाहांपासून स्वतःची सुटका करून घेतल्यावर योगी इतर शरीरांच्या द्वारें देखील कार्य करूं शकतो.

**उदानजयाज्जलपङ्ककण्टकादिष्वसङ्ग उत्क्रान्तिश्च ॥४०॥**

४०. **सूत्रार्थः—उदान नामक ज्ञानतंतुगत शक्तिप्रवाहावर जय मिळविल्याने योगी पाण्यांत किंवा चिखलांत बुडत नाही. तसेंच तो कांटयांवरून चालत जाऊं शकतो व इच्छामरणी होतो.**

स्पष्टीकरणः—शरीराचा वरचा भाग व फुफ्फुसें यांचें नियंत्रण करणाऱ्या ज्ञानतंतुगत शक्तिप्रवाहाला उदान असें म्हणतात. त्यावर जय मिळविल्याने योग्यांत हलकेंपण येतें. तो पाण्यांत बुडत नाही. तो कांटयांवर किंवा तरवारीच्या पात्यावर चालूं शकतो, आगींत उभा राहूं शकतो आणि स्वेच्छेनुसार हें जग सोडून जाऊं शकतो.

**समानजयात् प्रज्वलनम् ॥४१॥**

४१. **सूत्रार्थः—समान नांवाच्या ज्ञानतंतुगत शक्तिप्रवाहावर विजय मिळविल्याने योगी झगझगीत प्रकाशाने वेष्टिला जातो.**

स्पष्टीकरणः—जेव्हा योग्याला इच्छा होईल तेव्हा त्याच्या शरीरांतून प्रकाश बाहेर पडतो.

**श्रोत्राकाशयोः सम्बन्धसंयमाद्दिव्यं श्रोत्रम् ॥४२॥**

४२. **सूत्रार्थः—आकाश व कान यांच्या संबंधावर संयम केल्याने दैवी श्रवणशक्ति प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः—आकाश, व शब्द ऐकण्याचें साधन जें कान, या दोघांवर संयम केल्याने योग्याला असामान्य श्रवणशक्ति प्राप्त होते. त्याला सगळें कांही ऐकूं येतें. शेकडो मैल अंतरावरून बोललेले शब्द किंवा अति दूरचा आवाज त्याला ऐकूं येतो.

**कायाकाशयोः सम्बन्धसंयमाल्लघुतूलसमापत्तेश्चाकाशगमनम् ॥४३॥**

४३. **सूत्रार्थः—आकाश व शरीर यांच्या संबंधावर संयम केल्याने व कापूस**

**वगैरेंप्रमाणे आपण हलके आहोंत अशी भावना केल्याने योगी आकाशांत स्वैर संचार करूं शकतो.**

स्पष्टीकरण:—आकाश हें या शरीराचें उपादान आहे. आकाशानेच विशिष्ट आकार घेतल्यामुळे शरीर बनतें. जर योगी या शरीराचें उपादान असलेल्या आकाशावर संयम करील तर त्याचें शरीर आकाशासारखें हलकें होऊन तो हवेंतून वाटेल त्या ठिकाणीं फिरूं शकेल. याचप्रमाणे दुसऱ्या गोष्टीच्या बाबतींतहि समजावें.

**बहिरकल्पिता वृत्तिर्महाविदेहा ततः प्रकाशावरणक्षयः ॥४४॥**

४४. **सूत्रार्थ:—स्वतःच्या शरीराविषयीचा अहंभाव नष्ट झाल्यावर मनाच्या ज्या यथार्थ वृत्ति उठतात त्यांना 'महाविदेहा' म्हणतात. त्यांच्यावर संयम केल्यान प्रकाशावरील आवरण नाहीसें होतें.**

स्पष्टीकरण:—अज्ञानामुळे मनाला असें वाटतें की तें शरीरांत हालचाल करीत आहे. पण माझें मन विश्वव्यापी असतांना मीं काय म्हणून ज्ञानतंतूंच्या एकाच पुंजाने स्वतःला बांधून घ्यावें व एकाच शरीरांत आपल्या 'अहं'ला जखडून ठेवावें? असें करण्याचें कांही कारण नाही. योग्याला स्वेच्छेनुसार कुठेहि 'अहं'चा प्रत्यय घ्यावासा वाटतो. स्वतःच्या शरीराविषयीचा अहंभाव नाहीसा झाल्यावर जे मानसिक तरंग उद्भवतात त्यांना 'अकल्पिता वृत्ति' किंवा 'महाविदेहा' असें म्हणतात. या वृत्तींवर संयम करणें शक्य झाल्यास प्रकाशावरचीं सर्व आवरणें नाहीशीं होतात आणि सगळा अंधकार व अज्ञान हीं नष्ट होऊन जातात. योग्याला अशा स्थितींत सगळेंकांही चैतन्यमय दिसूं लागतें.

**स्थूलस्वरूपसूक्ष्मान्वयार्थवत्वसंयमाद्भूतजयः ॥४५॥**

४५. **सूत्रार्थ:—भूतांच्या स्थूल व सूक्ष्म रूपांवर, त्यांच्या स्वरूपावर (पृथ्वीचा कठीणपणा, जलाचा तरलपणा इत्यादि धर्मांवर), त्यांच्यांत वसणाऱ्या गुणांवर (सत्त्व–रज–तमांवर) व आत्म्याला विशिष्ट विशिष्ट भोग वा अनुभव प्रदान करण्याच्या त्यांच्या सामर्थ्यावर संयम केल्याने भूतांवर जय मिळवितां येतो.**

स्पष्टीकरण:—योगी अगोदर भूतांच्या स्थूल अवस्थांवर व त्यानंतर त्यांच्या सूक्ष्म अवस्थांवर संयम करतो. विशेषेंकरून कांही बौद्ध सांप्रदायिक या संयमाचा अभ्यास करतात. ते मातीचा एक गोळा घेऊन

त्यावर संयम साधतात आणि हळूहळू ज्या सूक्ष्म द्रव्यांपासून तो गोळा बनला आहे तीं सूक्ष्म द्रव्यें त्यांना दिसूं लागतात. हीं सर्व सूक्ष्म द्रव्यें दिसल्यावर योगी त्या भूतांवर जय मिळवितो. याचप्रमाणे इतर भूतांच्या बाबतींतहि समजावें. या सर्वांवर योग्याला जय मिळतो.

**ततोऽणिमादिप्रादुर्भावः कायसम्पत्तद्धर्मानभिघातश्च ॥४६॥**

**४६. सूत्रार्थः—त्यापासून अणिमादि सर्व सिद्धि मिळतात, कायासंपत् लाभते आणि शरीराच्या ठिकाणीं असलेल्या धर्मांचा नाश न होण्याचें सामर्थ्य त्या शरीरांत उत्पन्न होतें.**

स्पष्टीकरणः—याचा अर्थ असा की योग्याला अष्ट सिद्धि प्राप्त होतात. तो स्वतःला परमाणूइतकें लहान, डोंगराइतकें मोठें, पृथ्वीइतकें जड किंवा हवेप्रमाणे हलकें करूं शकतो. तो कुठेहि जाऊन पोहोचूं शकतो. तो कशावरहि जय मिळवूं शकतो, इत्यादि. त्याच्या पायाशीं सिंहहि शेळीप्रमाणे बसेल. त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होऊं शकतात.

**रूपलावण्यबलवज्रसंहननत्वानि कायसम्पत् ॥४७॥**

**४७. सूत्रार्थः—सौंदर्य, सुंदर अंगकांति, शक्ति व वज्रासारखी दृढता हीच 'काया-संपत्' होय.**

स्पष्टीकरणः—शरीर हें अविनाशी बनतें. कशानेहि त्याला इजा पोहोचूं शकत नाही. योग्याच्या इच्छेवांचून कोणतीहि गोष्ट त्याच्या शरीराचा नाश करूं शकणार नाही. 'काळाचा दंड तोडून योगी आपल्या शरीरानिशी जगांत राहत असतो.' वेदांमधे असें म्हटलें आहे की अशा माणसाला रोग, मृत्यु, दुःख इत्यादि गोष्टींचा उपसर्ग पोहोचत नाही.

**ग्रहणस्वरूपास्मितान्वयार्थवत्त्वसंयमादिन्द्रियजयः ॥४८॥**

**४८. सूत्रार्थः—इंद्रियांच्या विषयाभिमुखी गतीवर, तज्जनित ज्ञानावर, या ज्ञानापासून निर्माण झालेल्या अहंप्रत्ययावर, इंद्रियांतील गुणांवर व आत्म्याला भोगानुभव देण्याच्या त्यांच्या सामर्थ्यावर संयम केल्याने इंद्रियांवर जय मिळवितां येतो.**

स्पष्टीकरणः—बाह्य विषयांचा अनुभव घेतांना इंद्रियें मनांतील आपली जागा सोडून विषयांकडे धांव घेतात. यानंतरच विषयांचें ज्ञान होतें आणि 'अहं'ची उत्पत्ति होते. यांवर व इतर दोघांवर जेव्हा योगी

हळूहळू संयम साधतो तेव्हा तो इंद्रियांना जिंकतो. कोणतीहि दृश्य किंवा स्पृश्य वस्तु--उदा० एखादें पुस्तक--घ्या आणि प्रथम तिच्यावर संयम करा. त्यानंतर पुस्तकरूपाने होणाऱ्या ज्ञानावर व त्याहिनंतर जो 'अहं' तें पुस्तक पाहतो त्याच्यावर संयम करा. या अभ्यासाने सर्व इंद्रियें जिंकतां येतात.

**ततो मनोजवित्वं विकरणभावः प्रधानजयश्च ।।४९।।**

**४९. सूत्रार्थ:--त्यापासून शरीराला मनासारखी शीघ्र गति प्राप्त होते आणि शरीराशिवाय देखील विषयानुभूतीचें सामर्थ्य येतें व प्रकृतीवर जय मिळवितां येतो.**

स्पष्टीकरण:--ज्याप्रमाणे भूतांवरील जयामुळे 'काया-संपत्' प्राप्त होते त्याचप्रमाणे इंद्रियांच्या जयामुळे या सूत्रांत सांगितलेल्या सिद्धि प्राप्त होतात.

**सत्त्वपुरुषान्यताख्यातिमात्रस्य सर्वभावाधिष्ठातृत्वं सर्वज्ञातृत्वं च ।।५०।।**

**५० सूत्रार्थ--सत्त्व आणि पुरुष यांमधील भेदावर संयम केल्याने सर्वशक्ति-मत्व व सर्वज्ञत्व प्राप्त होतें.**

स्पष्टीकरण:--प्रकृतीवर जय मिळविल्याने व पुरुष आणि प्रकृति यांमधील भेद जाणल्याने--म्हणजे पुरुष शुद्ध, अविनाशी आणि पूर्ण आहे असें जाणल्याने--सर्वज्ञता व सर्वशक्तिमत्व हीं प्राप्त होतात.

**तद्वैराग्यादपि दोषबीजक्षये कैवल्यम् ।।५१।।**

**५१. सूत्रार्थ:--या सिद्धींचाहि त्याग केल्याने सर्व अशुभाचें बीजच नष्ट होऊन जातें व त्यामुळे कैवल्य प्राप्त होतें.**

स्पष्टीकरण:--तो कैवल्य प्राप्त करतो--मुक्त होऊन जातो. जेव्हा सर्वज्ञता व सर्वशक्तिमत्व यांचाहि त्याग केला जातो तेव्हा भोगांचा व देवतादिकांनी दाखविलेल्या प्रलोभनांचाहि पूर्णपणें त्याग होतो. जेव्हा योगी या सर्व आश्चर्यकारक सिद्धि प्राप्त करूनहि त्यांचा त्याग करतो तेव्हा तो आपल्या ध्येयाप्रत पोहोचतो. या सिद्धि आहेत तरी काय ? त्या केवळ विकाररूप आहेत. त्या स्वप्नाहून श्रेष्ठ नाहीत. सर्वशक्तिमत्वहि स्वप्नतुल्यच आहे, कारण तें मनावर अवलंबून आहे. जोंपर्यंत मन आहे तोंपर्यंतच सर्वशक्तिमत्व संभवूं शकतें. पण अंतिम ध्येय मनाच्याहि पलीकडे आहे.

**स्थान्युपनिमन्त्रणे सङ्गस्मयाकरणं पुनरनिष्टप्रसङ्गात् ॥५२॥**

५२. **सूत्रार्थः—स्वर्गीय देवतांनी दाखविलेल्या प्रलोभनांनी योग्याने मोहून किंवा हरखून जातां कामा नये, कारण त्यापासून फिरून अनिष्ट उद्भवण्याची शक्यता आहे.**

स्पष्टीकरणः—इतरहि धोके आहेत. देवतादि योग्याला भुरळ पाडण्यासाठी येतात. कोणीहि पूर्णपणें मुक्त झालेला त्यांना आवडत नाहीं. त्या माणसाप्रमाणेच किंबहुना माणसापेक्षाहि जास्त मत्सरी असतात. त्यांना आपलें पद गमावण्याची फार भीति वाटत असते. जे योगी पूर्णत्वास न पोहोचतांच मृत्युमुखीं पडतात ते देव-देवता होतात. सरळ मार्ग सोडून ते जणु बाजूच्या मार्गानें जातात व या सिद्धि मिळवतात. मग त्यांना फिरून जन्म घ्यावा लागतो. पण ज्याच्या ठायीं या मोहांना जिंकण्याचें सामर्थ्य असतें व जो सरळ आपल्या ध्येयाकडे जातो तो मुक्त होतो.

**क्षणतत्क्रमयोः संयमाद्विवेकजं ज्ञानम् ॥५३॥**

५३. **सूत्रार्थः—काळाच्या क्षणावर व त्याच्या पूर्वापर क्रमावर संयम साधल्याने विवेक प्राप्त होतो.**

स्पष्टीकरणः—देव, स्वर्ग, सिद्धि इत्यादि साऱ्या गोष्टी कशा टाळाव्या ?—विवेकाने, सदसद्विचाराने. म्हणून येथे असा संयम सांगितला आहे की ज्याच्यायोगें विवेकशक्ति वाढवितां येईल. हा संयम क्षण व त्याचा पूर्वापर क्रम यांवर करावयाचा असतो.

**जातिलक्षणदेशैरन्यतानवच्छेदात्तुल्ययोस्ततः प्रतिपत्तिः ॥५४॥**

५४. **सूत्रार्थः—जाति, लक्षण व स्थान यांच्याद्वारें ज्या वस्तूंमधे भेद करूं न शकल्यामुळे त्या समान प्रतीत होतात, त्यांनादेखील उपर्युक्त संयमाच्या द्वारें पृथक् पृथक् रूपांत जाणतां येतें.**

स्पष्टीकरणः—आपण जीं दुःखें भोगतों तीं अज्ञानामुळे, सत्यासत्याच्या अविवेकामुळे उद्भवतात. आपण सगळेच वाईटाला चांगलें व स्वप्नाला सत्य समजतों. आत्माच केवळ सत्य आहे, पण आपण हें विसरून बसलों आहोंत. शरीर हें एक मिथ्या स्वप्न आहे आणि तरी आपल्याला वाटतें की आपण शरीर आहोंत. हा अविवेक दुःखाचें कारण आहे. अविवेक हा अज्ञानामुळे होतो. विवेकाबरोबर

सामर्थ्य येतें आणि तेव्हाच आपण शरीर, स्वर्ग व देव या कल्पना टाकूं शकतों. जाति, लक्षण आणि स्थल यांच्यायोगें आपण वस्तूंमधे भेद करतों. उदा० एक गाय घ्या. गाय आणि कुत्रा यांच्यांत जातीचा भेद आहे. गायींमधे देखील एका गायीचा दुसरीपासून भेद आपण कसा करतों ?—लक्षणांमुळे. दोन वस्तु अगदीच सारख्या असल्या तर त्यांच्यांत स्थानामुळे भेद करतां येतो. पण जर वस्तूंची आपसांत इतकी सरमिसळ झाली असेल की या व्यवच्छेदकांचाहि कांही उपयोग होणार नसेल तर वर सांगितलेल्या अभ्यासाने मिळविलेल्या विवेकशक्तीच्या द्वारें त्या वस्तूंमधे आपण भेद करूं शकतों. योग्यांचें सर्वोच्च तत्त्वज्ञान या सत्यावर आधारलें आहे की पुरुष हा शुद्ध, पूर्ण व विश्वांतील एकमेव अमिश्र असें तत्त्व आहे. शरीर व मन हीं सावयव (मिश्र स्वरूपाचीं) आहेत. तरीपण आपण स्वतःला त्यांच्याशीं नेहमी एकरूप करीत असतों. या पार्थक्यज्ञानाचें वा वेगळेपणाचें विस्मरण होणें हा सर्वांत मोठा भ्रम होय. ही विवेकशक्ति प्राप्त केल्यावर मानवाला कळून येतें की या जगांतील सर्वच वस्तु सावयव वा मिश्र आहेत; आणि म्हणून त्या 'पुरुष' असूं शकत नाहीत.

**तारकं सर्वविषयं सर्वथाविषयमक्रमं चेति विवेकजं ज्ञानम् ॥५५॥**

५५. **सूत्रार्थः—जें विवेकज्ञान सर्व वस्तूंचें व त्यांच्या सर्व अवस्थांचें एकाच वेळीं आकलन करतें त्याला 'तारक' ज्ञान असें म्हणतात.**

स्पष्टीकरणः—हें ज्ञान 'तारक' आहे, कारण हें योग्यास जन्म-मरणाच्या महासागरापलीकडे नेतें. स्थूल-सूक्ष्म अवस्थांसकट संपूर्ण प्रकृति या ज्ञानाच्या कक्षेंत येते. या ज्ञानाच्या अनुभूतींत क्रम नाही. हें ज्ञान एकाच क्षणीं सर्व वस्तूंचें आकलन करीत असतें.

**सत्त्वपुरुषयोः शुद्धिसाम्ये कैवल्यमिति ॥५६॥**

५६. **सूत्रार्थः—सत्त्व हें जेव्हा पुरुषाइतकेंच शुद्ध होतें तेव्हा कैवल्य प्राप्त होतें.**

स्पष्टीकरणः—जेव्हा आत्म्याला ज्ञान होतें की तो देवांपासून अणूपर्यंत विश्वांतल्या कोणत्याहि वस्तूवर अवलंबून नाही तेव्हा त्याला कैवल्य वा पूर्णता प्राप्त होते. हें तेव्हाच घडतें की जेव्हा शुद्ध-अशुद्धाचें मिश्रण जें सत्त्व (बुद्धि) तें पुरुषाइतकेंच शुद्ध होतें. तेव्हा त्या सत्त्वांत

केवळ तो शुद्ध व निर्गुण स्वरूपाचा पुरुषच प्रतिबिंबित होतो.

## चतुर्थ अध्याय

# कैवल्यपाद

**जन्मौषधिमन्त्रतपःसमाधिजाः सिद्धयः ॥१॥**

**१. सूत्रार्थः—जन्म, रसायनें, मंत्रसामर्थ्य, तपश्चर्या व समाधि यांच्याद्वारें सिद्धि प्राप्त होतात.**

स्पष्टीकरणः—केव्हा केव्हा माणूस कांही सिद्धि (शक्ति) घेऊनच जन्मास येतो. या सिद्धि त्याने पूर्वजन्मांत प्राप्त केलेल्या असतात. या वेळीं तो जणुकांही त्या सिद्धींचीं फळें भोगावयास जन्मलेला असतो. सांख्य तत्त्वज्ञानाचे जनक महर्षि कपिल यांच्याबद्दल म्हणतात की ते जन्मतःच सिद्ध होते.

योग्यांचें म्हणणें आहे की या सिद्धि रसायनांनी प्राप्त होऊं शकतात. तुम्हां सगळ्यांना माहीतच असेल की रसायनशास्त्र हें किमयेपासून निघालें आहे. पूर्वीचे लोक परीस, अमृत इत्यादींचा शोध करीत असत. भारतांत 'रासायन' नांवाचा एक संप्रदाय होता. त्यांचें मत असें होतें की ज्ञान, अध्यात्म, धर्म वगैरे सर्व चांगल्याच गोष्टी आहेत, पण शरीररूप साधनाच्या द्वारेंच या गोष्टी प्राप्त होऊं शकणाऱ्या आहेत. जर शरीर वरचेवर नष्ट होऊं लागलें तर ध्येयप्राप्तीसाठी तितकाच जास्त वेळ लागेल. उदाहरणार्थ एखादा माणूस योगाभ्यास करून आध्यात्मिक भावांनी संपन्न होऊं इच्छितो, पण हें लक्ष्य साध्य होण्यापूर्वीच तो मरून जातो. फिरून तो शरीर धारण करतो, प्रयत्न करतो व फिरून मरतो. याप्रमाणे जन्ममरणांतच त्याचा पुष्कळ काळ निघून जाईल. जर शरीर सबल व निर्दोष करतां आलें व त्यामुळे जन्ममरण चुकवतां आलें तर तितकाच काळ साधनेसाठी वांचवतां येईल. म्हणून 'रासायन' संप्रदायाचें असें मत आहे की प्रथम शरीर मजबूत करावें. त्यांचें मत आहे की शरीर अविनाशी केलें जाऊं शकतें. त्यांचें असेंहि म्हणणें आहे की ज्याअर्थी मनच शरीर निर्माण करतें व ज्याअर्थी

प्रत्येक मन हें अनंत शक्तीच्या अभिव्यक्तीचें एक एक माध्यम आहे त्याअर्थीं या प्रत्येक माध्यमाला बाहेरून वाटेल तितकी शक्ति ओढून घेतां येतें. वाटेल तितका काळ शरीर जिवंत ठेवणें अशक्य कां असावें? आपल्याला जीं जीं शरीरें प्राप्त होतात तीं सर्व आपल्यालाच निर्माण करावीं लागतात. हें शरीर मृत होतांच आपल्याला दुसरें शरीर तयार करावें लागतें. जर हें करणें आपल्याला शक्य आहे तर तें आताच-- या शरीराबाहेर न जातांच--कां करतां येऊं नये ? हा सिद्धान्त अगदी बरोबर आहे. मृत्यूनंतरहि अस्तित्वांत राहून नवें शरीर निर्माण करणें आपल्याला जर शक्य आहे तर येथेंच, हें शरीर नष्ट होऊं न देतां केवळ त्यांत सारखा बदल घडवून नवीं नवीं शरीरें निर्माण करणें कां शक्य होऊं नये ? त्यांचें असेंहि मत होतें की गंधक व पारा यांच्यांत फार आश्चर्यकारक शक्ति आहेत व त्यांच्यापासून तयार केलेल्या औषधांच्या द्वारें माणूस आपलें शरीर वाटेल तितका काळ कायम ठेवूं शकतो. दुसऱ्या कांही लोकांची अशी समजूत होती की कांही औषधांच्या सेवनानें हवेंत उडणें इत्यादि शक्ति प्राप्त होऊं शकतात. आजचीं अनेक आश्चर्यकारक औषधें या रासायनांनीच शोधून काढलीं आहेत. विशेषें- करून त्यांनीच औषधांमधे धातूंचा उपयोग अस्तित्वांत आणला. योग्यांच्या कांही संप्रदायांचें म्हणणें आहे की त्यांचें कांही प्रमुख आचार्य आपल्या जुन्या शरीरांतच अजून हयात आहेत. योगाचे महान् आचार्य पतंजलि ही गोष्ट अमान्य करीत नाहीत.

मंत्रसामर्थ्य--'मंत्र' नांवाचे कांही पवित्र शब्द सामर्थ्यवान असतात. त्यांचा योग्य नियमानुसार जप केल्याने या असामान्य शक्ति प्राप्त होतात. आपण रात्रंदिवस इतक्या आश्चर्यकारक घटनांनी वेढलेले असतों की त्यांचें आपल्याला कांहीच महत्त्व वाटत नाही. मानवी शक्तीला, मंत्रसामर्थ्याला व मनाच्या शक्तीला कोणतीहि मर्यादा नाही.

तपश्चर्या--तुम्हांला माहीत असेल की प्रत्येक धर्मांत तपश्चर्येचा अभ्यास केला जातो. धर्माच्या ह्या अंगाच्या बाबतींत हिंदु लोक अगदी शेवटच्या टोकाला जातात. जोंवर हात सुकून जाऊन नष्ट होत नाही तोंवर तो उभारून ठेवणारे अनेक लोक तुम्हांला सापडतील. कांही लोक पाय सुजून जाईपर्यंत सतत उभेच राहतात. या लोकांचे पाय इतके

आखडून जातात की मग त्यांना ते वाकवतांच येत नाहीत. त्यांना सगळा जन्म उभ्यानेच काढावा लागतो. मीं एकदा अशा तऱ्हेचा हात वर केलेला माणूस पाहिला. मीं त्याला विचारलें की तसें करतांना सुरवातीला त्याला कसें वाटलें. तो म्हणाला की त्याला त्या वेळीं भयंकर यातना झाल्या. त्याला इतक्या वेदना होत असत की त्याला नदींत जाऊन पाण्याखाली बसून राहावें लागे. त्यामुळे त्याचें दुःख थोडें कमी होई. एका महिन्यानंतर त्याला मग फारसा त्रास झाला नाही. अशा अभ्यासाने सिद्धि प्राप्त होऊं शकतात.

समाधि—समाधि हाच यथार्थ योग आहे. हा योगशास्त्राचा मुख्य विषय आहे. हेंच सर्वश्रेष्ठ साधन आहे. आधीचीं साधनें गौण आहेत आणि त्यांच्या मदतीने आपण सर्वोच्च ध्येय प्राप्त करूं शकत नाहीं. समाधिच असें साधन आहे की जिच्या मदतीने मानसिक, नैतिक व आध्यात्मिक सर्वच गोष्टी आपण मिळवूं शकतों.

**जात्यन्तरपरिणामः प्रकृत्यापूरात् ॥२॥**

२. **सूत्रार्थः—जातीचें परिवर्तन हें प्रकृतीच्या मदतीने होत असतें.**

स्पष्टीकरणः—पतंजलींनी म्हटलें आहे की शक्ति कधी जन्मतः, कधी रसायनाने, तर कधी तपश्चर्येने प्राप्त होतात. ते असेंहि मान्य करतात की हें शरीर वाटेल तितका काळ जिवंत ठेवलें जाऊं शकतें. आता ते सांगतात की एक शरीर बदलून दुसऱ्या जातीचें शरीर कां निर्माण होतें. त्यांचें म्हणणें आहे की हें प्रकृतीच्या मदतीने होतें. हाच सिद्धान्त ते पुढील सूत्रांत स्पष्ट करून सांगतात.

**निमित्तमप्रयोजकं प्रकृतीनां वरणभेदस्तु ततः क्षेत्रिकवत् ॥३॥**

३. **सूत्रार्थः—चांगलीं व वाईट कर्मे हीं प्रकृतीच्या परिवर्तनाचीं प्रत्यक्ष कारणें नव्हत, पण तीं प्रकृतीच्या विकासाच्या मार्गांतील अडथळ्यांचें केवळ निराकरण करतात. जसें शेतकरी पाण्याच्या वाटेवरील अडथळे दूर सारतो व त्यामुळे पाणी आपोआप वाहूं लागतें तसेंच हें आहे.**

स्पष्टीकरणः—शेत भिजविण्यासाठी पाणी कालव्यांतच असतें, फक्त तें दारांनी अडवलेलें असतें. शेतकरी हीं दारें उघडतो आणि पाणी आपोआप गुरुत्वाकर्षणाच्या नियमानुसार आंतमधे वाहूं लागतें. त्याचप्रमाणे उन्नति व सर्व शक्ति माणसामधेच अवस्थित आहेत. पूर्णता

**प्रवृत्तिभेदे प्रयोजकं चित्तमेकमनेकेषाम् ॥५॥**

**५. सूत्रार्थः--जरी या निरनिराळ्या 'निर्माणचित्तां'चीं कार्यें निरनिराळीं असलीं तरी या सगळ्यांचें नियंत्रण मूळ चित्तच करतें.**

स्पष्टीकरणः--ह्या विभिन्न शरीरांना चालना देणाऱ्या या भिन्न भिन्न मनांना 'निर्माणचित्तें' असें म्हणतात व या विभिन्न शरीरांना 'निर्माणदेह' असें म्हणतात. भूतें व मन हीं दोन्ही कधीहि रिता न होणाऱ्या साठ्यासारखीं आहेत. तुम्ही जेव्हा योगी व्हाल तेव्हा तुम्हांला त्यांच्या नियंत्रणाचें रहस्य कळेल. तें रहस्य सदाच तुमच्या ठायीं वसत आहे पण तुम्ही तें विसरून गेलां आहांत. योगी झाल्यावर तुम्हांला त्याची स्मृति होईल. तेव्हा मग तुम्ही त्याचा स्वेच्छेनुसार उपयोग करूं शकाल. ज्या उपादानापासून हें विश्व निर्मिलें जातें त्याच उपादानापासून हीं 'निर्माणचित्तें' तयार केलीं जातात. मन वेगळी वस्तु आहे व भौतिक पदार्थ वेगळी वस्तु आहे असें नाही. हीं दोन्हीं एकाच वस्तूचे दोन पैलू आहेत. अस्मिता किंवा अहंतत्त्व या सूक्ष्म द्रव्यापासूनच योग्याचे 'निर्माणदेह' व 'निर्माणचित्तें' हीं उत्पन्न केलीं जातात. म्हणून प्रकृती-च्या शक्तीचें रहस्य कळल्यावर योगी अहंतत्त्वापासून वाटेल तितकीं शरीरें व मनें तयार करूं शकतो.

**तत्र ध्यानजमनाशयम् ॥६॥**

**६. सूत्रार्थः--या सर्व चित्तांपैकी समाधीने प्राप्त केलेलें चित्त हें वासनाशून्य असतें.**

स्पष्टीकरणः--वेगवेगळ्या माणसांत जीं वेगवेगळीं मनें आपण पाहतों त्यांपैकी ज्यांत समाधीचा किंवा पूर्ण एकाग्रतेचा उदय झाला आहे तें सर्वश्रेष्ठ असतें. औषधें, मंत्र किंवा तप यांच्या द्वारें ज्याने कांही शक्ति प्राप्त केल्या आहेत त्याला इच्छा असतातच, पण ज्याने एकाग्र-तेच्या द्वारें समाधि-अवस्था प्राप्त केली आहे तोच इच्छेपासून मुक्त होतो.

**कर्माशुक्लाकृष्णं योगिनस्त्रिविधमितरेषाम् ॥७॥**

**७. सूत्रार्थः--योग्यांचीं कर्में कृष्ण नसतात व शुक्लहि नसतात. इतरांचीं कर्में शुक्ल, कृष्ण व मिश्र अशीं त्रिविध असतात.**

स्पष्टीकरणः--जेव्हा योग्याला पूर्णता प्राप्त होते तेव्हा त्याचीं

कर्में व कर्मफलें त्याला बंधनकारक होत नाहीत, कारण तो त्यांची इच्छा ठेवीत नाहीं. तो फक्त कर्में करीत जातो. दुसऱ्याच्या भल्यासाठी तो कर्म करीत असतो, पण त्याच्या फलाची तो इच्छा ठेवीत नाही. त्यामुळे त्याचा त्यावर परिणाम होत नाही. पण त्या अत्युच्च अवस्थेप्रत न पोहोंचलेल्या सामान्य माणसांचीं कर्में कृष्ण (पापकर्में), शुक्ल (पुण्यकर्में) आणि मिश्र अशीं त्रिविध असतात.

**ततस्तद्विपाकानुगुणानामेवाभिव्यक्तिर्वासनानाम् ॥८॥**

८. **सूत्रार्थ:—या त्रिविध कर्मांपासून प्रत्येक अवस्थेंत, त्या अवस्थेलाच अनुरूप अशा इच्छा व्यक्त होतात. इतर इच्छा त्या वेळेपुरत्या अव्यक्त राहतात.**

स्पष्टीकरण:—समजा की मीं चांगलीं, वाईट व मिश्र अशीं त्रिविध कर्में करून मरतों व मेल्यानंतर स्वर्गांत जाऊन देव होतों. देवशरीरांतील इच्छा मानवी शरीरांतल्या इच्छेसारख्या नसतात. देवशरीराला खाद्यपेयें लागत नाहीत. मग खाण्यापिण्याची इच्छा उत्पन्न करणाऱ्या माझ्या पूर्व, अभुक्त कर्मांचें काय होतें ? मी देव झाल्यास हीं कर्में कुठे जातील ? याचें उत्तर हें की अनुकूल परिस्थिति प्राप्त झाली म्हणजे इच्छा व वासना प्रकट होतात. ज्या वासनांना अनुकूल परिस्थिति लाभते त्याच केवळ त्या वेळीं प्रकट होतात. बाकीच्या साऱ्या वासना संचित अवस्थेंत राहतात. या जीवनांत आपण अनेक दैवी इच्छा, अनेक मानवी इच्छा व अनेक पाशवी इच्छा बाळगतों. जर मी दैवी शरीर धारण करीन तर चांगल्या इच्छाच, त्यांना अनुरूप असें वातावरण असल्यामुळे फलद्रूप होतील आणि जर मीं पशूचें शरीर घेतलें तर पाशवी वासनाच त्यांत प्रकट होतील आणि चांगल्या इच्छा तशाच संचित राहतील. यावरून काय दिसतें ? हेंच की भोवतालच्या परिस्थितीच्या मदतीने आपण वासनांचा प्रतिरोध करूं शकतों. जें कर्म परिस्थितीला साजेसें व जुळणारें आहे तेंच प्रकट होईल. यावरून दिसून येतें की परिस्थितीची महान् शक्ति कर्मांचेंहि नियंत्रण करते.

**जातिदेशकालव्यवहितानामप्यानन्तर्यं स्मृतिसंस्कारयोरेकरूपत्वात् ॥९॥**

९. **सूत्रार्थ:—स्मृति आणि संस्कार एकरूप असल्यामुळे जाति, देश व काल यांचें व्यवधान असूनहि वासनांमधे आनंतर्य असतें—त्यांचा पूर्वापर संबंध किंवा क्रम खंडित होत नाही.**

स्पष्टीकरण:—अनुभव सूक्ष्म झाला कीं तो 'संस्कार' बनतो. संस्कार जागृत झाला की तो 'स्मृति' होतो. जाणीवपूर्वक केल्या गेलेल्या वर्तमान कालांतील कर्मांशीं, संस्काररूपांत परिणत झालेल्या पूर्वानुभवांचा जो नेणीवयुक्त संबंध आहे त्याचाहि या ठिकाणीं 'स्मृति' या शब्दाने बोध होतो. प्रत्येक शरीरांत, त्याच जातीच्या शरीरांत प्राप्त झालेल्या संस्कारांपासून वर्तमान कर्मे उद्‌भवत असतात. वेगळ्या प्रकारच्या शरीरांपासून प्राप्त झालेले संस्कार तेव्हा अवरुद्ध असतात. प्रत्येक शरीर अशा तऱ्हेने कार्य करतें की तें पूर्वीच्या सजातीय अशा एकामागून एक लाभलेल्या अनेक शरीरांचा परिणाम होय. याप्रमाणे वासनांचा पूर्वापर संबंध वा क्रम खंडित होत नाही.

**तासामनादित्वं चाशिषो नित्यत्वात् ॥१०॥**

१० **सूत्रार्थ:—सुखाची तृष्णा नित्य असल्यामुळे वासनाहि अनादि असतात.**

स्पष्टीकरण:—सगळ्याच अनुभवांच्या वा भोगांच्या पूर्वी सुखाची इच्छा असते. भोगांना आदि वा प्रारंभ नसतोच, कारण प्रत्येक भोग पूर्वीच्या भोगाने उत्पन्न केलेल्या प्रवृत्तीवर आधारलेला असतो. म्हणून वासना अनादि असतात.

**हेतुफलाश्रयालम्बनैः संगृहीतत्वादेषामभावे तदभावः ॥११॥**

११. **सूत्रार्थ:—वासना या कारण, कार्य, आधार आणि विषय यांवर आधारित असल्यामुळे हीं सर्व नाहीशीं झालीं की वासनाहि नाहीशा होतात.**

स्पष्टीकरण:—वासना ह्या कारण व कार्य * यांवर आधारलेल्या असतात. एखादी वासना उत्पन्न झाली की ती कांही फल उत्पन्न केल्याशिवाय नष्ट होत नाही. मन हें संस्कारावस्थेंत पोहोचलेल्या वासनांचें भांडार आहे. जोंपर्यंत त्या वासना फलद्रूप होत नाहीत तोंपर्यंत त्या नष्ट होत नाहीत. शिवाय, जोंपर्यंत इंद्रियें बाह्य विषय ग्रहण करीत असतात तोंपर्यंत नवनवीन वासना उद्भवतच असतात. जर कारण, कार्य, आधार व विषय यांच्या तावडींतून सुटतां आलें तरच वासना नष्ट होतील.

---

* २.३ या सूत्रांत सांगितलेले 'क्लेश' व ४.७ या सूत्रांत सांगितलेलीं 'कर्मे' हीं 'कारणें' होत. आणि २.१३ या सूत्रांत सांगितलेल्या विभिन्न योनि, कमीजास्त आयुष्य व सुखदुःखांचा भोग, हीं 'कार्ये' होत.

**अतीतानागतं स्वरूपतोऽस्त्यध्वभेदाद्धर्माणाम् ॥१२॥**

**१२. सूत्रार्थः—हें सारेंकांही वस्तूंच्या धर्मांच्या विभिन्न अभिव्यक्तींमुळेच झालें आहे. म्हणून अतीत व भविष्य स्वरूपतः विद्यमान आहेतच.**

स्पष्टीकरणः—याचें तात्पर्य हें की 'सत्'ची उत्पत्ति कधी 'असत्' पासून होत नाही. अतीत व भविष्य हीं जरी व्यक्त रूपांत नसलीं तरी सूक्ष्म रूपांत असतातच.

**ते व्यक्तसूक्ष्मा गुणात्मानः ॥ १३ ॥**

**१३. सूत्रार्थः—हे ( धर्म ) कधी व्यक्त अवस्थेंत असतात, तर कधी ते सूक्ष्मावस्थेंत जातात, आणि गुण हे त्यांचा आत्मा अथवा स्वरूप आहेत.**

स्पष्टीकरणः—सत्त्व, रज व तम हेच गुण होत व यांची स्थूल अवस्थाच हें दृश्य विश्व आहे. या तीन गुणांच्या निरनिराळ्या अभिव्यक्तींतूनच भूत व भविष्य उद्‌भवतात.

**परिणामैकत्वाद्वस्तुतत्त्वम् ॥ १४ ॥**

**१४. सूत्रार्थः—परिणामांच्या एकत्वामुळे वस्तूंत एकत्व येतें.**

स्पष्टीकरणः—जरी वस्तु सत्त्व, रज व तम अशा तीन आहेत तरी त्यांच्या परिवर्तनांत परस्पर संबंध असल्यामुळे सर्व वस्तूंत एकत्व येतें.

**वस्तुसाम्ये चित्तभेदात्तयोर्विभक्तः पन्थाः ॥१५॥**

**१५. सूत्रार्थः—वस्तु एकच असली तरी ज्याअर्थी तिच्यासंबंधी भिन्न भिन्न प्रकारच्या वासना व अनुभव उद्भवत असतात त्याअर्थी मन आणि विषय भिन्न वस्तु आहेत.**

स्पष्टीकरणः—म्हणजे आपल्या मनावर अवलंबून नसलेलें असें एक बाह्य विश्व आहे. हें बौद्ध विज्ञानवादाचें खंडन आहे. ज्याअर्थी वेगवेगळ्या माणसांना एकच वस्तु वेगवेगळ्या तऱ्हेची दिसते त्याअर्थी ती कुणाहि एखाद्या विशिष्ट व्यक्तीची केवळ कल्पना असूं शकत नाही. *

---

* कित्येक प्रतींत हें एक जास्तीचें सूत्र आढळतें:—

**न चैकचित्ततन्त्रं वस्तु तदप्रमाणकं तदा किं स्यात्**

**सूत्रार्थः**—एखाद्या वस्तूचें अस्तित्व कोणत्याहि एकाच मनावर अवलंबून आहे असें म्हणतां यावयाचें नाही. कारण मग तिच्या अस्तित्वाचें दुसरें कांहीच प्रमाण नसल्यामुळे ती असत् होऊन जाईल. (पुढे चालू)

**तदुपरागापेक्षित्वाच्चित्तस्य वस्तु ज्ञाताज्ञातम् ॥ १६ ॥**

**१६. सूत्रार्थः—ज्ञानासाठी चित्तावर वस्तूचें प्रतिबिंब पडावें लागत असल्या-मुळे वस्तु कधी ज्ञात तर कधी अज्ञात असतात.**

**सदा ज्ञाताश्चित्तवृत्तयस्तत्प्रभोः पुरुषस्यापरिणामित्वात् ॥ १७ ॥**

**१७. सूत्रार्थः—चित्तवृत्ति नेहमीच ज्ञात असतात, कारण चित्ताचा अधिपति जो पुरुष तो अपरिवर्तनशील असतो.**

स्पष्टीकरणः—या सिद्धान्ताचा एकंदरींत सारांश असा आहे की विश्व हें मानसिक व भौतिक दोन्ही प्रकारचें आहे. हीं दोन्हीं सतत परिवर्तनशील अशा अवस्थेंत असतात. उदाहरणार्थ, हें पुस्तक काय आहे ? हें सतत बदलणाऱ्या अणूंचा एक पुंज आहे. अणूंचा एक समूह बाहेर निघून जातो व त्याच्या जागीं दुसरा येतो. हा जणु एक भोवरा आहे. पण यांत एकता कोठून येते ? कशामुळे हें पुस्तक सर्वदा एकाच रूपांत दिसतें ? याचें कारण हें की हीं सर्व परिवर्तनें लयबद्ध असतात व त्यांचे मनावर होणारे परिणामहि लययुक्तच असतात. यांचें एकी-करण झाल्याने एक सातत्ययुक्त दृश्य—जरी त्यांत सारखें परिवर्तन होत असलें तरी—उत्पन्न होतें. मन हें स्वतः सारखें बदलत असतें. मन व शरीर हीं एकाच पदार्थाच्या वेगवेगळ्या गतींच्या दोन स्तरांसारखीं आहेत. यांतला एक स्तर दुसऱ्यापेक्षा मंद गतीचा असल्यामुळे या दोघांच्या गतींत आपण फरक करूं शकतों. उदाहरणार्थ, एक आगगाडी चालत असून तिच्या बाजूने एक डबाहि चालत आहे. या दोघांची गति कांही अंशीं ठरवतां येऊं शकते. तरी पण त्यासाठी आणखीहि एका वस्तूची आवश्वकता आहे. गतीचें ज्ञान होण्यासाठी निश्चल अशी आणखी एखादी वस्तु असणें आवश्यक आहे. पण जर दोन किंवा तीन वस्तु वेगवेगळ्या गतींनी धावत असतील तर जास्त वेगवान वस्तूंची गति आपल्याला अगोदर कळेल, त्यानंतर मंद गतीच्या वस्तूंची. आता प्रश्न हा की मनाला अनुभव कसा येऊं शकतो ? तें तर सर्वदा गतिशील

---

**स्पष्टीकरणः**—जर वस्तूचा अनुभव हेंच तिच्या अस्तित्वाचें एकमेव प्रमाण असेल तर मन ज्या वेळीं समाधींत किंवा इतर कशांत मग्न होईल त्या वेळीं ती वस्तु कुणालाहि दिसावयाची नाही आणि तसें झाल्यास ती असत्च ठरेल. हें अर्थातच कुणालाहि पटण्याजोगें नाही.

असतें. यासाठी त्याहून दुसरी कमी गतीची वस्तु आवश्यक आहे. तिच्यासाठी फिरून तिच्याहूनहि कमी गतीची वस्तु आवश्यक आहे, इत्यादि. अशा तऱ्हेने याचा कधी अंतच होणार नाही. म्हणून तर्क तुम्हांला कुठेतरी थांबावयास भाग पाडतो. ही शृंखला एका अपरिवर्तनीय अशा वस्तूच्या ज्ञानानेच संपूं शकते. या कधी न संपणाऱ्या गतीच्या श्रृंखलेमागे अपरिवर्तनशील, शुद्ध व असंग पुरुष विद्यमान आहे. या सर्व विषयानुभूति त्याच्यावर प्रतिबिंबित होतात, पण ज्याप्रमाणे सिनेमांतील दिवा पडद्यावर आकृत्या उमटवतो पण त्याला कलंकित करीत नाही त्याचप्रमाणे या विषयानुभूति आत्म्यामध्ये कोणतेंहि परिवर्तन घडवीत नाहीत.

न तत् स्वाभासं दृश्यत्वात् ॥ १८ ॥

**१८. सूत्रार्थः—मन हें स्वप्रकाश नाही, कारण तें दृश्यरूप आहे.**

स्पष्टीकरणः—प्रकृतींत सगळीकडे अफाट शक्ति प्रकट होत आहे, पण ती स्वप्रकाश किंवा स्वतःच चेतन अशी नाही. केवळ पुरुषच स्वयंप्रकाश असून तोच आपला प्रकाश इतरांना देतो. पुरुषाचाच प्रकाश सर्व पदार्थ व शक्ति यांच्यांतून प्रकटत असतो.

एकसमये चोभयानवधारणम् ॥ १९ ॥

**१९. सूत्रार्थः—एकाच वेळीं दोन वस्तूंचें ज्ञान होऊं शकत नसल्यामुळे मन स्वप्रकाश नाही.**

स्पष्टीकरणः—जर मन स्वप्रकाश असतें तर त्याला स्वतःचें व विषयाचें ज्ञान एकाच वेळीं होऊं शकलें असतें, पण तसें होत नाही. जेव्हा तें एखादी वस्तु अनुभवतें तेव्हा तें स्वतःवर विचार करूं शकत नाही. म्हणून पुरुष स्वयंप्रकाश आहे, मन तसें नाही.

चित्तान्तरदृश्ये बुद्धिबुद्धेरतिप्रसंगः स्मृतिसङ्करश्च ॥ २० ॥

**२०. सूत्रार्थः—जाणणारें आणखी एक मन कल्पिलें तर मनांची ही साखळी कधीच न संपून अनवस्था प्रसंग निर्माण होईल आणि स्मृतीचा घोटाळा हाच त्याचा परिणाम होईल.**

स्पष्टीकरणः—अशी कल्पना करूं या की सामान्य मनाला जाणणारें दुसरें मन असतें. मग हें मन जाणण्याला तिसरें मन पाहिजे आणि अशा मनांचा कधीच शेवट होणार नाही. यामुळे स्मृतींचा घोटाळा

होईल व स्मृतींना कांही अधिष्ठान राहणार नाही.

**चितेरप्रतिसंक्रमायास्तदाकारापत्तौ स्वबुद्धिसंवेदनम् ॥ २१ ॥**

२१. **सूत्रार्थः--पुरुषाचें चैतन्यमय स्वरूप अपरिवर्तनीय असल्यामुळे मन जेव्हा त्याचा आकार घेतें तेव्हा तें चेतन होतें.**

स्पष्टीकरणः--ज्ञान हा पुरुषाचा गुण नाही याचें स्पष्टीकरण करण्यासाठी पतंजलि असें म्हणतात. जेव्हा मन पुरुषाजवळ येतें तेव्हा पुरुष जणुकांही मनांत प्रतिबिंबित होतो आणि मन थोडया वेळापुरतें ज्ञानयुक्त होतें व पुरुषासारखेंच भासूं लागतें.

**द्रष्टृदृश्योपरक्तं चित्तं सर्वार्थम् ॥ २२ ॥**

२२. **सूत्रार्थः—द्रष्टा व दृश्य हीं मनांत प्रतिबिंबित झाल्यामुळे मन सर्व कांही जाणण्यास समर्थ होतें.**

स्पष्टीकरणः—मनांत एकीकडे बाह्य दृश्यविश्व प्रतिबिंबित होतें आणि दुसरीकडे द्रष्टा प्रतिबिंबित होतो. याप्रमाणे सर्व प्रकारच्या ज्ञानाचें सामर्थ्य मनाला प्राप्त होतें.

**तदसंख्येयवासनाभिश्चित्रमपि परार्थं संहत्यकारित्वात् ॥ २३ ॥**

२३. **सूत्रार्थः—जरी अनेक वासनांनी मन रंगलेलें असलें तरी तें दुसऱ्या-साठी (पुरुषासाठी) कार्य करीत असतें, कारण मन हें मिश्र स्वरूपाचें आहे.**

स्पष्टीकरणः—मन हें अनेक वस्तूंचें मिश्रण आहे; म्हणून तें स्वतःसाठी कांही कार्य करूं शकत नाही. या जगांतील मिश्र रूपाच्या सर्व वस्तु स्वतःहून वेगळया अशा कुणाचें तरी प्रयोजन पूर्ण करीत असतात, त्याच्यासाठीच हें मिश्रण तयार होत असतें. म्हणून मनाचें हें मिश्रण पुरुषासाठी आहे.

**विशेषदर्शिन आत्मभावभावनाविनिवृत्तिः ॥ २४ ॥**

२४. **सूत्रार्थः—विवेकी माणसाला मन हें आत्मा नाही असें कळून येतें.**

स्पष्टीकरणः—विवेकामुळे योग्याला कळून येतें की पुरुष मनाहून वेगळा आहे.

**तदा विवेकनिम्नं कैवल्यप्राग्भावं* चित्तम् ॥ २५ ॥**

२५. **सूत्रार्थः—तेव्हा विवेकाभिमुख असलेलें चित्त मूळच्या कैवल्यावस्थेस**

---

* याचा दुसराहि पाठ आहे—'**कैवल्यप्राग्भारं**.' त्याचा अर्थ असा होईल की मनांतील विवेक पक्का होतो व मन कैवल्याकडे झुकतें.

**प्राप्त होतें.**

स्पष्टीकरणः——याप्रमाणे योगाभ्यासामुळे विवेक किंवा दृष्टीची शुद्धता उत्पन्न होते, डोळ्यावरील झापड दूर होते आणि वस्तूंच्या यथार्थ स्वरूपाचा आपल्याला अनुभव येतो. आपल्याला दिसून येतें की प्रकृति-मिश्र रूपाची असून ती पुरुषरूपी साक्षीपुढे आपलें प्रदर्शन मांडीत आहे. प्रकृति ईश्वर नाही. प्रकृतीची सर्व मिश्रणें हीं, हृदय-सिंहासनवर विराजमान असलेला राजा जो पुरुष त्याला दाखविण्या-साठीच आहेत. जेव्हा दीर्घ अभ्यासाने विवेक प्राप्त होतो तेव्हा भीति नाहीशी होते व कैवल्याचा लाभ होतो.

**तच्छिद्रेषु प्रत्ययान्तराणि संस्कारेभ्यः ॥ २६ ॥**

२६. **सूत्रार्थः——याचा प्रतिरोध करणारे विचार संस्कारांपासून उत्पन्न होतात.**

स्पष्टीकरणः——आपल्या सुखासाठी बाह्य वस्तूंची आवश्यकता आहे असा समज उत्पन्न करणारे सर्व विचार या पूर्णतेचे वा कैवल्याचे विघातक आहेत. पुरुष स्वभावतःच सुखरूप, आनंदस्वरूप आहे. पण हा बोध पूर्वसंस्कारांनी झाकलेला असतो. या संस्कारांचा क्षय झाला पाहिजे.

**हानमेषां क्लेशवदुक्तम् ॥ २७ ॥**

२७. **सूत्रार्थः——ज्याप्रमाणे अज्ञान, अहंकार इत्यादींचा पूर्वी ( सूत्र २. १० मध्ये ) सांगितल्याप्रमाणे नाश होतो, त्याचप्रमाणे यांचाहि नाश होतो.**

**प्रसंख्यानेऽप्यकुसीदस्य सर्वथा विवेकख्यातेर्धर्ममेघः समाधिः ॥२८॥**

२८. **सूत्रार्थः——तत्त्वांचें खरें व विवेकात्मक ज्ञान प्राप्त झाल्यावर जो फल-त्याग करतो त्याला पूर्ण विवेकाचें फळ म्हणून धर्ममेघ समाधि प्राप्त होते.**

स्पष्टीकरणः——जेव्हा योग्याला विवेक प्राप्त होतो तेव्हा पूर्वीच्या प्रकरणांत सांगितलेल्या सर्व शक्ति त्याला प्राप्त होतात, पण खरा योगी त्या सर्वांचा त्याग करतो. अशा योग्याला एक विशिष्ट ज्ञान, एक विशेष प्रकारचा प्रकाश——धर्ममेघ——प्राप्त होतो. जगांतील सर्वच इतिहास-प्रसिद्ध, महान् धर्मोपदेशकांना हें ज्ञान होतें. त्यांना सर्व ज्ञानाचें मूळ स्वतःतच गवसलें होतें. त्यांना सत्याची प्रत्यक्षानुभूति झाली होती. पूर्वोक्त विभिन्न सिद्धींचा त्याग केल्याने शांति, समाधान व पूर्ण शुद्धता हीं सारीं त्यांच्या स्वभावांत रुजलीं होतीं.

**ततः क्लेशकर्मनिवृत्तिः ॥२९॥**

२९. **सूत्रार्थः—त्यामुळे दुःख व कर्म यांची निवृत्ति होते.**

स्पष्टीकरणः—जेव्हा 'धर्ममेघ समाधि' लाभते तेव्हा पतनाची भीति राहत नाही, कोणत्याहि गोष्टीने तेव्हा योग्याचें पतन होत नाही. मग त्याच्यापक्षीं कोणतेंहि अशुभ उरत नाही व त्याला कोणतेंहि दुःख होत नाही.

**तदा सर्वावरणमलापेतस्य ज्ञानस्यानन्त्याज्ज्ञेयमल्पम् ॥३०॥**

३०. **सूत्रार्थः—तेव्हा आवरण व अशुद्धि निघून गेल्यामुळे ज्ञान अनंत झाल्याने ज्ञेय हें क्षुद्र होऊन जातें.**

स्पष्टीकरणः—तेव्हा केवळ ज्ञान शिल्लक राहतें. त्याचें आवरण नाहीसें होतें. बौद्धांच्या एका धर्मग्रंथांत बुद्ध नामक अवस्थेचा अर्थ 'अनंत आकाशासारखें अनंत ज्ञान' असा सांगितला आहे. येशूंनी हें ज्ञान मिळवलें व मगच ते ख्रिस्त झाले. तुम्ही सगळेच या अवस्थेप्रत पोहोचाल. ज्ञान अनंत झालें की ज्ञेय क्षुद्र होतें. सर्व ज्ञेय वस्तूंसकट हें विश्व पुरुषापुढे शून्यवत् प्रतीत होतें. सामान्य माणूस स्वतःला फार क्षुद्र समजतो, कारण त्याला ज्ञेयवस्तु अनंत वाटते.

**ततः कृतार्थानां परिणामक्रमसमाप्तिर्गुणानाम् ॥३१॥**

३१. **सूत्रार्थः—मग लक्ष्यप्राप्ति झाल्याने गुणांचीं विभिन्न परिवर्तनें संपतात.**

स्पष्टीकरणः—मग गुणांचीं हीं विभिन्न परिवर्तनें (एका जातींतून दुसऱ्या जातींत परिवर्तन होणें ) कायमचीं नाहीशीं होतात.

**क्षणप्रतियोगी परिणामापरान्तनिर्ग्राह्यः क्रमः ॥३२॥**

३२. **सूत्रार्थः—क्षणांशीं संबद्ध असणाऱ्या व एका संपूर्ण परंपरेच्या शेवटीं प्रत्ययास येणाऱ्या परिवर्तनांना 'क्रम' असें म्हणतात.**

स्पष्टीकरणः—येथे पतंजलि 'क्रम' या शब्दाची व्याख्या पुढीलप्रमाणे करतात—'जीं परिवर्तनें, क्षणांशीं संबद्ध असतात त्यांना क्रम म्हणावें.' जेव्हा मी विचार करतों तेव्हा कित्येक क्षण निघून जातात आणि प्रत्येक क्षणाला एकेक विचार बदलतो. पण हीं परिवर्तनें मला या परंपरेच्या शेवटींच कळतात. याला 'क्रम' असें म्हणतात, पण ज्या मनाला सर्वव्यापित्वाचा अनुभव आला त्या मनाच्या दृष्टीने कुठेहि क्रम नाही. सगळें त्याच्या पुढ्यांतच असतें. त्याच्या दृष्टीने

सगळेंच वर्तमान आहे, भूत भविष्य कांहीहि नाही. कालहि त्याच्यासमोर स्थिरावतो. सगळें ज्ञान त्याच्यासमोर एका क्षणांत येऊन उभें राहतें. त्याच्यासमोर सगळेंकांही विजेप्रमाणे झटकन् प्रकाशित होतें.

**पुरुषार्थशून्यानां गुणानां प्रतिप्रसवः कैवल्यं स्वरूपप्रतिष्ठा वा चितिशक्तेरिति ॥३३॥**

३३. **सूत्रार्थः--जेव्हा गुणांना पुरुषासाठी कांही करण्याचें प्रयोजन उरत नाही आणि जेव्हा त्यांचा विलय होतो तेव्हा त्या अवस्थेला 'कैवल्य' म्हणतात; किंवा द्रष्टयाचें वा चित्शक्तीचें स्वतःच्या स्वरूपामधेच प्रतिष्ठित होणें, हेंच कैवल्य आहे.**

स्पष्टीकरणः--प्रकृतीचें--आपल्या ह्या प्रेमळ धात्रीचें हें स्वतःच स्वीकारलेलें निःस्वार्थ कार्य संपलें. तिने हळुवारपणें आत्मविस्मृत अशा आत्म्याचा जणु कांही हात धरून त्याला जगांतले सर्व अनुभव व सर्व अभिव्यक्ति दाखविल्या आणि क्रमाक्रमाने त्याला विभिन्न शरीरांतून वरवर आणीत त्याच्या स्वतःच्या स्वयंप्रकाश स्वरूपापर्यंत पोहोचविलें. मग त्याला आत्मस्वरूपाची स्मृति झाली. त्यानंतर ही प्रेमळ जननी ज्या वाटेने आली त्याच वाटेने परत गेली, आणि जे इतर प्राणी या जीवनरूपी मार्गरहित वाळवंटांत वाट चुकले आहेत त्यांना मार्ग दर्शविण्यास ती प्रवृत्त झाली. आणि अशाच प्रकारें ती अनादि अनंत काळ झटत असते. याप्रमाणे सुखदुःखांतून व बऱ्यावाईटांतून मार्ग काढीत जीवात्म्यांची ही अनंत नदी पूर्णतारूपी, आत्मसाक्षात्काररूपी महासागरांत विलीन होत असते.

ज्यांनी आत्मसाक्षात्कार करून घेतला आहे त्यांचा जयजयकार असो ! त्यांचे आशीर्वाद आम्हां सगळ्यांना लाभोत !

---

# परिशिष्ट

## योगाविषयी इतर शास्त्रांचीं मतें

## श्वेताश्वतर उपनिषद्

### (द्वितीय अध्याय)

**अग्निर्यत्राभिमथ्यते वायुर्यत्राधिरुध्यते ।**
**सोमो यत्रातिरिच्यते तत्र सञ्जायते मनः ॥६॥**

अग्नि जेथे घर्षणाने उत्पन्न केला जातो, जेथे वायूचें नियंत्रण केलें जातें, जेथे सोमरस ओसंडून वाहतो त्याच ठिकाणीं ( पूर्ण ) मनाची उत्पत्ति होते.

**त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं**
**हृदीन्द्रियाणि मनसा सन्निवेश्य ।**
**ब्रह्मोडुपेन प्रतरेत विद्वान्**
**स्रोतांसि सर्वाणि भयावहानि ॥८॥**

शरीर सरळ ठेवून व छाती, मान आणि डोकें ताठ ठेवून आणि इंद्रियें मनामधे विलीन करून ज्ञानी हा ब्रह्मरूपी नौकेच्या मदतीने समस्त भयानक प्रवाहांमधून तरून जातो.

**प्राणान् प्रपीड्येह संयुक्तचेष्टः**
**क्षीणे प्राणे नासिकयोच्छ्वसीत ।**
**दुष्टाश्वयुक्तमिव वाहमेनं**
**विद्वान् मनो धारयेताप्रमत्तः ॥९॥**

ज्याने आपलीं कर्मं कह्यांत ठेवलीं आहेत असा साधक प्रथम प्राणांचें नियंत्रण करतो. आणि प्राणाचा निरोध झाल्यावर तो नाकपुड्यांतून श्वास बाहेर सोडतो. ज्याप्रमाणे सारथी बेफाम घोड्यांना आवरून धरतो त्याचप्रमाणे प्रयत्नशील योगी आपलें मन आवरतो.

**समे शुचौ शर्करावन्हिवालुका-**
**विवर्जिते शब्दजलाश्रयादिभिः ।**
**मनोऽनुकूले न तु चक्षुपीडने**
**गुहानिवाताश्रयणे प्रयोजयेत् ॥१०॥**

एकान्त स्थळीं, उदाहरणार्थ डोंगरांच्या गुहांमधे, तसेंच जेथील जमीन सपाट आहे व गोटे, वाळू आणि अग्नि यांनी रहित आहे आणि

जेथे माणसांचा किंवा धबधब्यांचा मनाला विचलित करणारा आवाज नाही अशा, मनाला अनुकूल व डोळयांना आल्हादकारक ठिकाणीं योगाचा अभ्यास करावा.

नीहारधूमार्कानिलानलानां
खद्योतविद्युत्स्फटिकशशीनाम् ।
एतानि रूपाणि पुरःसराणि
ब्रह्मण्यभिव्यक्तिकराणि योगे ॥११॥

हिमवर्षाव, धूर, सूर्य, वायु, अग्नि, काजवे, विद्युत्, स्फटिक, चंद्र इत्यादि रूपें प्रकट होऊन योगांत क्रमशः ब्रह्म अभिव्यक्त करतात.

पृथ्व्यप्तेजोऽनिलखे समुत्थिते
पंचात्मके योगगुणे प्रवृत्ते ।
न तस्य रोगो न जरा न मृत्युः
प्राप्तस्य योगाग्निमयं शरीरम् ॥१२॥

पृथ्वी, जल, तेज, वायु व आकाश या पंचभूतांपासून योगांतील अनुभव जेव्हा उत्पन्न होऊं लागतात तेव्हा योगाची सुरवात होते. ज्यांना योगाग्निमय शरीर प्राप्त झालें आहे त्यांना आजार, म्हातारपण, मृत्यु इत्यादींचा उपसर्ग होत नाही.

लघुत्वमारोग्यमलोलुपत्वं
वर्णप्रसादः स्वरसौष्ठवं च ।
गन्धः शुभो मूत्रपुरीषमल्पं
योगप्रवृत्तिं प्रथमां वदन्ति ॥१३॥

योग हा मनांत रुजण्याची प्राथमिक लक्षणें पुढीलप्रमाणे होत-- हलकेपणा, आरोग्य, हावरेपणा नसणें, शरीराचा वर्ण उजळ होणें, गोड आवाज, शरीरांतून सुगंध येणें आणि मलमूत्रोत्सर्ग कमी होणें.

यथैव बिम्बं मृदयोपलिप्तं
तेजोमयं भ्राजते तत् सुधान्तम् ।
तद्वात्मतत्त्वं प्रसमीक्ष्य देही
एकः कृतार्थो भवते वीतशोकः ॥१४॥

मातींत मिसळलेलें सोनें किंवा चांदी स्वच्छ केल्यावर ज्याप्रमाणे चकाकते त्याचप्रमाणे शरीरधारी मानव अद्वय आत्म्याचा साक्षात्कार झाल्याने कृतार्थ व दुःखरहित होतात.

## श्रीशंकराचार्यांनी दिलेलीं याज्ञवल्क्यांचीं उद्धरणें

आसनानि समभ्यस्य वांच्छितानि यथाविधि ।
प्राणायामं ततो गार्गि जितासनगतोऽभ्यसेत् ।।
मृद्वासने कुशान् सम्यक् आस्तीर्याजिनमेव च ।
लम्बोदरं च सम्पूज्य फलमोदकभक्षणैः ।।
तदासने सुखासीनः सव्ये न्यस्येतरं करम् ।
समग्रीवशिराः सम्यक् संवृतास्यः सुनिश्चलः ।।
प्राङ्मुखोदङ्मुखो वाऽपि नासाग्रन्यस्तलोचनः ।
अतिभुक्तमभुक्तं च वर्जयित्वा प्रयत्नतः ।।
नाडीसंशोधनं कुर्यादुक्तमार्गेण यत्नतः ।
वृथा क्लेशो भवेत्तस्य तच्छोधनमकुर्वतः ।।
नासाग्रे शशभृद्बीजं चन्द्रातपवितानितम् ।
सप्तमस्य तु वर्गस्य चतुर्थं बिन्दुसंयुतम् ।।
विश्वमध्यस्थमालोक्य नासाग्रे चक्षुषी उभे ।
इडया पूरयेद्वायुं बाह्यं द्वादशमात्रकैः ।।
ततोऽग्निं पूर्ववद्ध्यायेत् स्फुरज्ज्वालावलीयुतम् ।
रेफं च बिन्दुसंयुक्तं शिखिमण्डलसंस्थितम् ।।
ध्यायेद्विरेचयेद्वायुं मन्दं पिङ्गलया पुनः ।
पुनः पिङ्गलयापूर्य घ्राणं दक्षिणतः सुधीः ।।
तद्वद्विरेचयेद्वायुमिडया तु शनैः शनैः ।
त्रिचतुर्वत्सरं चापि त्रिचतुर्मासमेव वा ।।
गुरुणोक्तप्रकारेण रहस्येवं समभ्यसेत् ।
प्रातर्मध्यन्दिने सायं स्नात्वा षट्कृत्व आचरेत् ।।
सन्ध्यादिकर्म कृत्वैव मध्यरात्रेऽपि नित्यशः ।
नाडीशुद्धिमवाप्नोति तच्चिन्हं दृश्यते पृथक् ।।
शरीरलघुता दीप्तिर्जठराग्निविवर्धनम् ।
नादाभिव्यक्तिरित्येतल्लिङ्गं तच्छुद्धिसूचनम् ।।

* * *

प्राणायामं ततः कुर्याद्रेचपूरककुंभकैः ।
प्राणापानसमायोगः प्राणायामः प्रकीर्तितः ।।

* * *

पूरयेत् षोडशैर्मात्रैरापादतलमस्तकम् ।
मात्रैर्द्वात्रिंशकैः पश्चाद्रेचयेत् सुसमाहितः ।।

सम्पूर्णकुंभवद्वायोर्निश्चलं मूर्धदेशतः ।
कुम्भकं धारणं गार्गि चतुःषष्ट्या तु मात्रया ।।

ऋषयस्तु वदन्त्यन्ये प्राणायामपरायणाः ।
पवित्रीभूताः पूतान्त्राः प्रभञ्जनजये रताः ।।

तत्रादौ कुम्भकं कृत्वा चतुःषष्ट्या तु मात्रया ।
रेचयेत् षोडशैर्मात्रैर्नासिनैकेन सुन्दरि ।।

तयोश्च पूरयेद्वायुं शनैः षोडशमात्रया ।

*　　　*　　　*

प्राणायामैर्दहेद्दोषान् धारणाभिश्च किल्बिषान् ।
प्रत्याहाराच्च संसर्गान् ध्यानेनानीश्वरान् गुणान् ।।

"हे गार्गी! नियमांप्रमाणे आवश्यक अशा आसनांचा अभ्यास करणाऱ्याला त्यांची सवय लागते आणि तो मग प्राणायामाचा अभ्यास करूं लागतो. कुशासनावर अंथरलेल्या, हरिणाच्या किंवा वाघाच्या कातड्याच्या आसनावर आरामानें बैठक मारून, गणपतीला फळें व मोदक यांचा नैवेद्य दाखवून, डाव्या हाताच्या तळव्यावर उजवा हात ठेवून, मान व डोकें सरळ रेषेंत ठेवून, ओठ बंद ठेवून, पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख होऊन, डोळे नासाग्रावर स्थिर करून व अति उपोषण आणि अति भोजन वर्ज्य करून नाडीशुद्धि केली पाहिजे. नाडीशुद्धीशिवाय हा अभ्यास व्यर्थ ठरेल. पिंगला व इडा (उजवी व डावी नाकपुडी) यांच्या संधिस्थानांत 'हुम्' या बीजाक्षराचें ध्यान करून बारा मात्रांत (बारा सेकंदांत) इडेने बाहेरचा वायु आंतमधे ओढला पाहिजे. त्यानंतर त्याच जागीं 'रं' या अक्षराच्या द्वारें योग्याने ध्यान केलें पाहिजे व असें ध्यान करीत असतांनाच पिंगलेंतून (डाव्या नाकपुडींतून) हळूहळू वायु बाहेर सोडला पाहिजे. पुनः पिंगलेंतून वायु आंत घेऊन पूर्वीप्रमाणेच इडेंतून हळूहळू बाहेर सोडला पाहिजे. हा अभ्यास तीनचार वर्षें किंवा तीनचार महिने गुरूच्या मार्गदर्शनाखाली एकान्तांत प्रभातीं, मध्यान्हीं, सायंकाळीं व मध्यरात्रीं करीत राहिल्याने नाडीशुद्धि होते. शरीराचें हलकेंपण, उज्ज्वल वर्ण, चांगली भूक, 'नाद' ऐकूं येणें हीं नाडीशुद्धीचीं लक्षणें होत.

"यानंतर, रेचक (श्वास सोडणें), कुंभक (श्वास कोंडणें) आणि पूरक (श्वास आंत घेणें) यांनी युक्त अशा प्राणायामाचा अभ्यास करावा. प्राण अपानाशीं जोडणें म्हणजेच प्राणायाम.

"सोळा मात्रांत (सोळा सेकंदांत) डोक्यापासून पायापर्यंत शरीर प्राणाने भरलें पाहिजे. बत्तीस मात्रांत (बत्तीस सेकंदांत) प्राण बाहेर टाकला पाहिजे व चौसष्ट मात्रांपर्यंत (चौसष्ट सेकंदांपर्यंत) कुंभक चालू ठेवला पाहिजे. एका निराळ्या प्रकारच्या प्राणायामांत प्रथम चौसष्ट मात्रा कुंभक करावयाचा, नंतर रेचक सोळा मात्रा व मग सोळा मात्रांपर्यंत शरीरांत प्राण भरावयाचा असतो.

"प्राणायामाने शरीरांतील सारे दोष व धारणेने मनाचे सारे दोष दग्ध होतात. प्रत्याहाराने आसक्तिदोष नाहीसा होतो आणि समाधीने आत्म्याच्या ऐश्वर्याला झाकून टाकणाऱ्या सगळ्याच दोषांचें निरसन होतें."

*

## सांख्यसूत्रें

### (तृतीय अध्याय)

**भावनोपचयात् शुद्धस्य सर्वं प्रकृतिवत् ॥ २९ ॥**

ध्यानाच्या सिद्धीमुळे शुद्धस्वरूप पुरुषाला प्रकृतीच्या सगळ्या शक्ति प्राप्त होतात.

**रागोपहतिर्ध्यानम् ॥ ३० ॥**

आसक्तीचें निरसन म्हणजेच ध्यान.

**वृत्तिनिरोधात्तत्सिद्धिः ॥ ३१ ॥**

वृत्तींचें दमन केल्याने ध्यानाला पूर्णता येते.

**धारणासनस्वकर्मणा तत्सिद्धिः ॥ ३२ ॥**

धारणा, आसन आणि कर्तव्याचरण यांच्या द्वारें ध्यान सिद्ध होतें.

**निरोधश्छर्दिविधारणाभ्याम् ॥ ३३ ॥**

प्राणाचें नियमन हें उच्छ्वसन व पूरण यांच्या द्वारें होऊं शकतें.

**स्थिरसुखमासनम् ॥ ३४ ॥**

जी बैठक स्थिर व सुखकारक आहे तिला 'आसन' म्हणावयाचें.

**वैराग्यादभ्यासाच्च ॥ ३६ ॥**

अनासक्ति व अभ्यास यांमुळेहि ध्यान सिद्ध होतें.

**तत्त्वाभ्यासान्नेति नेतीति त्यागाद्विवेकसिद्धिः ॥ ७४ ॥**

प्रकृतीच्या तत्त्वांचा 'हें नाही, हें नाही' (नेति, नेति) या चिंतनाने त्याग केल्यास विवेकाला पूर्णता येते.

## ( चतुर्थ अध्याय )

**आवृत्तिरसकृदुपदेशात् ॥ ३ ॥**

पुनःपुनः श्रवण करावें असा वेदांमधे उपदेश केला आहे. यासाठी सतत श्रवण करावें.

**श्येनवत् सुखदुःखी त्यागवियोगाभ्याम् ॥ ५ ॥**

ज्याप्रमाणे बहिरी ससाण्यापासून त्याचें खाद्य हिसकावून घेतल्यास त्याला दुःख होतें, पण त्याने स्वतःच तें खाद्य टाकून दिलें तर त्याला दुःख होत नाही त्याचप्रमाणे जो स्वतः होऊन सर्वकांही सोडून देतो तो सुखी होतो.

**अहिनिर्ल्वयनीवत् ॥ ६ ॥**

जसा कात टाकल्याने साप आनंदित होतो.

**असाधनानुचिन्तनं बन्धाय भरतवत् ॥ ८ ॥**

मुक्तीचें जें साधन नाही त्याचें चिंतन करतां कामा नये, कारण तें बंधनाला कारणीभूत होतें--जसें जडभरताच्या बाबतींत झालें.

**बहुभिर्योगे विरोधो रागादिभिः कुमारीशंखवत् ॥ ९ ॥**

अनेक वस्तूंच्या संपर्कामुळे राग, द्वेष इत्यादि जे विकार उद्भवतात ते ध्यानाच्या मार्गांतील अडथळे होत. जसें कुमारिकेने शिपल्याच्या पुष्कळ बांगड्या भरल्या तर तिला हात हलविणें देखील कठीण होऊन बसतें तसेंच हेंहि आहे.

**द्वाभ्यामपि तथैव ॥ १० ॥**

दोघेजण एकत्र राहिल्यासहि असेंच होतें.

**निराशः सुखी पिङ्गलावत् ॥ ११ ॥**

ज्यांनी आशांचा त्याग केला ते सुखी होतात--उदाहरणार्थ पिंगला नामक वेश्या.

**बहुशास्त्रगुरूपासनेऽपि सारादानं षट्पदवत् ॥ १३ ॥**

जरी अनेक गुरु व शास्त्रें यांची उपासना करणें आवश्यक असलें तरी ज्याप्रमाणे मधमाशी अनेक फुलांतून मध काढून घेते त्याचप्रमाणे साधकाने उपास्य वस्तूंमधील सार काढून घेतलें पाहिजे.

**इषुकारवन्नैकचित्तस्य समाधिहानिः ॥ १४ ॥**

बाण तयार करणाऱ्या व्यक्तीप्रमाणे ज्याचें मन एकाग्र होऊन जातें त्याची समाधि भंग होत नाही.

**कृतनियमलंघनादानर्थक्यं लोकवत् ॥ १५ ॥**

मूळ नियमांचें उल्लंघन केल्यास, इतर व्यावहारिक गोष्टींप्रमाणे, येथेहि ध्येयसिद्धि अशक्य होऊन बसते.

**प्रणतिब्रह्मचर्योपसर्पणानि कृत्वा सिद्धिर्बहुकालात्तद्वत् ॥ १९ ॥**

ब्रह्मचर्य, आदर व गुरूवर श्रद्धा यांच्यामुळे दीर्घ कालानंतर साफल्य प्राप्त होतें--जसें इंद्राला प्राप्त झालें होतें तसें.

**न कालनियमो वामदेववत् ॥ २० ॥**

ज्ञानोत्पत्तीच्या बाबतींत कालाचा कोणताहि नियम नाही--उदाहरणार्थ वामदेवांना गर्भावस्थेंत ज्ञान झालें होतें.

**लब्धातिशययोगाद्वा तद्वत् ॥ २४ ॥**

किंवा ज्याने पूर्णत्व मिळविलें आहे अशा माणसाच्या साहचर्याने ज्ञान प्राप्त होतें.

**न भोगात् रागशान्तिर्मुनिवत् ॥ २७ ॥**

ज्याप्रमाणे सौभरी मुनीची आसक्ति भोगाने दूर झाली नाही त्याप्रमाणे कुणाचीहि होणार नाही.

## ( पंचम अध्याय )

**योगसिद्धयोऽप्यौषधादिसिद्धिवन्नापलपनीयाः ॥ १२८ ॥**

ज्याप्रमाणे औषधादिकांनी रोग नाहीसा होतो ही गोष्ट कोणी नाकारीत नाही त्याचप्रमाणे योगाने सिद्धि प्राप्त होतात ही गोष्ट देखील नाकारणें शक्य नाही.

## ( षष्ठ अध्याय )

**स्थिरसुखमासनमिति न नियमः ॥ २४ ॥**

कोणतीहि आरामशीर व स्थिर बैठक 'आसन' आहे. यासंबंधी आणखी कोणताहि नियम नाही.

*

## व्याससूत्रें

### ( चतुर्थ अध्याय--प्रथम पाद )

**आसीनः संभवात् ॥ ७ ॥**

बसलेल्या स्थितींतच उपासना शक्य आहे, यासाठी बसून उपासना करावी.

**ध्यानाच्च ॥ ८ ॥**

ध्यान करावयाचें असल्यामुळेहि. ( बसलेला, शरीर स्थिर असलेला अशा पुरुषाला पाहून लोक म्हणतात की 'हा ध्यान करीत आहे.' म्हणून बसलेल्या पुरुषालाच ध्यान शक्य आहे. )

**अचलत्वं चापेक्ष्य ॥ ९ ॥**

कारण, ध्यान करणाऱ्या पुरुषाची तुलना अचल पृथ्वीशीं केली आहे.

**स्मरन्ति च ॥ १० ॥**

आणि 'स्मृती'मधे देखील असेंच सांगितलें आहे.

**यत्रैकाग्रता तत्राविशेषात् ॥ ११ ॥**

स्थानासंबंधी नियम नाही, जिथे कुठे मन एकाग्र होईल तिथे ध्यान करावें.

या विविध उद्धरणांवरून इतर भारतीय दर्शनें योगासंबंधी काय म्हणतात हें आपल्याला कळून येतें.

---

# संवाद आणि संभाषणें

( संकलक:—श्री. प्रियनाथ सिंह )

## (१)

स्वामीजींच्या घराच्या अगदी जवळच आमचें घर होतें. एकाच वेटाळांत राहणारे असल्यामुळे साहजिकच अनेकदा आम्ही त्यांच्या-बरोबर खेळलों होतों. बालपणापासूनच मला त्यांच्याबद्दल विशेष ओढ वाटत असे. तेव्हापासूनच माझा मनोमन विश्वास होता की हा माझा मित्र पुढे कोणी तरी थोर पुरुष होणार. तो जेव्हा संन्यासी झाला तेव्हा आम्ही फार हळहळलों. आम्हांला वाटलें की एक भावी कर्तृत्ववान मनुष्य वाया गेला.

पुढे ते अमेरिकेंत गेले. शिकागो येथील सर्वधर्मपरिषदेंत व अमेरिकेंतील इतर अनेक शहरीं झालेल्या त्यांच्या व्याख्यानांचें वृत्त आम्हीं वर्तमानपत्रांतून वाचलें. तेव्हा माझ्या मनांत विचार आला, अग्नि तो अग्निच ! तो कांही कापडाने झाकला जाऊं शकत नाही. स्वामीजींच्या अंत:करणांत असलेला अग्नि आता ज्वालामय होऊन प्रकट झाला होता. इतकीं वर्षें जी कळी होती ती पूर्णपणें उमलून आता फूल बनली होती.

कांही काळानंतर ते भारतांत परत आल्याचें व मद्रासमध्ये त्यांचीं तेजस्वी भाषणें चालू असल्याचें समजलें. तीं व्याख्यानें वाचून मी थक्क झालों. हिंदुधर्मांत इतकीं श्रेष्ठ तत्त्वें आहेत व तीं इतकीं सुबोध करून सांगितलीं जाऊं शकतात हें जणु मला नव्यानेच कळत होतें. स्वामी-जींच्या ठिकाणीं किती अलौकिक सामर्थ्य वास करीत होतें ! असें वाटे, हा मानव आहे की कोणी देवता !

स्वामीजी जेव्हा कलकत्त्याला आले तेव्हा चहूकडे उत्साह संचरला. ते गंगाकाठीं, काशीपूर विभागांतील श्री. शील यांच्या बागेंतील बंगल्यांत उतरले होते. आम्ही लगेच तेथे पोहोचलों. त्यानंतर थोड्याच दिवसांनी या 'कलकत्त्याच्या मुला'ने राजा राधाकांत देव

---

प्रस्तुत विभागांतील सर्व संवाद आणि संभाषणें प्रथम, 'श्रीरामकृष्ण-संघा-' तर्फे प्रकाशित होणाऱ्या 'उद्‌बोधन' नामक बंगाली मासिकांत प्रसिद्ध झालीं होतीं.

यांच्या भव्य निवासस्थानीं अभिनंदनाला उत्तर म्हणून, विशाल जन-समुदायासमोर असें स्फूर्तिदायी भाषण केलें की त्या पहिल्याच भाषणाने प्रभावित होऊन कलकत्त्यांतील लोकांनी त्यांच्यावर स्तुतीचा अगदी वर्षाव सुरू केला. ही हकीकत सगळयांना ठाऊकच आहे.

ते कलकत्त्याला आल्यावर मला एकच उत्कंठा लागली, ती ही की केव्हातरी त्यांची एकटयाने भेट घ्यावी आणि बालपणींच्या मोकळे-पणाने त्यांच्याशीं गोष्टी कराव्यात. पण जेव्हा पाहावें तेव्हा त्यांच्या भोवती उत्सुक पृच्छकांचा मेळावा जमलेला असे; आणि अखंड संभाषण चालू असे. त्यामुळे कांही काळपर्यंत मला तशी संधीच मिळाली नाही. एक दिवस आम्ही गंगेच्या बाजूला असलेल्या बगीच्यांत फिरावयास गेलों, त्या वेळीं मला हवा तसा एकान्त मिळाला. लगेच ते माझ्याबरोबर--अर्थात् बालवयांतील त्यांच्या सवंगडयाबरोबर--पूर्वीसारख्या सगळया गोष्टी बोलूं लागले. चार शब्द आम्ही बोलतों न बोलतों तोंच, कित्येक सद्‌गृहस्थ भेटायला आल्याच्या सूचना आल्या व बोलावण्यांवर बोला-वणीं येऊं लागलीं. शेवटीं ते किंचित् त्रासल्यासारखे झाले आणि निरोप आणणाऱ्याला म्हणाले," बेटा, मला थोडी विश्रांति तर देशील! बालपणींच्या या माझ्या सवंगडयाशीं मला चार शब्द बोलूं दे. थोडा-वेळ मला मोकळया हवेंत फिरूं दे. तिकडे जा आणि आलेल्या लोकांचें नीट स्वागत कर. त्यांना बसायला सांग. आणि थोडें थांबण्याची विनंती कर."

पुन्हा जेव्हा आम्हांला एकान्त मिळाला तेव्हा मीं त्यांना विचा-रलें, "स्वामीजी, तुम्ही साधु आहांत; तुमच्या स्वागतासाठी येथे वर्गणी गोळा करून पैसा जमविण्यांत आला आहे; मला असें वाटलें होतें की, देशांत असलेल्या दुष्काळाकडे पाहून तुम्ही कलकत्त्यांत येण्या-पूर्वी, 'माझ्या स्वागतासाठी एक पैसा देखील खर्च करूं नका, त्यापेक्षा ती सगळी रकम दुष्काळनिवारण-निधीला द्या' अशी कांहीतरी तुमची तार येईल. पण पाहतों तर तुम्हीं तसें कांहीच केलें नाही. हें कसें काय?"

स्वामीजी:--कारण लोकांत खूप उत्साह निर्माण व्हावा अशीच माझी इच्छा होती. येवढें कसें तुझ्या लक्षांत येत नाही? अरे, असें

कांहीतरी घडल्याशिवाय, लोक श्रीरामकृष्णांकडे कसे बरें आकृष्ट होतील ? आणि त्यांच्या पुण्यनामाने लोकांत नवतेजाचा संचार कसा बरें करतां येईल ? हा सगळा जयजयकार आणि सत्कार काय व्यक्तिश: माझा झाला ? यामुळे त्यांचा गौरव झाला नाही काय ? बघ, आता लोकांना श्रीरामकृष्णांविषयी जाणून घेण्याची कितीतरी तहान लागली आहे ! हळूहळू लोकांना त्यांची माहिती होईल. हें कार्य देशहिताला पोषक नाही काय ? या देशाच्या हितासाठी ज्या महापुरुषाचें इहलोकीं आगमन झालें त्यालाच जर लोकांनी ओळखलें नाही तर त्यांचें भलें होणें कसें शक्य आहे ? श्रीरामकृष्ण कोण होते, काय होते, हें जेव्हा लोक ओळखतील तेव्हाच 'माणसें'—खऱ्या अर्थानें 'माणसें' तयार होतील. आणि एकदा देशांत अशीं 'माणसें' निर्माण झालीं की मग दुष्काळादि आपत्तींना या देशांतून घालविण्यास काय उशीर लागणार आहे ? तात्पर्य असें की श्रीरामकृष्णांच्या जीवितकार्याबद्दल लोकांच्या मनांत आस्था निर्माण होण्यासाठी, कलकत्त्यांत कांहीतरी खळबळ माजावी, धामधूम व्हावी, हीच मुळी माझी इच्छा होती. एरवी केवळ माझ्यासाठी येवढें अवडंबर माजविण्याची काय आवश्यकता होती ? मी तर त्याला क:पदार्थ समजतों. मी तुझ्या घरीं येऊन खेळत होतों त्या वेळेपेक्षा आता मी कांही मोठा झालों आहे काय ? मी जसा पूर्वी होतों तसाच आहें. सांग तुला माझ्यामधे कांही बदल दिसतो काय ?

"नाही, म्हणण्यासारखा असा कांही बदल मला दिसत नाही" असें जरी मीं त्यांना म्हटलें तरी माझ्या मनांत विचार आला, "खरें पाहतां तुम्ही आता देवता झालां आहांत."

स्वामीजी पुढे बोलूं लागले:—"आपल्या देशांत दुष्काळाने कायमचें ठाण मांडलें आहे. पिकांवर रोग पडला म्हणजे जशी शेताची दुर्दशा होते तशी आपल्या समाजाची दुर्दशा झाली आहे. दुष्काळामुळे वारंवार इतकी नासाडी झाल्याचें आपल्याला इतर देशांत आढळत नाही; कारण, त्या देशांत 'माणसें' राहतात. उलट आपल्या देशांतील माणसें ढेकळांप्रमाणे निष्क्रिय बनलीं आहेत. म्हणूनच, लोकांना प्रथम श्रीरामकृष्णांचें खरें चरित्र ठाऊक झालें पाहिजे, त्यांतलें इंगित कळून त्याच्या प्रभावाने लोकांच्या संकुचित आणि स्वार्थी वृत्ति नाहीशा

झाल्या पाहिजेत, मग पुन:पुन्हा येणाऱ्या दुष्काळांविरुद्ध याच लोकांच्या हातून खरे प्रयत्न होतील. हळूहळू मीहि त्या दिशेने प्रयत्न करणार आहें तें तुला पुढे दिसेलच."

मी:—असें झाल्यास फारच चांगलें होईल. तर मग मला वाटतें, तुमचीं आता येथे अनेक व्याख्यानें होतील. त्याशिवाय श्रीरामकृष्णांचें नांव लोकांच्या कानांवर कसें बरें जाईल ?

स्वामीजी:—किती खुळी कल्पना ही ! तसें मी कांहीच करणार नाहीं. श्रीरामकृष्णांचें नांव लोकांच्या कानांवर जाण्यासाठी आणखी आता कोणते प्रयत्न बाकी आहेत ? त्याप्रकारचें कार्य पुष्कळ झालें आहे. आपल्या या देशांत नुसत्या व्याख्यानांनी कांहीहि लाभ होणार नाही. व्याख्यानें दिलीं म्हणजे आपले सुशिक्षित लोक तीं ऐकतील आणि फार तर टाळ्या वाजवून म्हणतील, 'छान, फारच छान बुवा !' व्याख्यानबाजीपासून याशिवाय दुसरें काय होणार ? व्याख्यान ऐकून घरीं गेल्यावर तो सगळा उपदेश जेवणाबरोबर पचून साफ होईल ! जुन्या गंजलेल्या लोखंडाच्या तुकड्यावर कितीहि हातोडे मारीत बसलें तरी त्यापासून कोणता फायदा होणार आहे ? त्याचे तुकडे तुकडे मात्र होतील. असें लोखंड प्रथम विस्तवांत टाकून लाल होईपर्यंत तापविलें पाहिजे, मग त्याला ठोकून कोणताहि आकार देतां येईल. जिवंत आणि ज्वलंत उदाहरण लोकांपुढे ठेवल्याशिवाय आपल्या देशांत कांहीएक कार्य होणें शक्य नाही. म्हणूनच आज आम्हांला, सर्वस्वावर पाणी सोडून देशासाठी जीवन समर्पित करणारे कांही तरुण हवे आहेत. प्रथम त्यांच्या जीवनाला वळण लावावें लागेल, कांही आकार द्यावा लागेल, मगच त्यांच्याकडून खऱ्याखऱ्या कार्याची अपेक्षा करणें उचित ठरेल.

मी:—स्वामीजी, एका गोष्टीचा विचार करतां, माझी मति अगदी गुंग होऊन जाते. आपल्या देशांतील लोक स्वत:चा धर्म नीट ओळखेनासे झाले आहेत आणि ते धर्मान्तर करीत आहेत. कोणी ख्रिस्ती होतो आहे, तर कोणी मुसलमान बनतो आहे. अशा स्थितींत या स्वदेशी बांधवांसाठी कांही करण्याऐवजी हिंदुधर्माचा प्रचार करण्यासाठी तुम्ही इंग्लंड-अमेरिकेंत गेलांत हें कसें काय ?

स्वामीजी:—परिस्थिति किती बदलली आहे हें तुझ्या लक्षांत

येत नाही काय ? आज आपल्या देशबांधवांमधे, खरा धर्म अंगिकारण्याचें आणि त्याप्रमाणे वागण्याचें सामर्थ्य आहे काय ? आज त्यांच्याजवळ फक्त एकच गोष्ट आहे. ती म्हणजे, 'आम्ही मोठे सात्त्विक आहोंत' असा अभिमान. एके काळीं ते सात्त्विक होते हें अगदी निश्चित, पण आंज त्यांचें घोर पतन झालें आहे. कोणीहि सत्त्वापासून ढळला की तात्काळ तो तामसाप्रत जाणार हें ठरलेलें आहे. त्यांचें असेंच झालें आहे. जो कसल्याहि बाबतींत प्रयत्नशील नाही, स्वत:ला एखाद्या खोलींत कोंडून घेऊन जो नुसतें हरीचें नांव घेत बसतो, धडधडीत त्याच्या डोळ्यांसमोर त्याच्या बांधवांवर घोर अन्याय आणि अत्याचार होत असूनहि जो अगदी शांत आणि तटस्थ वृत्तीने बसून राहतो तो काय सत्त्वगुणयुक्त म्हणावा ? अगदी नाही. मुळीच नाही. तो काळ्याकुट्ट तमोगुणाने घेरला आहे असेंच समजावें. साधें, भूक शमविण्यापुरतें अन्नदेखील जिथल्या लोकांना मिळत नाही, त्या देशांतील लोक धर्माचें पालन कसें करूं शकणार ? जेथे लोकांच्या मनांतील भोगलालसा थोडीहि शमली नाही त्या देशांत त्यागभावना कोठून येणार ? या कारणांस्तव लोकांना पुरेसें खायला कसें मिळेल याची प्रथम विवंचना केली पाहिजे. त्याचे उपाय शोधले पाहिजेत. जीवनांतील आनंद थोडाबहुत लुटतां येईल अशा सुखसोयी त्यांना उपलब्ध करून दिल्या पाहिजेत. मग हळूहळू त्यांच्यामधे खरें वैराग्य बाणूं शकेल; आणि ते आपल्या जीवनांत धर्मलाभ करून घेण्यास योग्य होतील व उद्युक्तहि होतील. इंग्लंड-अमेरिकेंतील लोक रजोगुणाने कसे परिपूर्ण आहेत ! सर्व प्रकारचे ऐहिक सुखोपभोग पुरेपूर लाभून ते तृप्त झाले आहेत. त्यांतहि विशेष म्हणजे, ख्रिस्ती धर्म हा श्रद्धा आणि अंधविश्वास यांनी भरलेला धर्म आहे. तो आपल्याकडील पुराणप्रणीत धर्मासारखा आहे. शिक्षणाचा प्रसार होऊन सुसंस्कृतता आल्यानंतर आता त्या धर्मापासून पाश्चिमात्यांना शांति लाभेनाशी झाली आहे. त्यांची सद्य:स्थिति अशी आहे की आज जर त्यांना थोडें वर उचलतां आलें तर ते सत्त्वगुणी होतील. तसेंच, आजचा काळ मोठा विचित्र आहे. समजा एखादा गोरमुख पाश्चात्त्य येऊन तुझ्या स्वत:च्या धर्माबद्दल कांही विवेचन करूं लागला तर त्याच्या वचनांना तूं जितका मान देशील, तितका एखाद्या

फाटके कपडे घातलेल्या संन्याशाच्या शब्दांना देशील काय ?

मी:—स्वामीजी, तुमचें हें म्हणणें अगदी खरें आहे ! श्रीयुत एन्. एन्. घोष * यांचें सुद्धा अगदी असेंच म्हणणें आहे.

स्वामीजी:—होय. जेव्हा माझे अनेक पाश्चिमात्य शिष्य शिक्षण-वळण लाभून आणि यथार्थ ज्ञान संपादन करून येथे येतील आणि, 'अरे, तुम्ही सगळे करतां आहांत तरी काय ? तुम्ही इतके अल्पश्रद्ध कसे झालांत ? तुमचा धर्म आणि धार्मिक विधि, तुमचे शिष्टाचार, तुमची नीतिरीति, या तुमच्या सगळ्या गोष्टींना तुम्ही इतरांच्यापेक्षा हीन कसें मानतां ? आम्ही तर तुमचा धर्म अगदी सर्वश्रेष्ठ समजतों ?' असें जेव्हा ते विचारतील तेव्हा तूं बघशील की आपल्याइकडील अनेक मोठे आणि प्रतिष्ठित लोक त्यांचें म्हणणें ऐकून घेतील. अशा रीतीने या देशाचा ते मोठा लाभ करून देतील. ते इकडे येऊन तुमच्या धर्माचार्यांच्या जागा घेतील असें क्षणमात्रहि मानण्याचें कारण नाही. भौतिक सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टीने व्यावहारिक विज्ञानाच्या बाबतींत ते तुमचे गुरु बनतील हें निःसंशय, पण धर्माच्या सगळ्या बाबतींत मात्र आपल्या देशांतील लोकच त्यांचे गुरु होतील. धार्मिक क्षेत्रांत भारत आणि भारतेतर जग यांमध्ये गुरुशिष्यांचें हें नातें चिरकाल राहील.

मी:—स्वामीजी, तें कसें शक्य आहे ? तिरस्काराच्या ज्या भावनेने ते आपला अधिक्षेप करतात ती लक्षांत घेतां, ते कधीहि निःस्वार्थ-बुद्धीने प्रेरित होऊन आपलें भलें करतील असें संभवनीय वाटत नाही.

स्वामीजी:—अनेक कारणांमुळे ते आपला तिरस्कार करतात. तीं कारणें पाहतां कदाचित् त्यांचें तसें करणें समर्थनीयहि असूं शकेल. पहिली गोष्ट म्हणजे आपण आहोंत एक जित समाज. तशांत पुन्हा आपल्या देशासारखा भीकमाग्यांचा देश जगांत दुसरा नाही ! बहुजन-समाज अगदी हलक्या जातीचा आहे; उच्चवर्णीयांनी या लोकांवर युगानुयुगें जुलूम केला; पावलोंपावलीं त्यांना लाथांखाली तुडविलें. त्यामुळे ते आपलें मनुष्यत्व गमावून बसले आहेत आणि ते जसे कांही धंदेवाईक भिकारी बनले आहेत. यांच्यापेक्षा जे एक पायरी वर आहेत

* कलकत्त्यांतील एक सुप्रसिद्ध बॅरिस्टर, पत्रकार आणि शिक्षणतज्ज्ञ.

ते चार इंग्रजी पुस्तकें वाचतात आणि हातांत अर्जांचीं भेंडोळीं घेऊन सरकारी कचेऱ्यांचे उंबरठे झिजवितात. वीस किंवा तीस रुपयांची एखादी जागा जर कुठे रिकामी झाली तर तिच्यासाठी बी. ए. किंवा एम्. ए. पदव्या मिळविलेले पांचपांचशे लोक अर्ज करतात! आणि, राम राम! या त्यांच्या अर्जांतील शब्दयोजना देखील किती विचित्र असते!

'हुजूर साहेबांस विनंती की, माझ्या घरीं मला खायला देखील मिळत नाही. माझी बायको व मुलें भुकेने तडफडत आहेत. साहेब, मी नम्र भावाने आपणांस विनंती करतों की आपण माझ्या आणि माझ्या कुटुंबियांच्या उदरभरणाची कांहीतरी सोय लावून द्यावी. अन्यथा आमच्यावर भुकेने मरण्याची पाळी येईल.' यानंतर ते जेव्हा नोकरीला लागतात तेव्हा सगळा स्वाभिमान गुंडाळून ठेवतात आणि दास्याची अतिहीन पद्धति ते अंगिकारतात. सर्वसाधारण जनतेची स्थिति ही अशी आहे. तुमच्यांतील उच्चविद्याविभूषित प्रमुख व्यक्ति सभा-समित्या स्थापन करतात आणि तेथे जोरजोराने ओरडतात--'हाय हाय! दिवसें-दिवस हिंदुस्थानचा नाश होत आहे. अहो इंग्रज राज्यकर्त्यांनो! आमच्या देशबांधवांना शासनांतील श्रेष्ठ अधिकाराच्या जागा द्या, आमच्या देशाला दुष्काळापासून सोडवा' वगैरे वगैरे. अशा रीतीने रात्रंदिवस चाललेल्या 'द्या! द्या!'च्या अविरत ओरडयाने सगळें आकाश ते भरून टाकतात! त्यांच्या भाषणांचा भर सगळा एकाच गोष्टीवर असतो--'अहो, इंग्रजांनो! आम्हांला द्या. आम्हांला आणखी द्या.' राम राम! आणखी काय देणार ते तुम्हांला? त्यांनी तुम्हांला आगगाडया दिल्या; तारायंत्रें दिलीं; देशभर सुव्यवस्थित शासन कायम केलें; ठगपेंढाऱ्यांचा त्यांनी प्रायः संपूर्ण नायनाट केला; विज्ञानाचें शिक्षण दिलें; आणखी किती देतील ते तुम्हांला? कोणीहि झाला तरी पूर्ण निःस्वार्थबुद्धीने दुसऱ्याला काय देतो? त्यांनी तुम्हांला हें इतकें दिलें आहे. आता मी असें विचारतों की त्याची परतफेड म्हणून तुम्हीं त्यांना काय दिलें आहे?

मी:--स्वामीजी, आमच्याजवळ देण्यासारखें आहे काय? आम्ही कर देतों.

स्वामीजी:—खरेंच का देतां तुम्ही कर ? तुम्ही कर स्वेच्छेने देतां की देशांत शांतता राखण्याच्या कामाबद्दल ते तुमच्याकडून बळ-जबरीने कर वसूल करतात ? त्यांनी जें इतकें तुम्हांला दिलें त्याच्या बदल्यांत तुम्ही त्यांना काय देतां तें स्पष्टपणें सांग बरें. त्यांच्याजवळ जें नाही असें कांहीतरी तुमच्याजवळ आहे आणि तें तुम्ही त्यांना देऊं शकतां. तुम्ही इंग्लंडला जातां पण तें देखील भिकारी याच नात्याने जातां. तेथे जाऊन तुम्ही शिक्षणाची भीक मागतां. कोणी विशेष मोठें केलेंच तर तो एवढेंच करतो की पाश्चिमात्यांच्या धर्माची स्तुति करण्यासाठी कांही भाषणें देतो आणि मग परत येतो. अहाहा, केवढें अचाट कर्तृत्व हें ! त्यांना देण्यासारखें तुमच्याजवळ कांहीच का नाही! एक असीम भांडार तुमच्याजवळ आहे. तें तुम्ही त्यांना देऊं शकतां. तुम्ही तुमचा धर्म त्यांना द्या. तुमचें तत्त्वज्ञान त्यांना द्या. सगळ्या जगाच्या इतिहासाचा जर अभ्यास केला तर एक गोष्ट तुला दिसेल. कोणत्याहि देशाचा, कुठलाहि उच्च आदर्श असो, त्याचा उगम या भारतवर्षांतूनच झालेला आढळेल. अति प्राचीन काळापासून, हा भारत-वर्ष, सगळ्या मानवसमाजाला मौल्यवान तत्त्वांच्या खाणीसारखाच उपयोगी पडला आहे. भारतवर्षाने अनेक मौल्यवान तत्त्वरत्नें स्वतः निर्माण करून तीं मुक्तहस्ताने सगळ्या जगभर वांटलीं आहेत. ते उच्च आदर्श प्राप्त करण्याकरिता, वेदान्ताचें ज्ञान मिळविण्याकरिता आणि तुमच्या सनातन धर्माच्या गहन गुह्यांत बुडी मारण्याकरिता इंग्रज लोक भारतांत आले आहेत. त्यांच्याकडून तुम्हांला जें मिळालें त्याच्या मोबदल्यांत हीं अमूल्य रत्नें तुम्ही त्यांना द्या. त्यांनी आमच्या कपाळावर जो भिकाऱ्याचा कुत्सापूर्ण छाप मारला आहे तो नाहीसा करण्यासाठीच ईश्वराने मला त्यांच्या देशांत नेलें. इंग्लंडमधे फक्त भीक मागण्या-करिताच जाणें, हें कांही योग्य नाही. नेहमी त्यांनी आपल्याला भिक्षा कां द्यावी ? कोणीहि झालें तरी काय कायमचा भीक देत राहील ? भिकाऱ्या-सारखें हात पुढे करून सदा भिक्षाच मिळवीत राहणें हें कांही एकंदर निसर्गनियमांत बसत नाही. द्यावें व घ्यावें हा निसर्गाचा नियम आहे. जो या नियमाचें पालन करीत नाही त्याची उन्नति होत नाही, मग तो कोणीहि असो—व्यक्ति असो, समाज असो की राष्ट्र असो. आपल्या-

लाहि त्याच नियमाचें अनुसरण केलें पाहिजे. मी अमेरिकेंत गेलों तो एवढयाचसाठी. तेथील लोकांची धर्मविषयक तृष्णा आता इतकी वाढली आहे की माझ्यासारखे हजारो लोक जरी तेथे गेले तरी ते त्यांना हवे आहेत. आजपर्यंत, त्यांच्याजवळ असलेल्या संपत्तींतून ते तुम्हांला देत आले आहेत. आता तुमची पाळी आहे. तुमच्याजवळ असलेल्या अमूल्य रत्नभांडारांतून तुम्हीहि त्यांना दिलें पाहिजे. आणि मग, त्यांची तिरस्कारभावना एकदम नाहीशी होऊन त्याऐवजी त्यांना तुमच्या-संबंधी विश्वास वाटूं लागल्याचें तुम्ही पाहाल. त्यांना तुमच्याबद्दल भक्ति वाटूं लागेल, आदर वाटूं लागेल आणि न मागतां ते तुमच्या देशाचें कल्याण करतील. त्यांचें राष्ट्र म्हणजे वीरांचें राष्ट्र आहे. आपल्या हितकर्त्याला ते कधीहि विसरणार नाहीत.

मी:—स्वामीजी, पश्चिमेकडे तुम्हीं जीं व्याख्यानें दिलीत त्यांत तुम्हीं मोठ्या आवेशाने भारतीयांच्या वैशिष्टयपूर्ण बुद्धिवैभवाचें आणि सद्‌गुणांचें वारंवार वर्णन केलें आहे. त्याच्या पुष्टीकरिता तुम्हीं अनेक निश्चयात्मक पुरावेहि दिले आहेत. भारतीयांना अगदी अंतःकरणा-पासून धर्माविषयी प्रेम आहे असेंहि तुम्हीं सांगितलें आहे. पण आता तर तुम्ही म्हणतां की आपण तमोगुणाने परिपूर्ण आहोंत. पण याचबरोबर तुम्ही असेंहि म्हणतां की ऋषींच्या सनातन धर्माचा वारसा आपल्याकडे आलेला असून आपण सगळया जगाचे गुरु आहोंत, हें कसें काय ?

स्वामीजी:—देशोदेशींच्या लोकांसमोर मी तुम्हां भारतीयांच्या प्रमादांचा डांगोरा पिटायला हवा होता, असें तुला म्हणावयाचें आहे काय ? तसें मीं केलें नाही; उलट, तुमच्या देशाचे जे वैशिष्टयपूर्ण गुण आहेत त्यांचाच उल्लेख मी पाश्चिमात्यांसमोर केला हें अधिक चांगलें ठरलें नाही काय ? कोणाहि माणसाचे दोष, सरळ त्याच्यापाशी जाऊन, मित्रभावनेने पण स्पष्ट शब्दांत त्याला समजावून सांगणें, हेंच नेहमी चांगलें असतें. असें केलें म्हणजे तो ते दोष दूर करतो, परंतु इतरां-जवळ बोलतांना तुम्हीं त्याचें गुणगानच केलें पाहिजे. श्रीरामकृष्ण म्हणत असत की एखाद्या वाईट माणसाला तुम्ही जर, 'तूं चांगला आहेस, तूं चांगला आहेस' असें पुन्हा पुन्हा म्हणालांत तर कालान्तराने तो खरो-खर चांगला होतो. याउलट एखाद्या चांगल्या माणसाला पुनःपुन्हा

वाईट म्हटलें तर तो वाईट होतो. पाश्चिमात्य देशांत असतांना, मी त्या लोकांचे पुष्कळ दोष त्यांना दाखवून दिले आहेत. एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. माझ्यापूर्वी जे जे लोक आपल्या देशांतून तिकडे गेले त्या सर्वांनी त्यांच्या सद्‌गुणांचीं स्तोत्रेंच गाइलीं आहेत, आणि आपणां भारतवर्षीयांचे दोषच त्यांच्या कानांवर घातले आहेत. परिणामत: ते जर आपला तिरस्कार करूं लागले तर त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीच नाही. म्हणूनच मी तुमचे सद्‌गुण त्यांच्यापुढे मांडले आणि त्यांचे दुर्गुण त्यांच्यापुढेच उघडे केले. आता तुमच्यासमोर करतों आहे ना, अगदी तितक्याच स्पष्टपणें हें दोषदर्शनाचें कार्य मीं त्यांच्यापुढे केलें. आता तुमच्यापुढे मी तुमचे दोष दाखवितों आहे आणि त्यांची चांगली बाजू मांडतों आहें. आज तुम्ही तमोगुणाने कितीहि आवृत झालेलां असलां तरी, अगदी थोडा का असेना पण प्राचीन ऋषींचा स्वभावधर्म आजहि तुमच्यामध्ये नि:संशय वास करीत आहे. तो स्वभाव पूर्ण नसला तरी निदान त्याची रूपरेखा, त्याचा सांगाडा तरी तुमच्या ठिकाणीं आहेच आहे. पण म्हणून लगेच एखाद्याने उठावें आणि धर्मशिक्षक बनून पाश्चिमात्य देशांत उपदेश करीत फिरावें असा मात्र याचा अर्थ नाही. सर्वप्रथम, एकान्तसेवन करून, स्वत:चें आध्यात्मिक जीवन घडविलें पाहिजे, परिपूर्ण त्यागवृत्ति अंगीं बाणविली पाहिजे आणि अखंड ब्रह्मचर्य पालन केलें पाहिजे. तुमच्यामधे तमोगुणाने प्रवेश केला म्हणून काय झालें ? त्या तमोगुणाचा नाश करतां येणार नाही काय ? त्याचा नाश क्षणार्धात करतां येईल. छे, छे, क्षणार्धसुद्धा नको, इतक्या अल्पावकाशांत त्याचा नाश करतां येईल. या तमोगुणाचा नाश करण्याकरिताच भगवान श्रीरामकृष्ण आपल्यामध्ये अवतरले.

मी:--पण स्वामीजी, सगळ्यांना तुमच्यासारखें कसें होतां येईल ?

स्वामीजी:--मी मेलों की विवेकानंद संपले असें तुला वाटतें काय ? थोड्या वेळापूर्वी ज्या तरुण मंडळींनी गायनवादन केलें त्यांना तूं पाहिलेंस ना ? नशापाणी करणारीं निरुपयोगी पोरें म्हणून तुम्ही सगळे त्यांना तुच्छ लेखतां, परंतु जर प्रभूची कृपा झाली तर त्यांच्यापैकी प्रत्येकजण विवेकानंद होईल. विवेकनंदांची कधीच वाण पडणार

नाही. जगाला जर हवे असतील तर हजारोच नव्हेत तर लाखो विवेकानंद निर्माण होतील. ते कोठून येतील हें कुणीं सांगावें ! लक्षांत ठेव की माझ्याकडून जें कार्य केलें जात आहे तें कांही माझें—या विवेकानंदाचें कार्य नाही. तें त्याचें कार्य आहे—प्रभूचें स्वत:चें तें कार्य आहे. हें मात्र अगदी नक्की समज की एक देशाधिकारी जर सेवानिवृत्त झाला तर त्याच्या जागेवर सम्राटाकडून दुसरा अधिकारी निश्चितच पाठविला जाईल. तमोगुणांत तुम्ही किती का डुबलेले असां ना, खऱ्या तळमळीने अगदी अंत:करणापासून जर तुम्ही त्या प्रभूला शरण जाल तर तें सगळें तम:पटल निश्चित दूर होईल. चालू काळ ही एक सुसंधि आहे, कारण आज भवरोग दूर करणारा वैद्य अवतरला आहे. त्याचें नांव घेऊन जर तुम्ही कार्याला लागाल तर तो स्वत: तुमच्याकडून सगळें कांही करवून घेईल. तामस प्रवृत्तीचेंच श्रेष्ठ सात्त्विक प्रवृत्तींत रूपान्तर होईल.

मी:—तुम्ही कांहीहि म्हणा, पण या शब्दांवर विश्वास ठेवण्याची माझ्या मनाची कांही तयारी होत नाही. ज्या वक्तृत्वपूर्ण पद्धतीने तुम्ही तत्त्वज्ञान विशद करून सांगतां तें सामर्थ्य इतर कोणास कसचें लाभतें!

स्वामीजी:—अरे तुला माहीत नाही. हें सामर्थ्य सगळ्यांना प्राप्त होऊं शकतें. केवळ ईश्वरसाक्षात्कार व्हावा या हेतूने सतत बारा वर्षें जो अखंड ब्रह्मचर्याचें पालन करतो त्याला हें सामर्थ्य प्राप्त होतें. मीं स्वत: त्याप्रकारें ब्रह्मचर्य पालन केलें आणि परिणामीं जणु माझ्या मेंदूवरील पटल दूर झालें. म्हणूनच तत्त्वज्ञानासारख्या सूक्ष्म विषयावर बोलतांनादेखील मला कधी विचार करीत बसावें लागत नाही, की कधी व्याख्यानांची तयारी करावी लागत नाही. उद्या जर मला भाषण द्यावयाचें असेल तर आज रात्रीं भाषणाच्या विषयांसंबंधीचीं अनेक चित्रें जशीं कांही माझ्या डोळ्यासमोर दिसूं लागतात. मग दुसऱ्या दिवशीं भाषण देतांना, पाहिलेल्या दृश्यांना केवळ शब्दरूप देऊन मी लोकांपुढे ठेवतों. यावरून आता तुझ्या लक्षांत येईल की सर्वस्वी माझीच म्हणावी अशी कांही ही शक्ति नाही. जो कोणी बारा वर्षेंपर्यंत अखंड ब्रह्मचर्याचें पालन करील त्याला ही शक्ति लाभेल. तूं करशील तर तुला देखील ती मिळेल. अमक्याच माणसाला ही मिळेल, बाकीच्यांना

मिळणार नाही असें कांही आपल्या शास्त्रांनी सांगितलेलें नाही !

मी:—स्वामीजी, तुम्हांला आठवतें का, तुम्हीं संन्यास घेण्यापूर्वी, एक दिवस आपण—यांच्या घरीं बसलों होतों. तुम्ही आम्हांला समाधीचें रहस्य समजावून सांगण्याचा प्रयत्न करीत होतां. आता कलियुगांत कोणालाहि समाधि प्राप्त होणें शक्य नाही असें म्हणून मी तुमच्या बोलण्यांतील तथ्याविषयी शंका प्रदर्शित केली होती. त्यावर अतिशय आवेशाने तुम्हीं मला विचारलें होतें, 'तुला समाधि पाहायची आहे काय ? अथवा तुला स्वतःला समाधि-स्थितीचा अनुभव घ्यायचा आहे काय ? मला स्वतःला समाधि लागत असते आणि तुलाहि त्या स्थितीचा अनुभव मी देऊं शकतों.'

येवढें बोलणें होतें न होतें तोंच कोणी तरी तिऱ्हाईत मनुष्य तेथे आला आणि मग त्या विषयावरील बोलणें तेथेच थांबलें.

स्वामीजी:—होय, मला तो प्रसंग आठवतो.

नंतर जेव्हा मी त्यांना मला समाधिस्थितीचा अनुभव देण्याविषयी आग्रह केला तेव्हा ते म्हणाले, "वर्षानुवर्षं सतत व्याख्यानें देत राहिल्यामुळे व इतर अनेक परिश्रमपूर्ण कार्यांत मग्न राहिल्यामुळे माझ्यांतील रजोगुण जास्त प्रबल झाला आहे. त्यामुळे माझ्या अंगची ती शक्ति सध्या जणु झाकली गेली आहे. येथील सगळें कार्य सोडून जर मी हिमालयांत गेलों आणि कांही काळ एकान्तसेवन करून ध्यानधारणा केली तर त्या शक्तीचा पुन्हा माझ्यामध्ये उदय होईल.

## (२)

एकदोन दिवसांनंतरची गोष्ट. स्वामीजींकडे जाण्यासाठी मी घराबाहेर पडलों तोंच वाटेंत माझे दोघे मित्र मला भेटले. ते म्हणाले, "आम्हीहि तुमच्याबरोबर येतों. आम्हांला प्राणायामासंबंधी स्वामीजींना कांही विचारावयाचें आहे."

देवदर्शनाला किंवा संन्याशाकडे जातांना रिकाम्या हातांनी जाऊं नये असें मीं ऐकलें होतें. म्हणून आम्हीं कांही फळें, थोडी मिठाई विकत घेतली आणि तें सगळें स्वामीजींपुढे नेऊन ठेवलें. स्वामीजींनी तें हातांत

घेऊन मस्तकीं लावलें, आणि आम्हीं त्यांना प्रणाम करण्याच्या आधी त्यांनीच आम्हांला नमस्कार केला. माझ्या या दोन मित्रांपैकी एकजण स्वामीजींचा सहाध्यायी होता. स्वामीजींनी ताबडतोब त्याला ओळखले आणि 'प्रकृति कशी काय आहे ? एकंदर सगळें ठीक चाललें आहे ना' वगैरे चौकशी केली. मग त्यांनी आम्हांला आपल्याजवळ बसवून घेतले. त्यांचें दर्शन घ्यावयास आणि त्यांचें बोलणें ऐकावयास आलेले पुष्कळ लोक तेथे जमले होते. प्रारंभीं कांही सद्‌गृहस्थांनी विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें स्वामीजींनी दिलीं. मग संभाषणाच्या ओघांत ते प्राणायामाबद्दल बोलूं लागले. सर्वप्रथम त्यांनी आधुनिक विज्ञानाच्या आधारें, जड-वस्तूंचा उद्‌भव मनापासून कसा झाला हें समजावून सांगितलें, त्यानंतर ते प्राणायाम म्हणजे काय हें सांगूं लागले. आम्हीं तिघांनीहि स्वामीजींचें 'राजयोग' नांवाचें पुस्तक आधीच काळजीपूर्वक वाचलें होतें. परंतु त्या दिवशीं प्राणायामासंबंधी खुद्द त्यांच्या तोंडून जेव्हा ऐकलें तेव्हा असें प्रतीतीस आलें की स्वामीजींच्या विशाल ज्ञानाचा फारच अल्प अंश त्या पुस्तकांत संगृहीत झाला होता. आणखी एक गोष्ट माझ्या लक्षांत आली. ते बोलत होते तें कांही केवळ पुस्तकी ज्ञान नव्हतें. त्यांना चिरंतन सत्याची अनुभूति प्राप्त झालेली होती. एरवी, धर्माच्या जटिल प्रश्नांची आधुनिक विज्ञानाच्या आधारें इतकी सुबोध आणि सुस्पष्ट उकल करून दाखविणें कोणाला शक्य होतें ?

प्राणायामावरील त्यांचें बोलणें दुपारी साडेतीनपासून संध्या-काळीं साडेसात वाजेपर्यंत चाललें. बैठक संपल्यावर आम्ही घरीं जाऊं लागलों. वाटेंत माझे मित्र मला म्हणाले, "आमच्या मनांतले प्रश्न स्वामीजींनी कसे बरें ओळखले? आम्ही अमुक प्रश्न विचारूं इच्छितों असें कांही तूं त्यांच्याजवळ बोलला होतास काय ?"

या प्रसंगानंतर थोड्याच दिवसांनी बागबाजारमधील कै. प्रिय-नाथ मुकर्जी यांच्या घरीं मी स्वामीजींना भेटलों. त्या वेळीं तेथे स्वामी ब्रह्मानंद, स्वामी योगानंद, श्रीयुत जी. सी. घोष, अतुलबाबू व आणखी एक दोन मित्र, अशी मंडळी उपस्थित होती. मी त्यांना म्हणालों—

"स्वामीजी, त्या दिवशीं माझ्याबरोबर जे दोघेजण तुम्हांला भेटायला आले होते त्यांना, प्राणायामाबद्दल कांही प्रश्न, तुम्हांला

विचारावयाचे होते. तुम्ही स्वदेशीं परत येण्यापूर्वी त्यांनी तुमचें 'राजयोग' हें पुस्तक वाचलें होतें. त्यावरूनच कांही शंका मनांत उद्‌भवल्या असल्याचें ते मजजवळ बोलले होते. परंतु त्या दिवशीं त्यांनी कांही प्रश्न विचारण्यापूर्वी, तुम्हीं स्वतः नेमक्या त्यांच्याच शंका मांडल्या आणि मग त्यांचें निरसन केलें! या गोष्टीचें त्यांना फार आश्चर्य वाटलें. 'तूं स्वामीजींना, आम्ही अशा अशा शंका विचारणार आहोंत वगैरे आधीच सांगितलेंस की काय?' असेंहि ते मला म्हणाले.

स्वामीजींनी उत्तर दिलें :—

"पाश्चिमात्य देशांत मी फिरत असतां असे प्रकार अनेक वेळां घडले आहेत. ते लोक मला विचारीत असत, 'आमच्या मनांत जे प्रश्न घुमसत होते ते तुम्हांला नेमके कसे कळले?' समोर बसलेल्या व्यक्तींच्या मनांतील प्रश्नांचें ज्ञान मला नेहमीच होतें असें नाही, परंतु श्रीरामकृष्णांना मात्र असें ज्ञान बहुधा नेहमीच होत असे."

याचसंबंधी अतुलबाबूंनी पुढे त्यांना विचारलें, "आपल्या पूर्वजन्मांसंबंधी सगळें ज्ञान आपल्याला प्राप्त होऊं शकतें असें तुम्हीं आपल्या 'राजयोग' या ग्रंथांत प्रतिपादिलें आहे. तुम्हांला स्वतःला तुमच्या पूर्वजन्मांची माहिती आहे काय?

स्वामीजी:—होय आहे.

अतुलबाबू:—ती माहिती काय आहे? कांही हरकत नसल्यास ती आपण आम्हांला सांगावी.

स्वामीजी:—मी ती जाणूं शकतों, नव्हे, मी ती जाणतों. पण मला असें वाटतें की यासंबंधी अधिक विस्ताराने न बोलणें बरें.

(३)

जुलै १८९८ चा तो काळ होता. संध्याकाळची वेळ होती. बेलूर येथील नीलांबर मुखर्जी यांच्या बगिच्यांतील निवासस्थानीं त्या वेळीं मठ होता. स्वामीजी आपल्या सगळ्या शिष्यांसह ध्यान करीत होते. ध्यान आटोपल्यानंतर स्वामीजी बाहेर आले आणि एका खोलींत येऊन बसले. धो धो पाऊस पडत होता आणि गार वारा वाहत होता. त्यांनी

दार लावून घेतलें आणि ते तंबोऱ्यावर गाऊं लागले. गाणें संपल्यानंतर संगीतावर बराच वेळ चर्चा झाली. स्वामी शिवानंदांनी त्यांना विचारलें, "पाश्चिमात्यांचें संगीत कशा प्रकारचें आहे?"

स्वामीजी:—वा, तें फार चांगलें आहे. त्यांच्या संगीतांत पराकोटीचा स्वरसंवाद ( harmony ) साधलेला असतो. त्या बाबतींत आपण तितकी प्रगति केलेली नाही. आपल्या अनभ्यस्त कानांना ते स्वर कसेसे वाटतात. त्यामुळे त्यांचें संगीत आपल्याला आवडत नाही. तें ऐकून आपल्याला असें वाटतें की हें काय गाणें आहे की कोल्हेकुई! प्रथम माझेंहि तसेंच मत झालें होतें. पण मी जेव्हा तें संगीत लक्षपूर्वक ऐकूं लागलों व त्याचा सूक्ष्म अभ्यास करूं लागलों तेव्हा त्यांतील स्वारस्य मला अधिकाधिक समजूं लागलें. आणि मग मी तें अगदी मुग्ध होऊन ऐकूं लागलों. प्रत्येक कलेचें असेंच आहे. उत्तमप्रकारें रंगविलेलें एखादें चित्र पाहतांच त्याचें सौंदर्य कुठे आहे हें चट्‌कन लक्षांत येत नाही. डोळ्यांना थोडेंफार वळण असल्याशिवाय कलावस्तूचें प्रतिभाशाली अंतरंग उमगत नाही, सूक्ष्म छटांचें आणि रंगमिश्रणाचें नीट आकलन होत नाही. आपल्या इकडील खरें संगीत फक्त संकीर्तनांत वा भजनांत आणि ध्रुपपदांत उरलें आहे. बाकीचें सगळें, मुसलमानी पद्धतीच्या स्वरनियमांमुळे पार बिघडलें आहे. लहानलहान हलकीं फुलकीं 'टप्पा' गीतें गेंगाण्या आवाजांत म्हणणें आणि विद्युत्‌गतीने फिरक्या मुरक्या आणि ताना घेत घेत एका स्वरावरून दुसऱ्या स्वरावर जाणें म्हणजे संगीतजगतांतील सर्वोत्कृष्ट कौशल्य होय असें समजावयाचें की काय? छे छे, तसें मुळीच नाही. प्रत्येक सप्तकांतील एक एक स्वर जर मोकळा म्हटला गेला नाही तर संगीताचें सगळें शास्त्रच बिघडतें. चित्रकलेंत जसें नैसर्गिकतेचें महत्त्व तसेंच संगीतांत शास्त्राचें महत्त्व आहे. चित्रकलेंत कितीहि कलाकुसर दाखविली तरी ती निसर्गाला अनुसरून हवी. तसेंच संगीतांत, शास्त्र संभाळून जर तुम्हीं आपली कला दाखविलीत तरच तें कानांना आल्हाददायक वाटेल. हिंदुस्थानांत आल्यावर मुसलमान लोक येथील रागरागिण्या शिकले. पण टप्पा गीतावर स्वतःच्या पद्धतीची अशी कांही छाप त्यांनी बसविली की त्यामुळे सगळें संगीतशास्त्रच नष्ट झालें.

प्रश्नः—परंतु महाराज, टप्पा तर सगळ्यांनाच आवडतो.

स्वामीजीः—रातकिड्यांचा किर्र आवाजदेखील पुष्कळांना आवडतो. संथाळ लोकांना त्यांचें स्वतःचें संगीत अगदी सर्वोत्कृष्ट वाटतें; म्हणून काय तें खरोखर तसें असतें ? मला वाटतें, एक गोष्ट तुमच्या लक्षांत आली नाही. जेव्हा एका स्वरामागोमाग दुसरा स्वर अतिशय द्रुतगतीने येतो, तेव्हा तो स्वरसौंदर्य घालवितो, इतकेंच नव्हे तर एक प्रकारची विसंगति निर्माण करतो. संगीतांतील विशिष्ट सुस्वरानुक्रमाला आपण रागरागिणींच्या नांवाने ओळखतों. सप्तस्वरांच्या विनिमयाने आणि मिश्रणाने या रागरागिणी सिद्ध होतात. एक राग धड न आळवतां त्यांत दुसऱ्या रागाच्या छटा आणणें किंवा ताना घेत घेत तारस्वरांत पोहोचणें आदि टप्प्याच्या पद्धतींमुळे विशिष्ट राग गाण्याच्या ठराविक नियमांचा भंग होत नाही काय ? गवई आपलें स्वरकौशल्य दाखविण्याकरिता तानांची एकच गर्दी करून सोडतो, परंतु त्यामुळे संगीतांतील सगळें काव्य नाहीसें होतें इकडे त्याचें लक्ष नसतें. टप्पागायन रूढ झाल्यापासून, गाण्याच्या द्वारें जो भावार्थ व्यक्त करावयाचा असतो त्याकडे दुर्लक्ष होऊं लागलें. रंगभूमींत सुधारणा झाल्यामुळे आता आपल्या भावार्थवाही खऱ्या संगीतकलेचेंहि पुनरुज्जीवन होणार असें थोडेंफार दिसूं लागलें आहे. परंतु रागरागिणींच्या बाबतींत मात्र अगदीच उदासीनता दिसत आहे.

या सर्व कारणांमुळे ध्रुपद गाण्यांत निष्णात असलेल्या व्यक्तीस टप्पा ऐकतांना वेदना होतात. परंतु आपल्याकडील संगीतांत तालबद्धता आहे. स्वरांचें आरोह-अवरोह तालाने अगदी पद्धतशीर रीतीने बांधलेले असतात. ही गोष्ट सर्वप्रथम फ्रेंच लोकांच्या लक्षांत आली. त्यांनी तिचें महत्त्व ओळखून आपल्या फ्रेंच संगीताला तालबद्ध करण्याचा प्रयत्न चालू केला. त्यांच्यापासून सगळ्या युरोपला ही गोष्ट ज्ञात झाली आणि आता तर युरोपने त्या बाबतींत चांगलेंच प्रभुत्व मिळविलें आहे.

प्रश्नः—महाराज, त्यांचें संगीत प्रामुख्याने कसें लष्करी बाण्याचें वाटतें. त्याउलट आपल्या संगीताशीं वीरश्रीचा कांहीच संबंध नाही असें वाटतें.

स्वामीजी:—तसें कांही नाही. आपल्याहि संगीतांत वीररसाला स्थान आहे. वीररसपूर्ण संगीतांत स्वरसंगतीची नितान्त आवश्यकता असते. आपल्या संगीतांत त्याचीच वाण आहे. म्हणून आपलें संगीत तेवढें वीररसानुकूल वाटत नाही. खरें पाहतां आपल्याकडे संगीत क्षेत्रांतहि चांगलीच प्रगति होत होती, परंतु मुसलमानांच्या आगमनानंतर त्यांनी या विद्येचा असा कांही कबजा घेतला की संगीतवृक्षाची वाढच खुंटली. त्या मानाने पाश्चिमात्यांचें संगीत बरेंच पुढे गेलें आहे. करुणरस आणि वीररस या दोहोंसहि त्यांच्या संगीतांत योग्य स्थान आहे. आम्ही मात्र कांहीहि प्रगति करून न घेतां भोपळयाच्या बनविलेल्या त्या जुनाट वाद्यापाशीच घुटमळत आहोंत.

प्रश्न:—कोणते राग व रागिण्या वीररसानुकूल आहेत ?

स्वामीजी:—स्वरसंगति साधून, वाद्यांच्या योग्य साथीवर कोणताहि राग वीररसपूर्ण आळविला जाऊं शकतो. कांही रागिणीसुद्धा वीररसात्मक गाइल्या जाऊं शकतात.

रात्रीच्या जेवणाची वेळ झाल्यामुळे हें संभाषण येथेच थांबलें. मठांत रात्रभर राहण्याच्या उद्देशाने जे कांही पाहुणे कलकत्त्याहून आले होते त्यांच्या झोपण्याच्या व्यवस्थेसंबंधी स्वामीजींनी जेवणानंतर चौकशी केली. नंतर ते आपल्या खोलींत जाऊन झोपले.

## (४)

नवीन मठ बांधला जाऊन दोन वर्षे झालीं होतीं. सगळे स्वामी तेथेच राहत असत. एके दिवशीं सकाळीं मी माझ्या गुरूंना भेटण्यासाठी मठांत गेलों. मला पाहून स्वामीजींनी स्मित केलें. क्षेमकुशल विचारल्यानंतर ते म्हणाले—"आज तूं इथेच राहणार आहेस, नाही का ?"

"होय, निश्चितच" मी म्हणालों. थोडा वेळ इतर कांही पृच्छा केल्यानंतर मीं विचारलें:—"महाराज, आपल्या मुलांची शिक्षणव्यवस्था कशी असावी असें आपलें मत आहे ?"

स्वामीजी:—गुरुगृहवास : अर्थात् गुरूजवळ राहणें.

प्रश्न:—तें कसें काय ?

स्वामीजी:—जसें प्राचीन काळीं होतें तसेंच. अधिक फक्त येवढेंच की या शिक्षणांत पाश्चिमात्यांच्या विज्ञानाचामुद्धा अंतर्भाव झाला पाहिजे. गुरुगृहवास आणि विज्ञानाचें शिक्षण या दोन्ही गोष्टी आवश्यक आहेत.

प्रश्न:—कां बरें ? आजच्या विश्वविद्यालयांच्या पद्धतींत कोणता दोष आहे ?

स्वामीजी:—ती पद्धति तर सगळी दोषांनीच भरलेली आहे. विश्वविद्यालय म्हणजे काय ? तर कारकून निर्माण करणारें एक उत्तम यंत्र. बरें येवढेंच असतें तरीहि मी दैवाची मोठी खैर झाली असें मानलें असतें, पण तेवढ्याने संपलें नाही ! लोक किती विश्वासहीन आणि अश्रद्ध बनत चालले आहेत पाहा ! गीता हा केवळ एक प्रक्षिप्त भाग आहे आणि वेद म्हणजे केवळ लोकगीतें आहेत अशीं विधानें ते करूं लागले आहेत. स्वतःच्याच या भारतवर्षाव्यतिरिक्त इतर सगळ्या देशांबद्दलच्या अनेक गोष्टी त्यांना अगदी मुखोद्गत असतात. पण स्वतःच्या वाडवडिलांबद्दल म्हणाल तर चौदा पिढ्यांची गोष्ट दूर राहो, सात पिढ्यांपर्यंतमुद्धा नांवें त्यांना माहीत नसतात !

प्रश्न:—त्यांत काय मोठेसें ? वाडवडिलांचीं नांवें माहीत नसल्याने असें कोणतें नुकसान होणार आहे ?

स्वामीजी:—असा विचार अगदी चुकीचा आहे. ज्या देशाला स्वतःचा इतिहास नाही त्याला या जगांत कांहीच स्थान नाही. 'मी एका श्रेष्ठ कुळांत जन्म पावलों आहें' असा ज्याचा विश्वास आहे आणि त्याविषयी जो अभिमान वाळगतो, तो माणूस कधीहि वाईट निघणार नाही, येवढेंतर तुला मान्य आहे ना ? तो वाईट निघणें कसें शक्य आहे ? त्याच्या अंतःकरणांत जो विश्वास आहे तो त्याला सतत अंकुश लावील; त्याच्या भावनांना आणि व्यवहाराला वळण लावील. याचा परिणाम इतका होऊं शकतो की, तो मनुष्य वेळीं प्राण देईल, पण वाईट गोष्ट करणार नाही. जसें व्यक्तीचें तसेंच राष्ट्राचें. राष्ट्राचा इतिहास राष्ट्राला विशिष्ट शिस्तींत ठेवतो, त्याचें अगदीच अधःपतन होऊं देत नाही. यावर तूं काय म्हणशील तें मला माहीत आहे.

'आपल्याला मुळी म्हणण्यासारखा राष्ट्रीय इतिहासच नाही' असें तूं म्हणशील. बरोबर आहे. जे तुझ्यासारखा विचार करतात त्यांच्या दृष्टीने आपल्याला राष्ट्रीय इतिहास मुळीच नाही खरा! तुमच्या विश्वविद्यालयांतील मोठमोठ्या पंडितांच्या दृष्टीनेहि आपल्या देशाला इतिहास नाही. पाश्चिमात्य देशांत घाईघाईने एक फेरफटका मारून आलेल्या लोकांच्या दृष्टीनेहि तेंच खरें आहे. तिकडून आल्यावर, पाश्चिमात्य वेषभूषा केलेले हे लोक ओरडून सांगतात—'आपल्याजवळ कांहीच नाही, आपण अगदी रानटी आहोंत!' अर्थात्, तंतोतंत अगदी इतर देशांसारखा इतिहास आपल्याला नाही. समजा की आपण तांदूळ खाणारे आहोंत आणि इंग्रज लोक तांदूळ खात नाहीत. येवढ्यावरून, ते कांहीच खात नाहीत, ते भुकेने मरत आहेत, त्यांचा लवकरच निर्वंश होणार आहे, असा तर्क करणें योग्य ठरेल काय? त्यांना जें धान्य सहज मिळूं शकतें किंवा जें त्यांच्या देशांत पिकूं शकतें, जें त्यांना रुचतें व पचतें तें खाऊन ते आपले सुखाने राहतात. त्याचप्रमाणे, आपल्या राष्ट्राला जसा असायला हवा आणि जसा त्याला शोभेल, अगदी तसा इतिहास आहे. तुमच्या केवळ डोळे झाकण्याने किंवा 'अरेरे! आम्हांला इतिहास नाही!' असें ओरडण्याने असलेला इतिहास लुप्त होऊन जाईल की काय? ज्यांना डोळे आहेत त्यांना दिसतें की या भारताला अतिशय तेजस्वी असा इतिहास लाभला आहे आणि ते हें जाणून आहेत की त्या इतिहासाच्या सामर्थ्यावरच आजहि आपलें राष्ट्र जिवंत आहे. पण तो इतिहास पुन्हा लिहावा लागेल. पाश्चिमात्यांनी दिलेल्या शिक्षणामुळे, विचार करण्याची आणि समजून घेण्याची आज आपली एक विशिष्ट पद्धति बनून गेली आहे. त्या पद्धतीला अनुसरूनच हा इतिहास पुन्हा सांगितला गेला पाहिजे.

प्रश्न:—तें कसें करतां येईल?

स्वामीजी:—तो फार मोठा विषय आहे. आताच त्यावर बोलतां येणार नाही, पण येवढें मात्र खरें की तें सर्व घडवून आणण्याकरिता गुरुगृहवास या प्राचीन संस्थेची किंवा तत्सदृश शिक्षणपद्धतीची आवश्यकता आहे. आम्हांला आज वेदान्त आणि पाश्चिमात्य विज्ञान यांचा समन्वय हवा आहे. ब्रह्मचर्य हेंच आपलें मार्गदर्शक ध्येय असलें पाहिजे.

आम्हीं श्रद्धावान बनलें पाहिजे; आमच्यांत आत्मविश्वास संचरला पाहिजे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे आजची ही शिक्षणपद्धति ताबडतोब बंद केली पाहिजे. एका माणसाने एका मूर्खाला सांगितलें की गाढवाचा घोडा बनवितां येतो. लगेच त्या मूर्खाने आपल्या गाढवाला ठोकपीट करण्यास आरंभ केला. आज आमच्या मुलांना जें शिक्षण दिलें जात आहे तें याच मासल्याचें आहे.

प्रश्नः––म्हणजे, आपल्या म्हणण्याचा अर्थ काय ?

स्वामीजीः––खरें म्हणजे असें आहे की कोणी कोणाला शिकवूं शकत नाही. मी शिकवितों आहें ही भावना जर शिक्षकाच्या मनांत जागृत राहील तर सगळेंच काम बिघडलें म्हणून समजावें. वेदान्त असें म्हणतो की मनुष्याच्या आंतच––मग तो लहान मुलगा का असेना––सर्व ज्ञान साठविलेलें आहे. फक्त तें जागृत करावें लागतें. आणि येवढेंच शिक्षकाचें कार्य असतें. मुलांना शिक्षण द्यायचें म्हणजे येवढेंच करायचें की बुद्धि कशी वापरावी हें त्यांना दाखवायचें. हातपाय, कान, डोळे यांचा उत्तम उपयोग कसा करायचा हें त्यांना स्वतंत्रपणें सुचलें की सगळें काम अगदी सोपें झालें. परंतु धर्म हा सगळ्यांचें मूळ आहे. धर्माला भात मानलें तर जीवनांतील इतर सगळ्या गोष्टी कालवणासारख्या आणि तोंडीलावण्यासारख्या आहेत. नुसतें कालवणच खाल्लें तर अपचन होईल आणि नुसता भात खाल्ला तरीहि तो नीट पचणार नाही. आपले शिक्षणतज्ज्ञ आज मुलांना पोपट बनवीत आहेत. अनेक विषय कोंबून ते त्यांच्या मेंदूची पार नासाडी करीत आहेत. या दृष्टीने पाहतां आपल्या व्हाइसराय साहेबांनी * विश्वविद्यालयांच्या बाबतींत जी सुधारणा सुचविली आहे तिच्याबद्दल आपण त्यांचे आभारच मानले पाहिजेत, कारण त्यांच्या सुधारणांनी उच्च शिक्षण जवळजवळ बंदच पडणार आहे. तसें झालें तर चांगलेंच होईल. देशाला जरा विसावा मिळेल, थोडा दम खातां येईल.

राम राम ! विश्वविद्यालयाची एखादी पदवी मिळावी म्हणून

---

* लॉर्ड कर्झन यांनी विश्वविद्यालयांतील शिक्षणाचा स्तर वाढविण्यासाठी जी योजना केली तिच्यामुळे तें शिक्षण फार खर्चाचें बनलें. इतकें महाग की त्यामुळे मध्यम वर्गाच्या मुलांना तेथे प्रवेश घेणें अशक्य झालें.

केवढा आटापिटा आणि केवढा कल्लोळ ! नंतर कांही दिवस गेले की पुन्हा आपलें जसें होतें तसें थंड ! आणि येवढें सगळें करून हे शिकतात काय तर--आपला धर्म आणि आपल्या सगळ्या चालीरीति वाईट आहेत; पाश्चिमात्यांचा धर्म आणि त्यांच्या सगळ्या चालीरीति चांगल्या आहेत ! शेवटीं काय, तर या साऱ्यामुळे उपजीविकेचा प्रश्न कांही सुटत नाही. हें उच्च शिक्षण राहिलें काय आणि गेलें काय, त्याने काय येवढा फरक पडणार आहे ? त्यापेक्षा थोडेंफार तांत्रिक शिक्षण मिळणें बरें. त्यामुळे निदान लोकांना उदरनिर्वाहाचें साधन तरी मिळेल; नोकरीसाठी उगीच ओरडत फिरायचें आणि व्यर्थ वेळ घालवायचा तें तरी टळेल.

प्रश्न:--तर मग मारवाडी लोक शहाणेच म्हणावे लागतील. ते कधीहि नोकऱ्या करीत नाहीत, कोणत्यातरी व्यापारांत ते गुंतलेले असतात.

स्वामीजी:--कांहीतरीच काय वेड्यासारखें बोलणें ! हे मारवाडी तर एका दृष्टीने या देशाचा सत्यानाश करीत आहेत ! स्वत:चा फायदा कशांत आहे तेंहि त्यांना नीट समजत नाही. तुम्ही लोक त्यांच्यापेक्षा फार बरे, कारण उद्योगधंद्यांचें महत्त्व ओळखून तुम्ही कांही खटपट तरी करतां. अगदी थोड्याशा फायद्यासाठी ते मारवाडी जो पैसा व्यापारांत गुंतवितात तोच जर त्यांनी कांही थोड्या उद्योगधंद्यांत आणि कारखान्यांत गुंतविला तर त्यामुळे देशाचाहि लाभ होईल आणि त्यांनाहि अधिक नफा मिळेल. पण आज युरोपियन लोकांना व्यापारांतील जास्त फायदा मिळवून देऊन त्यांचे खिसे भरण्यांतच ते धन्य मानीत आहेत.

नोकरीची पर्वा न करणारे खरे खरे जर कोणी असतील तर ते काबुली लोक आहेत. स्वातंत्र्यप्रियता त्यांच्या अगदी रोमरोमीं भिनलेली असते. त्यांच्यापैकी एखाद्याला नोकरी करायला सांगा आणि मग काय होतें तें पाहा !

प्रश्न:--पण महाराज, उच्च शिक्षण जर बंद झालें तर आपले देशबांधव पुन्हा पूर्वीसारखे मठ्ठ बैलोबा बनणार नाहीत काय ?

स्वामीजी:--किती वेडगळपणाची समजूत आहे ही ! सिंहाचें

रूपान्तर कधी कोल्ह्यांत होईल काय ? अरे, तूं म्हणतोस तरी काय ? ज्या भारताने अनादि कालापासून आपल्या ज्ञानदानाने सगळ्या जगाचें पोषण केलें आहे त्या भूमीचे आम्ही पुत्र, काय लॉर्ड कर्झनने केवळ उच्च शिक्षण बंद केलें म्हणून, बैलोबा बनूं ?

प्रश्नः—पण मग, ब्रिटिश लोकांच्या आगमनापूर्वीच्या आणि नंतरच्या आपल्या स्थितींत इतका फरक कां बरें दिसतो ?

स्वामीजीः—उच्च शिक्षण काय भौतिक शास्त्रांच्या अभ्यासापुरतें आणि यंत्रांद्वारा नित्योपयोगी वस्तूंच्या निर्मितीपुरतेंच सीमित मानायचें ? उच्च शिक्षणाचा खरा उपयोग जीवनांतील समस्या सोडवितां येण्यांत आहे. हें कसें घडवून आणायचें, याच प्रश्नाचा विचार आज आधुनिक सभ्य जगतांत चालला आहे. पण आपण आपल्या देशांत हा प्रश्न हजारो वर्षांपूर्वीच सोडविला होता.

प्रश्नः—पण इथे तर तुमचा वेदान्त देखील अस्तास जाण्याची पाळी आली होती ?

स्वामीजीः—तसें असलें म्हणून काय झालें ? काळाच्या प्रवाहांत वेदान्ताची ज्योति कधीकधी अगदी क्षीण होते. अशा वेळीं ईश्वर अवतार घेतो आणि धर्मांत नवसामर्थ्याचा आणि चैतन्याचा संचार करतो. मग अदम्य उत्साहाने पुन्हा कांही काळ तो धर्म चालूं राहतो. तें चैतन्य आणि तें सामर्थ्य आज आपल्या धर्मांत पुन्हा संचरलें आहे.

प्रश्नः—महाराज, भारताने भारतेतर जगाला विपुल ज्ञानदान केल्याचा पुरावा काय आहे ?

स्वामीजीः—त्याचा पुरावा इतिहासांत नमूद आहे. आत्मोन्नति घडवून आणणारे जे विचार आणि ज्ञानाच्या ज्या निरनिराळ्या शाखा आज जगांत अस्तित्वांत आहेत त्या सगळ्यांचें मूळ भारतांत आहे असेंच योग्य संशोधन केलें असतां आढळेल.

स्वामीजींमधे जणु उत्साहाचें तेज संचरलें. कितीतरी वेळ ते या विषयावर बोलत राहिले. त्या वेळीं त्यांची प्रकृति फार वाईट होती. शिवाय, उन्हाळ्यांतील प्रखर उष्णतेमुळे त्यांना सारखी तहान लागत होती व पुनःपुन्हा पाणी प्यावें लागत होतें. शेवटीं ते म्हणाले,—"गड्या सिंघी, माझ्यासाठी थोडें बर्फ घातलेलें पाणी आण पाहूं. मग मी हें

सगळें तुला अगदी सुबोध करून सांगतों" बर्फाचें गार पाणी प्यायल्यावर ते पुन: बोलूं लागले.

स्वामीजी:—विदेशियांच्या नियंत्रणाशिवाय, स्वतंत्र बुद्धीने आपल्या प्राचीन ज्ञानशाखांचा अभ्यास आज व्हायला पाहिजे आहे. त्याचबरोबर इंग्रजी भाषा आणि पाश्चिमात्य विज्ञान यांचाहि अभ्यास झाला पाहिजे. आपल्या येथे उद्योगधंद्यांची वाढ होण्याच्या दृष्टीने आवश्यक तें सगळें तांत्रिक व अन्य शिक्षण आपण घेतलें पाहिजे. तसें झालें तर आपल्या लोकांना नोकऱ्यांच्या मागे फिरावें लागणार नाही. उद्योगधंद्यांच्या द्वारें पोटापुरतें मिळून, कठीण काळासाठी कांही सोयहि करून ठेवतां येईल.

प्रश्न:—त्या दिवशीं आपण 'टोल'विषयी ( संस्कृत पाठशाळे-विषयी ) काय सांगणार होतां ?

स्वामीजी:—उपनिषदांतील गोष्टी तूं वाचल्या नाहीस काय ? त्यांतील एक गोष्ट मी तुला सांगतों. ब्रह्मचारी म्हणून राहण्यासाठी सत्यकाम नामक एक बालक आपल्या गुरूकडे गेला. गुरुजींनी कांही गायी त्याच्या स्वाधीन केल्या आणि त्या घेऊन रानांत जावयास सांगितलें. अनेक महिने होऊन गेले. गाईंची संख्या जेव्हा दुप्पट झाली तेव्हा सत्यकामाने गुरुजींकडे परतण्याचा विचार केला. वाटेंत एका वृषभाने, अग्नीने आणि इतर पशूंनी त्याला परब्रह्माविषयी ज्ञान दिलें. सत्यकाम गुरुजींकडे पोहोचला. नुसतें त्याच्या चेहऱ्याकडे पाहिल्याबरोबर, त्याला ब्रह्मज्ञान झालें असल्याचें गुरुजींनी ओळखलें. * निसर्गाशीं सतत सख्य-संबंध ठेविल्यानेच खरें शिक्षण मिळतें, हेंच या गोष्टीचें तात्पर्य आहे. हीच या गोष्टींतील शिकवण आहे.

ज्ञान ह्या पद्धतीने मिळविलें पाहिजे. एरवी, नुसतें एखाद्या पंडिताच्या 'टोल'मधे शिक्षण घेऊन, मनुष्यनामधारी माकडें मात्र निर्माण होतील. मुलांनी अगदी किशोरावस्थेपासून उज्ज्वल चारित्र्यसंपन्न व्यक्तीजवळ राहिलें पाहिजे. सर्वोच्च शिक्षणाचें जिवंत उदाहरण नेहमी त्यांच्या डोळ्यांसमोर असलें पाहिजे. खोटें बोलणें हें पाप आहे, असें नुसतें वाचून उपयोगी नाही. त्यांनी पूर्ण ब्रह्मचर्याचें पालन करायला शिकलें पाहिजे. केवळ त्यानंतरच श्रद्धा आणि विश्वास निर्माण होतील.

---

* छांदोग्य उपनिषद् ४।९।२

ज्याच्याठायीं श्रद्धा व विश्वास नाही तो खोटें बोलणारच. आपल्या-देशांत नेहमी त्यागी पुरुषच ज्ञानदानाचें कार्य करीत आले आहेत. कालान्तराने पंडितांनी सगळ्या ज्ञानाची मक्तेदारी सुरू केली. 'टोल-' च्या चार भिंतींतच त्यांनी ज्ञानाला कोंडून ठेवलें. यामुळेच त्यांनी आपला देश प्राय: नष्ट करून टाकला आहे. ज्ञानदानाचें कार्य जोंपर्यंत त्यागी लोकांकडून होत होतें तोंपर्यंत भारताचें भविष्य उज्ज्वल होतें.

प्रश्न:——महाराज, आपल्या या म्हणण्याचा अर्थ काय ? इतर देशांत कुठे आहेत संन्यासी ? पण त्यांच्या ज्ञानाच्या प्रभावामुळे भारत आज त्यांच्या पदतलीं पडलेला आहे.

स्वामीजी:——असें वेड्यासारखें कांहीतरी बोलूं नकोस. मी जें सांगतों आहें तें नीट ऐक. त्यागी लोकांकडे पुन्हा जर हें शिक्षणाचें कार्य आलें नाही तर मग भारताला नेहमीसाठीच परकीयांचे जोडे मस्तकीं धारण करावे लागतील. एका अशिक्षित मुलाने केवळ त्यागाच्या बळा-वर असें सामर्थ्य प्राप्त केलें की तें पाहून मोठमोठे पंडित चकित होऊन गेले. श्रीरामकृष्णांचें हें उदाहरण तुला ठाऊक नाही काय ?

एकदा दक्षिणेश्वरच्या मंदिरांत पुजाऱ्याच्या हातून विष्णूच्या मूर्तीचा पाय मोडला. आता यासंबंधी काय करावें हें ठरविण्यासाठी पंडितमंडळी बोलाविण्यांत आली. अनेक शास्त्रें आणि पोथ्या पाहून त्यांनी निर्णय दिला की या खंडित मूर्तीची पूजा शास्त्रसंमत नाही, नव्या मूर्तीची स्थापना केली पाहिजे. त्यावरून बरीच खळबळ माजली. शेवटीं श्रीरामकृष्णांना बोलाविण्यांत आलें. त्यांनी सगळें ऐकून घेतलें आणि मग विचारलें, 'एखाद्या स्त्रीचा पति जर लंगडा झाला तर ती काय त्याला टाकून देते ? '

येवढा प्रश्न विचारला मात्र आणि पंडित मंडळींचीं तोंडें अगदी बंद पडलीं. श्रीरामकृष्णांच्या अगदी साध्या बोलण्यापुढे त्यांची सगळी शास्त्राधारित टीका आणि विद्वत्तापूर्ण सगळीं मतें लुळीं पडलीं.

तुझ्या म्हणण्यांत जर कांही तथ्य असतें तर श्रीरामकृष्ण या अवनीतलावर कशाला अवतरले असते. आणि त्यांनी निव्वळ पुस्तकी विद्येचा अधिक्षेप तरी कां बरें केला असता ? सगळ्या विद्यांमधे आणि शिक्षणकार्यांमधे, श्रीरामकृष्णांनी आणलेल्या नवचैतन्याचा संचार

केला पाहिजे तरच खरें कार्य साधेल.

प्रश्नः—हें बोलणें सोपें आहे, पण करणें फार कठीण आहे.

स्वामीजीः—तें सोपें असतें तर मग श्रीरामकृष्णांच्या आगमनाची काय आवश्यकता होती ? तुम्हां लोकांना यापुढे मठस्थापनेचें कार्य करावयाचें आहे. प्रत्येक शहरांत आणि खेड्यांत एकेक मठ स्थापन झाला पाहिजे. हें कार्य तुम्ही करूं शकाल काय ? कांही तरी करा तर खरें ! कलकत्त्याच्या मध्यभागीं एक मोठा मठ सुरू करा. एखादा उच्चविद्याविभूषित साधु तिथे मुख्य म्हणून ठेवा. व्यावहारिक विज्ञान, कला आदि विभिन्न शाखांचें शिक्षण तिथे दिलें जाईल. त्या त्या विषयांत पारंगत असलेला एकेक संन्यासी प्रत्येक विभागाचें कार्य चालवील.

प्रश्नः—असे साधु तुम्हांला कोठून मिळतील ?

स्वामीजीः—ते आपल्याला तयार करावे लागतील. म्हणूनच मी नेहमी म्हणतों की मला कांही तरुण हवे आहेत. ज्वलन्त राष्ट्रभक्ति आणि त्यागवृत्ति असलेले तरुण हवे आहेत. त्यागी व्यक्तिच कोणतीहि गोष्ट तात्काळ आत्मसात् करून तीवर प्रभुत्व मिळवूं शकते.

स्वामीजी कांही वेळ शांत राहिले आणि मग म्हणाले, "सिंघी, देशासाठी आवश्यक अशा कितीतरी गोष्टी अजून आपल्याला करावयाच्या आहेत. त्यासाठी तुझ्यामाझ्यासारखे हजारो लोक हवे आहेत. केवळ बोलण्याने काय होणार ? देशाची कोण दुर्गति झाली आहे पाहा ! आता कांही तरी केलेंच पाहिजे. लहान मुलांना शिकविण्यासाठी एखादें योग्य पुस्तक म्हटलें तर तें सुद्धा आज आपल्याजवळ नाही.

प्रश्नः—कां बरें ? ईश्वरचंद्र विद्यासागरांनी लहान मुलांसाठी तर कितीतरी पुस्तकें लिहिलीं आहेत ?

मीं असें म्हटल्याबरोबर ते मोठ्याने हसले आणि म्हणाले, "होय, 'ईश्वर निराकार चैतन्यस्वरूप,' 'सुबल अति सुबोध बालक' (सुबल फार चांगला मुलगा आहे) वगैरे धडे त्या पुस्तकांत आहेत, पण त्यांनी आपलें भागणार नाही. आपल्याला नवीन पुस्तकें तयार करावीं लागतील—बंगालींत आणि इंग्रजींत देखील. त्या पुस्तकांत रामायण,

महाभारत, उपनिषदें वगैरेंमधील गोष्टी घालायच्या, त्यांची भाषा अगदी साधी सोपी ठेवायची, आणि तीं पुस्तकें आपल्या लहांन मुलांना वाचायला द्यायचीं."

आता अकरा वाजायला आले होते. एकाएकी आकाश भरून आलें आणि गार वारा वाहूं लागला. पावसाचीं हीं चिन्हें पाहून स्वामीजींना फार आनंद झाला. ते उठले आणि म्हणाले, "चल सिंघी, आपण जरा गंगेच्या किनाऱ्यावर फिरून येऊं."

मग आम्ही फिरायला गेलों. वाटेंत बोलण्याच्या ओघांत कालिदासाच्या मेघदूतांतील कितीतरी श्लोक त्यांनी म्हटले. तथापि इतर सामान्य गोष्टी चालू असतांहि, भारताचें भवितव्य उज्ज्वल कसें होईल हाच एक विचार त्यांच्या मनांत चालू होता. ते उद्गारले, "सिंघी, एक गोष्ट तुला करतां येईल का ? आपल्या तरुणांचे विवाह कांही दिवस थांबवितां येतील का ?"

मीं म्हटलें, "महाराज, हें कसें शक्य आहे ? समाजांतील शिष्ट मंडळींचा तर विरुद्ध दिशेने प्रयत्न चालू आहे. लग्नें स्वस्तांत कशीं आटोपतां येतील यासाठी ते विविध उपाय शोधीत आहेत."

स्वामीजी:--छे, अशा गोष्टींनी आपला मेंदू शिणवूं नकोस. कालसागराची लाट कोण थोपवूं शकतो ? अशा सगळ्या आंदोलनांचा पोकळ नगारा लवकरच बंद पडेल. त्यापासून दुसरें काय निष्पन्न होणार आहे ? देशाच्या दृष्टीने तर हीं लग्नें जितकीं महाग होतील तितकीं चांगलीं ! परीक्षा उत्तीर्ण होण्याची आणि लगेच लग्न करण्याची कोण धांवपळ चालली आहे ! लग्नांचीं उसळलेली तुफानगर्दी पाहून असें वाटतें की आता जगांत कोणी अविवाहित राहिलाच नसावा ! पण पुढल्या वर्षी पाहावें तों पुन्हा तेंच.

थोडा वेळ शांत राहिल्यानंतर स्वामीजी पुन्हा म्हणाले:--मला जर कांही अविवाहित पदवीधर मिळाले तर जपानमध्ये जाऊन त्यांना तेथे तांत्रिक शिक्षण घेतां येईल असा प्रयत्न मी करीन. तेथून परतल्यावर भारताच्या भल्याकरिता ते आपल्या ज्ञानाचा उपयोग करतील. असें जमलें तर किती चांगलें होईल ?

प्रश्न:—महाराज, इंग्लंडपेक्षा जपानला जाणें अधिक चांगलें,

असें आपलें मत आहे काय ?

स्वामीजी:—निश्चित. माझ्या मतें, आपल्याकडील श्रीमंत आणि सुशिक्षित लोक एकदा जरी जपानला जाऊन तो देश पाहतील तरी त्यांचे डोळे खाडकन् उघडतील.

प्रश्न:—ते कसे काय ?

स्वामीजी:—तिथे जपानमधे त्यांनी ज्ञान पचवलें आहे, आत्मसात् केलें आहे. आपल्या इथल्यासारखें त्यांना ज्ञानाचें अपचन झालेलें नाही. सगळ्या गोष्टी युरोपियन लोकांपासून घेऊनहि ते जपानीच राहिले आहेत, युरोपियन बनले नाहीत. उलट आपल्याइकडे, प्लेगची लागण लागावी तितक्या झपाट्याने पाश्चिमात्य बनण्याचें वेड पसरतें आहे.

मीं म्हटलें, "महाराज, मीं कांही जपानी चित्रें पाहिलीं. तीं इतकीं चांगलीं होतीं की जो पाहील तो आश्चर्यचकित होऊन जाईल असें मला वाटतें. त्यांच्या त्या कलेमागील स्फूर्ति ही त्यांची स्वत:चीच होती. ती वैशिष्टयपूर्ण असून तिचें अनुकरण दुसऱ्याला करतां येणें शक्य नाही.

स्वामीजी:—अगदी खरें आहे. त्यांच्या कलेमुळेच त्यांचें राष्ट्र थोर बनलें आहे. आपल्यासारखेच तेहि आशियाखंडांतलेच आहेत हें तुला ठाऊक नाही काय ? आपण जरी आपलें सर्वस्व गमाविण्याची पाळी आणली आहे तरी आजहि जें आपल्याजवळ आहे तें अद्भुत आहे. आशियांतील माणसाचा आत्माच मुळी कलामय आहे. तो कोणतीहि वस्तु कलापूर्ण असल्याशिवाय वापरायचा नाही. कला हा तर आपल्या येथे धर्माचाच एक भाग मानला गेला आहे हें तुला माहीत नाही काय ?

धार्मिक उत्सवांत पाण्यांत कालविलेल्या तांदुळाच्या पिठाने स्त्रिया भिंतींवर आणि जमीनीवर चित्रें काढतात. अशा वेळीं जी स्त्री उत्तम चित्रें काढते तिचा सर्वजण किती गौरव करतात ! श्रीरामकृष्ण स्वत: केवढे थोर कलावंत होते !

प्रश्न:—इंग्रजांचीहि कला तशी चांगली आहे, नव्हे का ?

स्वामीजी:—कसा अगदी मूर्खशिरोमणि आहेस रे तूं ! पण

तुला तरी दोष देण्यांत काय अर्थ ! आज मुळी ती प्रचलित विचार-पद्धतिच बनली आहे. हाय हाय ! काय ही आमच्या देशाची दुर्गति ! हे लोक आज घरच्या सोन्याचा पितळ म्हणून अधिक्षेप करतात आणि परकीयांचें पितळ त्यांना सोनें वाटतें. हीच खरोखर आधुनिक शिक्षणाची जादू आहे ! एक गोष्ट लक्षांत ठेव. युरोपियन लोक जेव्हापासून आशियाच्या संपर्कांत आले तेव्हापासून त्यांनी स्वतःच्या जीवनांत कलेला स्थान द्यायला सुरवात केली.

मीः—तुमचें हें बोलणें जर इतर लोक ऐकतील तर त्यांना तुमचा ह्या गोष्टीकडे पाहण्याचा दृष्टिकोन फारच निराशावादी वाटेल.

स्वामीजीः—स्वाभाविकच आहे तें. रुळलेल्या चाकोरींतून जे चालत आहेत त्यांना आणखी काय वाटणार ? जें माझ्या डोळ्यांना दिसतें तें तुम्हांलाहि दाखवावें असें मला किती उत्कटतेने वाटतें म्हणून सांगूं ! त्यांच्या इमारतींकडे पाहा, किती सामान्य आणि किती अर्थ-शून्य ! त्यांच्या मोठमोठ्या सरकारी इमारती पाहिल्या तरी तेंच. बाहेरून पाहून त्या कशासाठी आहेत हें तुम्हांला ओळखूं येणार नाही, कारण त्यांत प्रतीकात्मक असें कांहीच नसतें. पाश्चिमात्यांच्या वेश-भूषेची तीच तऱ्हा. त्यांच्या सरळ विजारी, कडक कोट, अंगावर घट्ट बसणारे कपडे घालण्याची त्यांची एकंदर पद्धति आमच्या दृष्टींतून पाहतां मुळीच सुंदर वाटत नाही. नाही का ? अहाहा ! काय त्या सौंदर्याचें वर्णन करावें !

आता आपल्या मायभूमींत सगळीकडे हिंडून पाहा. नुसत्या बाह्य आकारावरून त्या इमारती कशासाठी आहेत हें चटकन् ओळखतां येतें; आणि किती कलाकुसर असते तिथे ! ते कांचेच्या पेल्याने पाणी पितात, तर आपण धातूच्या गडव्याने पाणी पितों. या दोहोंत कलापूर्ण भांडें कोणतें आहे बरें ? आपल्या खेड्यांतील शेतकऱ्यांचीं घरें तूं पाहिलीं आहेस काय !

मीः—हो हो, पाहिलीं आहेत तर.

स्वामीजी.—त्या घरांत तूं कोणती विशेष गोष्ट पाहिलीस ?

काय सांगावें तें मला नीट सुचेना. तथापि मी म्हणालों, "महाराज, तीं इतकी स्वच्छ आणि व्यवस्थित असतात की नांव ठेवा-

यला थोडीसुद्धा जागा आढळत नाही. अंगण, जमिनी नेहमी सारवून लिंपून कशा अगदी लख्ख ठेवलेल्या असतात.

स्वामीजी:—भात साठविण्याचीं त्यांचीं कोठारघरें तूं पाहिलींस का ? किती कलापूर्ण असतात तीं ! त्या यःकश्चित् चिखलाच्या भितीं-वर नाना प्रकारचीं किती चित्रें काढलेलीं असतात !

पाश्चिमात्य देशांत खालच्या श्रेणीचे लोक कसे राहतात हें जर तूं जाऊन पाहशील तर दोन्हींतील फरक तुझ्या एकदम ध्यानांत येईल. उपयुक्तता हा त्यांचा आदर्श आहे, कला हा आपला आदर्श आहे. पाश्चिमात्य मनुष्य प्रत्येक गोष्टींत उपयुक्ततेचा विचार करतो. आपण प्रत्येक ठिकाणीं कला पाहतों. पाश्चिमात्य शिक्षणामुळे आपल्याकडील ते सुंदर गडवे नाहीसे झाले आणि आता घराघरांतून एनॅमलच्या पेल्यांनी त्यांची जागा बळकाविली आहे. आता हा त्यांचा उपयुक्ततेचा आदर्श आपण इतका स्वीकारला आहे की कित्येक वेळीं तो आपल्याला अगदी हास्यास्पद ठरवितो. आज आपल्याला कला आणि उपयुक्तता या दोहोंचा मिलाफ हवा आहे. जपानने तें तावडतोब घडवून आणलें, म्हणूनच अतिशीघ्र वेगाने त्या राष्ट्राची प्रगति झाली. आता उलट जपानीच पाश्चिमात्यांना शिकवितील अशी पाळी आली आहे.

प्रश्न:—महाराज, सर्व जगांत कोणत्या जातीची वेशभूषा सर्वांत उत्तम आहे ?

स्वामीजी:—आर्यांची. युरोपियन लोकांनासुद्धा हें मान्य आहे. आर्यांच्या वेषांत ज्या चुण्या पडलेल्या असतात त्या किती सुंदर दिस-तात ! बहुधा सर्व देशांच्या राजघराण्यांचीं राजवस्त्रें कांही प्रमाणांत आर्यांच्या वेशपद्धतीची नक्कलच म्हणतां येईल. कपड्यांवर चुण्या दिसाव्यात असाच प्रयत्न त्यांच्या देशांत केलेला दिसतो. हीं त्यांचीं राजवस्त्रें तद्देशीय इतर लोकांच्या वस्त्रांपेक्षा अगदी निराळ्या पद्धतीचीं दिसतात.

सहज ओघाने विषय आला म्हणून सांगतों, शिष्यो, युरोपियन पद्धतीचे शर्ट वापरण्याची वाईट सवय तूं सोडून दे.

प्रश्न:—कां बरें महाराज ?

स्वामीजी:—अरे पाश्चिमात्य लोक शर्ट केवळ अंतर्वस्त्र म्हणून

वापरतात. घराबाहेर फक्त शर्ट वापरणें त्यांना आवडत नाही. बंगाली लोक मात्र घराबाहेर शर्ट वापरून त्याचा चुकीचा उपयोग करतात. त्यांना वाटतें, कोणतेहि कपडे घालावेत आणि ते हवे तसे घालावेत. कपड्यांसंबंधी देखील कांही परंपरा, कांही रुढि चालत आलेली आहे की नाही ? नीचवर्णीयांच्या हस्तस्पर्शानें विटाळलेलें अन्न जर एखाद्यानें खाल्लें तर आपण त्याला वाळीत टाकतों. तसेंच कोणतीहि व कशीहि वेशभूषा कुणीं केल्यास हाच नियम आपण पाळला असतां तर बरें झालें असतें ! आपल्या पद्धतीला अनुरूप असा वेश आपण कां धारण करूं नये ? युरोपियन पद्धतीचे कोट-शर्ट वापरण्यांत कोणता शहाणपणा आहे ?

आता पाऊस पडूं लागला. तेवढ्यांत जेवणाची घंटाहि झाली. म्हणून इतरांबरोबर आम्हीहि प्रसाद ग्रहण करण्यासाठी आंत गेलों.

जेवतांना स्वामीजी मला उद्देशून म्हणाले, "आपलें भोजन असें असलें पाहिजे की तें पुष्टिकारक असून कमी प्रमाणांत घेतलें पाहिजे. आपण चांगलें सकस अन्न खाल्लें पाहिजे. खूपशा भातानें नुसतें पोट भरून घेतलें म्हणजे आळस निर्माण होतो." थोड्या वेळानंतर ते पुन: म्हणाले, "जपान्यांचा आहार पाहा, ते दिवसांतून दोनतीन वेळां भात व डाळीचें वरण असें जेवण घेतात. तिकडे जेवणाच्या वेळा अधिक आहेत पण चांगला धट्टाकट्टा माणूससुद्धा एकावेळीं अगदी बेताचेंच जेवेल. त्यांच्यापैकी जे सुखवस्तु असतात ते रोज मांसाहार करतात. आपण मात्र दिवसांतून दोन वेळ जेवतों आणि प्रत्येक वेळीं आकंठ पोट भरून घेतों तो भाताचा ढीग पचविण्यांतच आपली सगळी शक्ति खर्च होते."

प्रश्न:—आपण बंगाली लोक किती गरीब आहोंत ! आपल्याला मांसाहार परवडणें शक्य आहे काय ?

स्वामीजी:—कां नाही ? थोड्या प्रमाणांत घेणें तुम्हांला परवडूं शकेल. दिवसाला पावभर घेतलें तरी अगदी पुरें आहे. आपला खरा दुर्गुण आहे आळस. आपल्या गरिबीचें मुख्य कारण हा आळसच आहे. समजा एखाद्या दुकानाच्या मालकानें नाराज होऊन नोकराचा पगार कमी केला अथवा घरांतील तीनचार मिळवित्या मुलांपैकी एखादा मेला तर मग ते लोक काय करतात ? दुसरें काय करणार ? ते मुलांचें

दूध कमी करतात. दिवसांतून फक्त एक वेळ जेवण करतात व रात्रीं पोहे-चुरमुरे असें कांहीतरी खाऊन भागवितात.

प्रश्न:--पण त्या परिस्थितींत आणखी काय करतां येणें शक्य आहे ?

स्वामीजी:--आपल्या अन्नाचा दर्जा कायम ठेवण्याकरिता त्यांनी अधिक कष्ट कां करूं नयेत ? पण नाही. गप्पाष्टकांच्या अड्डयांवर जाऊन तिथे त्यांना तासचे तास घालवायचे असतात ना! अरेरे, आपण व्यर्थ वेळ दवडीत आहोंत हें जर त्यांना कळलें तर किती चांगलें होईल ?

## (५)

एकदा मी स्वामीजींना भेटायला गेलों. ते त्या वेळीं कलकत्ता येथे कै. बलराम बसु यांच्या घरांत राहत होते. जपान आणि अमेरिका यांसंबंधी बराच वेळ संभाषण झाल्यानंतर मीं त्यांना विचारलें, "स्वामीजी, पाश्चिमात्य देशांत तुमचे किती शिष्य आहेत ?"

स्वामीजी:--पुष्कळ आहेत.

प्रश्न:--दोनतीन हजार ?

स्वामीजी:--कदाचित् त्यापेक्षा अधिकच असतील.

प्रश्न:--त्या सर्वांना तुम्हीं मंत्रदीक्षा दिली आहे काय ?

स्वामीजी:--होय.

प्रश्न:--तुम्हीं त्यांना प्रणवाचा (ॐ चा) उच्चार करायला परवानगी दिली आहे काय ?

स्वामीजी:--होय.

प्रश्न:--महाराज, अशी कशी तुम्हीं परवानगी दिली ? असें म्हणतात की प्रणवाचा उच्चार करण्याचा अधिकार शूद्रांना नाही. तो फक्त ब्राह्मणांना आहे. त्यांतून पाश्चिमात्य लोक तर म्लेंच्छ आहेत. शूद्रदेखील नाहीत.

स्वामीजी:--मीं ज्यांना दीक्षा दिली ते ब्राह्मण नाहीत हें तुला कसें कळलें ?

मी:—भारताच्या बाहेर, म्लेंच्छांच्या आणि यवनांच्या देशांत, आपणांस ब्राह्मण कसे मिळाले ?

स्वामीजी:—माझे सगळे शिष्य ब्राह्मण आहेत. ब्राह्मणांशिवाय इतर कोणाला प्रणवोच्चाराचा अधिकार नाही हें वचन मला अगदी मान्य आहे. पण ब्राह्मणाचा मुलगा हा नेहमी ब्राह्मण असतोच असें नाही. अर्थात् तो ब्राह्मण असण्याची फार मोठी शक्यता असते ही गोष्ट निराळी, पण म्हणून तो असतोच असें नाही. बागबाजारामधील अघोर चक्रवर्तींच्या पुतण्याचीं गोष्ट तुला माहीत नाही काय ? तो भंगी बनला. भंग्याचीं सगळीं कामें तो करीत असे. तो काय ब्राह्मणाचा मुलगा नव्हता ?

जातीने ब्राह्मण असणें आणि ब्राह्मण्याचे गुण अंगीं असणें या अगदी भिन्न गोष्टी आहेत. भारतांत जातीवरून ब्राह्मण म्हणून मान्यता मिळते. पण पाश्चिमात्य देशांत गुणांवरूनच ब्राह्मण ओळखावे लागतील. सत्त्व, रज आणि तम हे जसे तीन गुण आहेत, तसेच एखादा मनुष्य ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वा शूद्र यांपैकी कोण आहे ही ओळख पटविणारेहि कांही विशिष्ट गुण आहेत. आपल्या देशांत ब्राह्मणाचे आणि क्षत्रियाचे गुण लोप पावत आहेत. पाश्चिमात्य देशांत, त्यांनी आता क्षत्रियत्व प्राप्त केलें आहे. यापुढची पायरी ब्राह्मणत्वाची आहे. ब्राह्मणत्वाचे गुण अंगीं बाणलेले पुष्कळ लोक तिकडे आहेत.

प्रश्न:—स्वभावाने जे सात्त्विक आहेत, त्यांना तुम्ही ब्राह्मण म्हणतां तर ?

स्वामीजी:—अर्थातच. सत्त्व, रज आणि तम हे गुण कमीअधिक प्रमाणांत प्रत्येक व्यक्तींत असतात. त्याचप्रमाणे कमीअधिक प्रमाणांत प्रत्येक माणसांत, ब्राह्मणाचे, क्षत्रियाचे, वैश्याचे व शूद्राचे गुण उपजतच असतात. पण कधी कधी एका किंवा दुसऱ्या गुणाचा प्रभाव कमी-अधिक होतो आणि माणसाच्या कर्मांतून तो प्रकट होतो. विभिन्न कर्में करीत असलेल्या एकाच माणसाचें आपण उदाहरण घेऊं या. पैसे घेऊन जेव्हा तो दुसऱ्याची नोकरी करतो तेव्हा त्याने शूद्रत्व स्वीकारलेलें असतें; स्वतःच्या लाभासाठी जेव्हा तो कांही खरेदी-विक्री करतो तेव्हा तो वैश्य असतो; अन्यायाविरुद्ध लढा द्यायला जेव्हा तो उभा राहतो

तेव्हा त्याच्यांतील क्षत्रिय वृत्ति जागृत झालेली असते; आणि जेव्हा तो ईश्वरचिंतन करतो अथवा ईश्वरविषयक संभाषणादि करण्यांत वेळ कारणीं लावतो तेव्हा तो ब्राह्मण असतो. अर्थातच माणसाला एका जातींतून दुसऱ्या जातींत जाणें सहज शक्य आहे. अन्यथा विश्वामित्र ब्राह्मण कसा झाला असता आणि परशुराम क्षत्रिय कसा झाला असता?

प्रश्नः—तुम्ही जें म्हणतां तें अगदी खरें दिसतें, पण मग आपले विद्वान् पंडित आणि कुलगुरु आपल्याला तसें कां बरें शिकवीत नाहीत?

स्वामीजीः—तो आपल्या देशाचा एक फार मोठा दुर्गुण आहे. पण जाऊं द्या. हा विषय आता येथेंच पुरे.

स्वामीजींनी या ठिकाणीं पाश्चिमात्यांच्या व्यावहारिक वृत्तीची फार स्तुति केली. धर्मसाधना अंगिकारल्यानंतर त्यांतहि त्यांची ती वृत्ति कशी दिसून येते तेंहि त्यांनी सांगितलें.

मीः—आपण म्हणतां तें खरें आहे महाराज. मीं असें ऐकलें आहे की धर्मसाधना करतांना त्यांच्या आत्मिक आणि मानसिक शक्ति फार झपाट्याने विकास पावतात. त्या दिवशीं स्वामी सारदानंदांनी त्यांच्या एका पाश्चिमात्य शिष्याचें पत्र मला दाखविलें. केवळ चार महिन्यांच्या साधनेने त्या शिष्याने आत्मिक शक्तीचा चांगलाच विकास करून घेतला होता.

स्वामीजीः—तेव्हा आता तूंच पाहा ! पाश्चिमात्य देशांत ब्राह्मण आहेत की नाहीत हें आता तुझ्या ध्यानांत आलेंच असेल. येथेहि ब्राह्मण आहेत, पण त्यांनी आपल्या जुलमी सत्तेमुळे देशाला विनाशाच्या अगदी निकट आणून उभें केलें आहे. परिणामीं, निसर्गतः जें त्यांना मिळालें होतें तें क्रमाक्रमाने त्यांच्यांतून नाहीसें होत आहे. आजहि गुरु शिष्याला मंत्रदीक्षा देतो खरी, पण त्याचाहि त्याने व्यापार करून टाकला आहे. आणि आजकालच्या ह्या गुरुशिष्यांचे संबंध देखील किती अद्भुत असतात ! एखाद्या दिवशीं जर गुरूच्या घरांत कांही खायला नसलें तर त्याची बायको त्याला म्हणते, 'अहो, आज घरांत खायला अन्न नाही; पुन्हा एकदा त्या शिष्याकडे तरी जाण्याचें करा. दिवसभर तुम्ही सोंगट्या खेळत बसतां. अशाने का भूक भागायची आहे ?' तो ब्राह्मण उत्तर देतो, 'ठीक आहे. उद्या सकाळीं मला आठवण कर. मला

असें कळलें आहे की माझ्या त्या अमुक अमुक शिष्याचें दैव चांगलेंच फळलें आहे, आणि मुख्य म्हणजे फार दिवसांत मी त्याच्याकडे गेलेलों नाहीं" बंगालमधे तुमच्या कुलगुरुप्रथेची आज ही दशा आहे ! पाश्चिमात्य देशांतील पुरोहितगिरीला अजून इतके अधःपतित स्वरूप प्राप्त झालें नाही. तुमच्या ह्या प्रकारापेक्षा, एकंदरीने ते अधिक चांगले आहेत.

(६)

आपल्या संभाषणांत किंवा संगीत इत्यादींसारख्या सामूहिक कार्यांत आपण फार कमी संयम बाळगतों. प्रत्येकजण आपलें घोडें पुढे दामटण्याचा प्रयत्न करीत असतों. आगगाडीच्या स्टेशनावर किंवा आगबोटींच्या धक्क्यावर जी धक्काबुक्की होते, जो हलकल्लोळ उडतो तोहि याचेंच उदाहरण म्हणतां येईल. एके दिवशीं मठामधे स्वामीजींच्या एका मित्राचें स्वामीजींशीं या विषयावर बोलणें झालें. स्वामीजी म्हणाले, "आपल्या इकडे एक जुनी म्हण प्रचलित आहे. तिचा अर्थ असा आहे की, 'तुमच्या मुलाचें जर अभ्यासांत मन लागत नसेल तर त्याला दरबारांत पाठवा.' दरबार म्हणजे सभा. त्या काळीं सामाजिक बैठकींना सभा म्हणत नसत. घरोघर होणाऱ्या प्रासंगिक बैठकी असाहि अर्थ त्यांत अभिप्रेत नसे, सभा म्हणजे राजदरबार असाच अर्थ होत असे. बंगालमधे ज्या काळीं स्वतंत्र राजे होते त्या काळीं ते सकाळ-संध्याकाळ दरबार भरवीत असत. रोज सकाळीं, राज्याच्या अनेक गोष्टींसंबंधी तेथे खल होत असे. त्या काळीं वर्तमानपत्रें नव्हतीं. त्यामुळे नगरांतील प्रतिष्ठित लोकांशीं बोलूनच राजा जनतेविषयीची आणि राज्याविषयीची सगळी माहिती काढून घेत असे. त्या प्रतिष्ठित नागरिकांना त्या दरबारांत अवश्य उपस्थित राहावें लागे. ते जर न आले तर राजा लगेच त्यांच्या अनुपस्थितीचें कारण विचारीत असे. केवळ आपल्याच देशांत नव्हे तर सर्वच देशांत हे दरबार सभ्यतेचीं केंद्रें मानलीं जात असत. आज या बाबतींत भारताचा पश्चिम भाग, विशेषतः राजपुताना, बंगालपेक्षा पुष्कळ बरा आहे; कारण, आजहि

तिकडे प्राचीन राजदरबारासारखें कांहीतरी भरत असतें."

प्रश्न:--तर मग महाराज, आपले स्वत:चे राजे नसल्यामुळेच आपल्या देशांतील शिष्टाचार लोप पावला की काय ?

स्वामीजी:---या सगळया अध:पतनाचें मूळ स्वार्थी वृत्तींत आहे. जहाजावर चढतांना सर्वचजण 'स्वत:चें सर्वकांही व्यवस्थित झालें की संपलें, मग इतरांचें कांहीहि होवो' अशी वृत्ति बाळगतात. संगीताच्या किंवा अन्य मनोरंजनाच्या कार्यक्रमांत, प्रत्येकजण स्वत:चें प्रदर्शन करण्याचा प्रयत्न करीत असतो. आपल्या वृत्तीचे हे वैशिष्टयपूर्ण नमुने होत. स्वार्थत्यागाच्या थोडयाशा शिक्षणाने हे दोष दूर होतील. आपल्या मुलांना साधे शिष्टाचारहि न शिकविणाऱ्या आईबापांकडे याचा दोष आहे स्वार्थत्याग हाच खरोखर सगळया सभ्यतेचा पाया आहे.

उलट, आपण असेंहि पाहतों की अधिक दाबांत ठेवल्यामुळे आपल्याइकडील मुलांची मोकळेपणाने वाढ होत नाही. आपल्या मुलांनी गाणें शिकणेंसुद्धा कांही आईबापांना अयोग्य वाटतें. पण एखादें चांगलें गाणें कानावर पडलें की मुलाला अगदी मनापासून तें गाणें शिकावेंसें वाटूं लागतें. साहजिकच, मग त्याला एखादा अड्डा गाठावा लागतो. बरें, आणखी दुसरा नियम असतो 'धूम्रपान करणें पाप आहे.' मग लहान मुलें घरांतील नोकरांचाकरांत मिसळून चोरटेपणाने हें व्यसन पूर्ण करून घेतात. यावांचून त्यांना दुसरा उपायच नसतो. प्रत्येकांत असंख्य प्रवृत्ति असतात. त्या तृप्त होण्यासाठी त्यांना योग्य वाव मिळणें आवश्यक असतें. पण आपल्या देशांत तसा वाव दिला जात नाही. ही स्थिति आमूलाग्र बदलावयाची असेल तर त्यासाठी आईबापांनाच नवें वळण लावलें पाहिजे. किती दयनीय अवस्था ही ! आपल्या सभ्यतेचा आपण अजून पुरेसा विकास केला नाही. तथापि, अशाहि स्थितींत, इंग्रजांनी देशाची राज्यव्यवस्था आपल्या हातीं सोपवावी अशी आमच्या सुशिक्षित "बाबू'ची इच्छा आहे ! हें ऐकलें म्हणजे मला हसूंहि येतें आणि रडूंहि येतें. आपल्याजवळ कुठे आहे ती क्षात्रवृत्ति ! ती जर हवी असेल तर त्यासाठी आधी सेवा कशी करावी आणि आज्ञापालन कसें करावें हें माहीत असलें पाहिजे, आणि त्याबरोबरच आत्मसंयमाचा सरावहि असला पाहिजे. क्षात्रवृत्ति ही अहंकारयुक्त पुढारीपणांत नाही, ती आत्मत्यागांत

आहे. आज्ञा झाल्याबरोबर पुढे होऊन स्वतःच्या प्राणांची बाजी लावण्यास जो तयार असतो तोच इतरांच्या हृदयांवर आणि प्राणांवरहि अधिकार मिळवूं शकतो. त्यासाठी प्रथम स्वार्थत्याग आवश्यक असतो.

श्रीरामकृष्णांच्या एका भक्ताने एक पुस्तक लिहिलें. त्यांत त्याने श्रीरामकृष्णांना ईश्वरी अवतार न मानणाऱ्या लोकांवर कडक टीका केली. स्वामीजींनी त्या लेखकाला आपल्यासमोर बोलाविलें आणि त्वेषाने ते त्याला म्हणाले:—

"अशा प्रकारें इतरांना शिव्या देण्याचा तुम्हांला काय अधिकार आहे? तुमच्या श्रीरामकृष्णदेवांवर त्यांनी विश्वास ठेवला नाही म्हणून काय झालें? आपण काय एखादा पंथ निर्माण केला आहे? आपण काय रामकृष्णपंथी आहोंत? जो त्यांची पूजा करणार नाही तो आपला शत्रु!—असें आहे की काय? तुमच्या या हटवादामुळे तुम्हीं रामकृष्णदेवांना कमीपणा मात्र आणला. तुम्हीं त्यांना सीमित केलें. तुमचे ठाकुर (श्रीरामकृष्ण) जर प्रत्यक्ष ईश्वरच आहेत तर मग कोणत्याहि नांवाने लोकांनी पूजन केलें तरी ती त्यांचीच पूजा होणार आहे हें तुम्हांला समजलें पाहिजे. आणि दुसऱ्यांना शिव्या देणारे असे तुम्ही कोण लागून गेलांत? त्यांच्यावर असें घसरल्याने ते तुमचें ऐकतील असें तुम्हांस वाटतें की काय? किती हा मूर्खपणा! ज्यांचीं अंतःकरणें जिंकायचीं असतील त्यांच्याकरिता आधी त्याग केला पाहिजे. अन्यथा, त्यांनी तुमचें म्हणणें कां म्हणून ऐकावें?"

थोड्याच वेळांत स्वामीजी नेहमीसारखे शांत झाले. ते खेद-भरल्या स्वरांत बोलूं लागले:—

"गड्यारे, प्रभूवर श्रद्धा ठेवणें किंवा त्यांच्या चरणीं आत्मसमर्पण करणें हें स्वतः वीर असल्यावांचून शक्य आहे काय? वीर बनल्याशिवाय अंतःकरणांतील द्वेष आणि मत्सर हीं नाहीशीं होणार नाहीत. आणि तीं नाहीशी झाल्याशिवाय खरी सभ्यता येणार कोठून? आज या देशांत तें दणकट पौरुष आणि ती वीरता कोठे आहे? हर हर! हे गुण आज आपल्या देशांत मुळीच नाहीत. ते कोठे आढळतात का, हें पाहण्याचा मीं पुष्कळ प्रयत्न केला, पण मला केवळ एकुलतें एकच उदाहरण सापडलें."

प्रश्न:––स्वामीजी, ते गुण आपणांस कोणामधे आढळले?

स्वामीजी:––फक्त जी. सी.*मधे. त्यांच्याच ठायीं मला खरें आत्मसमर्पण आढळलें, मी ठाकुरांचा (प्रभु श्रीरामकृष्णांचा) सेवक आहे, ही भावना बाणलेली आढळली. त्यांनी पूर्ण आत्मसमर्पण केलें म्हणूनच ना श्रीरामकृष्णांनी त्यांची सगळी जबाबदारी स्वीकारली? त्यांचें जीवन म्हणजे ईश्वरार्पणबुद्धीचें असामान्य उदाहरण! याबाबतींत त्यांच्याशीं तुलना करतां येईल असा मला अन्य कोणी आढळला नाही. आत्मसमर्पणाचा पाठ मी त्यांच्यापासूनच शिकलों.

असें म्हणून स्वामीजींनी हात जोडून मस्तकीं लावले आणि त्यांना उद्देशून आदरपूर्वक नमस्कार केला.

(७)

इ. स. १८९९ सालची गोष्ट. स्वामीजी दुसऱ्यांदा अमेरिकेस जाणार होते. त्यासंबंधीची सगळी तयारी चालू होती. आपल्या एका मित्राला भेटण्यासाठी स्वामीजी कलकत्त्याला गेले होते. तेथून परत येतांना थोड्या वेळासाठी ते बागबाजारामधे बलरामबाबूंच्या घरीं थांबले. आपल्याबरोबर मठांत जाण्यासाठी त्यांनी तेथे त्यांच्या दुसऱ्या एका मित्राला बोलाविलें. त्याप्रमाणे तो मित्र आल्यावर त्याचें आणि स्वामीजींचें पुढीलप्रमाणे संभाषण झालें:––

स्वामीजी:––आज मोठीच गंमत झाली. मी एका मित्राकडे गेलों होतों. त्याने एक चित्र रंगविलें होतें. चित्राचा विषय होता, 'कुरुक्षेत्राच्या रणमैदानावर अर्जुनास उपदेश देणारे श्रीकृष्ण'. श्रीकृष्ण रथांत उभे आहेत, त्यांनी हातांत लगाम धरले आहेत आणि ते अर्जुनाला गीता सांगत आहेत––असें तें चित्र त्याने मला दाखविलें आणि 'आवडलें का' म्हणून विचारलें. मीं म्हटलें, 'वा! चांगलें आहे की!' त्या चित्रावर मीं अधिक चिकित्सक मत द्यावें असा त्याने आग्रह धरला. मग मात्र मला माझें खरें मत सांगावें लागलें. मीं म्हटलें, 'गड्या, मला

* बाबू गिरीशचंद्र घोष––भगवान श्रीरामकृष्णांचे एक परम अनुगत भक्त; बंगालमधील तत्कालीन सुप्रसिद्ध नाटककार आणि नट.

फार आवडावें असें कांहीहि या चित्रांत दिसत नाही. पहिली गोष्ट ही की, हे असे पॅगोडयासारखे ( म्हणजे बौद्धमंदिरांच्या आकाराचे ) रथ श्रीकृष्णाच्या काळीं प्रचलित नव्हते. दुसरी गोष्ट अशी की श्रीकृष्णाची आकृति अगदीच भावहीन आहे.'

प्रश्न:--त्या काळीं पॅगोडयासारखे रथ प्रचलित नव्हते काय ?

स्वामीजी:--अरे, तुला माहीत नाही का ? बुद्धकाळापासून आपल्यायेथील सगळयाच गोष्टींत एक प्रकारचा गोंधळ माजला आहे, त्यांतलीच ही एक. त्या काळीं राजेलोक युद्धासाठी असे हे पॅगोडया-सारखे रथ वापरीत नसत. प्राचीन काळच्या रथांशीं पुष्कळ साम्य असलेले रथ आजहि राजपुतान्यांत आढळतात. ग्रीक पौराणिक चित्रांतील रथ तूं पाहिले आहेस काय ? त्यांना दोन चाकें असतात आणि त्यांत मागच्या बाजूने चढायचें असतें. तशाप्रकारचे रथ आपल्याकडे होते. चित्राचीं अंगंप्रत्यंगें जर चुकीचीं असतील तर तें काढून काय उपयोग ? ऐतिहासिक काळांतील चित्र काढावयाचें असल्यास योग्य अभ्यास आणि संशोधन करून त्या काळांतील गोष्टी अगदी जशाच्या तशा चित्रित झाल्या पाहिजेत, तरच तें चित्र उत्तम गणलें जाईल. चित्र पाहतांच सत्याची प्रतीति झाली पाहिजे, एरवी चित्राला कांहीच अर्थ नाही. आजकाल आपल्याकडे कोणतीं मुलें चित्रकला शिकतात ? बहुधा असें आढळतें की, शाळेंत अयशस्वी ठरलेलीं आणि पालकांनी कुचकामी म्हणून सोडून दिलेलीं मुलेंच चित्रकलेकडे वळतात. अशा लोकांकडून तुम्ही कसल्या कलाकृतींची अपेक्षा करणार ? सर्वांगपरिपूर्ण नाटय-निर्मितीसाठी जशी प्रतिभा लागते तशीच ती खरें खरें चांगलें चित्र रंगविण्यासाठीहि लागते.

प्रश्न:--मग प्रस्तुत चित्रांत श्रीकृष्ण कसे दाखवायला हवेत ?

स्वामीजी:--श्रीकृष्ण म्हणजे मूर्तिमान गीता ! तसेच ते चित्रित झाले पाहिजेत. मोह आणि भीरुता यांनी ग्रासलेल्या अर्जुनाला धर्ममार्गाचें दर्शन घडविणाऱ्या श्रीकृष्णाच्या सगळया आकृतींतून गीते-मधील मध्यवर्ति कल्पना जाज्वल्यपणें प्रकट झाली पाहिजे.

असें बोलत असतां स्वामीजी स्वत: उभे राहिले आणि श्रीकृष्णाची आकृति कशी चित्रित झाली पाहिजे याचा अभिनय करीत ते म्हणाले,

''इकडे पाहा, घोडयांचे लगाम त्यांनी असे धरले होते. ते लगाम इतक्या जोराने आवळून धरले आहेत की घोडयांचे मागचे पाय बसकट झाले आहेत, पुढचे पाय हवेंतच ताटकळत आहेत आणि त्यांनी आपलीं तोंडें वासलीं आहेत. यामुळे श्रीकृष्णाच्या आकृतींत एकप्रकारची विलक्षण गतिमानता भासेल. वीरपुंगव म्हणून जगप्रसिद्ध असलेला त्याचा तो मित्र, दोन्ही सैन्यांच्या मध्यभागीं उभ्या असलेल्या रथांत गलितधैर्य होऊन आणि धनुष्यबाण टाकून देऊन भित्र्यासारखा बसला आहे. श्रीकृष्णाच्या एका हातांत ताठ ओढलेले लगाम आहेत, दुसऱ्या हातांत चाबूक आहे आणि तो अर्जुनाकडे वळून पाहतो आहे, श्रीकृष्णाची मुद्रा एखाद्या बालकासारखी निरागस आहे. त्या मुद्रेंतून अपार्थिव प्रेम आणि सहानुभूति ओसंडत आहे. शांत आणि प्रसन्न मुद्रेने श्रीकृष्ण आपल्या जिवलग मित्रास गीतेचा संदेश देत आहेत. गीतेच्या उपदेष्टयाचें हें चित्र तुझ्या मनांत कोणती कल्पना निर्माण करतें सांग पाहू.

तो मित्रः—कृति, दृढता आणि शांति यांचा समुच्चय.

स्वामीजीः—होय, अगदी बरोबर. शरीराच्या रोमरोमीं कृतिशीलता भरलेली ! असें असूनहि, चेहरा म्हणाल तर नितळ नभासारखा पूर्ण शांत आणि प्रसन्न ! शरीर, मन आणि आत्मा प्रभूच्या पावन श्रीचरणीं केंद्रित करून कोणत्याहि परिस्थितींत शांत आणि दृढ राहणें हीच गीतेंतील मध्यवर्ति कल्पना आहे.

कर्मण्यकर्म यः पश्येत् अकर्मणि च कर्म यः
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥

जो कर्म करीत असतांहि मन शांत ठेवतो आणि बाह्यतः कांही कर्म करीत नसतांहि, ब्रह्मचिंतनाच्या रूपाने ज्याच्या चित्तांत कृतिशीलतेचा प्रवाह सतत वाहत असतो तोच खरा बुद्धिमान मनुष्य होय, तोच खरा योगी आणि तोच आदर्श कर्तृत्ववान मनुष्य होय.

तेवढयांत, नावेची व्यवस्था करण्यासाठी पाठविलेला मनुष्य परत आला आणि त्याने नाव तयार असल्याचें सांगितलें. तेव्हा स्वामीजी आपल्या मित्राला म्हणाले, ''आता आपण मठांत जाऊं या. तूं माझ्याबरोबर तिथे जाणार असल्याचें घरीं सांगितलें असशीलच.''

नावेकडे जात असतां त्यांचें संभाषण चालूच होतें.

स्वामीजी:--ही गोष्ट प्रत्येकाला शिकविली पाहिजे--कर्म, कर्म आणि अविरत कर्म ! फळाकडे पाहायचें नाही. मन आणि आत्मा हीं प्रभूच्या चरणकमलीं स्थिर ठेवायचीं.

प्रश्न:--पण हा कर्मयोगच नव्हे का ?

स्वामीजी:--होय, हाच कर्मयोग आहे. पण आध्यात्मिक साधनेशिवाय हा कर्मयोग तुम्हांला कधीच आचरतां येणार नाही. चाऱ्ही विभिन्न योगांचा तुम्हांला समन्वय करावा लागेल. त्याशिवाय आपलें मन आणि हृदय हीं पूर्णत: प्रभुमय कशीं बरें होतील ?

प्रश्न:--गीतेंतील कर्म या शब्दांत, वेदविहित यज्ञ आणि धार्मिक कर्मकांड हाच अर्थ अभिप्रेत आहे व अन्य सर्व प्रकारचें कर्म व्यर्थ आहे असेंच सर्वसाधारणत: म्हटलें जातें.

स्वामीजी:--ठीक आहे; पण तुम्हीं त्याचा अर्थ अधिक व्यापक रीतीने घेतला पाहिजे. तुमच्या प्रत्येक कृतीला, श्वासाला आणि मनांत येणाऱ्या विचाराला कोण जबाबदार आहे ? तुम्हीच स्वत: जबाबदार आहांत, नव्हे काय ?

मित्र:--होय आणि नाही. मला हें कोडें नीट उलगडत नाही. खरें असें आहे की कर्ताकरविता ईश्वर आहे आणि मनुष्य म्हणजे केवळ एक साधन आहे. मी जर त्याच्या इच्छेनुरूप वागत आहें, तर मग माझ्या कृतीबद्दल मी मुळीच जबाबदार राहूं शकणार नाहीं.

स्वामीजी:--पण आत्मानुभूतीची सर्वोच्च स्थिति ज्याने प्राप्त केली आहे त्याच्याबद्दलच असें म्हणतां येईल. कर्माने मन शुद्ध होऊन, तोच सगळ्यांकडून कर्म करवीत असल्याची जेव्हा तुला प्रत्यक्ष प्रतीति होईल तेव्हाच तुला अशी भाषा वापरण्याचा अधिकार पोहोचेल; अन्यथा, तशी भाषा वापरणें म्हणजे दांभिकतापूर्ण बडबडच होईल.

प्रश्न:--तो ईश्वरच सगळ्या क्रिया घडवितो आहे हें जर एखाद्याच्या बुद्धीला पूर्ण पटलें तर त्याने तशी भाषा कां वापरूं नये ?

स्वामीजी:--तशी ज्या वेळीं त्याच्या मनाची अगदी पूर्ण खात्री पटलेली असेल त्याच वेळीं तसें म्हणणें योग्य होईल. पण साधारणपणें मनाची ही अवस्था अगदी क्षणभरच टिकते. याबद्दल पूर्ण विचार करून पाहा. तुझ्या दैनंदिन कार्यांतील जें जें कर्म तूं करतोस, त्याचा कर्ता मी

आहें अशा अहंभावनेने तूं तें करतोस की नाही तें नीट तपासून पाहा. तुझ्याकडून तो ईश्वर कर्म करवितो आहे याचें तुला किती काळ भान असतें ? परंतु याप्रमाणे पुन:पुन्हा आत्मविश्लेषण केल्यानेच चित्तांतील अहंकार नाहीसा होईल व त्याच्या जागीं ईश्वर विराजमान होईल. आणि त्यानंतरच, 'हे ईश्वरा ! तूंच आंतून माझीं हीं सगळीं कर्में माझ्याकडून करवीत आहेस' असें तुला खरोखरी म्हणतां येईल. पण गड्या रे, तुझ्या अंत:करणांतील सगळी जागा जर अहंकाराने व्यापलेली असेल तर ईश्वराला आंत यायला कुठची कपाळाची जागा राहणार ? प्रभु मग तिथे निश्चितच नसतो !

प्रश्न:—पण माझ्या दुष्ट प्रवृत्तीहि त्या प्रभूनेच ना मला दिल्या?

स्वामीजी:—नाही. अगदी कोणत्याहि अर्थाने नाही. तसा विचार मनांत आणणें म्हणजे ईश्वराची निंदा करणेंच होय. ईश्वर तुला दुष्कृत्यें करण्यास प्रवृत्त करीत नाही. तीं सर्व तुझ्या अहंकारतृप्तीच्या लालसेंतून निर्माण होतात. जें करतो तें सगळें ईश्वर करतो असें म्हणून जर कोणी बुद्धिपुरस्सर दुष्कृत्येंच करूं लागेल तर तो सर्वनाश मात्र ओढवून घेईल. हाच आत्मवंचनेचा प्रारंभ होय. तूं जेव्हा एखादी चांगली गोष्ट करतोस तेव्हा तुला अभिमान वाटत नाही काय ? त्या वेळीं कांहीतरी चांगलें केल्याचें श्रेय तूं स्वत:कडेच घेतोस. मनुष्यस्वभावच तसा आहे, तेव्हा तें अनिवार्य आहे. पण सत्कृत्य करण्याचें श्रेय मात्र स्वत:कडे घ्यायचें आणि दुष्कृत्यांचें खापर तेवढें ईश्वराच्या माथीं फोडायचें हें हास्यास्पद नाही काय ? ही कल्पनाच भयंकर आहे. गीता आणि वेदान्त धडपणें न समजल्याचा तो परिणाम आहे. असा हा दृष्टिकोन कधीच स्वीकारूं नकोस. त्यापेक्षा, असें म्हण की, माझ्या हातून जें चांगलें होतें तें तो करवितो आणि दुष्कृत्यांकरिता मात्र मी स्वत: जबाबदार आहें. असें म्हटल्याने भक्ति आणि श्रद्धा निर्माण होतील, आणि त्याच्या कृपेचा आविष्कार झाल्याचें तुला पदोपदीं दिसेल. याविषयीचें सत्य असें आहे की, तुला कोणीच उत्पन्न केलें नाही; तूंच स्वत:ला उत्पन्न केलेंस. हाच खरा विवेक आहे, आणि हाच खरा वेदान्त आहे. पण आत्मसाक्षात्कार झाल्याशिवाय हा वेदान्त कळत नाही. म्हणूनच साधकाने साधनेचा प्रारंभ याच द्वैतभावनेने करावा की, चांगलीं कृत्यें ईश्वर

करवितो आणि वाईट कृत्यें मी स्वत: करतों. मनाच्या शुद्धीकरणाचा हा सर्वांत सोपा उपाय आहे. वैष्णवांच्या ठिकाणीं इतका दृढ द्वैतभाव असतो तो याच कारणामुळे. अगदी प्रारंभापासून अद्वैतभाव प्राप्त करणें फार कठीण आहे. पण हा द्वैती दृष्टिकोनच साधकाला हळूहळू अद्वैताच्या अनुभवाप्रत नेऊन पोहोचवितो.

कोठल्याहि क्षेत्रांत असो, दांभिकता ही गोष्ट भयंकर आहे. अतिशय दुष्ट प्रवृत्तिसुद्धा ईश्वरनिर्मितच आहेत असा जर खरा विश्वास असेल आणि त्यांत बुद्धिपुरस्सर आत्मवंचना जर मुळीच नसेल तर ती नीच कृत्यें त्याला अधिक काळपर्यंत करावीं लागणार नाहीत हें नक्की समज. त्याच्या मनांतील अशुद्धता लवकरच नाहीशी होईल. आपल्या प्राचीन शास्त्रकारांना याची चांगली जाणीव होती. आणि मला असें वाटतें की तांत्रिक पूजापद्धति बौद्धधर्माच्या ऱ्हासकालीं सुरू झाली. आणि बौद्धांच्या जाचामुळेच लोक वैदिक होम-हवनादि कृत्यें गुप्तपणें करूं लागले. दोन दोन महिने एकसारखें सत्र चालू ठेवणें आता त्यांना शक्य नव्हतें. म्हणून त्यांनी नवी पद्धति अंगिकारली. मातीची मूर्ति तयार करायची, पूजा करायची आणि लगेच ती पाण्यांत विसर्जित करायची. मागे कोणतीहि खूण न ठेवतां एका रात्रींत सगळें संपवायचें. मनुष्याला मूर्त स्वरूपाचें कांहीतरी प्रतीक हवें असतें. त्याशिवाय त्याच्या चित्ताचें समाधान होत नाही. त्यामुळे मग घराघरांत एका रात्रीचें होम-हवन होऊं लागले. पण त्यानंतर लोक विषयलोलुप बनले. श्रीरामकृष्ण म्हणत असत ना, की, कांही लोक भंग्याच्या दाराने घरांत शिरतात, तसाच हा प्रकार होय. म्हणून तत्कालीन धर्माचार्यांनी असा विचार केला की आपल्या कुवृत्तींमुळे धार्मिक आचारांचें पालन न करणाऱ्यांनाहि वळसा घालून का होईना पण सद्गुणांच्या मार्गावर हळूहळू आणणें आवश्यक आहे. म्हणून त्यांच्याकरिता त्या विचित्र तांत्रिक क्रिया शोधाव्या लागल्या.

प्रश्न:––हीं अपकृत्येंच चांगलीं आहेत अशा समजुतीने ते तीं करीत गेले, मग त्यामुळे त्यांची वाईट प्रवृत्ति नाहीशी कशी होणार ?

स्वामीजी:––कां बरें होऊं नये ? त्यांनी त्यांच्या प्रवृत्तींना एक निराळें वळण दिलें. त्यांनी कुकृत्यें केलीं तरी तीं ईश्वराचा साक्षात्कार

करून घेण्याच्या उद्देशाने केली.

प्रश्न:—असें खरोखर होऊं शकतें काय ?

स्वामीजी:—होय, होऊं शकतें. हेतु मात्र शुद्ध व चांगला असला पाहिजे. तसें जर असेल तर यश मिळण्यांत बाधा ती कसली येणार ?

प्रश्न:—पण अशा साधनांचा अवलंब करीत असतां अनेक लोक मद्यमांसादींच्या मोहाच्या कचाट्यांत सापडतात.

स्वामीजी:—म्हणूनच तर श्रीरामकृष्ण अवतरले. त्या पद्धतींनी तांत्रिक साधना करण्याचे दिवस आता संपले. त्यांनीसुद्धा तंत्रसाधना केली पण त्या पद्धतीने नव्हे. जेथे मद्यप्राशनाची आज्ञा असेल तेथे मद्याचा एक थेंब ते केवळ आपल्या कपाळाला लावीत. परंतु एकंदरींत, तांत्रिक पूजापद्धतींत, मनुष्य केव्हा घसरेल याचा नियम नाही. म्हणूनच मी म्हणतों की या प्रांतांतील हा तंत्राचार आता पुरे झाला. आता आपण त्यापलीकडे गेलें पाहिजे. वेदांचें अध्ययन केलें पाहिजे, चाऱ्ही योगांच्या समन्वयाची साधना केली पाहिजे. पूर्ण ब्रह्मचर्याचें पालन केलें पाहिजे.

प्रश्न:—आपण चार योगांचा समन्वय म्हणतां त्याचा अर्थ काय ?

स्वामीजी:—नित्यानित्यविवेक, वैराग्य आणि भक्ति, कर्म आणि ध्यानधारणा, आणि या सगळ्या गोष्टींबरोबरच आवश्यक आहे स्त्रियांविषयीची आदरभावना.

प्रश्न:—स्त्रियांबद्दलचा आदरभाव कशाप्रकारें निर्माण होऊं शकतो ?

स्वामीजी:—स्त्रिया म्हणजे जगन्मातेचीं रूपें होत. या भारतांत खऱ्या अर्थाने जेव्हा जगन्मातेची पूजा होऊं लागेल, आणि प्रत्येक व्यक्ति जेव्हा मातेच्या वेदीसमोर आत्मसमर्पण करील तेव्हाच या देशाच्या भाग्योदयास प्रारंभ होईल.

* * *

प्रश्न:—स्वामीजी, लहानपणीं आम्ही तुम्हांला लग्न करण्याबद्दल म्हणत असूं. त्या वेळीं तुम्ही म्हणत असां, 'मी लग्न करणार नाहीं. मी काय होईन तें तुम्ही पाहाल.' ते तुमचे शब्द तुम्हीं पूर्णतः खरे केले

स्वामीजी:--होय, मित्रा, तो माझा काळ तूं पाहिलाच आहेस. त्या काळीं मला खायला धड अन्न मिळत नव्हतें. अर्धपोटीं राहूनहि मला खूप मेहनत करावी लागे. बाप रे, काय ते दारुण परिश्रम ! आज अमेरिकन लोकांनी मोठ्या प्रेमाने मला हें चांगलें अंथरूण दिलें आहे, आणि आता मला खाण्यापिण्याचीहि भ्रान्त नाही. परंतु हाय, शारीरिक सुख उपभोगण्याचें माझ्या भाग्यांतच नाही--मी गादीवर पहुडलों की माझा आजार अधिकच वाढतो. जणुकांही मला अगदी श्वास कोंडल्या-सारखें होऊं लागतें. खाली उतरून जमिनीवर अंग टाकलें की मग जरा बरें वाटतें !

---

( संकलक:—श्री. सुरेंद्रनाथ सेन )

**शनिवार, २२ जानेवारी १८९८**

पहाटे मी स्वामीजींकडे आलों. स्वामीजी त्या वेळीं, ५७ रामकान्त बोस स्ट्रीट, कलकत्ता, येथे बलराम बाबूंच्या घरांत राहत होते. खोली श्रवणेच्छूंनी अगदी गच्च भरली होती. स्वामीजी बोलत होते, "आपल्याला श्रद्धा हवी आहे; स्वत:वर विश्वास हवा आहे. सामर्थ्य हेंच जीवन आहे. दुर्बलता हाच मृत्यु आहे. 'आपण आत्मा आहोंत, मृत्युरहित आणि मुक्त आहोंत, शुद्ध आहोंत, स्वभावत: शुद्ध आहोंत. आपल्या हातून कधीतरी पाप होईल काय? छे छे, अशक्य!'—असा विश्वास पाहिजे. असा हा विश्वासच आपल्याला मनुष्य बनवितो; आपल्याला देवता बनवितो. श्रद्धेची ही भावना नष्ट झाल्यामुळेच आपल्या देशाचा नाश झाला.

प्रश्न:—ही श्रद्धा आपण कशी गमाविली ?

स्वामीजी:—बालवयापासून आपल्याला एकसारखें नास्तिनास्तीचें अभावात्मक शिक्षणच दिलें गेलें. आपण कोणी नाहीं, आपण नगण्य आहोंत, एवढेंच फक्त आपण शिकलों. आपल्या देशांत कधीकाळीं थोर पुरुष जन्मले होते याचीहि आपल्याला क्वचितच जाणीव करून दिली जाते. भावात्मक, विधायक असें आपल्याला कांहीच शिकविलें गेलें नाही. आपल्या हातापायांचा कसा उपयोग करावा येवढेंहि आपल्याला ठाऊक नाही ! इंग्रजांच्या पूर्वजांसंबंधी सगळ्या घटना आणि तारखा आपल्याला उत्तम रीतीने अवगत असतात; पण खुद्द आपल्या पूर्वजांबद्दल मात्र आपण उपेक्षाच बाळगीत असतों ही केवढी दु:खाची गोष्ट आहे. आपण केवळ दुबळेपणाच शिकलों आहोंत. आपण जित आहोंत, म्हणून आपण अशी धारणा करून घेतली आहे की आपण दुर्बल आहोंत, कोणत्याच बाबतींत आपल्याला स्वातंत्र्य नाही. या सगळ्याच्या परिणामीं श्रद्धेचा लोप होणार नाही तर आणखी काय होणार ? पुन्हा एकदा आपल्या जीवनांत आपल्याला खरीखरी श्रद्धा प्रस्थापित करावी लागेल; स्वत:वरचा विश्वास पुन्हा एकदा जागवावा लागेल; तरच आपल्या देशासमोर असलेल्या सगळ्या समस्या आपण

स्वतः हळूहळू सोडवूं शकूं.

प्रश्नः—हें कधी तरी शक्य आहे काय ? आपल्या समाजांतील असंख्य वाईट गोष्टींचें निर्मूलन एकट्या श्रद्धेने कसें होऊं शकेल ? शिवाय आपल्या देशांतील अनेक वाईट गोष्टींविरुद्ध, भारतीय राष्ट्रीय सभा ( Indian National Congress ) आणि अन्य देशभक्त संस्था जोरदार आंदोलनें करीत आहेत; इंग्रज सरकारजवळ अर्जविनंत्या करीत आहेत; आपल्या देशाच्या गरजांना वाचा फोडण्याचा याहून चांगला उपाय तो कोणता ? या सगळ्या गोष्टींचा श्रद्धेशीं काय संबंध?

स्वामीजीः—तुम्ही मला सांगा, या गरजा आहेत कोणाच्या ? तुमच्या आहेत की राज्यकर्त्यांच्या आहेत ? जर त्या तुमच्या असतील तर राज्यकर्ते त्या पुऱ्या करतील की तुमच्या तुम्हांला त्या पुऱ्या करून घ्याव्या लागतील ?

प्रश्न—पण प्रजेच्या गरजा पुरविणें हें राजाचें कर्तव्यच आहे. या सगळ्या गोष्टींकरिता आम्हीं राजाकडे पाहावयाचें नाही तर कोणाकडे पाहावयाचें ?

स्वामीजीः—जो भीक मागतो त्याच्या गरजा केव्हाच पुरविल्या जात नाहीत. आणि समजा, तुम्हांला हवें तें सगळें जरी सरकारने दिलें तरी मिळालेलें सांभाळून ठेवतील असे लोक तुमच्यापाशी कोठे आहेत ? म्हणून प्रथम 'माणसें' निर्माण करा. आपल्याला 'माणसें' हवीं आहेत. आणि श्रद्धा असल्याशिवाय 'माणसें' कशीं तयार होतील ?

प्रश्नः—पण महाराज, बहुमत या दृष्टिकोनाचें नाही.

स्वामीजीः—ज्याला तुम्ही बहुमत म्हणतां तें कोणाचें बनलेलें असतें बरें ? त्यांत बहुधा मूर्ख आणि साधारण बुद्धीचे लोक यांचाच समावेश असतो. स्वतः विचार करण्याजोगती बुद्धि असलेलीं माणसें थोडींच असतात. सर्वत्रच ही स्थिति असते. हीं थोडीशीं बुद्धिमान माणसेंच प्रत्येक बाबतींत, जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रांत, खरें नेतृत्व करीत असतात. बाकीचे बहुसंख्य लोक दोरीने बांधल्यासारखे त्यांच्या मागे जातात. ही गोष्ट चांगलीच असते, कारण या नेत्यांच्या पावलावर पाऊल टाकल्या-नेच त्यांचें सगळेंकांही व्यवस्थित होतें. आपण फार मोठे, आपण कोणापुढे नतमस्तक कां व्हायचें ?—असा ताठा बाळगणारे लोक मूर्खच

असतात. स्वतःच्या मताने चालून ते स्वतःचा नाश ओढवून घेतात. तुम्ही आता सामाजिक सुधारणांबद्दल म्हणालांत. परंतु सामाजिक सुधारणा म्हणजे तुम्ही करतां काय?—तर विधवा-विवाह, स्त्रियांची मुक्तता किंवा असेंच कांहीतरी करण्यापुरतीच तुमची समाजसुधारणेची कल्पना सीमित असते. खरें की नाही? आणि या सार्‍या सुधारणा थोड्याशा जातींपुरत्याच मर्यादित असतात. सुधारणांची ही योजना कांही थोड्या लोकांना लाभदायक होईल हें निःसंशय. पण सगळ्या राष्ट्राला तिचा काय उपयोग होईल? ही सुधारणा आहे की स्वार्थी-पणाचा एक प्रकार आहे? कोणत्यातरी उपायाने आपली खोली स्वच्छ आणि व्यवस्थित ठेवायची, मग इतरांची अधिकाधिक दुर्गति होईना का? असाच हा प्रकार म्हणावयाचा!

प्रश्नः—तर मग सामाजिक सुधारणांची मुळी कांही आवश्यकताच नाही असें आपलें म्हणणें आहे काय?

स्वामीजीः—छे छे, असें कोण म्हणतो? सामाजिक सुधारणा अवश्य झाल्या पाहिजेत; परंतु तुम्ही ज्यांना सामाजिक सुधारणा म्हणतां त्या सर्वसाधारण जनतेपासून अगदी दूर असतात. तुम्ही म्हणतां त्या सुधारणा तर त्यांच्या आधीच झाल्या आहेत. त्यांच्या विधवा विवाह करतात आणि त्यांच्या स्त्रिया स्वतंत्रहि असतात, यामुळे तुम्ही जें म्हणतां तें त्यांना सुधारणेसारखें कांही वाटणारच नाही.

मला जें म्हणायचें आहे तें हेंच की अश्रद्धेमुळेच आमच्यांत सर्व वाईट गोष्टी शिरल्या आहेत व त्या अधिकाधिक वाढत आहेत. वर-वरच्या इलाजाने रोग दाबून टाकण्यापेक्षा त्याचें समूळ उच्चाटन करणें चांगलें. मी सांगतों ती पद्धति अशाच स्वरूपाची आहे. अनेक क्षेत्रांत आपल्याला सुधारणा अत्यावश्यक आहेत. जो हें नाकारील तो मूर्खच म्हणावा लागेल. उदाहरणार्थ हिंदुस्थानांत मिश्रविवाह समर्थनीय मानला गेला पाहिजे. असें नसल्यामुळे आपला समाज शारीरिकदृष्टया अधिका-धिक दुर्बल होत आहे.

त्या दिवशीं सूर्यग्रहण होतें. जे सद्गृहस्थ प्रश्न विचारीत होते त्यांनी स्वामीजींना प्रणाम केला. "मला आता गेलें पाहिजे. गंगेवर स्नानास जायचें आहे; परंतु मी पुन्हा एखादे दिवशीं येईन" असें

म्हणून ते तेथून निघून गेले.

### रविवार, २३ जानेवारी १८९८

संध्याकाळची वेळ होती. बागबाजारांत बलरामबाबूंच्या घरीं त्या दिवशीं रामकृष्ण-संघाची आठवडी सभा होती. स्वामीजींचे गुरुबंधु स्वामीतुरीयानंद, स्वामी योगानंद, स्वामी प्रेमानंद आदि मंडळी मठांतून आली होती. व्हरांड्याच्या पूर्वेकडील बाजूला स्वामीजींचें आसन होतें. ती सगळी बाजू माणसांनी भरून गेली होती. व्हरांड्याच्या उत्तर आणि दक्षिण बाजूहि तशाच गच्च भरल्या होत्या. परंतु हें नेहमीचेंच होतें. स्वामीजींचा मुक्काम कलकत्त्यांत असला की अशीच गर्दी असायची.

बैठकीला आलेल्यांपैकी अनेकांनी स्वामीजी चांगलें गातात असें ऐकलें होतें. म्हणून त्यांना स्वामीजींचें गाणें ऐकण्याची इच्छा होती. मास्तर महाशयांना ('श्रीरामकृष्णवचनामृता'चे लेखक 'एम्' यांना) ही लोकांची उत्सुकता माहीत होती. जवळ बसलेल्या कांही सद्‌गृहस्थांना ते हळूच म्हणाले--'तुम्ही स्वामीजींना गाण्याची विनंती करा.' स्वामीजींनी ती कुजबुज कशाबद्दल आहे तें तात्काळ हेरलें. ते गमतीने म्हणाले, "मास्तर महाशय, तुम्ही लोक आपसांत हळूहळू काय कुजबुज करीत आहांत ? मोठ्याने बोला की."

मग मास्तर महाशयांच्या विनंतीवरून स्वामीजी, "प्रेमाने धरि, नित हृदयान्तरि प्रियतम माता श्यामा ! . . ." हें गाणें आपल्या मनोहर आवाजाने गाऊं लागले. असें वाटत होतें, जणु एखाद्या वीणेंतूनच स्वर निघत आहेत.

गाणें संपल्यावर स्वामीजी मास्तर महाशयांना म्हणाले, "काय, झालें ना समाधान ? पण पुरे आता गाणें. एरवी स्वरलहरींबरोबर वाहत जाऊन मला त्या गाण्याची धुंदी चढल्यासारखें होईल. आणखी असें की पाश्चिमात्य देशांत व्याख्यानें देऊन देऊन माझा आवाज पार गेला आहे. माझा आवाज आता किती कांपरा निघूं लागला आहे. . .".

त्यानंतर स्वामीजींनी आपल्या ब्रह्मचारी शिष्यांपैकी एकाला, 'मुक्तीचें वास्तविक स्वरूप' या विषयावर बोलावयास सांगितलें. त्या-

प्रमाणे तो ब्रह्मचारी उभा झाला आणि त्याने बराच वेळ भाषण केलें. त्याच्या मागून आणखीहि कांहीजण बोलले. स्वामीजींनी आता त्या विषयावर चर्चा चालू करण्यास सांगितलें आणि चर्चेचा प्रारंभ करण्यास एका गृहस्थ शिष्यास सुचविलें. या वक्त्याने जेव्हा द्वैत आणि भक्ति यांचें गौणत्व दर्शवून अद्वैत आणि ज्ञान यांची प्रशंसा सुरू केली तेव्हा श्रोत्यांपैकी एकाने त्यास विरोध केला. दोघांनीहि आपापला दृष्टिकोन प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आणि मग कडाक्याचा वाद सुरू झाला.

कांही वेळ स्वामीजी ऐकत राहिले. पण वक्ते क्षुब्ध होत चाललेले पाहून त्यांनी उभयपक्षाच्या वक्त्यांना पुढील शब्दांनी शांत केलें. ते म्हणाले, "आपली बाजू मांडतांना तुम्ही इतके क्षुब्ध कां बरें होतां? त्यामुळे सगळें बिघडून जातें. एक गोष्ट लक्षांत ठेवा. श्रीरामकृष्ण म्हणत असत की शुद्ध ज्ञान आणि शुद्ध भक्ति यांत भेद नाही. तीं एकच आहेत. भक्तितत्त्वानुसार ईश्वराला प्रेमस्वरूप मानण्यांत येतें. मी त्याच्यावर प्रेम करतों ही भाषाहि तेथे शक्य नसते, कारण तो परमप्रेमस्वरूप आहे. त्याच्याबाहेर प्रेम कुठलें असणार? त्याच्याविषयी तुमच्या हृदयांत जें प्रेम आहे तेंहि तोच आहे. त्याचप्रमाणे मनाचीं सगळीं आकर्षणें आणि सगळ्या प्रवृत्तिहि तोच आहे. चोर चोरी करतो, वेश्या आपलें शरीर विकते, माता आपल्या बालकावर प्रेम करते,—या सगळ्यांमधे तोच एक परमेश्वर वास करीत असतो. एक ग्रहमाला दुसऱ्या ग्रहमालेकडून आकर्षिली जाते—तेथेहि तोच असतो. सर्वत्र तोच आहे. ज्ञानतत्त्वहि आपल्याला सांगतें की, त्याचीच सर्वत्र अनुभूति होते. येथेच ज्ञान आणि भक्ति यांचा समन्वय होतो. जेव्हा एखादा साधक सर्वोच्च भावावस्थेंत लीन होतो, किंवा जेव्हा त्याला समाधि-अवस्था प्राप्त होते तेव्हाच फक्त द्वैताचें सगळें भान नाहीसें होतें, आणि भक्त आणि त्याचे भगवान यांच्यांतील भेद पूर्णपणें लोपतो. भक्तिशास्त्रांत ईश्वराशीं संबंध प्रस्थापित करण्याचे पांच मार्ग सांगितले आहेत. त्यांपैकी कोणत्याहि एका मार्गाने ईश्वरप्राप्ति करून घेतां येते. पण आणखीहि एका मार्गाचा त्यांत समावेश होऊं शकतो. तो मार्ग म्हणजे जीवब्रह्मैक्यावर ध्यान करण्याचा. अशाप्रकारें भक्त हा अद्वैत्यांना

देखील 'भक्त' म्हणूं शकतो, पण हे भक्त 'अद्वैतभक्त' असतात एवढेंच. जोंपर्यंत भक्त मायेच्या राज्यांत आहे तोंपर्यंत द्वैतभाव राहणारच. देश-काल-निमित्त किंवा नाम-रूप यांनाच 'माया' म्हणतात. या मायेच्या पलीकडे जेव्हा साधक जातो तेव्हाच त्याला ऐक्यानुभूति होते. त्या वेळीं तो द्वैतीहि नसतो आणि अद्वैतीहि नसतो. त्याला सगळें 'एक'च असतें. भक्त आणि ज्ञानी यांच्यांत जो फरक तुम्ही पाहतां तो फक्त प्रारंभिक अवस्थेंत असतो. एक बाहेर ईश्वर पाहतो, तर दुसरा त्याला आंत पाहतो. यासंबंधी आणखीहि एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. श्रीरामकृष्ण म्हणत असत की भक्तीची आणखी एक अवस्था आहे. तिला पराभक्ति म्हणतात. अद्वैतांत प्रतिष्ठित झाल्यानंतरहि आणि मुक्तावस्था लाभल्यानंतरहि ईश्वरावर प्रेम करणें हीच ती अवस्था होय. हें वचन विरोधात्मक वाटेल. ज्याने मुक्ति प्राप्त केली त्याने भक्तिभावना जागृत ठेवण्याची इच्छा कां बरें बाळगावी ?—असा प्रश्न सहजच उपस्थित केला जाईल. याचें उत्तर हेंच आहे की मुक्त हा सर्व नियमांपासून मुक्त आहे. जर कोणताच नियम त्याला लागूं नाही तर 'तूं असें कां करतोस ?' हा प्रश्नहि त्याला विचारतां येत नाही. मुक्तावस्था प्राप्त झाल्यानंतरहि अनेक मुक्त स्वेच्छेने भक्ति करतात—भक्तीची माधुरी चाखण्यासाठी.

प्रश्नः—मातेचें आपल्या अपत्याविषयी जें प्रेम असतें त्यांत ईश्वर असूं शकेल पण चोरांच्या आणि वेश्यांच्याहि ठिकाणीं त्यांच्या स्वाभाविक पापप्रवृत्तीच्या रूपाने ईश्वर वसत असतो असें मानणें म्हणजे मोठें विचित्र वाटतें ! याच आधारावर पुढे असेंहि म्हणतां येईल की या जगांतील सगळ्या पुण्यकर्मांइतकेंच पापकर्मांचेंहि उत्तरदायित्व ईश्वरावर आहे.

स्वामीजीः—सर्वोच्च स्थितींत पोहोचल्यानंतरच, अर्थात् आत्मानुभूति प्राप्त झाल्यानंतरच अशा प्रकारचा बोध प्राप्त होतो. मग त्याला कोणत्याहि प्रकारच्या आकर्षणांत किंवा प्रेमांत ईश्वरच दिसतो. पण प्रत्यक्ष जीवनांत हा अनुभव येण्यासाठी आधी ती सर्वोच्च अवस्था प्राप्त करून घ्यावी लागते.

प्रश्नः—तरी पण पापांतहि परमेश्वर वास करतो असें मानणें क्रमप्राप्त आहे !

स्वामीजी:—वास्तविक पाहतां चांगलें आणि वाईट अशा विभिन्न वस्तु नाहीतच मुळी. त्या केवळ रूढ झालेल्या संज्ञा आहेत. जी गोष्ट एका वेळीं आपण वाईट म्हणतों तीच कालान्तराने आपण चांगली म्हणतों. हें चांगलें-वाईट म्हणणें आपण तिचा जसा उपयोग करूं त्यावर अवलंबून असतें. उदाहरणार्थ, हा दिवा पाहा. तो जळतो आहे म्हणूनच आपण एकमेकांस पाहूं शकतों किंवा अन्य उपयुक्त कामें करूं शकतों. हा दिव्याच्या उपयोगाचा एक प्रकार झाला. याउलट तुम्ही जर आपलीं बोटें त्या दिव्यावर धराल तर तीं भाजतील; हा झाला दिव्याच्या उपयोगाचा दुसरा प्रकार. म्हणून कोणत्याहि गोष्टीचा चांगलेवाईटपणा हा उपयोग सापेक्ष आहे, हें स्पष्ट झालें. सद्‌गुणांबद्दल व दुर्गुणांबद्दल असेंच म्हणतां येईल. ढोबळमानाने सांगावयाचें झाल्यास असें म्हणतां येईल की, आपल्या मानसिक वा शारीरिक शक्तींच्या योग्य उपयोगाला आपण सद्‌गुण म्हणतों; आणि त्यांच्या दुरुपयोगाला किंवा त्यांना वाया दवडविण्याला दुर्गुण असें म्हणतों.

याप्रमाणे लागोपाठ अनेक प्रश्न विचारले गेले व त्यांचीं उत्तरेंहि दिलीं गेलीं. तेवढ्यांत कोणीतरी म्हटलें, आकाशस्थ ग्रहांच्या परस्पर आकर्षणांत ईश्वर असतो हें तत्त्व प्रत्यक्ष सत्य असो की नसो, ही एक उत्कृष्ट काव्यमय कल्पना आहे हें कांही कोणाला अमान्य करतां येणार नाही.

स्वामीजी:—नाही महाशय, तसें नाही. तें काव्य नाही. ज्ञान-प्राप्तीनंतर कोणालाहि त्याची सत्यता पारखून पाहतां येईल.

या मुद्यावर स्वामीजी पुढे बरेंच बोलले. माझ्या समजुतीप्रमाणे स्वामीजींचा आशय असा होता की, जड आणि चेतन ह्या जरी वरवर पाहतां भिन्न भिन्न गोष्टी दिसत असल्या तरी वास्तविक पाहतां त्या एकाच वस्तूचीं दोन रूपें आहेत. त्याचप्रमाणे बाह्य किंवा अंतर्जगतां-तील कोणत्याहि शक्ति असोत, त्या एकाच शक्तीचीं भासमान होणारीं विभिन्न रूपें आहेत. जेव्हा एखाद्या वस्तूंत चित्कळा कमी प्रमाणांत अभिव्यक्त असते तेव्हा आपण तिला जड म्हणतों आणि ज्या वस्तूंत ती अधिक प्रमाणांत अभिव्यक्त असते तिला आपण चेतन म्हणतों. परंतु सर्व कालीं आणि सर्व परिस्थितींत पूर्णत: जड असें या जगांत कांहीच

नाही. साक्षात्काराच्या उच्च उच्च अवस्थांत असें अनुभवास येतें की भौतिक विश्वांत जी शक्ति आकर्षणाच्या किंवा गुरुत्वाकर्षणाच्या रूपानें प्रकट होते तीच शक्ति तिच्या श्रेष्ठ आणि सूक्ष्म अवस्थेंत प्रेम आदि भावनांच्या रूपांनी व्यक्त होते.

प्रश्नः—उपयोगसापेक्ष म्हणजेच वेगवेगळी व्यक्ति वेगवेगळ्या रीतीने करीत असलेल्या एकाच वस्तूच्या उपयोगावर आधारलेला हा भेद तरी कां असावा ? आपल्या कोणत्याहि शक्तीचा वाईट अथवा अयोग्य उपयोग करण्याची, माणसाची प्रवृत्ति तरी कां व्हावी ?

स्वामीजीः—पूर्वकर्माचें फलित म्हणून ही प्रवृत्ति उत्पन्न होते. प्रत्येकाच्या प्रवृत्ति त्याच्या त्याच्या कर्मांवर अवलंबून असतात. यावरून हाच निष्कर्ष निघतो की आपल्या प्रवृत्तींना कह्यांत ठेवणें किंवा त्यांना योग्य वळण लावणें ही प्रत्येक व्यक्तीच्या अगदी हातांतली गोष्ट आहे.

प्रश्नः—प्रत्येक गोष्ट आपल्याच कर्माचें फल आहे असें जरी मानलें तरी केव्हा ना केव्हा त्याचा प्रारंभ हा झाला असलाच पाहिजे. त्या वेळीं म्हणजे अगदी प्रारंभीं आपल्या प्रवृत्ति चांगल्या किंवा वाईट कां बरें झाल्या ?

स्वामीजीः—प्रारंभ झाला हें तुम्हांस कसें कळलें बरें ? ही सृष्टि अनादि आहे—हा वेदांतील सिद्धान्त आहे. जोंपर्यंत ईश्वर आहे तोंपर्यंत सृष्टिहि राहणारच.

प्रश्नः—महाराज, ही माया येथे कां बरें आहे ? आणि ही आली तरी कोठून ?

स्वामीजीः—ईश्वराला अनुलक्षून 'अमुक कां' असें विचारणें चूक आहे. ज्याला कांही उणीव आहे, जो अपूर्ण आहे, त्याच्याबद्दलच हा प्रश्न संभवतो. ज्याला कशाची उणीव नाही, जो स्वतः पूर्णस्वरूप आहे त्याच्यासंबंधी 'कां ?' हा प्रश्न कसा बरें उद्भवेल ? माया कोठून आली असाहि प्रश्न विचारतां येत नाही. देश-काल-निमित्त यांनाच माया म्हणतात. तुम्ही, मी आणि इतर सगळे, आपण सारेजण या मायेंत आहोंत आणि मायेच्या पलीकडे काय आहे तें तुम्ही विचारीत आहांत ! मायेंत राहत असतां असा प्रश्न विचारणें कसें शक्य आहे ?

यानंतरहि अनेक प्रश्न विचारण्यांत आले. संभाषणाचा प्रवाह

मिल, हॅमिल्टन, हर्बर्ट स्पेन्सर इत्यादींच्या तत्त्वज्ञानाकडे वळला आणि स्वामीजींनी त्या विषयांतहि सर्वांचें पूर्ण समाधान केलें. पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचा स्वामीजींचा प्रगाढ आणि व्यापक व्यासंग पाहून, तसेंच चट्कन उत्तरें देण्याची त्यांची पद्धति पाहून प्रत्येकजण अगदी चकित झाला.

पुढे आणखी कांही विषयांवर थोडेसें संभाषण होऊन ही बैठक संपली.

**सोमवार, २४ जानेवारी १८९८.**

गेल्या शनिवारीं ज्या सद्गृहस्थांनी स्वामीजींना प्रश्न विचारले होते ते आजहि आले होते. त्यांनी मिश्रविवाहासंबंधी विषय पुन्हा काढला. ते म्हणाले, "विभिन्न राष्ट्रांमध्ये परस्पर वैवाहिक संबंध कसे बरें निर्माण करतां येतील ?"

स्वामीजी:—भिन्न धर्म असलेल्या राष्ट्रांशीं आपले वैवाहिक संबंध व्हावेत असें मी म्हणत नाहीं. कारण सद्य:परिस्थितींत तरी तशा गोष्टींमुळे निश्चितच सामाजिक बंधनें शिथिल होतील व अनेकविध उत्पात घडून येतील. एकाच धर्माच्या लोकांनी आपसांत विवाह करण्याचा मी पुरस्कार करतों.

प्रश्न:—तरीसुद्धा त्यांतून बरेच घोटाळे निर्माण होण्याचा संभव आहे. समजा, बंगालमधे जन्मलेल्या आणि वाढलेल्या माझ्या मुलीचें लग्न जर मीं एखाद्या मराठी बोलणाराशीं किंवा मद्रासी बोलणाराशीं केलें तर मुलीला पतीची भाषा समजणार नाही आणि त्याला तिची भाषा समजणार नाही. दोघांच्या चालीरीति आणि व्यक्तिगत सवयी यांच्यामध्येहि कितीतरी अंतर असणार ! मिश्रविवाह केलेल्या जोडप्यांना अशा अडचणींना तोंड द्यावें लागेल. तसेंच समाजाच्या दृष्टीने तर कमालीचे घोटाळे होतील.

स्वामीजी:—अशा प्रकारचे विवाह मोठ्या प्रमाणावर होण्याचा काळ अजून फार दूर आहे. शिवाय ते तडकाफडकीं घडवून आणण्याचा प्रयत्न करणेंहि विवेकाचें होणार नाही. कमींत कमी विरोधाच्या मार्गानें जाणें हेंच कोणत्याहि कार्यातील एक प्रमुख रहस्य असतें. म्हणून प्रथम,

आपल्या जातींतल्या जातींतच विवाह घडवून आणले पाहिजेत. बंगालमधील कायस्थांचें उदाहरण घेऊं या. त्यांच्यामध्ये उत्तर राढी, दक्षिण राढी, बंगज, आदि अनेक उपशाखा आहेत. त्यांचे आपसांत विवाहसंबंध होत नाहीत. आता उत्तर राढी आणि दक्षिण राढी यांचे आपसांत विवाह घडवून आणले पाहिजेत. तें सध्या शक्य नसलें तरी निदान दक्षिण आणि बंगज यांच्यांत तरी विवाह झाले पाहिजेत. अशा रीतीने, जें आज आहे त्यालाच नीट आकार देणें, हेंच सध्याचें कार्य आहे. ज्या आपण प्रत्यक्ष व्यवहारांत आणूं शकतों अशाच गोष्टींना हात घालणें इष्ट ठरेल. सुधारणा म्हणजे कांही पूर्णपणें मोडतोड करणें नव्हे.

प्रश्नः—ठीक आहे. आपण म्हणतां तसें जरी झालें तरी त्यापासून असें कोणतें इष्ट घडून येणार आहे ?

स्वामीजीः—आपल्या समाजांत शतकानुशतकें एकेका उपशाखेंतच विवाहसंबंध सीमित झाल्यामुळे, आता अशी वेळ येऊन ठेपली आहे की, आते मामे किंवा मावस भावाबहिणींचीं अथवा अशाच जवळच्या नात्यागोत्यांतील लोकांचीं आपसांत लग्नें होऊं लागलीं आहेत असें म्हणतां येईल. याच एका कारणामुळे आपला समाज शारीरिक दृष्टचा दुर्बल होत चालला आहे आणि त्यामुळेच अनेक प्रकारचे रोग आणि इतर वाईट गोष्टी आपल्या समाजांत सहज प्रवेश करीत आहेत. हें सारें तुम्हांला दिसत नाही काय? रक्ताचा संबंध कांही थोडयाशा व्यक्तींतच मर्यादित झाल्यामुळे रक्तांत एक प्रकारचा दोष उत्पन्न झाला आहे. परिणामीं, नवजात बालक आपल्या आईबापांचे शारीरिक रोग घेऊनच जन्माला येतें. जन्मतःच दोषपूर्ण रक्त लाभल्याने, रोगाच्या कीटाणूंशीं झगडण्याची क्षमता अशा शरीरांत फार कमी असते. या शरीरांना आपलें भक्ष्य बनविण्यास रोगकीटाणु टपलेलेच असतात. विवाहाचें क्षेत्र विस्तृत करूनच आपल्याला आपल्या भावी संततींत नव्या आणि निराळया रक्ताचा संचार करतां येईल. आज आपला समाज नाना प्रकारच्या रोगांनी आणि तज्जन्य अनिष्ट गोष्टींनी घेरलेला दिसतो. त्यांच्या कचाटयांतून भावी पिढीस सोडविण्याचा हाच एक मार्ग आहे.

**प्रश्नः—महाराज, बालविवाहाबद्दल आपलें काय मत आहे ?**

स्वामीजी:—बंगालमधील सुशिक्षित वर्गांत मुलांचीं लग्नें बालवयांत करण्याची पद्धति आता हळूहळू लोप पावत आहे. मुलींच्या बाबतींत सुद्धा एकदोन वर्षांनी वयोमर्यादा पुढे ढकलली गेली आहे. पण ही मुलींच्या लग्नाची मर्यादा स्वखुशीने वाढविली गेली नसून आर्थिक दुरवस्थेमुळे तें घडलें आहे. कोणत्याहि कारणांनी का असेना, मुलींच्या विवाहाचें वय वाढलें आहे; तें आणखी वाढविलें पाहिजे. पण तो बिचारा पिता काय करील ? मुलगी थोडी मोठी होते न होते तोंच आईची भुणभुण सुरू होते. नात्यागोत्यांतील लोक, एवढेंच काय पण शेजारीपाजारी देखील त्या आईलाच साथ देतात. 'मुलगी मोठी होते आहे. तिला लवकर योग्य वर पाहा' असें एकासारखें टुमणें लावून ते त्या बिचाऱ्या पित्याला मुळीच चैन पडूं देत नाहीत. आणि तुमच्या त्या धार्मिक दंभाचार्यांबद्दल अधिक कांही न बोलणेंच बरें. आजकाल त्यांचें विशेष कोणी ऐकत नाही हें जरी खरें असलें तरी ते मात्र आपण समाजाचे मोठे पुढारी आहोंत असें समजून वागतात. राज्यकर्त्यांनी संमतिवयाचा कायदा बनविला. त्यायोगें बारा वर्षांखालील मुलींचा विवाह करणें शिक्षास्पद झालें. लगेच या तथाकथित धार्मिक पुढाऱ्यांनी त्याविरुद्ध जोराचा आरडाओरडा सुरू केला. 'हाय हाय ! आमचा धर्म बुडाला' अशी एकच हाकाटी त्यांनी केली. जणु एखाद्या मुलीला बाराव्या किंवा तेराव्या वर्षी मातृपदावर आसीन करणें यांतच सगळा धर्म सामावला आहे. परिणामीं, राज्यकर्त्यांना आपल्या धर्मसमजुती विक्षिप्त वाटूं लागतात आणि ते उपहासाने म्हणतात, 'हे लोक म्हणे आता राजकीय चळवळी करणार आणि राजकीय हक्क मागणार !'

प्रश्न:— विवाहसमयीं स्त्री-पुरुषांचें वय अधिक असावें असें आपलें मत आहे तर ?

स्वामीजी:—होय, निश्चित. पण त्याचबरोबर त्यांना शिक्षणहि मिळालें पाहिजे. अन्यथा अव्यवस्था आणि भ्रष्टाचार माजेल. शिक्षण म्हणजे प्रचलित पद्धतीचें मात्र नव्हे. तें शिक्षण भावात्मक व विधायक असलें पाहिजे. नुसती पुस्तकीविद्या उपयोगाची नाही. चारित्र्य घडविणारें, मानसिक बल वाढविणारें, बुद्धि विशाल करणारें आणि स्वावलंबी बनविणारें असें शिक्षण आम्हांस हवें आहे.

प्रश्न:—आपल्याकडील स्त्रियांची अनेक बाबतींत सुधारणा घडवून आणावी लागेल.

स्वामीजी:—मी म्हणतों तसें जर शिक्षण मिळालें तर स्त्रिया स्वत:च आपल्या समस्या सोडवितील. त्यांना आजपर्यंत असहायता, दास्य, परावलंबन यांचेंच शिक्षण मिळालें आहे. त्यामुळे, कुठे एखादी क्षुल्लक दुर्घटना झाली किंवा लहानसें भीतीचें कारण उत्पन्न झालें की अश्रु ढाळीत बसणें हेंच त्यांचें कर्तृत्व बनलें आहे. त्यांना इतर गोष्टी तर शिकविल्या जातीलच पण त्याबरोबर पराक्रम आणि वीरता हे गुण त्यांच्या अंगीं बाणतील असें शिक्षण त्यांना दिलें पाहिजे. आजच्या काळांत स्त्रियांनी सुद्धा आत्मसंरक्षण करण्यास शिकलें पाहिजे. पाहा बरें ती झांशीची राणी किती महान् होती ! कशी तेजस्वी होती !

प्रश्न:—आपण म्हणतां ती तर अगदी नवीन गोष्ट आहे. मला वाटतें आपल्याकडील स्त्रिया अशा शिक्षणाने सुसज्ज होण्यासाठी खूपच काळ लागेल.

स्वामीजी:—कसेंहि असलें तरी आपण प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे. स्त्रियांनाच शिक्षण द्यावयाचें आहे असें नाही तर आपल्यालाहि पुष्कळच शिकावयाचें आहे. नुसती प्रजानिर्मिति केल्याने पित्याचें कर्तव्य पूर्ण होत नाही. त्याबरोबरच पुष्कळ जबाबदाऱ्या अंगावर घ्याव्या लागतात. स्त्रीशिक्षणाला सुरवात, आपल्या हिंदु स्त्रियांना सहज अवगत असलेल्या आणि परंपराप्राप्त अशा सतीत्वाच्या माहात्म्यापासूनच केली पाहिजे. प्रथम सतीत्वाविषयीची ध्येयनिष्ठा तीव्रतर बनून तिने त्यांचें सगळें चारित्र्य उजळलें पाहिजे. विवाहित असोत किंवा इच्छा असल्यास त्या अविवाहित राहोत, या चारित्र्याच्या शक्तीने, सतीत्वाच्या रक्षणाकरिता प्राण देण्याची पाळी आली तरी त्या तिळमात्रहि कचरणार नाहीत—आपल्या पावित्र्याला किंचित् देखील धक्का लागूं देणार नाहीत. कोणत्याहि ध्येयाकरिता वेळीं स्वप्राणांचें बलिदान देण्यासहि उद्यत असणें ही काय थोडी वीरता झाली ? चालू युगाच्या गरजा पाहतां कांही स्त्रियांना त्यागाचा आदर्श ग्रहण करण्याचें शिक्षण देणें अत्यावश्यक आहे, म्हणजे त्यायोगें अतिप्राचीन कालापासून त्यांच्या रक्तांत भिनलेल्या सतीत्वाच्या सामर्थ्यावर

अधिष्ठित असें आजीवन ब्रह्मचर्यव्रत त्या पाळूं शकतील. याबरोबरच त्यांना भिन्न भिन्न विद्यांचें आणि विज्ञानाचें शिक्षण दिलें पाहिजे. अशा शिक्षणामुळे त्यांचा स्वतःचा लाभ होऊन त्या परहितहि साधूं शकतील; आणि हें जर त्यांना समजलें तर त्या तें शिक्षण मोठ्या आनंदाने ग्रहण करतील व लवकर आत्मसात् करतील. आपल्या मातृभूमीच्या हितासाठी तिच्या संतानांपैकी कांहींनी असें शुद्धहृदयी ब्रह्मचारी व ब्रह्मचारिणी बनणें आवश्यक आहे.

प्रश्नः—त्याने मातृभूमीचें हित कसें काय साधेल ?

स्वामीजीः—त्यांचें उदाहरण आणि लोकांच्या डोळ्यांसमोर राष्ट्रीय ध्येय ठेवण्याचे त्यांचे प्रयत्न यांमुळे लोकांच्या विचारांत आणि आकांक्षांत क्रांति घडून येईल. आजची स्थिति म्हणाल तर कशी आहे? कोणत्याहि रीतीने नऊ दहा वर्षांची मुलगी उजवायची. आणि तेराव्या वर्षी ती माता झाली की सगळ्या कुटुंबाला केवढा आनंद ! हा विचार-प्रवाह जर पालटला तरच प्राचीन श्रद्धा पुन्हा प्रस्थापित होण्याची कांही आशा आहे. वर वर्णिल्याप्रमाणे जे ब्रह्मचर्य पाळतील त्यांच्या-बद्दल काय बोलावें ? किती आत्मविश्वास त्यांच्यांत संचरेल ! इष्ट तें सगळें घडवून आणण्यासाठी त्यांच्या ठिकाणीं किती शक्ति निर्माण होईल !

प्रश्नकर्त्याने स्वामीजींना प्रणाम केला आणि तो जायला निघाला. स्वामीजी त्याला म्हणाले, "येत जा अधूनमधून."

"महाराज, अवश्य येईन" तो सद्‌गृहस्थ म्हणाला. "माझा कितीतरी लाभ झाला आहे ! यापूर्वी मीं कधीहि न ऐकलेल्या अशा कितीतरी नव्या गोष्टी मला तुमच्याकडून ऐकायला मिळाल्या."

जेवणाची वेळ होत आली होती. मी देखील उठलों आणि घरीं आलों.



त्या दिवशीं दुपारीं मी पुन्हा स्वामीजींकडे आलों. त्यांच्याभोवती चांगलीच गर्दी जमली होती. ईश्वराला पति मानून त्याचें पूजन कर-ण्याची, श्रीचैतन्यांच्या कांही शिष्यांत प्रचलित असलेली पद्धति अर्थात् मधुरभाव, या विषयावर चर्चा चालली होती. मधूनमधून चालणाऱ्या

त्यांच्या थट्टामस्करीने हास्याचे कल्लोळ उठत होते.

कोणीतरी म्हणाले, "श्रीचैतन्यप्रभूंच्या आचरणांत असा विनोद करण्यासारखें काय बरें आहे ? ते थोर साधुपुरुष नव्हते असें आपणांस वाटतें काय ? त्यांनी आपल्या जीवनांतील सगळ्या गोष्टी मानवजातीच्या कल्याणार्थ केल्या असें आपणांस वाटत नाही काय ?

स्वामीजी:—कोण विचारतें आहे हें ? मग काय, महाशय, मीं तुमची थट्टा करावी ? तुम्ही फक्त थट्टेचीच बाजू पाहतां. पण कामकांचनाचा परित्याग करण्याचें त्यांचें ज्वलंत ध्येय अंगीकारून तदनुसार माझें जीवन घडविण्यासाठी मीं केलेले आजन्म प्रयत्न आणि तेंच ध्येय सर्वसामान्य जनांच्या हृदयांत संचारित करण्यासाठी चाललेले माझे अविरत प्रयास, यांकडे तुमचें लक्ष कसें बरें जात नाही ? श्रीचैतन्य महान् त्यागी पुरुष होते. स्त्री आणि विषयवासना यांपासून ते अगदी दूर होते. पण उत्तरकाळीं त्यांच्या शिष्यांनी आपल्या संप्रदायांत स्त्रियांना प्रवेश दिला. कांहीहि विवेक न बाळगतां चैतन्यांच्या नांवावर ते स्त्रियांमधे मिसळले आणि मग सगळा एकच गोंधळ माजला. वासनाविकारांचा अगदी मागमूस नसलेल्या स्वार्थरहित श्रेष्ठ प्रेमाचा आदर्श श्रीप्रभूंनी आपल्या चरित्राद्वारें जगापुढे ठेवला. तसलें कामगंधहीन प्रेम सर्वसामान्य जनांना साधणें शक्य नाही. पण त्यांच्यानंतर झालेल्या वैष्णव गुरूंनी आपल्या या महापुरुषाच्या जीवनांतील त्यागभावनेवर भर न देतां प्रेमविषयक ध्येय मात्र सर्वसाधारण लोकांत प्रसृत व्हावें म्हणून मोठ्या उत्साहाने प्रयत्न केले व तशी शिकवण दिली. परिणाम असा झाला की त्यांच्या त्या दैवी प्रेमाचा आदर्श सामान्य जनांस कधीच आकळतां आला नाही आणि आत्मसात् करतां आला नाही. आणि स्वाभाविकपणें परिणाम असा झाला की अत्यंत हीन स्तराच्या स्त्रीपुरुष प्रेमाचें स्वरूप त्याला प्राप्त झालें.

प्रश्न:—परंतु महाराज, श्रीचैतन्यांनी चांडाळासकट सगळ्यांनी हरिनाम घ्यावें असें सांगितलें. मग तें सामान्य जनांच्या अधिकाराबाहेरचें कां बरें गणलें जावें ?

स्वामीजी:—चैतन्यांनी जो उपदेश केला त्याविषयी मी सध्या बोलत नाहीं. पण राधाप्रेमाचा जो आदर्श त्यांच्या जीवनांत प्रत्यक्ष

दिसून येतो आणि ज्या प्रेमांत रात्रंदिवस मग्न होऊन ते आपलें व्यक्तित्व विसरून राधारूप होऊन जात त्या प्रेमाविषयी मी बोलत आहें.

प्रश्नः--हें प्रेम सर्वसामान्यांना कां बरें शिकवूं नये ?

स्वामीजीः--आपल्या ह्या राष्ट्राकडे पाहा. अशा शिकवणुकीचा त्याच्यावर काय परिणाम झाला आहे तेंहि नीट पाहा. तसल्या प्रेमाच्या सार्वत्रिक शिकवणीमुळे सगळें राष्ट्र कसें नामर्द बनलें आहे, कसें बायकी बनलें आहे ! सगळा ओरिसा प्रांत भित्रा बनला आहे. गेलीं चारशे वर्षें या राधाप्रेमाच्या मागे लागून बंगालनेहि आपलें पौरुष आणि आपली पराक्रमाची सगळी भावना गमाविली आहे ! या लोकांना काय चांगलें येत असेल तर तें फक्त रडणें अन् अश्रु ढाळणें. तेंच त्यांचें राष्ट्रीय वैशिष्टय बनलें आहे. त्यांच्या साहित्याकडे पाहा--साहित्य हेंच राष्ट्राच्या विचारांचें आणि आकांक्षांचें निश्चित गमक असतें. गेल्या चारशे वर्षांतील सगळ्या बंगाली वाङमयाचें ध्रुवपद एकाच सुराचें आहे आणि तो सूर म्हणजे कण्हण्या-रडण्याचाच होय. या काळांतील बंगाली साहित्यांत एकादेखील खऱ्या वीररसात्मक काव्याची निर्मिति झाली नाही.

प्रश्नः--तर मग तें प्रेम धारण करण्याचा खरा अधिकार कोणाला पोहोचतो ?

स्वामीजीः--कामवासनेचा एक बिंदुहि जोंपर्यंत हृदयांत वास करीत आहे तोंपर्यंत तेथे प्रेम असूंच शकत नाही. महान् त्यागभावना असलेल्या असामान्य सामर्थ्यशाली पुरुषांनाच त्या दैवी प्रेमाचा अधिकार आहे. प्रेमाचें हें सर्वोच्च ध्येय जर सामान्य जनतेपुढे ठेविलें तर त्याचा दुष्परिणामच होईल. सामान्य माणसांच्या हृदयांत नेहमी वास करीत असलेल्या तत्सदृश पार्थिव प्रेमाला अर्थात् वैषयिक वासनेलाच त्यामुळे उत्तेजन मिळेल. कारण ईश्वराला पति व स्वतःला पत्नी मानून त्या प्रेमाचें चिंतन करावयास बसलेला सामान्य माणूस बहुधा स्वतःच्या बायकोच्या चिंतनांतच मग्न होऊन राहणार आणि मग त्याचा परिणाम काय होईल तें सांगायला नकोच.

प्रश्नः--तर मग ईश्वराला आपला पति किंवा प्रियकर मानून

स्वत:ला त्याची पत्नी वा प्रेयसी मानणें हा जो प्रेममार्ग आहे त्या मार्गानें गृहस्थाश्रमी लोकांना ईश्वरसाक्षात्कार घडणें अशक्य आहे काय ?

स्वामीजी:--कांही अपवाद सोडले तर सर्वसामान्य गृहस्थांना तें अशक्य आहे हें अगदी नि:संशय ! इतर अनेक मार्ग असतांना अशा या नाजूक व धोक्याच्या मार्गावर भर तरी कां द्यावा ? या मधुर-भावाशिवाय ईश्वराशीं संबंध जोडण्याचे काय दुसरे मार्गच नाहीत ? अंत:करणापासून प्रभूचें नामस्मरण करीत अन्य चार भावांचा ( शांत, दास्य, सख्य व वात्सल्य भावांचा ) स्वीकार कां करूं नये ? हृदयाचें कपाट प्रथम उघडूं द्या. बाकीच्या गोष्टी मग आपोआपच प्राप्त होतील. पण एक गोष्ट मात्र अगदी पक्की समजा की जिथे कामवासना आहे तिथे प्रेम असणें शक्यच नाही. कामवासनेपासून मुक्त होण्याचा प्रयत्न प्रथम कां करूं नये ? तुम्ही कदाचित् म्हणाल, 'हें मला कसें शक्य आहे ? मी तर गृहस्थ आहें.' हें म्हणणें अगदी वेडेपणाचें आहे. गृहस्थ झाला म्हणजे काय त्याला अगदी मूर्तिमंत स्वैराचारी बनलें पाहिजे ? किंवा त्याने काय अगदी जन्मभर सामान्य वैषयिक संबंधच ठेवला पाहिजे ? आणि या मधुरभावाच्या साधनेसाठी पुरुषासारख्या पुरुषानें स्वत:ला स्त्री बनवायचें हें तरी किती अशोभनीय आहे !

प्रश्न:--महाराज, आपण म्हणतां तें अगदी खरें आहे. ईश्वराचें नामसंकीर्तन आत्मोन्नतीस फार साहाय्यक होतें. नामसंकीर्तनानें वृत्ति उल्लसित होतात; हृदय आनंदमय होतें. आपल्या पुराणग्रंथांत नाम-संकीर्तनाची अशी महति वर्णिली आहे आणि श्रीचैतन्यदेवांनी सामान्य जनतेला त्याचाच उपदेश केला आहे. मृदंगावर थाप पडली रे पडली की अंत:करण खूप उचंबळून येऊन अगदी नाचावेंसें वाटूं लागतें.

स्वामीजी:-- तुम्ही म्हणतां तें ठीक आहे, परंतु संकीर्तन म्हणजे नुसतें नाचणें असें मात्र समजूं नका. संकीर्तनाचा अर्थ आहे, तुम्हांला जमेल त्या पद्धतीने ईश्वराचे गुण गाणें. वैष्णवजनांचा भावनावेग तसेंच त्यांचें नृत्य वगैरे चांगलें असतें आणि नि:संशय त्यांत कोणाचेंहि मन अगदी रंगून जातें, पण त्यांत जो एक धोका आहे त्यापासून स्वत:ला नेहमी वांचविलें पाहिजे. धोका आहे--

प्रतिक्रियेचा. एकीकडे तर अशी स्थिति होते की--भावना एकदम खूप उत्तेजित केल्या गेल्या आहेत, डोळ्यांतून घळघळा अश्रु वाहत आहेत, नशा चढल्यासारखें डोकें गरगर फिरतें आहे; आणि मग पाहाल तर अगदी विरुद्ध स्थिति. संकीर्तन संपलें रे संपलें की, भावना जितक्या आवेगाने वर उसळल्या होत्या तितक्याच आवेगाने त्या खाली कोसळतात. समुद्रावर एखादी लाट जितक्या आवेगाने आणि जितकी उंच उसळी घेते तितक्याच आवेगाने ती खाली पडते आणि तितकीच खोल जाते. त्या अवस्थेंत, प्रतिक्रियेच्या धक्क्यापासून स्वतःला वांचविणें म्हणजे महाकठीण कर्म असतें; एखाद्याच्या ठायीं जर विवेकशक्ति नसेल तर तो कामादींसारखा हीन वासनांच्या आहारींच जाणें अधिक संभवनीय असतें. अमेरिकेंत देखील मीं हीच गोष्ट पाहिली आहे. तेथे अनेक लोक चर्चमधे जातात, अगदी भक्तिपूर्वक प्रार्थना करतात, भावपरिपूरित होऊन गाणीं म्हणतात, धर्माचार्यांचा उपदेश ऐकतां ऐकतां त्यांच्या डोळ्यांतून घळघळा अश्रुसुद्धा वाहूं लागतात. पण चर्चमधून बाहेर पडल्यावर जोरदार प्रतिक्रिया सुरू होते आणि ते पाशवी प्रवृत्तींना बळी पडतात.

प्रश्नः--तर मग महाराज, श्रीचैतन्यांच्या उपदेशांपैकी कोणते आमच्या योग्य आहेत, कोणते आम्हीं अंगिकारावेत तें आपण आम्हांला सांगा म्हणजे आमच्या हातून चुका होणार नाहीत.

स्वामीजीः--ज्ञानयुक्त भक्तीने ईश्वराची उपासना करा. भक्तीबरोबरच सदसद्विवेकबुद्धीलाहि कार्य करूं द्या. तसेंच श्रीचैतन्यांचें विशाल हृदय, भूतमात्रांविषयी त्यांच्या ठायीं असलेली प्रेमभावना व दयाबुद्धि, त्यांच्या हृदयांत वास करीत असलेली ईश्वराविषयीची ज्वलन्त भक्ति, या सगळ्या गोष्टींचा तुम्हीं अंगिकार करावा आणि सर्वसंगपरित्यागाची जी भावना त्यांच्या ठिकाणीं होती तिला तुम्हीं आपल्या जीवनाचा आदर्श मानावा.

प्रश्नकर्त्याने आता स्वामीजींपुढे हात जोडले आणि तो म्हणाला, "महाराज, मला क्षमा करा. आपलें म्हणणें अगदी खरें आहे हें आता मला उमगलें. वैष्णवांच्या मधुरभावावर सहज थट्टेंत तुम्हीं जी टीका केली तिच्यांतील आशय मी प्रथम समजूं शकलों नाही, म्हणून मीं

त्याबद्दल हरकत घेतली."

स्वामीजीः—ठीक ठीक. पण असें पाहा की आपल्याला जर टीका करावयाचीच असेल तर ती ईश्वरावर करावी—किंवा ईश्वरी पुरुषांवर करावी. तुम्हीं मला कांही शिव्या दिल्यात तर सहजच मला तुमचा राग येईल. मीं तुम्हांला शिव्या दिल्या तर तुम्हीं तसेंच प्रत्युत्तर द्याल, नव्हे का? पण ईश्वर किंवा ईश्वरीपुरुष वाइटाची फेड कधीहि वाइटाने करीत नाहीत.

स्वामीजींच्या चरणांस वंदन करून ते प्रश्नकर्ते सद्‌गृहस्थ तेथून निघून गेले. मीं पूर्वीच म्हटलें आहे की स्वामीजी कलकत्त्यांत असले की अशी मंडळी जमणें ही अगदी रोजचीच गोष्ट झाली होती. पहाटेपासून तों रात्रीं आठ नऊ वाजेपर्यंत कोणत्याहि वेळीं लोकांची तेथे अशीच गर्दी असायची. यामुळे स्वाभाविकच त्यांच्या जेवणाच्या वेळेच्या बाबतींत मोठी अनियमितता होत असे. अनेकांना हें बरें वाटत नसे. म्हणून ठरलेल्या वेळेव्यतिरिक्त भेटायला येणाऱ्यांची आपण भेट घेऊं नये असें ते स्वामीजींना मोठ्या आग्रहाने सांगत. पण स्वामीजींचें हृदय प्रेमपूर्ण होतें. दुसऱ्यांना केव्हाहि साहाय्य करण्यासाठी ते कितीहि कष्ट करण्यास तयार असत. धर्मतृष्णा लागून धावत आलेल्या लोकांना पाहतांच ते द्रवित होऊन जात. स्वतःची शरीरप्रकृति ठीक नसतांहि ते कोणाचाहि आग्रह किंवा विनंती जुमानीत नसत व लोकांच्या भेटी घेत. त्यांचें उत्तर ठरलेलें होतें. ते म्हणत असत, "किती कष्ट घेतात हे लोक! कोठे दूर दूर त्यांचीं घरें, तेथून तें येथवर चालत येतात. थोडीफार तब्येत बिघडेल या भीतीपायीं मी काय त्यांच्याशीं येथे बसल्या बसल्या चार शब्दहि बोलूं नको?"

दुपारीं चारच्या सुमारास सर्वसाधारण चर्चा बंद झाली. जमलेले लोक निघून गेले. कांही थोडे जण राहिले होते. स्वामीजी त्यांच्याशीं इंग्लंड, अमेरिका आदि विविध विषयांवर बोलत होते. असें संभाषण चालूं असतां ते म्हणाले:—

"इंग्लंडहून परत येतांना जहाजावर मला एक विलक्षण स्वप्न पडलें. त्या वेळीं आमचें जहाज भूमध्य समुद्रांतून जात होतें. मी झोपलों होतों. अगदी म्हातारा आणि आदरणीय वाटावा असा एखाद्या ऋषी-

सारखा दिसणारा एक माणूस माझ्यासमोर उभा राहिला आणि म्हणाला, 'तूं ये आणि आम्हांला आमची पूर्वीची स्थिति प्राप्त करून दे. मी प्राचीन थेरपुत्ताच्या संप्रदायाचा आहें. हा संप्रदाय भारतीय ऋषींच्या शिकवणुकींतूनच उत्पन्न झाला होता. आम्हीं ज्या सत्यांचा उपदेश दिला आणि जे आदर्श प्रसृत केले तेच आज ख्रिस्ती लोक येशूच्या नांवावर खपवीत आहेत. परंतु वास्तविक पाहतां येशू नांवाची कोणी व्यक्ति कधीच जन्मली नाही. येथे जर उत्खनन कराल तर माझ्या विधानाची सत्यता पटविणारा कितीतरी पुरावा प्रकाशांत येईल.'

"मीं विचारलें, 'तुम्ही म्हणतां तो पुरावा आणि प्राचीन काळचे ते अवशेष कोठे आढळतील ? कोठे उत्खनन करावयाचें ?'.

"त्या शुभ्र केसांच्या पुरुषाने तुर्कस्थानच्या निकटवर्ती एका स्थानाकडे बोट दाखवून म्हटलें, 'या इथे, समजलें ?'

"त्यानंतर लगेच मी जागा झालों. धावतच डेकवर जाऊन मीं कप्तानाला विचारलें, 'आपलें जहाज कोणत्या प्रदेशानिकट आलें आहे ?'

"कप्तान म्हणाला–'तो पहा पलीकडे तो तुर्कस्थान दिसत आहे आणि तें आहे क्रीट बेट.'"

तें निव्वळ स्वप्न होतें की कांही गूढ अर्थ सुचविणारें तें दर्शन होतें ? कोण जाणें !

---

( संकलक—श्री. सुरेंद्रनाथ दासगुप्त )

एके दिवशीं, निरनिराळ्या महाविद्यालयांत शिकणाऱ्या माझ्या तरुण मित्रमंडळीसह मी बेलूर मठांत, स्वामीजींना भेटण्यासाठी गेलों. आम्ही स्वामीजींच्या आवतीभोवती बसलों, भिन्न भिन्न विषयांवर संभाषण सुरू होतें. प्रश्न विचारला रे विचारला की लागलीच मोठें निर्णयात्मक असें उत्तर स्वामीजींकडून मिळत होतें. असें चाललें असतां एकदम ते आम्हांला उद्देशून म्हणाले, "तुम्ही सर्व, पाश्चिमात्यांच्या निरनिराळ्या दर्शनशाखांचा, तत्त्वज्ञानप्रणालींचा आणि आध्यात्मिक शास्त्रांचा अभ्यास करणारे विद्यार्थी आहांत; अनेक देशांच्या आणि जातींच्या नव्या नव्या गोष्टी तुम्ही शिकत आहांत. मानवी जीवनांतील सगळ्यांत भव्य आणि उदात्त सत्य कोणतें, तें तुम्ही मला सांगूं शकाल काय ?

आम्ही विचार करूं लागलों. पण त्यांना नेमकें काय उत्तर हवें आहे तें आम्हांस कळेना. आम्हांपैकी कोणींच कांही उत्तर दिलें नाही. तेच मग आपल्या स्फूर्तिप्रद वाणीने बोलूं लागले:—

"लक्षांत ठेवा की आपण सगळे मरणार आहोंत. ही एक गोष्ट जर मनांत नेहमी वागवाल तर तुमचा अंतरात्मा जागृत होईल, तुमच्या क्षुद्र वृत्ति लोप पावतील, तुमच्यामध्ये प्रत्यक्ष कार्य करण्याची शक्ति येईल, मनांत आणि शरीरांत नवा उत्साह संचरेल आणि जे कोणी तुमच्या सान्निध्यांत येतील त्यांनाहि असें वाटेल की तुमच्याजवळ येतांच उन्नत करणारें कांही तरी त्यांना तुमच्याकडून प्राप्त झालें आहे."

यानंतर माझें त्यांच्याशीं पुढीलप्रमाणे संभाषण झालें.

मी:—परंतु, स्वामीजी, मृत्यूच्या विचारामुळे उत्साह नष्ट होऊन अंत:करण निराशाग्रस्त होणार नाही काय ?

स्वामीजी:—होईल. खचित होईल. प्रथमत: हृदय दुभंगून जाईल. निराशापूर्ण खेदजनक विचारांनी मन व्याप्त होईल. पण तसेंच पुढे रेटा. कांही दिवस तसेच जाऊं द्या. आणि नंतर, नंतर एक नवें बल हृदयांत प्रविष्ट झालेलें तुम्ही पाहाल. सतत वास्तव्य करून असलेला मृत्यूचा विचार तुम्हांस नवजीवन देईल, 'Vanity of vanities, all

is vanity'—'सगळेंकांही असार आहे, नश्वर आहे, सगळेंकांही क्षणभंगुर आहे'—या वचनाची सत्यता तुमच्या मनश्चक्षूसमोर क्षणोक्षणीं साकार करून तुम्हांला तो विवेकशील बनवील. धीर धरा. दिवस, महिने आणि वर्षें व्यतीत होऊं द्या, आणि मग सिंहासारखा बलसंपन्न होऊन अंतरात्मा जागृत होत आहे असें तुम्हांला आढळेल. आंत असलेल्या अल्पशक्तीचें विराट शक्तींत रूपान्तर झाल्याचें तुम्हांला दिसेल. नेहमी मृत्यूचा विचार करा, म्हणजे माझ्या बोलण्यांतील शब्दन् शब्द खरा असल्याचा प्रत्यय तुम्हांला येईल. या विषयावर आणखी कितीहि बोललों तरी शब्द अपुरेच पडणार !

माझ्या एका मित्राने स्वामीजींविषयी हळूच कांही स्तुतिपर शब्द उच्चारले. स्वामीजी म्हणाले, "माझी स्तुति करूं नका. आपल्या या जगांत स्तुति आणि निंदा यांची कांहीच किंमत नाही. झोक्यावर बसलेला माणूस जसा मागेपुढे, वरखाली होतो, तसेंच निंदास्तुतीमुळे होत असतें. माझी पुष्कळ स्तुति झाली आहे. निंदेचा वर्षावहि मला सहन करावा लागला आहे. पण त्यांचा विचार करण्यापासून लाभ काय ? प्रत्येकाने निर्विकारपणें आपलें कर्तव्य करीत राहिलें पाहिजे. शेवटची घटका आली म्हणजे, तुम्हांला काय, मला काय, किंवा आणखी कोणाला काय, निंदास्तुति सारखीच भासेल. आपल्याला येथे विशिष्ट कार्यासाठी पाठविण्यांत आलें आहे. बोलावणें आल्याबरोबर येथील सगळेंकांही सोडून आपल्याला जावें लागेल."

मी:—स्वामीजी, आम्ही किती क्षुद्र आहोंत !

स्वामीजी:—खरें आहे. तुमचें म्हणणें अगदी बरोबर आहे. लक्षलक्ष सूर्यमालिका असलेलें असीम विश्व कोणा अमर्याद, अकल्पनीय शक्तीने प्रेरित होऊन त्या अज्ञाताच्या चरणस्पर्शासाठी जणु कसें धावत सुटलें आहे याचा विचार करा. त्यापुढे आपण किती लहान आहोंत याचाहि विचार करा. अशा स्थितींत नीचपणांत आणि दुष्टपणांत स्वतःला गुरफटून घेण्यास आपल्याला वाव आहे कोठे ? आपसांतील भांडणें आणि पक्षाभिनिवेश यांचें पोषण केल्याने आपला काय लाभ होणार आहे ? मी सांगतों तसें वागा. महाविद्यालयांतून बाहेर पडल्यानंतर स्वतःला पूर्णतः दुसऱ्यांच्या सेवेसाठी लावून द्या. अगदी विश्वास

बाळगा की, द्रव्य आणि अन्य मौल्यवान वस्तूंनी भरलेला एखादा पूर्ण खजिना तुमच्या ताब्यांत आल्याने तुम्हांला जेवढें सुख होईल, त्यापेक्षा कितीतरी अधिक सुख तुमच्या या सेवेमुळे तुम्हांला लाभेल. जनसेवा करतां करतांच ज्ञानमार्गावरहि तुमची प्रगति होईल.

मी:—पण स्वामीजी, आम्ही अतिशय गरीब आहोंत !

स्वामीजी:—ठेवा बाजूला तुमचे ते गरीबीसंबंधीचे विचार ! कशाच्या बाबतींत गरीब आहांत हो तुम्हीं ? तुमच्याजवळ बग्गी-घोडे नाहीत, अथवा तुम्ही हाक मारल्याबरोबर नोकरांचा ताफा तुमच्या समोर हात जोडून उभा राहत नाही याचा तुम्हांला विशाद वाटतो की काय ? त्यांत मोठेसें तें काय काहे ? अगदी अंत:करणापासून, रात्रंदिवस रक्ताचें पाणी करून, तुम्ही दुसऱ्यांकरिता झटा. असें कराल तर या जगांत तुम्हांला अशक्य असें कांहीच उरणार नाही, हें तुम्हांला कळून येईल. आणि मग पाहाल, जीवनाच्या पवित्र नदीचें परतीर तुमच्या दृष्टीला दिसूं लागेल, मृत्यूचा पडदा लोप पावलेला दिसेल आणि अमरत्वाच्या अद्‌भुत साम्राज्याचे तुम्ही वारसदार आहांत याचा तुम्हांला अनुभव येईल.

मी:—स्वामीजी, तुमच्यासमोर बसण्यांत आणि तुमचे संजीवक शब्द ऐकण्यांत आम्हांला किती आनंद वाटतो म्हणून सांगावें !

स्वामीजी:—वर्षानुवर्ष आपल्या देशांत मी प्रवास करीत आहें. या प्रवासांत माझी अनेक महात्म्यांशीं भेट झाली. प्रेमपूर्ण दयेचा स्रोत ज्यांच्या अंत:करणांतून ओसंडतो आहे असे अनेक उदार हृदयाचे पुरुष मला भेटले. त्यांच्या चरणांजवळ जेव्हा मी बसत असे तेव्हा मला असा अनुभव येई की जणु शक्तीचा प्रचंड प्रवाह माझ्या अंत:करणांत प्रविष्ट होत आहे. त्या महापुरुषांशीं असा संबंध आल्यामुळे जो प्रवाह माझ्यांत संचरला, त्याच्याच शक्तीने मी हे चार शब्द तुमच्याशीं बोलूं शकत आहे. मी स्वत: कोणी महापुरुष आहें असें तुम्ही समजूं नका.

मी:—पण स्वामीजी, तुम्ही ईश्वरसाक्षात्कारी पुरुष आहांत या दृष्टीनेच आम्ही तुमच्याकडे पाहतों.

माझ्या तोंडून निघालेले वरील शब्द ऐकतांच, स्वामीजींचे ते मोहक डोळे अश्रूंनी डबडबले. ( अहाहा ! आजहि तें दृश्य माझ्या

डोळयांसमोर किती स्पष्ट उभें आहे!) त्यांच्या अंतःकरणांत प्रेम उचंबळून आलें. मृदु आणि सौम्य आवाजांत ते बोलूं लागले, "मोठमोठे ज्ञानी ज्याच्या शोधार्थ श्रमतात तें परमज्ञान त्या पवित्र चरणांत साठविलेलें आहे. प्रेमीभक्त ज्या प्रेमाच्या शोधांत असतात, त्याची पूर्णता त्या पवित्र चरणांच्या ठायींच आहे. यच्चयावत् स्त्रीपुरुषांना त्या पवित्र चरणांशिवाय दुसरा कोणता आश्रय आहे?"

कांही वेळानंतर ते पुन्हा म्हणाले, "हर हर, या जगांत लोक आपसांत भांडण्याझगडण्यांत खुशाल दिवस घालवितात, ही केवढी भूल! पण असें हें किती दिवस चालणार? जीवनाच्या सायंकाळीं * त्यांना सगळयांनाच घरीं परतावें लागेल, आणि मग त्यांना त्या करुणामयी जगन्मातेच्या कुशींत चिरशांति लाभेल."

---

* जन्ममृत्यूचा फेरा कायमचा संपण्याच्या वेळीं

आधारावरच. यासाठीच आपल्या या धर्माचे योग्य प्रतिनिधि बाहेर देशीं पाठवावयास हवेत. त्यामुळेच साऱ्या जगाला कळून येईल की भारत अजून जिवंत आहे.

आपण अगदी जंगली नाहीं हें दाखविण्यासाठी तरी निदान कांही लोकांनी प्रतिनिधि म्हणून भारतांतून अन्य देशांत जावयास हवें. भारतांत आपल्या घरीं बसून तुम्हांला या कार्याची गरज भासणार नाही, पण विश्वास ठेवा की आपल्या राष्ट्राच्या पुष्कळशा जिव्हाळ्याच्या गोष्टी यावरच अवलंबून आहेत. आणि ज्या संन्याशाच्या अंतरीं आपल्या बांधवांच्या कल्याणाची स्पृहा नाही तो संन्यासासाठी अयोग्य आहे--त्याला शुद्ध पशुच मानावें लागेल.

मी कांही देशावलोकन करायला निघालेला वा चैनी प्रवासी नाहीं--जगलां-वांचलांत तर आपण पाहालच माझें काम, आणि मग मला आयुष्यभर आशीर्वाद द्याल.

श्री. द्विवेदींचा प्रबंध धर्मसभेच्या दृष्टीने फार मोठा होता, त्यांतला बराचसा भाग गाळावा लागला.

धर्ममहासभेंत माझें भाषण कसें झालें यासाठी हाताशींच असलेल्या वर्तमानपत्रांतून व मासिकांतून अभिप्रायादाखल आलेले कांही उतारेच येथे देतों; मला घमेंड मारायची नाही, पण आपला माझ्यावरील लोभ पाहतां, आपल्याला म्हणूनच हें सांगतों की, कोणत्याहि अन्य हिंदूचा अमेरिकेवर असा प्रभाव पडला नाही, आणि माझ्या येथे येण्याने एरव्ही कांही नाही तरी अमेरिकन लोकांना एवढें मात्र खासच कळलें की भारत आजच्याहि परिस्थितींत अशीं माणसें निर्माण करतो की ज्यांच्या पायाशीं बसून अत्यंत सुसंस्कृत देशांनी देखील धर्माचे आणि नीतीचे धडे घ्यावेत. हिंदु जातीने आपला हा संन्यासी इकडे पाठविण्यासाठी हें पुरेसें कारण आहे, असें आपणांस नाही वाटत ? याबाबतची तपशीलवार माहिती आपणांस वीरचंद गांधींकडून मिळेल. . .

पुढे आता मी कांही उतारे देतों—"झालेल्या त्रोटक भाषणांपैकी बहुतांश भाषणें वक्तृत्वपूर्ण असलीं तरी सर्वधर्मपरिषदेचा यथार्थ भाव काय आहे व तिच्या मर्यादा कोणत्या आहेत हें इतक्या कौशल्यपूर्ण तऱ्हेने व्यक्त करणारें, या हिंदु संन्याशाच्या भाषणासारखें अन्य कुणाचेंहि

भाषण नव्हतें. त्यांचें सारें भाषण मी पुढे उद्‌धृत करतों, पण त्या भाषणाचा श्रोत्यांवर झालेला परिणाम मात्र मला फक्त सूचितच करतां येणें शक्य आहे, कारण, परमेश्वरानेच त्यांना वक्तृत्वाचा अधिकार दिला आहे आणि भगव्या वस्त्रांनी खुलून दिसणारा त्यांचा सुबुद्ध तेजस्वी चेहरा त्यांनी सुमधुर आवाजांत केलेल्या कळकळीच्या भाषणाप्रमाणेच आकर्षक होता." (यानंतर सविस्तर भाषण उद्‌धृत केलें आहे.)—न्यूयॉर्क क्रिटिक.

"विभिन्न मंडळांमध्ये आणि चर्चेसमधे स्वतःच्या धर्मावर ते एवढें बोलले आहेत की आता आम्ही त्या धर्माशीं चांगलें परिचित झालों आहोंत.... त्यांचा सुसंस्कृतपणा, त्यांचें वक्तृत्व व आकर्षक व्यक्तिमत्त्व या साऱ्यांमुळे हिंदु सभ्यतेचें आम्हांला एक नवीनच दर्शन झालें....बुद्धिमत्तेचें तेज विलसत असलेला त्यांचा सुंदर चेहरा आणि त्यांची गंभीर सुललित वाणी यांमुळे कुणाचाहि त्यांच्याबद्दल एकदम अनुकूल ग्रह होतो... आपले मुद्दे व त्यावरून काढलेले निष्कर्ष कोणत्याहि टिपणांच्या मदतीशिवाय ते इतक्या कलापूर्ण पद्धतीने आणि अंतःकरणपूर्वक श्रोत्यांसमोर मांडतात की श्रोत्यांना त्यांचें म्हणणें तात्काळ पटतें. त्यांचीं भाषणें नेहमीच वक्तृत्वपूर्ण आणि स्फूर्तिदायक होतात."
—न्यूयॉर्क क्रिटिक.

"सर्वधर्मपरिषदेंत विवेकानंद हे सर्वश्रेष्ठ व्यक्ति होत ही गोष्ट अगदी वादातीत आहे. त्यांचीं भाषणें ऐकल्यावर त्यांच्यासारख्यांच्या सुजाण देशांत धर्मप्रचारक पाठविणें किती मूर्खपणाचें आहे हें आपल्या ध्यानांत येतें."—हेरल्ड. (येथील अग्रगण्य वर्तमानपत्र.)

अधिक उतारे देणें गर्विष्ठपणाचें दिसेल म्हणून येथेच थांबतों, पण जगांत कुठे काय चाललें आहे याची कांहीच दखल न घेतल्याने कूपमंडुकासारखी अवस्था झालेल्या तुम्हां लोकांच्या निदर्शनाला वरील गोष्टी आणून देणें अत्यावश्यच होतें. माझ्या उदारहृदयी मित्रा, माझी ही टीका व्यक्तिशः तुमच्यावर नाही, आपल्या देशांतील सर्वसाधारण लोकांबद्दलच मीं वरील विधान केलें आहे.

भारतांत मी जसा होतों तसाच येथेहि आहें; फरक येवढाच की येथे या अत्यंत सुसंस्कृत देशांत गुणग्राहकता आहे व सहानुभूति पण

आहे. आपल्या मूर्ख लोकांकडून स्वप्नांतसुद्धा या गोष्टींची अपेक्षा करणें चूक ठरलें असतें. आपल्या देशांत आम्हां संन्याशांना भाकरीचा चतकोर तुकडा देतांना सुद्धा लोक कुरकुर करतात, उलट येथे एका व्याख्यानाला लोक हजार रुपये द्यावयासहि तयार असतात आणि शिवाय ते व्याख्यानांत मिळणाऱ्या उपदेशांबद्दल चिरकाल कृतज्ञ राहतात.

भारतांतील लोकांपेक्षा या अनोळखी लोकांनीच माझ्या बाबतींत अधिक गुणग्राहकता दाखविली आहे. मनांतच आणलें तर जन्मभर मी मोठ्या ऐषआरामांत येथे राहूं शकेन, पण मी आहें संन्यासी व 'सदोष असलास तरीहि हे भारता, तूं मला प्रिय आहेस' ही आहे माझी भावना. एवढ्यासाठीच कांही महिन्यांतच मी तिकडे परत येईन आणि ज्यांना गुणग्राहकता व कृतज्ञता कशाशीं खातात हें माहीत नाही अशा माझ्या लोकांत, जसें मीं आजवर केलें तसेंच, जागोजाग हिंडून धर्म व प्रगति यांचीं बीजें पेरीत प्रचार करीन.

माझ्यासारख्या एका परक्या धर्माच्या प्रतिनिधीला अमेरिकन लोकांनी जी मदत दिली, जें आतिथ्य दाखविलें, त्याच्यावर सहानुभूतीचा व आदराचा जो वर्षाव केला त्यांच्या तुलनेने माझ्या देशांतील स्वार्थ, भीकमागू वृत्ति, गुणग्रहणाबाबतचा थंडपणा, अकृतज्ञता वगैरे गोष्टी पाहून शरमेने मला मान खाली घालावीशी वाटते. म्हणून म्हणतों की आपल्या देशाच्या जरा बाहेर या, इतर लोकांचे आचार-विचार पाहा व तुलनेने चांगलें-वाईट ठरवा.

वर दिलेले उतारे वाचून तरी एका संन्याशाला अमेरिकेंत पाठविल्याचें सार्थक झालें हें पटतें ना ?

कृपा करून या गोष्टींना प्रसिद्धि देऊं नका. भारतांत असतांना प्रसिद्धीसंबंधी मला जशी घृणा वाटत होती तशीच येथेहि वाटते.

मी प्रभूचेंच कार्य करीत आहें; तो जिकडे मला नेईल तिकडे मी जाईन. 'मूकं करोति वाचालम्'—ज्याच्या कृपेने मुका माणूस वक्ता होतो आणि पंगु देखील पर्वत ओलांडतो, तोच मला साहाय्य करील. कुठल्याहि मानवी मदतीची मला पर्वा नाही. भगवंताला वाटलें तर तो मला भारतांत, अमेरिकेंत, अगदी उत्तर ध्रुवावर देखील साहाय्य करील. आणि त्याचीच इच्छा नसेल तर इतर कुणाचीहि मला मदत

करण्याची ताकद नाही. सदा भगवंताचा जयजयकार असो.

आपला शुभाकांक्षी
विवेकानंद

## (२)

( स्वामी सारदानंद यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
२० मे १८९४

प्रिय शरत्,

तुमचें पत्र मिळालें. शशीची प्रकृति आता चांगली आहे हें वाचून आनंद झाला. एक अद्‌भुत गोष्ट मी आता तुम्हांला सांगतों. तुमच्यापैकी जेव्हा कुणी एखादा आजारी पडेल तेव्हा त्याने वा तुमच्यापैकी इतर कुणीं त्याचें रूप मनांत आणून तो बरा झाला आहे असें मनांतल्या मनांत म्हणावें व तशी दृढ भावना करावी. अशानेच त्याला लवकर आराम पडेल. त्याला न कळत वा त्याच्यापासून हजारो मैल दूर राहूनहि तूं ही गोष्ट करूं शकतोस. हें नीट ध्यानांत ठेव व आता पुन्हा आजारी पडूं नकोस. तुम्हांला एव्हाना पैसे मिळालेच असतील. तुम्हां सर्वांची इच्छा असल्यास मीं मठासाठी पाठविलेल्या पैशांतून ३०० रु. गोपालला देऊं शकतां. आता पाठविण्यासाठी माझ्याजवळ पैसा नाही. आता मला मद्रासकडे लक्ष दिलें पाहिजे.

आपल्या मुलींच्या लग्नाबद्दल इतकी खंत सन्यालने कां करावी हेंच मला कळत नाही. ज्या संसारापासून आपण स्वतः सुटावें असें त्याला वाटतें त्याच संसारांत आपल्या मुलींना तो अखेर लोटणार आहे! माझ्या मतें असें करणें अगदी निंद्य आहे! मुलामुलींच्या लग्नाचें नांव घेणेंसुद्धा मला ऐकवत नाही. मीं कुणाला या असल्या बंधनांत पडावयास मदत करावी असें तुम्हांला वाटतें की काय? केवढा वेडेपणा हा! माझा भाऊ महेंद्र हा जर लग्नाच्या भानगडींत पडेल

तर मी त्याचें तोंड देखील नाही पाहणार. या बाबतींत मीं अगदी दृढ निश्चय केला आहे....

तुमचा
विवेकानंद

(३)

(श्री. हरिदास बिहारीदास देसाई यांना)

शिकागो,
५४१, डिअरबोर्न ॲव्हेन्यु,
नोव्हेंबर, १८९४

प्रिय दिवाणजी,

आपल्या पत्रामुळे मला खूपच संतोष झाला. आपला विनोद अर्थातच माझ्या लक्षांत आला, पण असल्या विनोदाने मागे हटायला मी कांही कुकुलें बाळ नाहीं. आता आणखी कांही लिहितों, घ्या!

पाश्चात्त्यांच्या यशाचें रहस्य आहे त्यांच्या संघटनेच्या व एकीच्या शक्तींत. परस्परावर विश्वास, सहकार्य व साहाय्य करण्याची तत्परता यांमुळेच तें शक्य आहे. आपल्याला सुपरिचित असलेल्या, मुंबईच्या जैनधर्मी वीरचंद गांधींचेंच उदाहरण घेऊं. हे गृहस्थ इथल्या असल्या या कडक थंडींतहि शाकाहाराखेरीज अन्य कांहीदेखील घेत नाहीत आणि आपल्या देशवासीयांचें व धर्माचें दृढतेने समर्थन करीत असतात. या देशांतील लोकांनाहि ते खूप आवडतात, पण ज्यांनी त्यांना इकडे पाठविले ते लोक काय करताहेत ? त्यांचे प्रयत्न चालले आहेत गांधींना वाळींत टाकण्याचे ! मत्सर हा दुर्गुण नेहमी गुलामांतच उत्पन्न होत असतो. आणि तो मत्सरच त्यांना त्या हीन अवस्थेंत ठेवीत असतो.

...हे लोक येथे होते; व्याख्यानें देऊन पैसा मिळविण्याचे त्यांचे प्रयत्न होते. त्यांच्या प्रयत्नांना यश आलें नाही असें नाही अगदीच, पण माझ्या पदरीं त्यांच्यापेक्षा यशाचा अधिक वांटा आला. मी

कांही त्यांच्या मार्गांत आडवा आलों नव्हतों. माझें यश ही भगवंताची इच्छा होती. पण...च्या खेरीज...या बाकीच्यांनी माझ्याविषयी अत्यंत हीन, कुत्सित व कपोलकल्पित प्रवाद इकडे पसरविण्याचा खूप प्रयत्न केला, आणि तोहि माझ्या पाठीमागे. अमेरिकन लोक असल्या नीचपणाकडे नजरहि टाकणार नाहीत आणि स्वतःहि असला नीचपणा करणार नाहीत.

...इथे जर कुणीं पुढे जाण्याचा प्रयत्न केला तर बाकी प्रत्येक-जणच याच्या साहाय्याला सिद्ध असतो. उद्या तुम्ही माझ्या स्तुती-दाखल एखादी ओळ आपल्या हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांत (उदा-हरणार्थ 'हिंदु' पत्रांत) लिहून पाहा; लागलीच सारे लोक कंबर कसून मला विरोध करायला पुढे आलेले दिसतील. असें कां? कारण एकच, गुलामांचा तो स्वभावच असतो. आपल्याचपैकी एखाद्याने किंचितहि डोकें वर केलेलें त्यांना मुळी सहनच होत नाही...स्वातंत्र्य, स्वावलंबन, बंधुप्रेम इत्यादि गुणांनी अलंकृत असलेल्या या देशांतील लोकांशीं तुम्ही या गुलामांची तुलना करूं इच्छितां? आपल्या लोकांची तुलना इकडच्या लोकांशीं करायचीच झाली तर ती करतां येईल अमेरिकेंतील नुकत्याच स्वतंत्र झालेल्या गुलाम निग्रोंशीं. दक्षिण संस्थानांमधे या निग्रो गुलामांची संख्या जवळपास दोन कोट असून आता नुकते कुठे ते गुलामीच्या खोड्यांतून मोकळे झाले आहेत. त्या भागांत गोरे लोक आहेत मूठभरच, पण असें असूनहि ते मूठभर गोरे लोकच त्यांना दडपून टाचेखाली ठेवतात. असें कां? त्यांना कायद्याने सारे हक्क असूनहि या गुलामांना स्वतंत्र करण्यासाठी चाललेल्या लढ्यांत भावा-भावांत कलहामुळे रक्ताच्या नद्या कां वाहिल्या? याचें कारण म्हणजे मत्सर. आपलाच एखादा निग्रो बांधव पुढे गेल्याचें किंवा त्याची स्तुति होत असल्याचें अन्य निग्रोंना कांही सहन नाही व्हायचें. लागलीच ते गोऱ्यांशीं हातमिळवणी करून त्याला चिरडून टाकण्याच्या उद्योगाला लागतील. या साऱ्या गोष्टींची भारताबाहेर पडल्याखेरीज तुम्हांला कल्पनाहि येणें शक्य नाही. ज्यांच्यापाशी प्रतिष्ठा व मुबलक पैसा आहे त्यांनी जग चाललें आहे तसें चालूं द्यावें हें ठीकच, पण लाखो पद-दलितांच्या व परिश्रम करणाऱ्या लोकांच्या रक्तावर ज़्यांचें ऐश-

आरामांत लालन-पालन व शिक्षण होऊनहि जे या दलितांकडे लक्ष सुद्धा देत नाहीत त्यांना मी कृतघ्न आणि विश्वासघातकीच म्हणेन. इतिहासांत कुठे व कोणत्या कालखंडांत तुमच्या श्रीमंत व उच्चभ्रू लोकांनी, पुरोहितांनी आणि सत्ताधीशांनी या गरिबांबद्दल सहानुभूति दाखविल्याची नोंद आढळते ? आणि या गरिबांच्या पिळणुकीमुळेच या साऱ्यांना शक्ति प्राप्त झालेली होती.

पण भगवंताची लीला अगाध आहे ! लवकर म्हणा की उशीरा म्हणा या अन्यायांचा सूड उगवला गेला. ज्यांनी जळवांप्रमाणे गरिबांचें सतत रक्त शोषलें, ज्यांच्या साऱ्या शिक्षणाची मदार याच गरिबांवर होती, ज्यांच्या साऱ्या शक्तींचा आधार या गरिबांचें दारिद्र्य होतें ते सारेच, कालचक्राला कलाटणी मिळतांच शेकडोंनी, हजारोंनी गुलाम म्हणून विकले गेले, त्यांची संपत्ति लुटली गेली आणि त्यांच्या बायका-मुलींची इज्जत गेली. गेल्या हजार वर्षांचा हाच इतिहास आहे. आणि या साऱ्यांमागे कांही कारणच नाही असें का तुम्हांला म्हणायचें आहे ?

भारतांत गरिबांमधूनच इतक्या मोठ्या प्रमाणावर लोक मुसलमान झालेले कां आढळतात ? केवळ तरवारीच्या जोरावर त्यांच्यांत असें धर्मान्तर घडवून आणलें गेलें असें म्हणणें म्हणजे महामूर्खपणाच होय. त्यांनी धर्मान्तर केलें. . . जमीनदारांच्या कचाट्यांतून सुटण्यासाठी, . . . पुरोहितांच्या हातून मुक्त होण्यासाठी--स्वाधीनतेसाठी. म्हणूनच बहुसंख्य जमीनदार असलेल्या बंगालमधे मुसलमान किसानांची संख्या हिंदु किसानांपेक्षा अधिक आढळून येते. या लाखो अवनत व दलित नरनारींच्या उद्धाराची चिंता आहे कुणाला ? मूठभर पदवीधर किंवा मूठभर धनिक म्हणजे कांही देश नव्हे. आपल्यापाशी साधन-सामुग्री अल्प आहे हें खरें; पण आपल्यापाशी जें आहे तें तीस कोट लोकांना खायलाल्यायला आणि आरामांत--नव्हे चैनींत कालक्रमणा करायला पुरेसें आहे. आपल्यांतील नव्वद टक्के लोक अगदी अशिक्षित आहेत--पण त्यांच्याबद्दल विचार करायला सवड आहे कुणाला ? या बाबूंना ? की या नामधारी देशभक्तांना ?

अशी जरी परिस्थिति असली तरी मी आपणांस सांगतों की ईश्वर आहे. हें अगदी ध्रुवसत्य आहे. ही कांही थट्टेची गोष्ट नाही.

तोच आपल्या जीवनाचें नियंत्रण करीत आहे. मला माहीत आहे की, गुलाम लोक आपल्या स्वभावदोषानुसार उपकारकर्त्यालाच चावा घ्यायला कमी करीत नाहीत, तरीहि त्यांच्या कल्याणासाठी माझ्याबरोबर तुम्हीहि प्रार्थना करा. माझ्या परिचयांतील निदान तुम्ही तरी एक असे आहांत की ज्यांच्या ठिकाणीं, जें जें म्हणून शुभ आहे, महान् आहे, त्याबद्दल खरी सहानुभूति आढळते. तुम्ही सच्चे आहांत, तुमच्या ठिकाणीं स्वाभाविक उदारता वा हृदय-बुद्धीची निष्कपटता आहे. तुम्हीहि माझ्या बरोबर प्रार्थना करूं लागा—'तमसो मा ज्योतिर्गमय' —हे ज्योतिर्मया, आम्हांला अंधारांतून प्रकाशांत ने.

लोक काय म्हणतात त्याची पर्वा मला नाही. भगवंतावर, माझ्या धर्मावर, देशावर आणि त्याहिपेक्षा माझ्यासारखे जे निर्धन भिकारी आहेत त्यांच्यावर माझें प्रेम आहे. दरिद्री, अज्ञानी, पददलित यांच्यावर माझें प्रेम आहे. त्यांच्यासाठी माझा प्राण कळवळतो, कसा अन् किती हें एक त्या भगवंतालाच माहीत. तोच मला मार्ग दाखवील. मानवाने केलेल्या स्तुति-निंदेची मला काडीमात्र किंमत वाटत नाही. माझ्या दृष्टीने ते लोक म्हणजे गोंगाट करणारीं अज्ञ बालकेंच होत. निःस्वार्थ सहानुभूतीचें व प्रेमाचें मर्म त्यांना कळणेंच शक्य नाही.

श्रीरामकृष्णांच्या कृपाप्रसादाने तें मर्म कळण्याची अंतर्दृष्टि मला लाभली आहे. माझ्यासारख्याच मूठभर निष्कांचन लोकांच्या साहाय्याने काम करण्याचा मी प्रयत्न करीत आहें. तुम्हीं त्यांना पाहिलेंच आहे. दीन-दरिद्री लोकांकडूनच भगवंताचें कार्य आजवर होत आलें आहे. माझा माझ्या गुरूंवर, भगवंतावर व स्वतःवर विश्वास दृढ होईल असा आपण मला आशीर्वाद द्या.

सहानुभूति व प्रेम हाच एकमात्र मार्ग आहे—प्रेम हीच एकमेव उपासना आहे.

प्रभु आपणां सर्वांना निरंतर साहाय्य करो.

आपला कल्याणेच्छु
विवेकानंद

(४)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
३० नोव्हेंबर १८९४

प्रिय आलासिंगा,

तुम्हांला ग्रामोफोन सुरक्षितपणें मिळाला व पत्रहि तुम्हांला मिळालें हें वाचून आनंद झाला. इत:पर तुम्हीं वर्तमानपत्रांचीं कात्रणें पाठविण्याची आवश्यकता नाही. माझ्याजवळ त्यांचे ढीगचे ढीग साचले आहेत—आता कांही तीं पाठवूं नका. आता संघासाठी कार्य करूं लागा. मीं आधीच न्यूयॉर्कमधे एक समिति सुरू केली आहे. तिचे उपाध्यक्ष लवकरच तुम्हांला पत्र लिहितील. तुम्हीहि त्यांच्याशीं पत्रव्यवहार चालू करा. लवकरच आणखी कांही ठिकाणीं मी समित्या स्थापन करूं शकेन अशी आशा आहे. आपल्या सर्व शक्ति एकवटून आपण आपल्या धार्मिक संस्थेचा व्यावहारिक भाग संघटित केला पाहिजे, पण आध्यात्मिक बाबतींत त्यांतून एखादा पंथ तर निर्माण होत नाही ना याचीहि काळजी घ्यायला हवी. धडाक्याने प्रचार सुरू करावयास हवा. सर्व मिळून विचार करा आणि संघटित व्हा.

श्रीरामकृष्णांच्या चमत्कारांसंबंधी हा काय मूर्खपणा चालवला आहे! . . . मला ते ठाऊकहि नाहीत व मला ते समजतहि नाहीत. मद्याचें रूपान्तर डी. गुप्ताच्या औषधांत करण्याखेरीज श्रीरामकृष्णांना या जगांत दुसरें कामच नव्हतें काय? या असल्या लोकांपासून परमेश्वर मला वांचवो! या असल्या लोकांना घेऊन काम करणें माझ्या कपाळीं आहे! कोणतें कार्य करण्यासाठी व कोणती शिकवण देण्यासाठी श्रीरामकृष्ण अवतरले होते हें दाखविण्यासाठी त्यांचें यथार्थ चरित्र जर कुणी लिहून काढूं शकला तर पाहा. पण हें जर कुणाला जमण्यासारखें नसेल तर उगाचच त्यांचें जीवन व त्यांची शिकवण विकृत स्वरूपांत लोकांपुढे न आणणेंच बरें. ज्यांना श्रीरामकृष्णांच्या जीवनांत चमत्कारांखेरीज कांहीच दिसत नाही ते लोक म्हणे ईश्वरसाक्षात्कार करून घेऊं इच्छितात. . . . त्यांची भक्ति, त्यांचें ज्ञान, त्यांची

सर्वधर्मसमन्वयाची शिकवण व त्यांचे इतर उपदेश या सर्वांचा 'किडी'ने अनुवाद करावा. पुढील विषयांच्या आधारें त्यांचें चरित्र लिहा-- श्रीरामकृष्णांचें जीवन म्हणजे ज्याच्या उजेडांत हिंदु धर्माच्या सगळ्या अंगांचें व मर्माचें यथार्थ आकलन व्हावें असा केवढातरी प्रचंड प्रकाशाचा स्रोत आहे. त्यांचें जीवन म्हणजे शास्त्रांत सांगितलेल्या सिद्धान्तांचें एक प्रात्यक्षिकच होय. ऋषि-मुनींना व अवतारांना खरोखर जें शिकवावयाचें होतें तें त्यांनी आपल्या जीवनाने प्रत्यक्ष दाखवून दिलें. शास्त्रग्रंथ म्हणजे नुसते सिद्धान्त होत, त्यांचें जीवन म्हणजे त्या साऱ्यांची प्रत्यक्ष अनुभूति. आपल्या एक्कावन वर्षांच्या आयुष्यांत आपल्या देशाचें पांच हजार वर्षांचें आध्यात्मिक जीवन ते जगले. आणि याप्रमाणे भावी पिढ्यांसाठी आदर्श म्हणून स्वतःचें जीवन घडवून तें मागे ठेवून गेले. आध्यात्मिक प्रगतीच्या भिन्न भिन्न अवस्था वा टप्पे असतात, आपण दुसऱ्यांच्या धर्ममतांविषयी केवळ सहिष्णुताच बाळगावयाची नसून त्यांना आपलें म्हटलें पाहिजे, सत्य हाच सर्व धर्मांचा एकमेव आधार आहे--ह्या श्रीरामकृष्णांच्या सिद्धान्तानेच वेदांचा अर्थ लागूं शकेल आणि शास्त्रांचा समन्वय होऊं शकेल. ह्याच्याच अनुरोधाने त्यांचें एखादें सुरेख व प्रभावी चरित्र लिहितां येण्यासारखें आहे. वेळ येतांच या साऱ्या गोष्टी होतील. सर्वप्रकारची अनुचित आणि असभ्य भाषा टाळा, कारण इतर सारे देश या प्रकाराला अत्यंत अश्लील समजतात, आणि इंग्रजींतील त्यांचें चरित्र तर साऱ्या जगाच्या वाचण्यांत येणार आहे. माझ्याकडे पाठविलेलें बंगालींतील चरित्र मीं वाचलें. तें असल्या बीभत्स शब्दांनी भरलेलें आहे. . . . म्हणून खूप सावध असा. असली भाषा कटाक्षाने टाळा. या लोकांच्या ठायीं कवडीची सुद्धा योग्यता नाही, पण घमेंड मात्र खूप ! स्वतःला ते एवढे मोठे समजतात की दुसऱ्याचा सल्ला ऐकून घ्यायला ते रिकामे नाहीत. या अचाट सज्जनांचें काय करावें, कळत नाही. त्यांच्यापासून मला कांही विशेष आशा नाही. जशी प्रभूची इच्छा ! बंगालींतील हें पुस्तक पाहून मला फार शरम वाटते. लेखकाला बहुधा वाटलें असावें की घडलेल्या गोष्टी तो तंतोतंत जशाच्या तशा मोकळेपणें नोंदीत आहे--श्रीरामकृष्णांची भाषासुद्धा जशीच्या तशी राखीत आहे. पण श्रीरामकृष्णांनी स्त्रियांसमोर

असली भाषा कधीच वापरली नसती हें कांही त्या दीडशहाण्याच्या लक्षांत आलें नाही. आणि हा माणूस आपलें पुस्तक स्त्री-पुरुष दोघांनीहि वाचावें अशी अपेक्षा करतो! अशा मूर्खांपासून प्रभु माझें रक्षण करोत! शिवाय त्यांच्या डोक्यांत हेंहि वेड आहे की त्यांनी श्रीरामकृष्णांना प्रत्यक्ष पाहिलें आहे! ठेवा गुंडाळून तुमचें पाहणेंन् बिहणें! . . .आहेत तर भिकारी, पण राजाचा आव आणू इच्छितात! आहेत तर मूर्ख, पण स्वतःला समजतात मोठे शहाणे! आहेत तर यःकश्चित् गुलाम, पण मानतात स्वतःला मालक! अशी आहे त्यांची अवस्था! काय करावें, कळत नाही. प्रभो, मला वांचव! तुम्हां लोकांवरच माझा सारा भरवसा आहे. तुम्ही आपलें कार्य करीत राहा. ह्या लोकांच्या मताने चालू नका. पण त्यांना दुखवू नका, खूप ठेवा-- अशाने त्यांच्यापैकी एखादा तरी पुढे चांगला निघण्याची आशा आहे. स्वतंत्रपणें आपल्या मार्गाने पुढे व्हा. आयत्या पिठावर रेघोट्या ओढायला सगळेच तयार असतात. खूप सावधगिरी बाळगा व काम करीत राहा.

तुम्हां सर्वांना आशीर्वाद.

तुमचा
विवेकानंद

## (५)

(श्री. आलासिंगा पेरुमल यांना)

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
२६ डिसेंबर १८९४

प्रिय आलासिंगा,

. . .मिशनरी लोक आपल्या वर्तमानपत्रांत माझ्यावर अर्वाच्य टीकेची वारंवार झोड उठवितात असें मी ऐकतों, पण अशा गोष्टींची मी कधीच पर्वा करीत नाहीं. हिंदुस्थानांतील अशाच प्रकारच्या कुजक्या

टीकेचीं कात्रणें तुम्हीं जर माझ्या अवलोकनार्थ पाठविलीं तरी तीं सारीं मी रद्दीच्या टोपलींत टाकीन. आपलें काम व्हावें यासाठी सुरवातीला थोडयाफार धामधुमीची गरज होती. आता तें सारें पुरे झालें. माझ्या-बद्दल लोक काय भलेंबुरें बोलतात इकडे आता अजीबात लक्षच देऊं नका. तुम्ही आपलें काम करीत राहा आणि लक्षांत ठेवा, 'न हि कल्याण-कृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति'--'वत्सा, सत्कर्म करणाऱ्याची कधीहि दुर्गति होत नाही.' (गीता ६।४०)

दिवसेंदिवस येथील लोक माझ्या कार्याकडे अधिकाधिक गुण-ग्राहकतेच्या दृष्टीनेच पाहत आहेत. तुम्हांलाच म्हणून मी सांगतों-- तुम्हांला कल्पनाहि करतां येणार नाही येवढा माझा येथे प्रभाव आहे. प्रत्येक गोष्ट हळूहळूच व्हायला हवी. बाल्टिमोरच्या घटनेसंबंधी लिहा-वयाचें म्हणजे एवढेंच की, येथील दक्षिण संस्थानांमधील लोकांना निग्रो आणि इतर काळे लोक यांच्यांतील फरक माहीत नाही. जेव्हा त्यांना तो कळेल तेव्हा दिसून येईल की ते खूप आतिथ्यशील आहेत. . . मीं ही गोष्ट तुम्हांला आधीच स्पष्टपणें सांगितली आहे आणि आता पुन्हा एकदा सांगतों की माझ्यासंबंधी वर्तमानपत्रांत येणाऱ्या निंदास्तुतीशीं मला कांहीएक कर्तव्य नाही. त्या साऱ्यांसाठी एकच एक राखीव जागा म्हणजे पेटती चूल ! आणि असल्या साऱ्या गोष्टींना तुम्हीहि अग्निच दाखवायला हवा. वर्तमानपत्रांतील मूर्खपणाची वा टीकेची तुम्ही काडी-मात्र दखल घेऊं नका. सचोटीने आणि प्राण पणास लावून आपलें कर्तव्य करा. बाकी सारें कांही ठीक होऊन जाईल. 'सत्यमेव जयते'— सत्याचाच जय होणार अखेरला. . .

मिशनऱ्यांनी केलेल्या विकृत प्रचाराकडे तुम्ही सपशेल काणाडोळा करा. येथील कुणीहि सभ्य लोक त्यांना मानीत नाहीत. . . संपूर्ण मौनच असल्या गोष्टीचें समर्पक उत्तर होय आणि तुम्हीसुद्धा या बाब-तींत पूर्णपणें मौन धारण करावें. सगळयांत म्हणजे, मला भारतांतील वर्तमानपत्रांच्या लोंढयाने गुदमरून टाकूं नका. माझ्यापक्षीं त्या साऱ्यांचें जें प्रयोजन होतें तें आता पूर्ण होऊन गेलें आहे. आता पुरे. आता कामाकडे लक्ष द्या. श्री. सुब्रह्मण्य अय्यर यांना तुम्ही आपल्या समितीचे अध्यक्ष करा. माझ्या परिचयांतल्या अत्यंत सचोटीच्या व उदार व्यक्तींपैकी

ते एक आहेत. त्यांच्या ठिकाणीं बुद्धीचा व भावनेचा सुरेख मेळ साधलेला आहे. माझ्यावर अवलंबून न राहतां तुम्ही आपल्या मार्गानें धडाडीने पुढे व्हा. . . माझ्याविषयी म्हणाल तर मी परत केव्हा येईन हें कांही निश्चित सांगतां येत नाही; येथल्याप्रमाणेच भारतांतहि माझे काम चालू आहे. सर्वांनाच सप्रेम आशीर्वाद सांगणें.

तुमचाच

विवेकानंद

## (६) *

( आपल्या सर्व गुरुबंधूंना उद्देशून स्वामी रामकृष्णानंदांना लिहिलेलें पत्र )

ॐ नमो भगवते रामकृष्णाय

१८९४

परमप्रिय शशी,

तुमच्या पत्रावरून मला तिकडली इत्थंभूत हकीकत कळली. बलरामबाबूंच्या पत्नीच्या शोकाची वार्ता ऐकून मला अत्यंत दुःख झालें. ईश्वरेच्छा बलीयसी. हें जग कर्मभूमि आहे, भोगभूमि नव्हे; आणि येथलें काम संपतांच प्रत्येकालाच येथून स्वधामीं परत फिरावें लागणार आहे; कांही आधी जातील, कांही उशीरा जातील, येवढाच काय तो फरक. फकीर निघून गेला, प्रभूची इच्छा !

श्रीरामकृष्णांचा जन्मोत्सव मोठ्या धामधुमीने साजरा झाला ही फार आनंदाची गोष्ट. त्यांच्या नांवाचा जितका प्रचार होईल तितकें श्रेयस्कर. पण याबाबत सावधानतेची एक सूचना देऊन ठेवतों: मोठमोठे महापुरुष जगासाठी एखादा निश्चित संदेश घेऊनच अवतीर्ण होत असतात, नांवलौकिकासाठी त्यांचा जन्म नसतो; पण जगाचा इतिहास हेंच सांगतो की असल्या या थोर महापुरुषांचे अनुयायी त्यांची

* अशी फुली असलेलीं पत्रें स्वामीजींनी मुळांत बंगालींत लिहिलीं होतीं.

शिकवण बाजूला टाकून त्यांच्या नांवासाठीच भांडतात. लोक श्रीरामकृष्णांचें नांव मानतात किंवा नाही याची मला पर्वा नाही, पण त्यांनी दिलेल्या शिकवणुकीसाठी, त्यांच्या जीवनाच्या व शिकवणुकीच्या प्रसारासाठी मी माझें जीवितहि समर्पण करावयास तयार आहें. मला सर्वांत जर कशाची भीति वाटत असेल तर ती तुम्हां लोकांच्या देवघराची. देवघर हें मुळांतच वाईट आहे असें नाही, पण त्यालाच सारसर्वस्व मानून साऱ्या जुन्यापुराण्या व्यर्थ, वेडगळपणाच्या गोष्टीच पुन्हा आळवत बसण्याचा कांही लोकांचा स्वाभाविकच कल असतो. याच गोष्टीचें मला भय वाटतें. ते असलीं जुनाट अनुष्ठानें वगैरे कां करतात हें मला ठाऊक आहे. त्यांच्यांत काम करण्याची प्रबल स्पृहा असते, पण योग्य मार्ग न सापडल्याने ते आपली सारी शक्ति घंटा वाजविण्यांत व असल्याच कांही गोष्टी करण्यांत खर्च करतात.

मी तुमच्यापुढे आता एक नवीन कल्पना ठेवतों. ती जर तुम्ही प्रत्यक्षांत उतरवूं शकलांत तर म्हणेन तुमचा कांही उपयोग आहे, तुम्ही मर्द आहां. . . . सर्वजण मिळून आपल्या कामाची नीट आंखणी करा. कांही मॅजिक लँटर्न, नकाशे, पृथ्वीचे ग्लोब, कांही रासायनिक पदार्थ यांचीं गरज लागेल. यानंतरची आवश्यक गोष्ट म्हणजे एक मोठी झोपडी. हें झालें की तुम्ही कांही गरीबलोक एकत्र जमवून आणावयास हवेत. नंतर त्यांना खगोल, भूगोल वगैरेंचीं चित्रें दाखवून त्या गोष्टी समजावून सांगा व श्रीरामकृष्णांबद्दल माहितीहि द्या. जगांतले देश, त्या देशांतून चाललेल्या विविध घडामोडी यांसंबंधीचें व जगाच्या एकंदर स्वरूपाचें ज्ञान त्यांना देऊन त्यांचे डोळे उघडण्याचा प्रयत्न करा. असले अनेक गरीब व अशिक्षित लोक तुम्हांला सापडतील. त्यांच्या दारोदार सकाळीं-संध्याकाळीं केव्हाहि जा व त्यांना शिकवून त्यांचे डोळे उघडा. अशा ठिकाणीं पुस्तकें वगैरेंचा कांही उपयोग नसतो. सारा भार तोंडीं शिकवण्यावर ठेवा. नंतर हळूहळू आपलीं असलीं केंद्रें वाढवावयास तुम्ही सुरवात करा. हें सारें तुम्ही करूं शकाल ?—की नुसतीच घंटा हलवीत बसणार ?

तारकदादाबद्दल सारी हकीकत मला मद्रासहून कळली. तेथील लोकांची त्यांच्यासंबंधी खूप उच्च धारणा आहे—सारे लोक संतुष्ट

आहेत त्यांच्यावर. तारकदादा, तुम्ही जर कांही दिवस मद्रासलाच जाऊन राहाल तर फार मोठें कार्य होणार आहे. पण तिकडे जावयास निघण्यापूर्वी तुम्ही जिथे आहांत तिथेच या कामाची सुरवात करून द्या. श्रीरामकृष्णांच्या भक्त असलेल्या तेथील स्त्रिया कांही विधवांना शिष्या बनवूं शकणार नाहीत काय? या विधवांना तुम्ही कांही विद्या शिकवूं शकणार नाही काय? त्यानंतर त्यांना घरोघर पाठवून श्रीरामकृष्णां-बद्दल प्रचार व त्याबरोबरच शिक्षणाचाहि फैलाव नाही का करतां येणार तुम्हांला?...

चला! उठा! तन-मन-प्राण लावून कार्याला लागा. गप्पा करण्याचे व घंटा वडवत बसण्याचे दिवस आता गेले. आता तुम्हांला कांही तरी काम करावेंच लागेल. बंगाल्यांच्या धर्माची दौड कुठपर्यंत आहे, तें आता पाहूं. लाटूला कांही गरम कपडयांची आवश्यकता असल्याचें निरंजनने लिहिलें आहे. येथील लोक लोकरी कापड युरोपांतून व हिंदुस्थानांतून मागवतात. इथल्या किंमतीच्या चवथ्या हिश्शांत तुम्हांला पाहिजे असलेलें गरम कापड कलकत्त्यांत मिळेल....मी युरोपांत केव्हा जाईन कांही सांगतां येत नाही, सारें अनिश्चित आहे माझें. येथे माझें कसेंतरी निभतें आहे इतकेंच काय तें.

हा मोठा अद्भुत देश आहे. येथे सध्या उन्हाळा चालूं आहे. बंगालमधे भर एप्रिलमधे असावा तसा उष्मा सकाळीं इथे होता, पण आता चार तासांनंतर फेब्रुवारींत अलाहाबादला असावी तशी थंडी आहे. चारच तासांत हवामानांत येवढा चढउतार आहे. इथल्या हॉटेलांचें वर्णन करतांना शब्द अपुरे पडतात! न्यूयॉर्कमधे एक हॉटेल आहे. तेथे एका खोलीला रोजीं नुसत्या राहण्याचें ५००० रु. द्यावे लागतात, खाण्याचा त्या दिवसाचा खर्च पुन्हा वेगळा! विलास व चैनीची राहणी या दृष्टीने साऱ्या युरोपमधे देखील असा देश दाखवतां येणार नाही. पैसा जेथे सतत पाण्यासारखा वाहत असतो असा साऱ्या देशांमधे संपन्न असा हा देश आहे. मी हॉटेलमधे क्वचितच राहतों, बहुतेक कुण्यातरी बडया माणसाचा पाहुणा म्हणूनच येथे माझें वास्तव्य असतें. मी येथे साऱ्यांच्याच अगदी परिचयाचा झालों आहें. सारा देशच मला आता ओळखतो, व यामुळे मी जेथे जेथे जातों तेथे तेथे लोक माझें अगदी खुल्या

दिलाने स्वागत करतात. शिकागो येथे श्री. हेल यांचें घर हेंच माझें राहण्याचें स्थान असतें. मी त्यांच्या पत्नीला आई म्हणूनच संबोधितों व त्यांच्या मुलीहि मला भाऊच म्हणतात. असलें निष्पाप व दयाळू कुटुंब माझ्याहि क्वचितच पाहण्यांत आलें. एरव्ही देव तरी आपल्या कृपेचा त्यांच्यावर काय म्हणून एवढा वर्षाव करता बाबा ? केवढे दयाळू आहेत हे लोक ! एखादा मनुष्य अमुक ठिकाणीं संकटांत आहे असें यांना कळूं द्या, लागलीच सारे स्त्रीपुरुष तेथे जातात, त्याच्या खाण्या-पिण्याची, कपड्यालत्त्याची व त्याला नोकरी मिळवून देण्याची सारी व्यवस्था करून देतात ! आणि नाही तर आपण काय करतों अशा वेळीं तें पाहा !

उन्हाळयांत हे लोक आपलीं घरें सोडून परदेशीं वा समुद्र-किनारीं जाऊन राहतात. जाणार तर मीहि आहें, पण कुठे जायचें तें कांही अद्याप मीं निश्चित केलेलें नाही. अन्य बाबतींत ते इतर सर्व-साधारण इंग्लिश लोकांप्रमाणेच आहेत. पुस्तकें वगैरे त्यांच्या साऱ्या वस्तु असतात तसल्याच प्रकारच्या; पण फार महाग असतात येवढाच काय तो फरक. इथल्या किंमतींत कलकत्त्यांत त्याच वस्तु निदान पांच-पट तरी अधिक मिळतील. परदेशांतून कुठल्याहि मालाची आपल्या देशांत हे लोक आयात होऊं देत नाहीत हाच याचा अर्थ. परदेशांतून येणाऱ्या मालावर हे लोक फार जबरदस्त आयातकर बसवितात, याचा परिणाम होऊन बाजारांत या मालाच्या किंमती खूप वाढतात. दुसरें असें की कापडचोपड तयार करण्याच्या हे लोक फारसे भानगडींतच पडत नाहीत. अवजारें, यंत्रसामुग्री बनविणें व तांदूळ, गहू, कापसाची पैदास करणें हेंच या लोकांचें काम; आणि या वस्तु इकडे मिळतातहि स्वस्त.

. . .केळीं, लिंबें, पेरू, सफरचंदें, बदाम, किसमिस, द्राक्षें वगैरे फळेंफळावळ इकडे खूप मिळते. यांच्याच जोडीला भरीस भर कॅलि-फोर्नियांतूनहि खूप फळें येतात. अननस तर खूप मिळतात इथे, पण आंबे किंवा लिचूसारखीं फळें इकडे मुळीच दिसत नाहीत.

इकडे 'स्पिनॅक' नांवाची एक पालेभाजी मिळते. शिजवून ती अगदी आपल्या बंगालकडील 'नोटे' (राजगिरा) नामक पालेभाजीसारखी लागते.

ॲस्पॅरगॅस् म्हणून दुसरी एक इकडील भाजी थेट आपल्या कोवळ्या 'डेंगो'च्या देठीप्रमाणे लागते. फरक इतकाच की ती घालून 'चडचडी' कांही करतां येत नाही. उडीद किंवा इतर कोणत्याहि डाळी तर इकडे नाहीतच. असल्या वस्तु असल्याचेंहि इकडच्या लोकांना माहीत नाही. येथे विशेष प्रचार आहे भाताचा, पावांचा अन् नाना प्रकारच्या मांसाच्या व माशांच्या पदार्थांचा. यांचें खाणें फ्रेंचांप्रमाणे असतें. दूध असतें, दही क्वचितच; 'व्हे' मात्र भरपूर. साय मात्र नित्य वापरांतील वस्तु. चहांत, कॉफींत, अगदी सर्वत्र ही साय (cream) सापडेल तुम्हांला. दूध खूप तापविल्याने येते तशी मात्र नसते ही साय. लोण्याचाहि वापर खूप असतो. दिवस असो रात्र असो, उन्हाळा असो हिवाळा असो, तुम्हांला सर्दी झाली असो वा ताप असो, कसल्याहि परिस्थितींत बर्फाचें पाणी मात्र खूप वापरतात. हे सारे आहेत वैज्ञानिक वृत्तीचे लोक. बर्फाने सर्दीपडसें वाढतें असें म्हटल्यास ते हसतात. बर्फ जितकें उपयोगांत आणाल तितकें चांगलें असें त्यांचें म्हणणें. नाना प्रकारच्या आणि नाना आकारांनी सजवलेल्या आइसक्रीमला तर कांही तोटाच नाही.

नायगाराचा धबधबा मीं सात-आठदा पाहिला. हरीची इच्छा! आहे खूपच भव्य. पण आपण त्याबद्दल जितकें ऐकतों तितका कांही तो मला भव्य वाटला नाही. हिवाळ्यांत एकदा 'ऑरोरा बोरिएलिस' (उत्तर ध्रुवानजीकच्या भागांत आकाशांत दिसणारा एक विशिष्ट प्रकारचा प्रकाश) पाहिला.

...एव्हाना योगेन खडखडीत बरा झाला असेल अशी आशा आहे. सारदाची भटकी वृत्ति अद्याप कांही शमली नाही असें दिसतें. संघबद्ध होण्याची क्षमता यायला हवी, आलें ध्यानांत? तुमच्यापैकी कुणाच्या तरी टाळक्यांत तितकी अक्कल आहे का? असल्यास करून दाखवा पाहूं. तारकदादा, शरद आणि हरि हें कार्य करूं शकतील. शशीमधे कल्पकता मुळांतच कमी आहे पण तो चिकाटीने काम करणारा माणूस आहे. या गुणांची खूप आवश्यकता आहे; प्रत्यक्ष काम कसें चालवावें हेंहि चांगलें जाणतो तो. बाकीच्या सगळ्यांनी हे जसें सांगतील तसें वागावें. आपल्याला ज्वलंत उत्साही अशा कांही तरुण

शिष्यांची आवश्यकता आहे, ते बुद्धिमान असावेत, धीट असावेत-- मृत्यूच्या जबड्यांत उडी घेण्याची त्यांची तयारी असावी, सागर तरून जाण्याची देखील त्यांना भीति नसावी. आपल्याला असे शेकडो स्त्री-पुरुष हवे आहेत, आलें ध्यानांत ? हेंच एक उद्दिष्ट आता डोळ्यापुढे असूं द्या. आटोकाट प्रयत्न करून असे कांही लोक जमवा आणि पवित्र बनविणाऱ्या आपल्या सांच्यांत त्यांना टाकून द्या.

तुम्हांला फुटक्या कवडीचीहि अक्कल नाही बघा---श्रीरामकृष्ण नरेंद्रबद्दल असें म्हणत, तसें म्हणत हें सारें आणि इतर भाकडकथा 'इंडियन मिरर' पत्राला कळविण्याची गरजच काय होती तुम्हां लोकांना? जसें कांही दुसऱ्यांचे विचार ओळखणें व असलेच चमत्कार करीत राहणें यापरतें त्यांना दुसरें कांही कामच नव्हतें ! . . . सन्याल तुम्हांला वारंवार भेटतो हें फार बरें. तुम्ही गुप्ताला पत्रें लिहितां काय ? त्याची काळजी घ्या व त्याला माझा सस्नेह आशीर्वाद कळवा. हळूहळू साऱ्या गोष्टी ठीक होऊन जातील. ढीगचे ढीग पत्रें लिहिण्याला मला सवड नाही. व्याख्यानांसाठी मी कांही आधीपासून तयारी करून ठेवीत नसतों. तुम्हीं जें छापून काढलें आहे तेवढें एकच भाषण मीं आधी लिहून काढलें होतें. बाकीचीं सारीं भाषणें म्हणजे राहिलों उभा आणि लागलों बोलायला. गुरुदेव माझ्या पाठीशीं आहेत ! पांढऱ्यावर काळें करत बसण्याची मला कांही गरज भासत नाही. डेट्रॉइट् येथे एकदा तर मी सतत एकसारखा तीन तास बोलत होतों. अनेकदा तर असलें अघटित कर्तृत्व पाहून माझें मलाच आश्चर्य वाटतें. आपल्या डोक्यांत एवढी विद्या आहे हें पाहून माझा मीच स्तंभित होतों ! इथल्या लोकांनी, मीं पुस्तक लिहावें म्हणून माझ्यामागे सारखा लकडा लावला आहे, आणि मला स्वतःलाहि पटतें की असें कांहीतरी करण्याची वेळ आता निश्चित आली आहे. पण अंग मोडून दौत, टांक, कागद घेऊन लिहावयाचें म्हटलें की अंगावर कांटा उभा राहतो ! मोठी कटकट वाटते, कोणीं करावी एवढी भानगड ! ! . . .

साऱ्या समाजांत, साऱ्या जगांत आपण विद्युत्शक्तीचा संचार करायला हवा. रिकाम्या गप्पा करण्याने किंवा नुस्ती घंटा वाजवीत बसण्याने कांहीहि साधणें शक्य नाही. . . . तुमचें काम आहे विचारस्रोत प्रसृत करण्याचें. हें जर तुम्हांला साधलें तर साऱ्या गोष्टी ठीक होऊन

जातील....

चारित्र्य घडवा. तसें झालें की मी तुमच्यांत आलोंच म्हणून समजा. स्त्री-पुरुष मिळून आपल्याला दोन हजार, दहा हजार, नव्हे वीस हजार संन्याशांची आवश्यकता आहे. गौर मा, योगेन मा, गोलाप मा वगैरे श्रीरामकृष्णांच्या स्त्रीभक्त काय करीत आहेत ? मी म्हणतों तशा शिष्यांची आपल्याला अत्यंत निकडीची गरज आहे असें त्यांना सांगा व तुम्हीदेखील असे शिष्य मिळविण्याचा मनापासून प्रयत्न करा. आपल्याला निकड आहे संन्यासी शिष्यांची, गृहस्थ शिष्यांची नव्हे. तुमच्यापैकी प्रत्येकाने निदान शंभर जणांचें तरी मुंडन करवून त्यांना शिष्यवर्गात सामील करून घेण्याचा प्रयत्न करायला हवा. जे लोक निवडाल ते मात्र चांगले शिकलेसवरलेले असायला हवेत--बुद्दू नसावेत, हें मात्र विसरूं नका ! तरच तुमची कांही बहादुरी. आपल्याला अगदी जोरदार धामधूम माजवून द्यायची आहे. तेव्हा कंबर कसून सिद्ध व्हा. नुसतें पडून राहण्याची अजगरवृत्ति सोडा आता. तारकदादा, विद्युत्-प्रवाहाप्रमाणे मद्रास ते कलकत्ता कित्येक चक्कर लावा बघूं. ठिकठिकाणीं केंद्रें उघडा, सारखे शिष्य करीत राहा. जे कुणी तुमच्याकडे येतील--मग ती स्त्री असो वा पुरुष --त्यांची तशी इच्छा असल्यास त्यांना तुम्ही संन्यासी बनवा. असें झाल्यावरच मी आनंदाने तुमच्यांत सामील होईन. एक प्रचंड आध्या-त्मिक शक्तीचा स्रोत तुफान वेगाने येत आहे, जे हीनदीन असतील ते या प्रवाहांत महान् होऊन जातील आणि जे अज्ञ असतील ते प्रभुकृपेने पंडितांचेहि आचार्य बनतील. 'उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत'-- उठा, जागे व्हा आणि जोंपर्यंत ध्येय प्राप्त होत नाही तोंपर्यंत थांबूं नका.

विकास म्हणजेच जीवन, संकोच हाच मृत्यु. आपल्याच चैनीसाठी, आपल्याच सुखासाठी उसासत राहून आळसांत जीवन घालविणाऱ्या स्वार्थी माणसाला नरकांतमुद्धा स्थान नाही. ज्याच्या ठिकाणीं जीव-मात्राविषयी एवढी करुणा असते की त्यांच्यासाठी तो नरकांत देखील जाण्यास तयार असतो व जो त्यांचें दुःख हलकें करण्यासाठी वाटेल ते कष्ट झेलून प्रयत्न करतो तोच श्रीरामकृष्णांचा पुत्र म्हणवून घेण्याचा

अधिकारी आहे,--इतरे कृपणाः--बाकी सारे हीनबुद्धीचे आहेत असें समजा. जो कोणी या अत्यंत मंगल संधिक्षणीं कमर कसून उभा राहील आणि दारोदार, खेडोपाडीं त्यांची वाणी पोहोचवील तोच माझा खरा बंधु--तोच श्रीरामकृष्णांचा खरा पुत्र. . . .श्रीरामकृष्णांचे जे पुत्र आहेत ते स्वतःच्या भल्याची कधीहि पर्वा करणार नाहीत, हीच त्यांची खरी कसोटी आहे. प्राणात्ययेऽपि परकल्याणचिकीर्षवः--आपले प्राण समर्पण करूनहि ते परकल्याण साधतील. जे कोणी वैयक्तिक सुखाच्या मागे लागून आळशी जीवन जगूं पाहत असतील, जे आपल्या लहरी-समोर इतर कुणाचीहि फिकीर करीत नसतील त्यांचा आपला काडी-चाहि संबंध नाही, शक्य तों लवकर त्यांनी आपल्यांतून चंबूगवाळें उचलावें हें बरें. श्रीरामकृष्णांच्या आदर्श चारित्र्याचा, त्यांच्या शिकवणुकीचा, त्यांच्या धर्माचा चोहोकडे प्रचार करा. हेंच साधन आहे, हेंच पूजन आहे, हीच साधना आहे आणि हीच सिद्धि आहे. उठा, उठा! एक महाप्रचंड शक्तिस्रोत येत आहे. पुढे व्हा! आचांडाल सारेच स्त्री-पुरुष त्यांच्या दृष्टीने पवित्र आहेत, पुढे चला! पुढे चला! नांवलौकिक अथवा मुक्ति-भक्ति यांच्यासाठी अडून राहा-यला सवड आहेच मुळी कुणाला? या साऱ्यांचा पुढे फुरसतीच्या वेळीं विचार करूं. हें जीवन तरी निदान त्यांच्या महान् चारित्र्याच्या, त्यांच्या महान् जीवनाच्या, त्यांच्या अनंत आत्म्याच्या असीम प्रचारा-साठीच वेंचूं आपण. केवळ हेंच आपलें कर्तव्य आहे, दुसरें कांही नाही. जिथे त्यांचें नांव जाईल तिथला जंतु देखील देवता होऊन जाईल, नव्हे प्रत्यक्ष होतोच आहे; पण तें बघायला डोळे आहेत का तुम्हांला? तुम्हांला नाही का दिसत हें सारें? हा कांही पोरखेळ नाही. ही कांही नुसती बडबड नाही. ही कांही थट्टा नाही. उत्तिष्ठत जाग्रत--उठा, जागे व्हा. प्रभु, प्रभु! ते आपल्या पाठीशीं उभे आहेत. यापेक्षा मी कांही अधिक जास्त लिहूं शकत नाहीं--पुढे चला. फक्त एवढेंच मी सांगतों की जो कुणी माझें हें पत्र वाचील त्याच्या हृदयांत माझे हे भाव संचरतील. विश्वास ठेवा. पुढे व्हा. प्रभु, प्रभु! . . .माझा हात धरून जबरदस्तीने कुणी तरी हें मला लिहायला भाग पाडत आहे असें माझ्या अनुभवास येत आहे. प्रभु, प्रभु!--पुढे चला. सर्वांना या प्रवाहांत

वाहावें लागेल---सावधान---ते येताहेत. जे कोणी त्यांच्या सेवेसाठी---त्यांच्या सेवेसाठी नव्हे, तर त्यांच्या संतानांच्या---दीनहीनांच्या, पतितांच्या, जीवजंतूंच्या सेवेसाठी तयार होतील, त्यांच्या ठिकाणीं ते आविर्भूत होतील. अशांच्या जिभेवर साक्षात् सरस्वती वास करील आणि महाशक्ति महामाया त्यांच्या हृदयीं विराजमान होईल. जे कुणी नास्तिक, अश्रद्ध, निस्सार आणि विलासी असतील त्यांनी स्वतःला आमच्यापैकी कशाला म्हणवून घ्यावें? . . . मी आणखी कांही लिहूं शकत नाहीं, बाकी सारें ते स्वतःच सांगोत.

ता. क.---. . .'संघटना' म्हणजे श्रमविभाग. प्रत्येकजण कर्माचा आपापला भाग उचलतो आणि हे सर्व भाग मिळून समन्वयाचा आदर्श प्रकट होतो. . . .

तुमचाच
नरेंद्र

## (७) *

( स्वामी रामकृष्णानंद यांना )

श्री. जॉर्ज डब्ल्यु. हेल यांचें घर
५४१, डिअरबोर्न ॲव्हेन्यु शिकागो,
१८९४

प्रिय शशी,

तुमचें पत्र मिळाल्याने फार आनंद झाला. मजुमदारांच्या लीला ऐकून मनाला फार वाईट वाटलें. दुसऱ्यांना मागे लोटून स्वतःच पुढे जाण्याच्या खटपटींत माणूस नेहमी असाच वागतो. माझा त्यांत कांही अपराध नाही. मजुमदार दहा वर्षांपूर्वी जेव्हा इकडे आले होते तेव्हा त्यांचा खूप सन्मान व नांव झालें होतें; आता ती पाळी माझी आहे. गुरुदेवांची तशी इच्छा दिसते, त्याला मी काय करूं? मजुमदारांनी येवढ्याचसाठी डोक्यांत राख घालून घेणें म्हणजे शुद्ध पोरकटपणा

आहे. पण फिकीर करण्याचें कांही कारण नाही. उपेक्षितव्यं तद्वचनं भवत्सदृशानां महात्मनाम् । अपि कीटदंशनभीरुकाः वयं रामकृष्णतनयाः तद्हृदयरुधिरपोषिताः । 'अलोकसामान्यमचिन्त्यहेतुकं निन्दन्ति मन्दाश्चरितं महात्मनाम्' इत्यादीनि संस्मृत्य क्षन्तव्योऽयं जाल्मः । (तुमच्यासारख्या थोरामोठ्यांनी त्यांच्या शब्दांकडे लक्षच देऊं नये. रामकृष्णांच्या हृदयाच्या रक्ताने पोसल्या गेलेल्या त्यांच्या संतानांनी असल्या किड्याकिटकुल्याच्या चावण्याने भिऊन जावें काय ? 'मूढ लोक थोरांच्या लोकविलक्षण व अचिंत्य हेतूने केलेल्या आचरणावर नेहमीच टीका करीत असतात' ही कविकुलगुरु कालिदासाची उक्ति लक्षांत घेऊन असल्या क्षुद्र मनाच्या लोकांना क्षमाच करायला हवी.) येथील लोकांची अंतर्दृष्टि उघडावी अशी ईश्वराचीच इच्छा दिसते. ईश्वराच्या शक्तीला पायबंद घालण्याची मग कुणाची बिशाद आहे ? नांवलौकिकाची मला मातब्बरी नाही—I want to be a voice without a form (मीं निराकार वाणी व्हावें असें मला वाटतें.) माझी बाजू मांडून कुणीं माझें समर्थन करावें याची मला जरूर नाही. कोऽहं तत्पादप्रसरं प्रतिरोद्धुं समर्थयितुं वा, के वा अन्ये हरमोहनादयः ? तथापि मम हृदयकृतज्ञता तान् प्रति. (त्यांचें कार्य चालविणारा वा त्याला बाधा आणणारा मी कोण ? वा हरमोहन इत्यादि अन्य कोणालाहि काय ती क्षमता आहे ? तें कसेंहि असो, त्यांनी जें कांही केलें त्याबद्दल मी हृदयापासून कृतज्ञच राहीन.) 'यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते'—नैषः प्राप्तवान् तत्पदवीमिति मत्वा करुणादृष्ट्या द्रष्टव्योऽयमिति ('जिचा लाभ झाला असतां मोठ्यांत मोठ्या दुःखांच्या आघातानेहि माणूस विचलित होत नाही' त्या स्थितीचा त्याला लाभ झालेला नाही असें समजून त्याच्याविषयी दयादृष्टि ठेवली पाहिजे.) ईशकृपेने नांवलौकिकाची स्पृहा अद्याप माझ्या ठिकाणीं उत्पन्न झालेली नाही; आणि पुढे तर ती उत्पन्न होणेंहि शक्य नाही असें मी निश्चित सांगूं शकतों. मी यंत्र, भगवान् यंत्री. माझ्याद्वारें या दूर असलेल्या भूमींतील हजारो लोकांत ते धार्मिक भाव जागृत करीत आहेत. हजारो स्त्रीपुरुष येथे माझ्याकडे प्रेमाच्या व आदराच्या भावनेने पाहतात.... 'मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम्'—'ते मूक व्यक्तीला वक्ता

करतात आणि पांगळ्यांना पर्वत चढून जाण्याचें सामर्थ्य देतात' हेंच खरें. त्यांची कृपा पाहून मी तर थक्कच झालों आहें. ज्या कुण्या शहरीं मी जातों तेथे खूप धामधूम माजते. येथील लोकांनी मला 'The Cyclonic Hindu'—'तुफानी हिंदु'—असें नांव दिलें आहे. लक्षांत ठेवा, ही सारी प्रभूची इच्छा—I am a voice without a form (मी निराकार वाणी आहें.)

मी इंग्लंडला जाणार का आणखी कुठे, हें एक त्या ईश्वरालाच माहीत. तोच साऱ्या गोष्टी जुळवून आणणार. येथे एका साध्या सिगारेटला एक रुपया पडतो. वाहनांत बसावें तर वेळीं तीन रुपये द्यावे लागतात. एका कोटाला शंभर रुपये; हॉटेलमधे राहावें तर रोजीं नऊ रुपये नुसतें भाडें. साऱ्या गोष्टी प्रभुकृपेने मिळनात म्हणून बरें. येथील मोठमोठे लोक मोठ्या आदराने मला आपल्या घरीं घेऊन जातात आणि माझी सर्व काळजी वाहतात. जय प्रभु! मला तर यांतलें कांही उमजत नाही. 'सत्यमेव जयते नानृतम् सत्येन पन्था विततो देवयानः'—'अखेर सत्याचाच जय होतो, असत्याचा नाही. सत्याच्या बलानेच देवयान मार्ग लाभतो.' आपण अगदी निर्भय असायला हवें. भेकड माणसेंच भिऊन आत्मसमर्थन करीत असतात. माझें समर्थन करण्यासाठी आपल्यापैकी कुणीहि पुढे येण्याची आवश्यकता नाही. मला मद्रास व राजपुताना येथील बातम्या वेळोवेळीं मिळतात. 'इंडियन मिरर'ने वडाची साल पिंपळाला चिटकवून माझी बरीच थट्टा केली आहे—कुणाचें बोलणें कुणाच्या तोंडीं घालून! आणि दादा, अशीहि दृष्टि असूं शकते की जिला सात हजार कोसांवरून पाहणें कांही कठीण नाही. अगदी निखालस सत्य आहे ही गोष्ट. थोडें स्वस्थ राहून पाहा. भगवंताची इच्छाच जर असेल तर साऱ्या गोष्टी यथाकाल उजेडांत येतीलच. त्यांचा (श्रीरामकृष्णांचा) एक शब्द देखील खोटा ठरला नाही. दादा, कुत्र्या-मांजरांचीं भांडणें पाहून माणसें दुःखीकष्टी होतात का कधी? म्हणूनच सामान्य माणसांचीं भांडणें, त्यांच्या ईर्ष्या, द्वेष वगैरे गोष्टी तुम्हीं अजीबात मनाला लावून घेऊं नयेत. आज सहा महिन्यांपासून मी सांगतों आहें—पडदा बाजूला होत आहे, सूर्योदय होत आहे. हळूहळू पण अगदी निश्चितपणें पडदा दूर होत आहे. कालान्तराने

तुमच्या तें लक्षांत येईल. आपल्या मनींचें कुणी सारेंच बोलून दाखवूं शकत नाहीं प्रभु सारेंकांही जाणतात. या गोष्टी कांही लिहून सांगतां येण्यासारख्या नाहीत. माझें पत्र तुमच्याखेरीज दुसरा कुणी न वाचो. सुकाणूवरची तुमची पकड कधी ढिली होऊं देऊं नका, ती अगदी पक्की ठेवा. आपण आपली नाव अगदी बरोबर हाकारीत आहोंत. त्यांत कुठे कसली चूक नाहीं. आता परतीरीं पोहोचणें हा फक्त कालाचाच प्रश्न आहे. बाबा, नेता काय धरूनबांधून तयार करतां येतो? नेतृत्वाचा गुण जन्मजातच असावा लागतो. आलें ध्यानांत मी काय म्हणतों तें? नेतेंपण करणें फार अवघड गोष्ट आहे--'दासस्य दास:'--अनेकांचीं अंतरें राखण्याची कला अंगीं असायला हवी. स्वार्थाचा, द्वेष-मत्सरादिकांचा अगदी समूळ नाश झाल्यावरच खरें नेतेंपण अंगीं बाणतें. प्रथमत: जन्मगुणाने, द्वितीयत: संपूर्ण स्वार्थत्यागाने तें अंगीं बाणतें. सारें ठीक चाललें आहे आणि ठीकच होईल. प्रभुच योग्यप्रकारें जाळें फेकतात अन् योग्य रीतीने परत गुंडाळून घेतात. वयमनुसराम: वयमनुसराम: प्रीति:, परमसाधनम् (आपण फक्त भक्तिपूर्ण अंत:करणाने त्यांनी दाखवलेल्या मार्गाने पुढे व्हायचें. प्रीति हें परमसाधन आहे.)--आलें ना लक्षांत? प्रेमाचाच अंतीं विजय होतो. उतावीळ होऊन कांही काम होणार नाहीं. म्हणून थोडें आस्ते कदम चला. धीर धरला तर यश लाभेलच लाभेल. . . .

माझें तुम्हांला येवढेंच सांगणें आहे गड्यांनो, की जसें चाललें आहे ठीक तसेंच चालूं द्या सारें. कुठला एखादा form (बाह्य आचार) अगदी आवश्यक होऊन बसत नाहीना याकडेच जरा लक्ष असूं द्या. विविधतेंत एकता पाहा--सार्वजनीन भावाला कुठे थोडासुद्धा धक्का लागत नाही ना ह्याची काळजी घ्या. या Universalityसाठी--या सार्वजनीन भावासाठी वेळीं कशाचाहि होम करावा लागला तरी तयारी हवी. मी जगो, मरो; हिंदुस्थानांत माझें येणें होवो, न होवो; हें सार्वजनीनतेचें तत्त्व अगदी पक्कें ध्यानांत ठेवा. अर्थात् आम्ही परमतसहिष्णु आहोंत असें म्हणून भागणार नाही; आपल्या मताइतकेंच अन्य मतहि आपण ग्राह्य व आदरणीय मानायला हवें; आणि हें नुसतें तोंडाने सांगून भागणार नाही, प्रत्यक्ष आचरणाने आपल्याला हें दाखवून द्यावें

लागेल. दुसऱ्यांच्या अधिकारांवर थोडें देखील आक्रमण होत नाहीना याची काळजी घ्या. या असल्याच भोवऱ्यांत सापडून मोठमोठीं जहाजें रसातळाला गेलीं आहेत. एककल्लीपणाचा भाग काढून टाकलेली आदर्श स्वरूपांतील पूर्ण भक्ति आपल्याला लोकांपुढे प्रत्यक्ष आचरणाने ठेवावयाची आहे. त्यांच्याच कृपेने साऱ्या गोष्टी ठीक होऊन जातील. सगळ्यांचें कसें काय चाललें आहे तें लिहा. . . .प्रत्येकाला हाव असते नेतेपणाची. पण खरा नेता जन्मावा लागतो हें लक्षांत न घेतल्यानेच पुढचे सारे घोटाळे निर्माण होतात. . . .

स्त्रीभक्तांपैकी सर्वजणी कुशल आहेत ना? गौर मा कुठे आहे? अशा उदात्त व स्फूर्तिदायी चारित्र्याच्या हजारो 'गौर मां'ची आपल्याला आवश्यकता आहे. . . .आपण आपलें दार सर्वांसाठीच खुलें ठेवायला हवें. आपल्यासारखाच व आपल्याइतकाच विश्वास साऱ्यांचा श्रीरामकृष्णांबद्दल असायला हवाच असें नाही. आपला उद्देश आहे साऱ्या अशुभ शक्तींविरुद्ध लढण्यासाठी सर्व शुभ शक्तींना एकत्र आणणें. . . .आपण संन्यासी आहोंत हा अभिमान वाहणें हा संन्याशांचा दोष आहे. साधकजीवनाच्या सुरवातीला फार तर तसें वाटणें साहाय्यक ठरेल, पण परिपक्व झाल्यावर सतत हीच भावना बाळगण्याची कांहीच गरज नाही. हा गृहस्थ, हा संन्यासी ही भेदभावना संपूर्ण मावळायला हवी. जो असें करील त्यालाच यथार्थ संन्यासी मानतां येईल.

. . .हातीं एक फुटकी कवडी नसतांना पांचसात मुलांनी सुरू केलेली चळवळ आज जी या स्वरूपांत मोठ्या वेगाने फोफावत आहे तिला काय थोतांड म्हणायचें ?—की ही प्रभूची इच्छा ? ही जर प्रभूची इच्छा असेल तर व्यक्तिगत मत्सर, गटबाजी या साऱ्यांना तिलांजलि द्या आणि एकोप्याने कामाला लागा. गटबाजी करून सार्वजनीन धर्माचा प्रचार करतां येणें शक्य नाही. . . .

एक दिवस, एक क्षणच का होईना पण साऱ्यांच्या लक्षांत जर येईल की नुसती इच्छा केल्याने कांही कुणाला मोठेंपण मिळत नाही—भगवान ज्याला थोर पद देतात तोच थोर होतो व ते ज्याचा आधार काढून घेतात तो खाली पडतो—तर मला वाटतें सर्व भानगडी आपोआप मिटतील. पण अहंकार म्हणून कांही वस्तु आहेच ना. पारखून

पाहिलें तर नुसता पोकळ वासा. इकडची काडी कांही तिकडे करतां येत नाही त्याच्या आधारावर. 'मी कुणालाहि पुढे जाऊं देणार नाहीं' असें अहंकाराने म्हणणेंच किती हास्यास्पद ! मत्सर, आपसांतील फूट, एकोप्याचा अभाव वगैरे गोष्टी म्हणजे गुलाम देशाचा स्वभावच होय. हे सारे दोष आपण पूर्णपणें टाकून द्यायला हवेत, हा मत्सर आपलें एक वैशिष्टयच होऊन बसला आहे. . . .इतर कांही देश जर तुम्ही चोखंदळ-पणें पाहाल तर ही गोष्ट तुमच्या लक्षांत येईल. या बाबतींत आपलें साम्य जर कुणाशीं असेल तर तें नुकत्याच गुलामगिरींतून मुक्त झालेल्या येथल्या निग्रोंशींच आहे. त्यांच्याचपैकी जरी कुणी थोडा पुढे गेला तर ते लागलीच गोऱ्यांशीं हातमिळवणी करून अखेर त्याला नेस्तनाबूत करून टाकण्याचा कसून प्रयत्न करतात. . . .

केवढीहि किंमत देऊन, काय वाटेल तो त्याग करून कोणत्याहि परिस्थितींत आपण हा दोष आपल्यांत शिरूं देतां कामा नये. आपण दहा आहोंत की दोघेच आहोंत हा प्रश्न नाही. पण जे कोणी आपल्या-बरोबर असतील त्यांचें चारित्र्य अगदी आदर्श असायला हवें. . . .'माँगो भलो न बाप से, रघुवर राखे टेक.' (रघुवीर जर आपली बाजू राखणारा असेल तर बापाजवळहि कांही मागण्याची गरज नाही.) रघुवीर खरो-खरच आपली बाजू राखील, या बाबतींत तुम्ही अगदी निश्चिन्त असा. . . .राजपुताना, पंजाब, संयुक्त प्रांत, मद्रास वगैरे प्रांतांत त्यांच्या नांवाचा प्रचार करावयास हवा. राजपुतान्यांत तर करावयास हवाच, कारण तेथे 'रघुकुलरीति सदा चलि आई। प्राण जाइ पर वचन न जाई' अशा नेकीने वागणारे लोक अद्यापहि आहेत.

उडतां उडतां पक्षी अशा ठिकाणीं पोहोचतात की तेथून अगदी निश्चित व शांत मनाने त्यांना खालील भूमीकडे पाहतां येतें. तुम्ही पोहोचलां आहांत कां अशा जागीं ? जे अशा स्थानीं पोहोचले नसतील त्यांना दुसऱ्यांना उपदेश करण्याचा अधिकारच नाही. हातपाय ढिले सोडून या प्रवाहांत स्वतःला सोडून द्या--तुम्ही निश्चित गंतव्य स्थानीं पोहोचाल.

मीं येथला हिवाळा तर काढला, आता थंडी हळूहळू कमी होत आहे. येथे हिवाळयांत अंगांत अगदी विद्युत्संचार झाल्याप्रमाणे वाटतें.

हस्तांदोलन करतांना विजेचा धक्का बसतो, आवाज देखील ऐकू येतो. नुसतीं बोटें घासून देखील गॅस पेटवतां येईल. या हिवाळ्याबद्दल मीं बरीच माहिती तुम्हांला अगोदर कळवलीच आहे. मी सारा देश पालथा घालतों आहें, पण माझें काम आटोपलें की मी शिकागोकडे धांव घेतों. शिकागो जणु माझा 'मठ.' मीं आता पूर्व दिशेकडे मोर्चा वळविण्याचें ठरविलें आहे. ही नौका आता कोणत्या किनाऱ्याला लागणार हें एक परमेश्वरालाच ठाऊक....

दासूचा तुमच्यावरील लोभ तसाच कायम आहे ना? तो तुमच्याकडे वारंवार येतो की नाही? भवनाथचें ठीक आहे ना? तो काय करतो सध्या? तुम्ही त्याच्याकडे जातां की नाही? त्याला आदराने वागवतां की नाही? संन्यासी व गृहस्थ यांच्यांतील भेद ही एक शुद्ध भाकडकथा आहे बाबा. 'मूकं करोति वाचालं'--हें लक्षांत ठेवायला हवें बाबारे! कुणाच्या आंत काय आहे हें ओळखणें ही वास्तविक अत्यंत कठीण गोष्ट आहे. श्रीरामकृष्ण त्याच्याबद्दल फार गौरवाने बोलत, म्हणूनच तो आपल्याला आदरणीय आहे. इतकें ऐकून व पाहूनसवरूनहि जर तुमचा विश्वास बसत नसेल तर धिक्कार असो तुम्हांला! भवनाथचें तुमच्यावरील प्रेम कायम आहे ना? मीं प्रेमाने व आन्तरिक श्रद्धेने त्याची चौकशी केल्याचें त्याला कळवा. कालीकृष्णबाबू अत्यंत थोर आहेत, त्यांना मीं प्रेमाने आठवण केल्याचें सांगा. रामलालचें कसें काय चाललें आहे? त्याच्या ठिकाणीं थोडीफार तरी श्रद्धाभक्ति आहे की नाही? त्याला माझा सप्रेम नमस्कार सांगा. संन्याल घाणीभोवती ठीक फिरतो आहे म्हणावयाचें? त्याला साऱ्या गोष्टी जरा दमाने घ्यायला सांगा--अशाने ती घाणी आपोआप ठीक चालेल.

सर्वांना माझा अंतःकरणपूर्वक आशीर्वाद.

तुम्हां सर्वांवर सदैव प्रेम करणारा
तुमचाच
नरेंद्र

ता. क.--माताजींना * त्यांच्या ह्या जन्मोजन्मींच्या दासाचे

* भगवान श्रीरामकृष्णांच्या लीलासहधर्मिणी--श्रीसारदादेवी.

पुनःपुन्हा साष्टांग प्रणाम सांगा--त्यांच्या आशीर्वादाने माझें सर्वथैव मंगल आहे.

## (८)*

( स्वामी अखंडानंद यांना )

ॐ नमो भगवते रामकृष्णाय

१८९४

प्रिय गंगाधर,

तुझें पत्र मिळाल्याने फार आनंद झाला. खेतरीला राहिल्याने तुझ्या प्रकृतींत बरीच सुधारणा झाली हें वाचून फार बरें वाटलें.

तारकदादांनी मद्रासकडे बरेंच काम केलें. खूप आनंद व्हावा अशीच बातमी आहे ही! मद्रासच्या मंडळींकडून त्यांची खूपच तारीफ ऐकली. . . .

राजपुतान्यांत ठिकठिकाणीं तेथील ठाकुर मंडळींत आध्यात्मिकता व परहित करण्याची भावना ह्या दोन्ही गोष्टी वाढीस लावण्याचा प्रयत्न करा. आपल्याला कार्य करावयाचें आहे, आणि हें नुसतें बसून कांही साधणार नाही. मलसीसर, अलसीसर आणि आणखी जे 'सर' तिथे असतील तिथे आलटून पालटून जात जा. अगदी प्रयत्नपूर्वक संस्कृतचा व इंग्रजीचा अभ्यास करा. गुणनिधी पंजाबमधे असावा अशी माझी समजूत आहे. मीं मोठ्या प्रेमाने त्याची चौकशी केल्याचें त्याला कळवून त्याला खेतरीला आणा. त्याच्या मदतीने संस्कृत शिका आणि त्याला इंग्रजी शिकवा. कसेंहि करून त्याचा पत्ता मात्र मला कळवाच. . . .

खेतरींत जे कुणी गरीब आणि खालच्या जातींतील लोक असतील त्यांच्या दारीं जा आणि त्यांच्यांत धर्मप्रचार करा. याबरोबरच भूगोला-सारख्या विषयांचें त्यांना तोंडीं ज्ञान देण्याचा प्रयत्न करा. प्रत्यक्ष अंग मोडून गरिबांसाठी जोंवर तुम्ही कांही करीत नाही तोंवर पंचपक्वान्नावर

ताव मारीत तोंडाने नुसते 'रामकृष्ण, प्रभो दयाळ!' म्हणून आळसाने काळ घालविल्यास कांहीहि साधणार नाही. वेळोवेळीं खेडोपाडीं जाऊन तेथील लोकांनाहि जीवनोपयोगी विद्या व धर्म या दोन्ही गोष्टी शिकवा. कर्म, उपासना व ज्ञान—प्रथम कर्म केल्याने चित्तशुद्धि साधेल, एरव्ही पवित्र अग्नींत आहुति टाकावयाचें सोडून राखेच्या ढिगाऱ्यावरच हवन केल्याप्रमाणे साऱ्या गोष्टी व्यर्थ जातील. गुणनिधि आल्यावर राजपुतान्यांतील खेडोपाडीं हिंडून गोरगरीबांच्या दारोदारीं जा. तुमच्या खाण्यापिण्याबाबत जर लोकांनी हरकत घेतली तर तशा प्रकारचें खाणेंपिणें तुम्ही ताबडतोब बंद करा. परकल्याणभावनेने काम करतांना नुसतें गवत खाऊन जरी राहण्याची वेळ आली तरी तें चांगलें. भगवें वस्त्र हें कांही भोगासाठी नाही. महत्कार्याचें तें निशाण आहे. देह-मन-वाणी हीं 'जगद्धिताय' अर्पण केलीं पाहिजेत. 'मातृ देवो भव, पितृ देवो भव' असें आजवर तुम्हीं वाचलें, पण मी सांगतों 'दरिद्र देवो भव, मूर्ख देवो भव'—दरिद्री, मूर्ख, अज्ञ, दुःखी हेच तुमचे देव होवोत. यांची सेवा म्हणजेच परम धर्म, ही गोष्ट जाणून असा. तुम्हांला माझा सप्रेम आशीर्वाद.

तुमचा
विवेकानंद

## (९)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

५४१, डिअरबोर्न ॲव्हेन्यु,
शिकागो,
१८९४

प्रिय आलासिंगा,

तुमचें पत्र आताच मिळालें....तुम्हांला पाठविलेला मजकूर प्रसिद्ध करावयास सांगण्यांत मी चुकलों. ही माझी एक भयंकर चूक

झाली. यावरून माझ्या हृदयाचा क्षणिक दुबळेपणाच दिसून येतो. दोन-तीन वर्षे व्याख्यानें देऊन या देशांत पैसा उभा करतां येईल. या दिशेने मीं थोडाफार प्रयत्नहि केला. बहुतेक ठिकाणीं माझ्या कार्याचा गौरवहि झाला, पण मुळांतच ही गोष्ट मला मानवत नाही. खालच्या पातळीवर उतरावें लागतें यामुळे. . . .

भारतांतील वर्तमानपत्रांमधील टीका व त्याबाबत तुमचें म्हणणें हीं दोन्हीं मीं वाचलीं. या गोष्टी अगदी स्वाभाविकच आहेत. मत्सर हा गुलामांचा सर्वांत मोठा दोष असतो. आणि मत्सर व एकीचा अभाव यांनूनच गुलामी उत्पन्न होत असते आणि स्थायी बनत असते. मी म्हणतों हें किती सत्य आहे याची कल्पना हिंदुस्थानांतून बाहेर पडल्या-खेरीज तुम्हांला येणें शक्य नाही. परस्परावर विश्वास आणि परस्परांचें गुण ग्रहण करण्याची वृत्ति यांवर आधारलेली एकजुटीची शक्ति हीच पाश्चात्त्यांच्या यशस्वी जीवनाची गुरुकिल्ली आहे. देश जितका दुबळा व भित्रट तितका हा मत्सररूपी दोष तेथे अधिक प्रकट होतो. . . .पण वत्सा, गुलामापासून तुम्ही कशाचीहि अपेक्षा ठेवूं नये. परिस्थिति प्रायः निराशाजनक असली तरी तुम्हां सर्वांसमोर मला ती स्पष्टपणें मांडूं द्या. ज्यांची नैतिक उच्चाकांक्षा मरून गेली आहे, भावी उन्नतीसाठी जे मुळीच प्रयत्न करीत नाहीत, जे आपल्या उपकारकर्त्यावरच उलटायला मागेपुढे पाहत नाहीत, अशा या मृतवत् लोकांत तुम्ही कांही चैतन्य निर्माण करूं शकाल काय ? नाठाळ मुलाच्या छातीवर बसून त्याच्या भल्यासाठी त्याच्या नरड्यांत औषध ओतणाऱ्या वैद्याची भूमिका तुम्ही घेऊं शकाल काय ? . . .आपलाच देशबांधव जर परदेशीं भेटला तर अमेरिकन वा युरोपियन माणूस नक्कीच त्याच्या साहाय्याला धावून जाईल. परंतु . . .

'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन'—तुम्हांला कर्म करण्याचा अधिकार आहे, पण फलाचा नाही. या गोष्टीची मी पुन्हा एकदा तुम्हांला जाणीव करून देतों. एखाद्या मजबूत खडकाप्रमाणे अविचल असायला हवें. 'सत्यमेव जयते.' श्रीरामकृष्णांचे शिष्य निष्कपट व सत्यनिष्ठ राहोत, म्हणजे सर्वकांही ठीक होऊन जाईल. याचें फल पाहण्याला कदाचित् आपण असणार नाहीं, पण लौकर म्हणा की उशीरा

म्हणा, याचें फल प्राप्त होणार हें निश्चित. साऱ्या राष्ट्राच्या नसांतून नवचैतन्य खेळण्यासाठी भारतांत नव-विद्युत्संचार व्हायला हवा आहे. असलीं कार्यें नेहमीच हळूहळू होत असतात आणि केव्हाहि हळूहळूच होतील. फलाकांक्षा सोडून काम करा, आणि मुख्य गोष्ट ही की, स्वत:शीं कुठल्याहि प्रकारची प्रतारणा करूं नका. पावित्र्य, दृढता आणि निष्कपटता हीं पूर्णपणें अंगीं बाणवा. साऱ्या गोष्टी अशानेच ठीक होतील. श्रीरामकृष्णांच्या शिष्यांतील कोणता एक गुण जर लक्षांत येण्यासारखा असेल तर तो म्हणजे निष्कपट कळकळ. अशा प्रकारचे शंभर लोक तयार करून त्यांना भारतांत कार्यप्रवृत्त करूं शकलों तरी माझें कार्य झालें असें समाधान लाभून मी सुखाने मरूं शकेन. अजाण लोक काय वाटेल ती मूर्खपणाची बडबड करोत, पण सत्य काय तें एक तो परमेश्वरच जाणे. आम्ही कुणाला मदतीसाठी आवाहन करीत नाहीं किंवा कुणी मदत केली तर तिचा अव्हेर करीत नाहीं. आम्ही त्या परमेश्वराचे दास आहोंत. क्षुद्र लोकांनी केलेल्या या माकडचेष्टांची आपण दखलहि घ्यायला नको. पुढे चला. शतकानुशतकांच्या प्रयत्नांनी चारित्र्य घडत असतें. निराश होऊं नका. सत्याचा एक शब्दहि कधी वाया जात नाही. शतकानुशतकें जरी तें सत्य मातीच्याखाली पडून राहिलें तरी एक ना एक दिवस तें प्रकट होईलच. सत्य, सद्‌गुण व पावित्र्य या गोष्टी अविनाशी आहेत. मला शेकडो अनुयायी नको आहेत; मला एकच पण खरा, अगदी सच्चा माणूस हवा आहे. वत्सा, दृढनिश्चय कायम असूं दे. कुणाच्या मदत करण्या न करण्याची फिकीर बाळगूं नकोस. सर्व मानवी मदतीपेक्षा ईश्वर अनंतपटीने श्रेष्ठ नाही काय ? पावित्र्य अंगीं बाणव, ईश्वरावर दृढ श्रद्धा असूं दे, सर्वदा त्याच्यावर अवलंबून राहा. मग तुझें सारें ठीक होऊन जाईल. तुझें मग कुणीहि कांही अनिष्ट करूं शकणार नाही. . . .

'तमसो मा ज्योतिर्गमय'—हीच आपली प्रार्थना असो. याहि अंधारांतून आशेचा किरण दिसेलच दिसेल. यांतूनच आपल्याला मार्गदर्शन करण्यासाठी त्यांचा हात पुढे येईल. माझी तर तुमच्यासाठी सततची प्रार्थना आहे, तुम्हीहि माझ्यासाठी प्रभूची करुणा भाका. दारिद्र्य, पुरोहितबाजी आणि अत्याचार यांनी पीडित झालेल्या कोटयवधि

भारतीय पददलितांसाठी आपल्यापैकी प्रत्येकाने रात्रंदिवस प्रार्थना करावयास हवी. संपन्न वा उच्च वर्गीयांपेक्षा यांनाच धर्म शिकवावा अशी माझी इच्छा आहे. मी दार्शनिक नाहीं, तत्त्वज्ञ नाहीं, व संतहि नाहीं. मी गरीब आहें आणि गरिबांबद्दल मला प्रेम वाटतें. या देशांत गरीब म्हणजे कोण तें मीं पाहिलें आहे, आपल्याकडील गरिबांपेक्षा यांची अवस्था कितीतरी पटीने चांगली असते. असें असूनहि कितीतरी लोक त्यांची काळजी घ्यायला पोटतिडकीने पुढे येतात. याउलट दारिद्र्य आणि अज्ञान यांच्या पंकांत रुतून बसलेल्या भारतांतील वीस कोटी स्त्री-पुरुषांबद्दल कुणाचें मन कळवळतें ? या परिस्थितींतून बाहेर पडण्याचा मार्ग कोणता ? त्यांच्या वेदना पाहून कुणाच्या तरी अंत:करणाला पीळ पडतो का ? अंधारांतून ते प्रकाशांत येऊं शकत नाहीत, त्यांना शिक्षण प्राप्त होत नाही. कोण त्यांना प्रकाश दाखवील ? कोण त्यांच्या दारोदार जाऊन त्यांना शिक्षण देईल ? हे लोक म्हणजेच तुमचा ईश्वर, त्यांच्याच कल्याणाची चिंता वाहा, त्यांच्यासाठीच कर्म करा, त्यांचीच कल्याणकामना मनांत बाळगून त्यांच्यासाठी सतत प्रार्थना करा; प्रभु तुम्हांला मार्ग दाखवितील. ज्याचें हृदय गरिबांसाठी द्रवतें त्यालाच मी 'महात्मा' म्हणेन, नाही तर तो दुरात्माच होय. एकमनाने आपण त्यांची कल्याणकामना करूं या, त्यांच्यासाठी एका दिलाने प्रार्थना करूं या. कदाचित् आपण अज्ञातपणेंच मरूं, कुणी सहानुभूतीचा एक शब्द देखील आपल्यासाठी उच्चारणार नाही, कुणी आपल्यासाठी कळवळ्याने दोन आसवें देखील ढाळणार नाही, कदाचित् मृत्यूपूर्वी आपण सफलहि होणार नाहीं, पण लक्षांत ठेवा की आपल्या विचारांचा एक कण देखील नष्ट होणार नाही. त्या विचारांचा आज ना उद्या परिणाम होईलच होईल. माझें हृदय इतकें भरून गेलें आहे की मी माझ्या भावना व्यक्त करण्यास असमर्थ आहें. तुम्हांला याची जाणीव आहे, तुम्ही त्याची सहज कल्पना करूं शकतां. जोंवर हे कोट्यवधि लोक उपाशी आणि अशिक्षित राहतील तोंवर त्यांच्याच पैशाने शिक्षण घेऊन त्यांच्याकडे जे ढुंकूनहि पाहत नाहीत त्यांना मी कृतघ्न आणि द्रोही समजतों. क्षुधार्त रानटी माणसांपेक्षा ज्यांची अवस्था कांही अधिक चांगली नाही अशा वीस कोटी गरीब देशबांधवांना पिळून काढून,

त्यांच्या पैशावर चैन करून जे थाटामाटाने हिंडतात पण त्यांच्यासाठी कांही करीत नाहीत त्यांना मी घृणास्पद समजतों. बंधूंनो, आपण निर्धन आहोंत, आपण नगण्य आहोंत, पण आपल्यासारख्या गरिबांकडूनच ईश्वराने आजवर आपलीं कार्यें करवून घेतलीं आहेत. प्रभु तुम्हां सर्वांचें कल्याण करो.

तुमचा
विवेकानंद

## (१०)

( अनागारिक धर्मपाल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
१८९४

प्रिय धर्मपाल,

कलकत्त्यांतील तुमचा पत्ता मी विसरून गेलों आहें, म्हणून मठाच्या पत्त्यावर हें पत्र पाठवीत आहें. कलकत्त्यांतील तुमच्या व्याख्यानांबद्दल व त्यांच्या अद्भुत प्रभावाबद्दल मीं ऐकलें आहे. येथील एका सेवानिवृत्त मिशनऱ्याने मला 'भाऊ' असें संबोधून एक पत्र लिहिलें आणि मग या पत्राचें माझें संक्षिप्त उत्तर घाईघाईने प्रसिद्ध करून खळबळ माजविण्याचा प्रयत्न केला. पण येथील लोकांची अशा व्यक्तीविषयी कशी धारणा असते हें तुम्हांला ठाऊकच आहे. याच मिशनऱ्याने परत माझ्या कांही मित्रांकडे गुप्तपणें जाऊन, त्यांनी मला कोणत्याहि प्रकारचें साहाय्य करूं नये असेंहि त्यांना सांगितलें. अर्थातच माझ्या सगळ्या मित्रांनी या मिशनऱ्याचा तिरस्कारच केला. या माणसाचें हें असलें वर्तन पाहून मी तर थक्कच झालों. धर्मोपदेशक असूनहि असलें कपटाचरण! सर्व देशांत आणि सर्व धर्मांत अशा प्रकारचे पुष्कळ लोक आढळतात ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे.

गेल्या हिवाळ्यांत अत्यंत कडक थंडीचा उपद्रव सोसूनहि मीं

या देशांत बराच प्रवास केला. थंडीचा जितका त्रास होईल अशी कल्पना होती तितका कांही त्रास मला झाला नाही. 'फ्री रिलिजस सोसायटी'चे अध्यक्ष कर्नल नेगिन्सन यांचें तुम्हांला स्मरण असेलच. ते तुमच्याबद्दल प्रेमाने चौकशी करीत असतात. ऑक्सफर्ड (इंग्लंड) चे डॉ. कार्पेंटर नुकतेच मला भेटले. प्लायमाउथ येथे त्यांनी 'बौद्धधर्माचें नीतिशास्त्र' या विषयावर व्याख्यान दिलें. बौद्धधर्माविषयी तें अत्यंत सहानुभूतिपूर्ण होतें व विद्वत्तापूर्णहि होतें. तुमच्याविषयी व तुमच्या नियतकालिका-विषयी त्यांनी चौकशी केली. तुम्ही हातीं घेतलेलें थोर कार्य यशस्वी होईल अशी आशा आहे. 'बहुजनहिताय बहुजनसुखाय' जे आले होते त्यांचे तुम्ही सुयोग्य दास आहांत.

. आपल्या भारतांत प्रसृत केल्या जात असलेल्या ख्रिस्ती धर्मापेक्षा येथील ख्रिस्ती धर्म सर्वस्वी भिन्न आहे. धर्मपाल, तुम्हांला जर मीं सांगितलें की येथील एपिस्कोपल व प्रेसबिटेरियन पंथाचेहि कांही धर्मगुरु माझे चांगले मित्र आहेत तर तुम्हांला सहजच आश्चर्य वाटेल. हे तुमच्यासारखेच उदारमताचे व विशाल दृष्टीचे आहेत, आणि तुम्हांला तुमच्या धर्माविषयी वाटते तितकीच त्यांना त्यांच्या स्वतःच्या धर्माविषयी कळकळ वाटते. खरा धार्मिक मनुष्य सर्वत्र उदारमताचाच सापडेल. त्याच्या ठायींचें प्रेमच त्याला असें उदारमताचें होण्यास भाग पाडतें. जे धर्माचें दुकान लावतात ते धर्मांत स्पर्धा, झगडे, स्वार्थपरता वगैरे सांसारिक गोष्टी आणतात आणि त्यामुळे त्यांना संकुचित आणि उपद्रवी बनणें भाग पडतें.

सदैव तुमचाच प्रेमळ बंधु
विवेकानंद

## (११)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
१८९४

प्रिय आलासिंगा,

तुम्हांला मी एक जुनी गोष्ट सांगतों. एक ऐदी भटक्या रमत गमत व स्वच्छंदपणें हिंडत असतां, घराच्या दारांत बसलेल्या एका म्हाताऱ्याजवळ आला आणि 'अमुक खेडें इथून किती दूर आहे ?' असें त्याने त्याला विचारलें. म्हातारा चूपच बसला. त्या भटक्याने नंतर पुनः पुनः त्याला तोच प्रश्न विचारला. पण तो म्हातारा तोंड कांहीकेल्या उघडेना. अखेर कंटाळून चिडून जाऊन तो जायच्या उद्देशाने वळला. आता तो म्हातारा एकदम त्याला म्हणतो--"तुम्ही विचारतां तें खेडें येथून फक्त मैलभर आहे." त्या भटक्याने त्याला विचारलें, "मग आतापावेतो तुम्ही कां बरें तोंडाला अगदी खीळ लावून बसलां होतां ?" यावर त्या म्हाताऱ्याने उत्तर दिलें. "आतापर्यंत तुम्ही, करायचें तर कांही नाही, मग नुसतें विचारायला काय हरकत आहे अशा भावनेने मला उगीच प्रश्न विचारून सतावत होतां. पण आता जेव्हा तुम्ही खरोखरच जायला निघालां आहांत तेव्हा तुम्हांला उत्तर देणें भाग आहे."

वत्सा ! ही गोष्ट राहील का नीट ध्यानांत ? तुम्ही कामाला लागा, बाकी साऱ्या गोष्टी आपोआप होतील. "जो इतर कुणापासूनहि कसलीहि अपेक्षा न करतां संपूर्णतया माझ्यावर भार घालून विसंबून असतो त्याला मी सर्व गोष्टी पुरवितों" असें भगवंतांनी गीतेंत आश्वासन दिलें आहे. ही कांही केवळ कविकल्पना नाही.

...सध्या गरज आहे सेवा व प्रचार अशा दोन्ही प्रकारच्या कार्यांची. जिथे तुम्ही दर आठवड्याला जमूं शकाल अशी एखादी जागा निवडा. तेथे पूजा वगैरे आटोपून नंतर भाष्यासहित उपनिषदांचें वाचन करा व अशा तऱ्हेने अध्ययन व काम हीं दोन्हीं करीत राहा.

स्वत: काम करूं लागा की साऱ्या गोष्टी ठीक होऊन जातील. . . .

आता कामाला लागा. जी. जी. हा भावनाप्रधान आहे, तुम्ही आहांत शांत डोक्याचे. तेव्हा दोघे मिळून काम करा. अगदी मग्न व्हा कामांत. ही तर कुठे नुसती सुरवात आहे. प्रत्येक देशाने स्वसंरक्षणासाठी सिद्ध व्हायला हवें. हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनासाठी आपण अमेरिकेच्या पैशावर अवलंबून राहनां कामा नये, कारण तो एक निखालस भ्रम आहे. एखादें मध्यवर्ती केंद्रस्थान असणें अत्यंत महत्त्वाचें आहे. मद्रासासारख्या मोठ्या शहरांत असली एखादी जागा शोधून काढा व तेथूनच एक जिवंत शक्तीचा स्रोत चोहीकडे प्रसृत करा. सुरवात करा अगदी लहान प्रमाणावर. सुरवातीला कांही गृहस्थ-प्रचारकांची मदत घ्या. हळूहळू पुढे आपलें सर्वस्व तुमच्या कार्याला वाहण्याची तयारी असलेले लोक तुमच्यांत सामील होतील. कुणावरहि सत्ता गाजवायचा हव्यास बाळगूं नका. जो उत्कृष्ट सेवा करूं शकतो तोच खरा शासक होऊं शकतो. प्राण गेला तरी पर्वा नाही, पण सत्याशीं प्रतारणा करूं नका. आपल्याला गरज आहे कामाची. नांवलौकिक, पैसा या गोष्टी कांही आपलें ध्येय नाही. . . .खूप हिंमत बांधा. . . .या कामासाठी लागणारा पैसा जमा करण्यांत मद्रासमधील लोक राजीखुशीने भाग घेतील असा प्रयत्न करा आणि मगच सुरवात करा. . . . तुम्ही संपूर्ण स्वार्थगंधशून्य व्हा म्हणजे दिसेल की यश तुमच्या दारीं लोळण घेत आहे. . . .

आपल्या कामांतील स्वाधीनता न गमावतां वरिष्ठांविषयी आदरभाव असूं द्या. एकजुटीने काम करा. . . .माझ्या मुलांनी कार्यसिद्धीसाठी पेटल्या अग्नींत देखील उडी घ्यायची तयारी ठेवायला हवी. आता एकच गोष्ट—काम—काम—काम! कालान्तराने आपण सर्व मिळून आपल्या कार्याचा आढावा घेऊं. धीर धरा, चिकाटीने काम करा, अंगीं पावित्र्य बाणवा.

. . .हिंदुधर्मावर कसलेंहि पुस्तक लिहिण्याचा सध्या माझा विचार नाही. मी माझे विचार सध्या फक्त नोंदून ठेवतों. ते मी प्रसिद्ध करीन किंवा नाही हें कांही सांगतां येत नाही. आणि पुस्तकांतच काय असें मोठेसें ठेवलें आहे? जगांत आधीच मूर्खपणाच्या गोष्टींचा सुळसुळाट

आहे. वेदान्त-विचारांना प्रेरणा देणारें एखादें नियतकालिक जर तुम्हीं काढलें तर तें मात्र आपल्या कार्याच्या दृष्टीने उपकारक ठरेल. कुणावरहि कोरडी टीका करण्यापेक्षा प्रत्यक्ष रचनात्मक, भावात्मक गोष्टी लोकांपुढे मांडण्याचा प्रयत्न करा. तुम्हांला जें काय सांगायचें, शिकवायचें असेल तें सांगा, शिकवा आणि स्वस्थ राहा. बाकी साऱ्या गोष्टी भगवान् जाणे. . . .

मी माझ्यावर होणारी मिशनऱ्यांची टीका पाहत देखील नाहीं आणि मला वाटतें त्यामुळे येथील सर्वसाधारण जनतेची माझ्याबद्दलची आदरभावना वाढलीच आहे. तेव्हा आता तेथून माझ्याकडे वर्तमानपत्रें पाठविण्याची गरज नाही.

. . तुम्ही खरोखरच जर माझें संतान असाल तर तुम्हांला कशाचीहि भीति बाळगायला नको, कशानेहि तुमच्या प्रगतींत बाधा यायला नको. तुम्ही सिंहासारखे व्हाल. आपण साऱ्या भारताला, समस्त जगताला जागृत केलें पाहिजे. आता भित्रेपणा मुळीच चालणार नाही. आता 'नाही' म्हणून भागणार नाही. समजलें? मरेपर्यंत सत्याला कवटाळून राहा! . . मुख्य गोष्ट आहे गुरुभक्ति. मरेपर्यंत गुरूवर श्रद्धा. अशी गुरुभक्ति आहे का तुमच्या ठिकाणीं? ही श्रद्धा तुमच्या ठिकाणीं आहे असा माझा आंतरिक विश्वास आहे व माझाहि तुमच्या-वर विश्वास आहे याची तुम्हांला पूर्ण जाणीव आहे. तेव्हा आता कामाला लागा. तुम्ही यशस्वी व्हालच. तुमच्या प्रत्येक पावलागणिक माझ्या प्रार्थनेचें, आशीर्वादांचें बळ तुमच्या पाठीशीं आहे. मिळून मिसळून काम करा. प्रत्येकाशीं वागतांना सहनशीलता बाळगा. माझी प्रेमभावना प्रत्येकाच्या पाठीशीं आहे. तुमच्या प्रत्येक हालचालीकडे माझी अगदी बारीक नजर आहे. पुढे व्हा—पुढे चला! ही तर नुसती कुठे सुरवात आहे. मीं येथे थोडें जरी काम केलें तरी त्याचा मोठा प्रतिध्वनि हिंदुस्थानांत उमटतो. कळलें? म्हणून मी नसती घाई करून कांही येथून परत फिरणार नाहीं. येथे कांहीतरी स्थायी स्वरूपाचें कार्य करून ठेवावें या हेतूने मी अहर्निश खपतों आहें. प्रत्यहीं या अमेरिकन लोकांचा माझ्यावरील विश्वास वाढत आहे. . . . तुमचें हृदय, तुमच्या आशाआकांक्षा खूप विशाल बनूं द्या, सारें

जग व्यापूं द्या त्यांना. संस्कृतचा अभ्यास करा व वेदान्तावरील तिन्ही भाष्यांचें विशेषेंकरून अध्ययन करा. तयार राहा, कारण भविष्यांत अमलांत आणण्यासारख्या खूप योजना मीं आंखून ठेवल्या आहेत. प्रभावी व आकर्षक वक्ता बनण्याचा प्रयत्न करा. लोकां-मधे जणु विद्युत्संचार करा. तुमच्या ठायीं श्रद्धा असल्यास बाकी सार्‍या गोष्टी आपोआप साधतील. हें सारे 'किडी'ला, नव्हे तेथील सार्‍यांनाच सांगा. यथाकालीं त्यांच्या हातून अशीं थोर कृत्यें होतील की जीं पाहून सारें जग स्तिमित होऊन जाईल. धैर्यानें आता कामाला लागा. तुम्हीं प्रत्यक्ष काय केलें हें तर एकदा पाहूं द्या मला. मंदिर, छापखाना, एखादें नियतकालिक आणि एखादें निवासस्थान——या गोष्टी करून दाखवा. तुम्ही मद्रासमधे जर माझ्यासाठी एखादें राहण्यासाठी स्थान निर्माण करूं शकलां नाही तर तेथे मीं कुठे राहावें ? लोकांमधे विद्युत्संचार करा. निधि जमवा आणि प्रचारकार्य करा. अंगिकारलेलें हें व्रत मोठ्या सचोटीने पाळा. आतापावेतो तर तुमचें कार्य ठीक चाललें आहे. उत्तरोत्तर तें अधिकाधिक चांगलें करण्याचा प्रयत्न करा.

. . . लोकांशीं वितंडवाद करूं नका, कुणाचें शत्रुत्व पदरीं घेऊं नका. सोम्या किंवा गोम्या ख्रिस्ती झाला तर ती गोष्ट आपण मनाला कां लावून घ्यावी ? त्यांना मानवेल अशा कोणत्याहि धर्माचा अवलंब त्यांना करूं द्या. त्याबाबत उठलेल्या वादंगाच्या वादळांत तुम्हीं उगीच कां भाग घ्यावा ? लोकांच्या विभिन्न मतांकडे सहिष्णुतेने पाहा. धीर, चिकाटी, पावित्र्य या गुणांचाच अखेर जय होईल.

तुमचा
विवेकानंद

## (१२)

( खेतरीचे राजेसाहेब यांना )

अमेरिका,
१८९४

...'न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते'--घराला घरपणाची कळा येते ती कांही इमारतीमुळे नाही, तर ती येते सुगृहिणीमुळे असें एका संस्कृत कवीने म्हटलें आहे. यांत केवढा तरी सत्यांश आहे ! थंडी, वारा, पाऊस वगैरेंपासून जें तुम्हांला निवारा देतें त्याचें महत्त्व त्याला किती खांब आहेत किंवा त्या खांबांवर किती कलाकुसर आहे यावर अवलंबून नाही; त्याचें महत्त्व आहे त्या चैतन्यमय स्तंभावर--त्या खऱ्या आधारावर--अर्थात् स्त्रीवर; तीच खरा आधारस्तंभ असते घराचा. याच दृष्टीने जगांतील कोणत्याहि देशाच्या घराशीं अमेरिकन घराची तुलना केली तर अमेरिकन घर कांही कुठल्याच बाबतींत हार जाणार नाही.

अमेरिकन घराला बदनाम करणाऱ्या बऱ्याच गोष्टी मीं ऐकल्या आहेत. मीं ऐकलें आहे की येथे स्वातंत्र्याचा अर्थ 'मनाला येईल तसें वागणें' असा करण्यांत येतो; येथील स्त्रिया ह्या स्त्रियांसारख्या नाहीत, स्वातंत्र्यकल्पनांनी उन्मत्त होऊन त्यांनी येथील गृहशांति व समाधान पायदळीं तुडविलें आहे, असल्या कितीतरी मूर्खपणाच्या गोष्टी लोक बोलतांना मीं ऐकलें होतें. पण एक वर्ष अमेरिकन घरांचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन, येथील स्त्रियांना जवळून पाहून, आता मला वाटतें की किती चुकीच्या व गैरसमज पसरविणाऱ्या आहेत या गोष्टी ! अमेरिकन स्त्रियांनो ! तुमच्या उपकाराची परतफेड करावयाची झाल्यास शंभर जन्म देखील पुरणार नाहीत मला. माझी कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी माझ्याजवळ पुरेसे शब्द नाहीत. याबाबत पौर्वात्य अतिशयोक्तिच पौर्वात्य भावना पुढीलप्रमाणे व्यक्त करूं शकेल--"असितगिरिसमं स्यात् कज्जलं सिंधुपात्रे, सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमूर्वी। लिखति यदि गृहित्वा शारदा सर्वकालम्--" अर्थात् समुद्राची दौत, हिमालयाची शाई, पारिजातक

वृक्षाच्या शाखेची लेखणी व पृथ्वीचा कागद केला आणि लिहिण्याला अनंत कालपर्यंत जर स्वत: सरस्वतीच बसली तरी देखील तिला तुमच्याबद्दलची माझी कृतज्ञता व्यक्त करतां येणार नाही !

गेल्या उन्हाळ्यांत, अगदी दूर देशाहून, ज्याचें नांवगाव कुणाला माहीत नाही, ज्याला पांडित्य नाही, ज्याला कुणी मित्र नाहीत अशा असहाय्य व निर्धन अवस्थेंत एका परिव्राजक प्रचारकाच्या स्वरूपांत मी या देशीं आलों; पण याच अमेरिकन स्त्रियांनी मला आश्रय दिला, मला जेवूंखाऊं घातलें, आपल्या घराचीं दारें माझ्यासाठी खुलीं केलीं व मुलगा म्हणून, भाऊ म्हणून आपल्या घरीं माझें प्रेमाने स्वागत केलें. जेव्हा त्यांचे धर्मगुरु 'या भयंकर विधर्म्यापासून दूर रहा' असें त्यांना सांगून त्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न करीत होते, जेव्हा त्यांचे सर्वांत निकटचे मित्र 'अज्ञात कुलशील असलेल्या या परदेशी माणसाचें चारित्र्य कदाचित् धोक्याचें ठरेल' अशा प्रकारच्या सूचना त्यांना माझ्याबाबत देत होते तेव्हा देखील त्यांनी मला अंतर दिलें नाही. स्वच्छ आरशांत यथातथ्य प्रतिबिंब पडावें या न्यायाने अंत:करण व शील कसें आहे हें त्या बरोबर जाणूं शकतात.

कितीतरी सुंदर संसार, कितीतरी चारित्र्यसंपन्न व पवित्र माता मला येथे पाहावयास मिळाल्या. त्यांचें आपल्या मुलाबद्दलचें नि:स्वार्थ वात्सल्य तर अवर्णनीयच म्हणावें लागेल. 'डायना ( Diana ) देवीच्या ललाटावरील तुषारकणिकांप्रमाणे' ज्या निर्मल आहेत, ज्या सुसंस्कृत, सुशिक्षित व अध्यात्मगुणसंपन्न आहेत, अशा किती तरी अमेरिकन कन्यका मला येथे आढळतात ! याचा अर्थ असा नव्हे की येथील सर्वच स्त्रिया देवता आहेत. चांगल्याबरोबर वाईट हें सर्व ठिकाणीं असणारच. पण देशाचा मोठेपणा मोजतांना तणाप्रमाणे वाढलेले दुष्ट लोक कांही विचारांत घ्यावयाचे नसतात; देशाचें श्रेष्ठत्व जें मापायचें तें जे उदार व चारित्र्यसंपन्न असतील त्यांच्यावरूनच मापायचें असतें. देशांतील जीवनप्रवाह चैतन्ययुक्त व निर्मल आहे हें त्यांच्यावरूनच कळून येतें.

संख्येने खूप पण खाली गळून पडलेलीं, किडयांनी खाल्लेलीं, पूर्ण वाढ न झालेलीं अशीं फळें विचारांत घेऊन का तुम्ही त्या झाडाची व त्याच्या फळाची किंमत ठरवीत असतां ? त्या झाडाला एकच जर पूर्ण

वाढ झालेलें, सुमधुर फळ लागलें तर त्या एकामुळेच त्या झाडाची ताकद, फळें देण्याची शक्ति, प्रयोजन वगैरे गोष्टी ठरवितां येतील. शेकडो अपक्व फळांमुळे कांही झाडाची किंमत ठरत नाही.

आधुनिक अमेरिकन स्त्रीच्या उदार आणि विशाल मनाचें मला कौतुकच वाटतें. अगदी संकुचितांत संकुचित म्हणून मानल्या गेलेल्या संप्रदायांत देखील कांही उदार व विशाल मनाचीं माणसें माझ्या पाहण्यांत आलीं, पण त्यांच्यांत व स्त्रियांत फरक आढळतो. पुरुष जेव्हा असला उदारपणा दाखवतात तेव्हा आपला धर्म वा आपली आध्यात्मिकता सोडून देऊन हा उदारपणा अंगिकारण्याची त्यांच्या बाबतींत भीति असते. उलट आपल्या धर्माला काडीचाहि धक्का न लागूं देतां जें जें म्हणून भलें असेल त्याचा सहानुभूतिपूर्वक स्वीकार करण्याचें औदार्य स्त्रियांच्या ठिकाणीं असतें. जोडावयाचें असतें, तोडावयाचें नसतें; विधायक असायला हवें, विघातक नको हें त्यांना अगदी अंतःस्फूर्तीनें कळतें. प्रत्येक गोष्टींतील भावात्मक, अस्तिवाचक अंशाचा संचय होईल ह्याची, आणि प्रकृतीच्या या भावात्मक, अस्तिवाचक आणि म्हणूनच आत्मविकासाला पोषक असणाऱ्या शक्तींच्या संचयाची ही क्रियाच जगांतील अभावात्मक, नास्तिवाचक, विनाशक शक्तींचें निर्दालन करणार आहे या सत्याची जाणीव प्रत्यहीं त्यांना अधिकाधिक प्रमाणांत होत आहे.

शिकागोचें जागतिक प्रदर्शन हें केवढें अद्भुत कार्य होतें! तसेंच जगांतील सर्व देशांतून आलेल्या धर्मप्रचारकांनी आपापले विचार जिथे व्यक्त केले ती अद्भुत सर्वधर्मपरिषद! डॉ. बॅरोज व श्री. बॉनी यांच्या कृपेने मलाहि माझी मतें तेथे व्यक्त करण्याची संधि मिळाली. श्री. बॉनी हे किती छान गृहस्थ आहेत! ज्याने या साऱ्या अफाट कार्याची कल्पना व आखणी केली आणि फार मोठ्या प्रमाणावर हा कार्यक्रम यशस्वी करून दाखविला तें मन कसें असेल याची एकदा कल्पना तर करून पाहा. त्यांतहि श्री. बॉनी हे कांही धर्मगुरु नव्हत. धंद्याने वकील असूनहि निरनिराळ्या धर्मगुरूंच्या परिषदांचें त्यांनी अध्यक्षपद मंडित केलें. त्यांचा स्वभाव अत्यंत मधुर आहे, ते विद्वान् आहेत, शांत स्वभावाचे आहेत. त्यांच्या हृदयांतील सखोल, मर्मस्पर्शी

भाव जणुकांही त्यांच्या उज्ज्वल नेत्रांतून प्रकट होत असत. . . .

तुमचा
विवेकानंद

## (१३)*

( स्वामी अभेदानंद यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका
१८९४

प्रिय काली,

तुमचें पत्र मिळालें. सर्व मजकूर समजला. तुम्ही म्हणतां ती तार ट्रिब्यून वर्तमानपत्रांत आल्याचें मला माहीत नाही. शिकागो सोडून मला सहा महिने झालेत, व अद्याप तेथे परत फिरण्याइतकी सवड कांही मला झालेली नाही. त्यामुळे तेथील खबर ठेवणें मला शक्य झालें नाही. तुम्हीं खूप परिश्रम केले आहेत, त्याबद्दल तुम्हांला किती धन्यवाद देऊं? असामान्य काम करण्याची आपली कार्यक्षमता तुम्हीं सर्वांनी सिद्ध करून दाखविली आहे. आणि ठाकुरांचे (श्रीरामकृष्णांचे) शब्द खोटे ठरतीलच कसे ?--तुमच्या ठिकाणीं खासच अद्‌भुत शक्ति आहे. शशी सन्यालबद्दल तर मीं आधीच लिहिलें आहे. ठाकुरांच्या कृपेने कोणतीहि गोष्ट लपून राहणार नाही. त्याची इच्छा असल्यास त्याला स्थापूं द्या ना एखादा पंथ, किंवा त्याला वाटेल तें करूं द्या. त्यांत काय हानि आहे ? 'शिवा वः सन्तु पन्थानः ।' ('तुमचा मार्ग निर्विघ्न होवो.') दुसरें असें की तुमच्या पत्राचा रोख कांही नीटसा माझ्या ध्यानांत आला नाही. आपला मठ बांधण्यासाठी मी पैसा उभारणार. आता लोकांनी जर त्यासाठी माझ्यावर टीका केली तर त्यांत आपण विचलित होऊन जाण्यासारखें काय आहे ? तुम्ही आपलीं मनें उच्च आणि स्थिर ठेवा, म्हणजे त्रास होण्याचा प्रश्नच उत्पन्न होणार नाही. तुम्ही आपापसांत गाढ प्रेम ठेवा आणि लोकांच्या निंदेविषयी उदासीन राहा.

कालीकृष्ण बाबूंना या कार्याबद्दल खूप आपुलकी आहे ते एक थोर गृहस्थ आहेत. माझ्या सप्रेम शुभेच्छा त्यांना कळवा. तुमच्यांत जोंपर्यंत एकजूट राहील तोंपर्यंत ईशकृपेने तुम्हांला कसलीच भीति नाही हें पक्कें समजा, मग 'रणे वने पर्वतमस्तके वा'--'रणांत, वनांत वा पर्वतशिखरावर' कुठेहि असां तुम्ही. सत्कार्याला विघ्नें फार असतात--'श्रेयांसि बहुविघ्नानि.' जगाचा हा मुळी स्वभावच आहे. मन अगदी अचल ठेवा. क्षुद्र व पोरकट लोक काय म्हणतात याकडे लक्षच देऊं नका मुळी. उपेक्षा, उपेक्षा, उपेक्षा--बस या बाबतींत हाच एक मंत्र ध्यानांत ठेवा. शशीला (स्वामी रामकृष्णानंदांना) मीं अगोदरच सविस्तर लिहिलें आहे. वर्तमानपत्रांतले उतारे किंवा पुस्तकें वगैरे गोष्टी आणखी पाठविण्याची कांही गरज नाही. एक बंगाली म्हण आहे की, मुसळ स्वर्गीं जरी गेलें तरी कांडायचें आपलें काम कांही तें तेथेहि सोडायचें नाही ! अस्मादिकांचें हिंदुस्थानांत जसें भ्रमण तसेंच येथेहि; येथे भरीस भर दुसऱ्यांचाहि बोजा माथीं घ्यावा लागतो ! दुसऱ्यांच्या पुस्तकांना मी येथे कसे काय गिऱ्हाईक शोधून काढूं ? येथे चारचौघांसारखाच मीहि एक, यापेक्षा अधिक कांही नाही. या देशांतलीं वर्तमानपत्रें वगैरे जें कांही माझ्यासंबंधी म्हणतात तें मी अग्नीला अर्पण करतों. तुम्हींहि हेंच करायला हवें. हाच योग्य मार्ग.

श्रीरामकृष्णांचें कार्य होण्याच्या दृष्टीने सुरवातीला थोडीशी खळबळ माजणें आवश्यक होतें, आणि ती तशी माजली हें ठीकच झालें. यापुढे मात्र आपल्याविषयी लोक काय बोलतात याकडे कोणत्याहि परिस्थितींत तुम्हीं मुळीदेखील लक्ष द्यायला नको. मी पैसा गोळा करीन किंवा आणखी कांही करीन. क्षुद्र लोकांच्या मतामताने श्रीरामकृष्णांचें कार्य काय बंद पडणार आहे ? बंधो, तुम्ही अजून बालक आहांत, आणि माझे केस तर आता पिकत चालले आहेत. अशा लोकांच्या मतांना मी किती किंमत देतों हें तुम्हांला कळायला पाहिजे, मीं जें लिहिलें आहे त्यावरूनच. तुम्ही मंडळी जोंवर कंबर कसून माझ्या पाठीशीं उभे आहांत तोंवर सारें जग जरी एकवटून आपल्या विरुद्ध उभे राहिलें तरी पर्वा नाही. मला खूपच उच्च दृष्टिकोन अंगिकारावा लागेल येवढेंच मला कळतें. तुमच्याखेरीज मीं इतर कुणाला लिहिण्याची गरज नाही

असें मला वाटतें. ओघानेच विषय निघाला म्हणून विचारतों, गुणनिधि कुठे आहे ? त्याला शोधून काढून मोठ्या प्रेमाने मठांत आणा. तो अतिशय विद्वान् व निष्कपट माणूस आहे. लोक काय म्हणतात याकडे लक्ष न देतां तुम्हीं जमिनीचे दोन तुकडे (प्लॉट्स) घ्यायला हवेत. माझ्या स्तुति-निंदेचें काय वाटेल तें भारूड वर्तमानपत्रांत आलें तरी त्यामुळे तुम्हीं विचलित होण्याची गरज नाही. तुम्ही लक्षच देऊं नका तिकडे. अन् बंधो, माझी अगदी हात जोडून विनंती आहे की टोपलींच्या टोपलीं भरून वर्तमानपत्रांचे भारे कांही तुम्ही यापुढे माझ्याकडे पाठवूं नका. विश्रांति घेण्याच्या गोष्टी तुम्ही आता बोलूंच कसे शकतां ? देहत्यागानंतरच जी काय विश्रांति मिळणार आहे ती मिळेल आपल्याला. एकदा अशा धूमधडाक्याने श्रीरामकृष्णांचा जन्मोत्सव साजरा करा की सभोवतालचा सारा प्रदेश उत्साहाने भरून जाईल. शाबास शूरहो ! आपल्या या प्रेमप्रवाहांत सारे निंदक वाहून जातील. अरे, तुम्ही मोठे थोर दिग्गज आहांत, किडेमुंग्या चावण्याचें काय भय आहे तुम्हांला ?

तुम्हीं पाठविलेलें अभिनंदनपर भाषण मला मागेच मिळालें व त्याला मीं उत्तरहि प्यारीबाबूंकडे पाठविलें.

नेहमी लक्षांत ठेवा की माणसाला डोळे आहेत दोन, कान आहेत दोन, पण तोंड मात्र एकच आहे. तेव्हा उपेक्षा, उपेक्षा, उपेक्षा ! 'न हि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति.' (सत्कर्म करणाऱ्यांची कधीहि दुर्गति होत नाही.) भ्यायचें ? भीति बाळगायची ? कुणाची भीति बाळगायची बाबा ? इथले मिशनरी-बिशनरी माझ्याविरुद्ध ओरडून ओरडून आता शांत झाले आहेत—आणि सारें जगहि असेंच शांत होईल.

"निंदन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु
लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् ।
अद्यैव वा मरणमस्तु शतान्तरे वा
न्याय्यात् पथः प्रविचलन्ति पदं न धीराः ॥

—अर्थात् "नीतिनिपुण लोक प्रशंसा करोत की निंदा करोत, लक्ष्मी अनुकूल असो की ती निघून जावो, मृत्यु आज येवो की शेकडो वर्षांनंतर येवो, धीरस्थिर सज्जन व्यक्ति सन्मार्गापासून केव्हाहि ढळत नाहीत."

भलत्यासलत्या लोकांत तुम्हीं मिसळूंहि नये आणि त्यांना कांही मागूंहि नये. ठाकुर ( भगवान श्रीरामकृष्ण ) साऱ्या गोष्टी देताहेत आणि पुढेहि ते देतीलच. भ्यायचें कशाला बाबा ? मोठमोठीं कार्यें संकटांशीं झगडा करूनच सिद्धीला गेलेलीं आढळतात. हे वीर, कुरु पौरुषमात्मनः, उपेक्षितव्याः जनाः सुकृपणाः कामकाञ्चनवशगाः ––हे वीरांनो ! पुरुषार्थाची पराकाष्ठा करा, कामकांचनादिकांच्या आहारीं गेलेल्या हीन लोकांकडे उपेक्षाबुद्धीनेच पाहा. या देशाच्या भूमीवर मीं आपले पाय पक्केपणीं रोवले आहेत, मला आता कुणाच्याहि मदतीची गरज नाही. मला मदत करण्याच्या उद्देशाने बंधुप्रेमाच्या भावनेंतून उत्पन्न झालेल्या तुमच्या ठिकाणची अपार पुरुषार्थशक्ति तुम्ही पूर्णपणें प्रभुसेवेकडे लावा येवढीच माझी तुम्हां सर्वांना कळकळीची प्रार्थना आहे. कांही विशेष फायदा होईल अशी खात्री होईपर्यंत आपलें मन कुणापाशी उघडें करूं नका. आपल्या अगदी मोठ्यांत मोठ्या शत्रू-विषयी बोलतांना देखील प्रिय आणि हितकर भाषाच वापरा. नांव-लौकिक, पैसाअडका यांची इच्छा प्रत्येक मानवांत स्वाभाविकच असते बाबा. आणि या इच्छेमुळे, भगवान आणि भोग हे दोन्ही साधायचा जर कांही उपाय असेल तर तो आचरण्यासाठी साऱ्यांचाच उत्साह दांडगा असणार ! परहिताखेरीज अन्य कसलीहि भावना ज्यांच्या ठायीं नाही आणि इतरांच्या ठिकाणच्या किंचिन्मात्र गुणाला जे पर्वताएवढा मानतात तेच संत खरें कार्य करूं शकतात––'परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य, अपि च, त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः प्रीयमाणाः।' तेव्हा मूढबुद्धीच्या, अनात्मदर्शी, तामसमति लोकांना काय वाटेल तो पोरकटपणा करूं द्या. अखेर आपल्यावरच चांगली शेकते आहे असें पाहून ते आपण होऊनच पळतील. चंद्रावर थुंकण्याचा प्रयत्न करूं द्या त्यांना, पण अखेर थुंकी पडणार आहे त्यांच्याच तोंडावर. शुभं भवतु तेषाम्––त्यांचें कल्याण होवो ! त्यांच्यांत जर कांही सार असेल तर त्यांचें यश कोण 'रोधूं' शकणार ? पण मत्सराने जळून-पिचून जर ते असल्या चेष्टा करीत असतील तर त्या साऱ्या अखेर वाया जातील. हरमोहनने कांही जप-माळा पाठविल्या आहेत. ठीक आहे. पण आपल्या देशांतील धर्मकर्म येथेंहि चालेल असें नाही, हें नीट ध्यानांत ठेवा तुम्ही. येथील लोकांना

रुचेल, पचेल असें स्वरूप त्याला द्यायला हवें. तुम्ही ह्या लोकांना जर हिंदु व्हा म्हणून सांगाल तर ते लोक तुमच्या सावलीला नाही उभे राहणार. घृणा करूं लागतील ते तुमची. आपण नाही ख्रिस्ती मिशनऱ्यांना घृणास्पद मानीत ? हिंदुधर्मग्रंथांतील कांही कल्पना त्यांना आवडतात, मानवतात, एवढेंच. यापेक्षा अधिक कांही नाही, हें ध्यानांत ठेवा. इकडील बहुतांश पुरुषमंडळी धर्माबिर्माच्या गोष्टींत डोकें घालण्याच्या भानगडींतच पडत नाहीत. इकडील स्त्रिया या बाबतींत थोडीफार उत्सुकता दाखवतात, पण अधिक प्रमाणांत नव्हे. चारदोन हजार लोकांचाच अद्वैत सिद्धान्तावर विश्वास आहे. पण त्यांच्यापुढे जर पोथ्यापुराणें, जातपात, स्त्रियांची निंदा वगैरे गोष्टी तुम्ही मांडाल तर ते तुमच्या वाऱ्याला देखील उभे राहणार नाहीत. प्रत्येक कार्य हें हळूहळू प्रगत होत असतें. म्हणून लक्षांत ठेवा की, धीर, पवित्रता व चिकाटी यांचीच नितान्त आवश्यकता आहे.

तुमचा
नरेंद्र

## (१४) *

( स्वामी शिवानंद यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
१८९४

प्रिय शिवानंद,

तुमचें पत्र नुकतेंच मिळालें. मध्यंतरीं माझीं इतर पत्रें तुम्हांला मिळालीं असतील. अमेरिकेंत माझ्याकडे आता कांहीहि पाठविण्याची गरज नाही, हें त्यांवरून तुम्हांला कळलेंच असेल. कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक केव्हाहि वाईटच. वर्तमानपत्रांतील या गाजावाजामुळे माझी लोकप्रियता वाढली हें खरें, पण या साऱ्यांचा परिणाम येथल्यापेक्षा हिंदुस्थानांत अधिक झाला आहे. उलट, सारखे ढोल पिटत राहिल्यास

त्याचा येथील सुसंस्कृत उच्च वर्गावर वाईटच परिणाम होतो; त्यामुळे त्यांच्यांत आपल्याबद्दल नावड उत्पन्न होते. तेव्हा या साऱ्या गोष्टी आता पुरे. आता या सभांमधे ठरल्याप्रमाणे स्वत:ला भारतांत संघटित करण्याच्या प्रयत्न करा. इकडे कांहीहि पाठविण्याची आता आवश्यकता नाही. पैशासंबंधी म्हणाल तर माताजींसाठी * आधी एखादें स्थान निर्माण करण्याचा मीं संकल्प केला आहे, कारण याबाबत स्त्रियांची गरज अधिक निकडीची आहे. . . .या कामासाठी मी सात हजार रुपये पाठवूं शकेन. असें एखादें स्थान एकदाचें झालें की मग मला कसलीच फिकीर नाही. मी येथून गेलों तरी दरवर्षी सोळाशे रुपये मला या देशांतून नियमितपणें मिळूं शकतील. या पैशाचा मी स्त्रियांच्या जागेसाठी विनियोग करीन. ती संस्था पुढे मग आपोआपच वाढीस लागेल. जागा घेण्याबावत या दृष्टीने मीं तुम्हांला आधीच सुचविलें आहे. . . .

मी यापूर्वी भारतांत परत आलों असतों, पण भारतांत पैसा उभारतां येणें कठीण. हजारो लोक श्रीरामकृष्णांना गौरवीत असतां जिथे कुणी त्यांच्यासाठी एक छदाम द्यायला तयार नाही असा देश म्हणजे—भारत. . . .तुम्ही सारे एकजुटीने राहा.

जग हें तत्त्वांची फिकीर करीत नाही, त्यांना हवी असते व्यक्ति. आपल्याला मान्य असलेल्या व्यक्तीचें मूर्खपणाचें बडबडणें ऐकणें लोकांना परवडतें, पण नावडत्या माणसाचें कांहीहि ऐकून घेण्यास ते तयार नसतात, ही गोष्ट पक्की लक्षांत बाळगूनच आपल्या वागणुकीला मुरड घाला. अशानेच साऱ्या गोष्टी ठीक होतील. नेतृत्व हवें असेल तर सगळ्यांचे दास व्हा. यशाची हीच खरी गुरुकिल्ली आहे. तुमचें शब्द जरी क्वचित् कठोर असले तरी तुमच्या प्रेमाचाच खरा प्रभाव पडेल. प्रेमभावना कशाहि शब्दांत व्यक्त झालेली असली तरी ती ओळखण्याची सहजप्रवृत्ति लोकांच्या ठिकाणीं स्वाभाविकपणेंच असते.

दादा, श्रीरामकृष्णदेव ईश्वराचा अवतार होते यांत मला लवमात्र संदेह नाही, पण त्यांची शिकवणूक काय होती हें लोकांनाच समजून घेऊं द्या, या गोष्टी तुम्ही लोकांवर जबरदस्तीने लादूं नयेत; असें करण्यालाच माझी हरकत आहे.

* भगवान् श्रीरामकृष्णांच्या लीलासहधर्मिणी श्रीसारदादेवी

लोकांना आपापलीं मतें बोलून दाखवूं द्या. याला काय म्हणून आपण विरोध करावा? दादा, आधी श्रीरामकृष्णांचा सांगोपांग अभ्यास केल्याखेरीज वेदांचें, वेदान्ताचें, भागवताचें व अन्य पुराणांचें मर्म कुणालाहि कळणें शक्य नाही. त्यांचें जीवन म्हणजे समग्र भारतीय धर्मविचारांवर पडलेला अमाप शक्तिसंपन्न असा प्रचंड प्रकाशझोतच होय. वेद व वेदाचें लक्ष्य यांवर त्यांचें जीवन म्हणजे एक जिवंत भाष्यच होय. भारतीय धार्मिक जीवनाचा एक संपूर्ण कल्प त्यांनी आपल्या एकाच जीवनांत प्रत्यक्ष जगून दाखविला.

भगवान् श्रीकृष्ण वास्तविक जन्मले वा नाहीत हें आपल्याला निश्चित ठाऊक नाही; बुद्ध, चैतन्यादि अवतारांनी एकाच अंगावर भर दिला. पण श्रीरामकृष्ण हेच the latest and the most perfect —सगळयांत अलीकडचे व सर्वांपेक्षा पूर्ण आहेत. ज्ञान, प्रेम, वैराग्य, उदारभाव, लोकहितभावना वगैरेंची ते म्हणजे घनीभूत साकार मूर्तिच. त्यांची काय दुसऱ्या कुणाशीं तुलना होऊं शकते? त्यांना जो समजूं शकणार नाही, त्याचा जन्म वृथाच म्हणावा लागेल! मी त्यांचा जन्मजन्मांतरींचा दास आहें हेंच माझें परमभाग्य होय. त्यांचा एक शब्द देखील साऱ्या वेद-वेदान्तापेक्षा मला अधिक मोलाचा वाटतो. तस्य दासदासदासोऽहम् — अहाहा, मी त्यांच्या दासाच्या दासाचा दास आहें. पण एकांगीपणा, संकुचितता आणि कट्टरपणा हीं त्यांच्या तत्त्वांशीं कधीच जुळण्यासारखीं नाहीत; असें कांही पाहिलें की मला दुःख होतें आणि राग येतो. त्यांचें नांव विस्मृतींत बुडालें तरी कांही हरकत नाही, पण त्यांचे उपदेश फलद्रूप होवोत. ते काय नांव-लौकिकाचे गुलाम होते? कांही कोळयांनी व अडाणी लोकांनी येशू ख्रिस्तांना ईश्वर म्हटलें, पण जे पंडित होते त्यांनी मात्र त्यांना मारून टाकलें. बुद्धांच्या जीवितकालांत त्यांना अनेक व्यापाऱ्यांकडून व गवळयांकडून सन्मान मिळाला होता. पण या एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस श्रीरामकृष्णांच्या जीवितकालांतच विश्वविद्यालयाच्या भुतांनी व ब्रह्मराक्षसांनी त्यांना ईश्वराचा अवतार म्हणून पूजिलें. . . . कृष्ण, बुद्ध, येशू यांच्याबद्दल फारच थोडया गोष्टी नोंदून ठेवल्या गेल्या आहेत आणि त्यालाहि आज हजारो वर्षें होऊन गेलीं आहेत. 'जिच्या घरीं आपल्याला

कधी राहण्याचें काम पडलें नाही ती चांगलीच गृहिणी असणार' अशी आपल्या बंगालींत म्हण आहे. पण आपण तर रात्रंदिवस त्यांच्याबरोबर घालवून देखील आज असेंच म्हणावेसें वाटतें की वर उल्लेखिलेल्या व्यक्तींपेक्षा त्यांचें व्यक्तिमत्त्व कितीतरी मोठें होतें. हा प्रकार काय आहे, कळतें, तुम्हांला ?

माताजी म्हणजे काय हें अजून तुमच्यापैकी कुणालाच समजलें नाही. त्यांचें अद्‌भुत जीवनमाहात्म्य अजून तुम्हां कुणाच्याहि लक्षांत आलेलें नाही. हळूहळू तें तुम्हांला उमजेल. शक्तीशिवाय जगाचा उद्धार होणें शक्य नाही. आपला देश सर्वांत दुबळा व मागासलेला कां असावा ?––आपल्या देशांत शक्तींचा अवमान होतो म्हणून. भारतांत त्या महाशक्तीला जागविण्यासाठीच माताजी आल्या आहेत; त्यांना केंद्र बनवूनच पुन्हा या देशांत गार्गी, मैत्रेयी निर्माण होतील. दादा, आता कुठे तुम्हां लोकांना थोडें उमजूं लागलें आहे. कालान्तराने साऱ्या गोष्टी तुम्हांला समजतील. म्हणूनच माताजींसाठी मठ आधी व्हावा अशी माझी इच्छा आहे. . . .महाशक्तीच्या कृपेखेरीज कांहीहि होणें शक्य नाही. युरोपअमेरिकेंत मला काय आढळलें ?––शक्तीची उपासना, शक्तीची उपासना. पण अज्ञानामुळे ते ही उपासना इंद्रियभोगांच्या द्वारें करीत आहेत. यावरून, जे तिची विशुद्ध भावाने, मातृभावाने व शुद्ध सात्त्विक भावाने पूजा करतील त्यांचें किती कल्याण होईल याची नुसती कल्पनाच करून पाहा. दिवसेंदिवस माझे डोळे उघडताहेत, हळूहळू मला सारें समजत आहे. कसेंहि करून आपण प्रथम माताजींसाठी मठ निर्माण करायला हवा. आधी आई आणि तिच्या मुली, नंतर बाप आणि त्याचीं मुलें––आलें तुमच्या लक्षांत ? . . .पित्यापेक्षा मातेची कृपा मला लाखपट अधिक मोलाची वाटते. मातेचा आशीर्वाद, मातेची कृपा याच गोष्टी मला सर्वांत अधिक महत्त्वाच्या वाटतात. . . .माफ करा, मातेच्या बाबतीत मी किंचित् कडवा आहें. मातेने आज्ञा करतांच तिचीं भुतें वाटेल तें काम करतील. तारकदादा, अमेरिकेला येण्यापूर्वी मीं माताजींना पत्र लिहून त्यांच्या आशीर्वादाची याचना केली होती. त्यांचा आशीर्वाद मिळतांच एका झेपेंतच मी सागर उल्लंघून आलों. हें तर तुम्ही प्रत्यक्ष पाहतां आहांत. या भयंकर थंडींत अडचणींशीं झगडत

मी जागोजाग व्याख्यानें देत हिंडतों आहें, पैसा उभा करतों आहें—हेतु हा की माताजींसाठी मठ उभारतां यावा. . . . निरंजन आहे थोडा लढाऊ वृत्तीचा, पण माताजींबद्दल त्याला विशेष भक्ति वाटते, यामुळेच त्याच्या साऱ्या लहरी सहन करायला माझी तयारी आहे. सध्या तर तो विलक्षण मोलाचें कार्य करतो आहे. मी साऱ्या गोष्टींची खबर ठेवतों. मद्रासी लोकांच्या सहकार्यानें तुम्हींहि कांही कमी काम केलें नाही. दादा, तुमच्याकडून माझी फार मोठी अपेक्षा आहे. एकजुटीने काम करण्यासाठी तुम्हीं साऱ्यांना एकत्र आणलें पाहिजे. माताजींच्या मठासाठी तुम्हीं जागा घेतांच मी सरळ भारतांत निघून येईन येथून. जागा मात्र मोठी घ्या. सुरवातीला साधें मातीचें जरी घर बांधलें तरी चालेल. हळूहळू मी तेथे सुरेख घर बांधीन. त्याची काळजी नका करूं तुम्ही.

मलेरियाचें मुख्य कारण असतें दूषित पाणी. तुम्ही दोनतीन फिल्टर कां नाही तयार करीत ? आधी उकळून, नंतर फिल्टर करून घेतल्यास पाण्यांतील सारे दोष निघून जातात. . . . जंतूंपासून सुरक्षित असलेले पाश्चर कंपनीचे दोन मोठेथोरले फिल्टर विकत आणा. स्वयंपाकाला, प्यायला सारे तेंच पाणी वापरा; पाहाल पुन्हा मलेरियाचें नांव देखील ऐकूं येणार नाही कुठे. . . . पुढे चला ! पुढे चला ! काम करा, काम करा, काम करा. ही तर केवळ सुरवात आहे.

तुमचा
विवेकानंद

## (१५)

( श्रीमती ओली बुल यांना )

ब्रुकलिन
२८ डिसेंबर १८९४

प्रिय श्रीमती बुल,

मी न्यूयॉर्कला सुखरूप येऊन पोहोचलों. तेथे डेपोवर लॅन्ड्सबर्ग

मला भेटला. लागलीच ब्रुकलिनला जाण्यास निघून तेथे अगदी वेळेवर पोहोचलों.

आमचा सायंकाळचा वेळ मोठया मजेंत गेला. 'एथिकल कल्चर सोसायटी'चे पुष्कळ सदस्य मला येऊन भेटले.

येत्या रविवारीं एक व्याख्यान होईल. डॉ. जेन्स नेहमीप्रमाणेच प्रेमाने वागले व श्री. हिगिन्सहि पूर्वीप्रमाणेच दिसले--खूप कामाचा माणूस. कां कुणास ठाऊक पण इतर कोणत्याहि शहरापेक्षा या न्यूयॉर्क शहरांत स्त्रियांपेक्षा पुरुषांत धर्माची आवड अधिक आढळते....

श्री. हिगिन्स यांनी माझ्याबद्दल प्रसिद्ध केलेल्या छोटयाशा पुस्तिकेची एक प्रत सोबत पाठवीत आहें. पुढे आणखी पाठवीतां येतील असें वाटतें.

कु. फार्मर यांना व त्यांच्या पवित्र कुटुंबातील सर्वांना माझ्या प्रेमळ शुभेच्छा.

तुमचा आज्ञाधारक
विवेकानंद

## (१६) *

( स्वामी ब्रह्मानंद यांना )

ॐ नमो भगवते रामकृष्णाय

१८९४

प्रिय राखाल,

...भारतांत कांही धर्म आता शिल्लक आहे असें तुम्हांला वाटतें का? ज्ञानमार्ग, भक्तिमार्ग, योग या साऱ्यांची तर केव्हाच वासलात लागली. आता शिल्लक आहे फक्त 'मला शिवूं नका'–वाद. 'मला शिवूं नका,' 'मला शिवूं नका!' सारं जग अमंगळ; शुद्ध, पवित्र काय या जगांत तो एकटा मी! हेंच आमचें ब्रह्मज्ञान! वारे

मर्दीनो ! हे भगवन् ! आजकाल ब्रह्म हें हृदयगुहेंत वसत नाही, तें वैकुंठांत नाही, तें सर्व भूतांत नाही, तें आहे फक्त भाताच्या बोघोण्यांत. पूर्वी उदारचरिताचें लक्षण होतें आपल्या प्रेमळ सेवेने त्रिभुवनांतील सर्वांना संतुष्ट करणें—'त्रिभुवनमुपकारश्रेणिभिः प्रीयमाणः।' पण आज मात्र तें आहे—'सारें जग आहे ओंगळ, पवित्र फक्त काय तो मीच ! तेव्हा जा आणि पैसा जमा करून तो माझ्या पायाशीं ओता !'... शहाणपणाचा दिमाख मिरविणाऱ्या ज्या महाभागाने मी येथलें काम संपवून परत भारतांत येण्याचा मला सल्ला दिला त्याला कळवा की .. हा देश मला घरापेक्षाहि अधिक जवळचा वाटतो—काय ठेवलें आहे त्या हिंदुस्थानांत ? धर्माची कदर आहे का कुणाला ? विद्वत्तेला कांही काडीची तरी किंमत देतो का कुणी ? म्हणे, मायदेशीं घरीं परत या ! आहे कुठे घर ?

...मी श्रीरामकृष्णांचें एक चरित्र लिहून पाठवीन. त्याचें भाषान्तर करून तें छापून त्याची विक्री करा. फुकट वांटल्याने लोक वाचीत नाहीत, थोडी किंमत ठेवा....मला भक्तीची किंवा मुक्तीची काडीमात्र पर्वा नाही. त्यापेक्षा 'वसंतवल्लोकहितं चरन्तः'—'गाजा-वाजा न करतां वसंत ऋतुप्रमाणे लोकांचें हित साधतां साधतां' मी काळ घालवीन—त्यासाठी मला नरकांत जरी जावें लागलें तरी मी तें पत्करीन—हाच आहे माझा धर्म. आळशी, निर्दय, क्रूर व स्वार्थी लोकांशीं कसलाहि संबंध ठेवण्याची माझी इच्छा नाही. ज्यांचें सौभाग्य असेल तेच या महत्कार्याला हातभार लावूं शकतील.

...साऱ्यांनाच माझ्या सप्रेम शुभकामना सांगा, मला साऱ्यांच्याच मदतीची अपेक्षा आहे. ना पैसा कामीं येत, ना नांवलौकिक, ना पांडित्य. शुद्ध चारित्र्य हीच एक अशी गोष्ट आहे की जी अत्यंत घोर संकटांवर देखील मात करूं शकते. हें तुम्ही पक्कें ध्यानांत ठेवा....

तुमचा चिरस्नेहास्पद

विवेकानंद

(१७)

(श्री. जी. जी. नरसिंहाचारियर यांना)

शिकागो,

११ जानेवारी १८९५

प्रिय जी. जी.,

तुमचें १३ डिसेंबरचें पत्र आत्ताच मिळालें. . .येथील सर्वधर्म-परिषद आयोजित करण्यांत आली होती—ख्रिस्ती धर्माचें इतर धर्मांवर श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्यासाठी, पण तरी देखील तत्त्वज्ञानाधिष्ठित हिंदुधर्म आपली प्रतिष्ठा प्रस्थापित करण्यांत विजयी झाला. डॉ. बॅरोज व त्यांच्याच श्रेणींतील लोक भयंकर पुराणमताभिमानी आहेत, त्यामुळे त्यांच्यापासून मला मदतीची कांही अपेक्षा नाही. . . परमेश्वराच्या कृपेने मला या देशांत अनेक मित्र लाभले व त्यांची संख्याहि सतत वाढतच आहे. ज्यांनी माझें अनिष्ट करण्याचा प्रयत्न केला त्यांचें ईश्वर भलें करो . . .या देशांतील दोन प्रमुख केंद्रें म्हटलीं म्हणजे बोस्टन व न्यूयॉर्क हीं होत. या दोन केंद्रांत मला सारख्या खेपा घालाव्या लागत आहेत. या दोन केंद्रांपैकी बोस्टन म्हणजे मेंदू व न्यूयॉर्क म्हणजे पैशाची थैली असें म्हटल्यास वावगें नाही. या दोन्ही ठिकाणीं मला आशातीत यश लाभलें. मी वर्तमानपत्री लिखाणांकडे उपेक्षाबुद्धीनेच पाहतों व असल्या वर्तमानपत्रांतून माझ्याबद्दल येणाऱ्या गुणवर्णनांचीं कात्रणें मी तुम्हांला पाठवीन अशी तुम्हींहि अपेक्षा करूं नये. आपलें काम चालू व्हावें म्हणून सुरवातीला थोड्या गाजावाजाची आवश्यकता होती. त्या गोष्टी आता भरपूर प्रमाणांत होऊन गेल्या आहेत.

मीं मणी अय्यर यांना लिहिलें असून तुम्हांलाहि द्यायच्या त्या सूचना दिल्या आहेत. आता फक्त प्रत्यक्ष कृतींत तुम्ही काय करतां तेंच मला दाखवा. निर्बुद्धासारखी वायफळ बडबड करण्याचें सोडून प्रत्यक्ष कामाला लागा. हिंदु लोकांनी बोलण्याबरोबरच प्रत्यक्ष कांही कामहि करावयास हवें. हें जर त्यांच्याने होत नसेल तर ते कशालाच लायक नाहीत हाच त्याचा अर्थ. तुमचीं खुळें पुरीं करण्यासाठी अमेरिका कांही

तुम्हांला पैसा देणार नाही. आणि त्यांनी कां म्हणून द्यावी ? माझ्या दृष्टीने बोलायचें तर मला सत्याचा प्रचार करावयाचा आहे, मग तो येथे असो वा अन्यत्र कुठे असो.

तुमच्या आणि माझ्यासंबंधी लोक अनुकूल वा प्रतिकूल काय बोलतात याकडे तुम्ही यापुढे लक्षच देऊं नका. काम करा, सिंहपराक्रम गाजवा, भगवान् तुम्हांला आशीर्वाद देईल. न थांबतां, अगदी मरेपर्यंत मी कार्य करीत राहीन, इतकेंच नव्हे तर मृत्यूनंतरहि माझ्या लोक-कल्याणकार्याला खंड पडणार नाही. असत्यापेक्षा सत्य हें केव्हाहि अनंत पटीने प्रभावशाली असतें; भलेपणाच्या बाबतींतहि हेंच खरें आहे. तुमच्या ठिकाणीं जर हे गुण असतील तर आपल्याच प्रभावाने, आपल्याच शक्तीने ते आपला मार्ग काढतील.

थिऑसफिस्टांशीं माझा कांही संबंध नाही. श्री. जज् मला मदत करतील ?––रामाचें नांव घ्या! . . .चांगल्यांत चांगले समजले जाणारे हजारो लोक मला येथे मानतात याची तुम्हांलाहि जाणीव आहे. तेव्हा आता तरी भगवंतावर विश्वास असूं द्या. माझ्याविषयीच्या वर्तमानपत्री नेत्रदीपक प्रचाराने पडला असेल त्यापेक्षा माझा कितीतरी पट अधिक प्रभाव या देशावर हळूहळू पडत आहे. येथील सनातनी मंडळींना याची जाणीव होत आहे, पण त्यांचा कांही उपाय चालत नाही. हा आहे चारित्र्याचा, पावित्र्याचा, सत्याचा प्रभाव––व्यक्तिमत्त्वाचा प्रभाव. जोंवर या गोष्टी माझ्या ठिकाणीं आहेत तोंवर तुम्ही अगदी निश्चिंत असा. कुणी माझ्या केसाला देखील धक्का लावूं शकणार नाही. जर ते तसा प्रयत्न करतील तर तोंडघशीं पडतील––स्वयं प्रभुच मला असें सांगत आहेत. . . .तात्त्विक सिद्धान्त, पुस्तकें या साऱ्या गोष्टी बाजूला राहूं द्या. लोकांच्या अगदी हृदयाला हात घालण्याचा एकमात्र सर्वोत्कृष्ट उपाय म्हणजे जीवन; त्यांतूनच आपल्या व्यक्तिमत्त्वाचें आकर्षण उत्पन्न होत असतें. . .प्रभूच्या कृपेने दिवसानुदिवस मला अधिकाधिक सखोल अंतर्दृष्टि लाभत आहे. काम करा, काम करा, काम करा. . . .मूर्ख-पणाच्या भाकडकथा आता बंद, आता बोलायचें तें भगवंताबद्दलच. लबाड, एककल्ली, वेडपट लोकांबद्दल बोलत बसायला सवड नाही आपल्याला, आयुष्य फार थोडें आहे.

प्रत्येक देशाने, प्रत्येक व्यक्तीने स्वतःचें संरक्षण करावयास हवें; याबाबत कुणीहि कुणाकडे मदतीसाठी तोंड वेंगाडण्यांत अर्थ नसतो हें ध्यानांत धरा. येथे खूप परिश्रम करून मी तुम्हांला अधूनमधून तुमच्या कार्यासाठी कांही पैसा पाठवूं शकेन. याहून अधिक मी कांही करूं शकणार नाहीं. पण तुम्ही जर त्यावरच सर्वस्वी अवलंबून राहणार असाल तर त्यापेक्षा तुम्हीं आपलें काम बंदच करणें बरें होईल. याबरोबरच हेंहि लक्षांत ठेवा की माझ्या विचारांच्या प्रसारासाठी येथे विशाल क्षेत्र आहे. येथील लोक हिंदु असोत की मुसलमान असोत की ख्रिस्ती असोत, याची मला पर्वा नाही. जे जे कोणी परमेश्वरावर प्रेम करीत असतील त्यांच्या सेवेसाठी मी तत्पर राहीन.

. . .शांतपणें, गाजावाजा न करतां काम करणें मला आवडतें. प्रभुच सर्वदा माझा पाठीराखा आहे. माझ्या मागून यायचेंच असेल तर पूर्णतया निष्कपट, निःस्वार्थ व सर्वांत म्हणजे पवित्र होऊनच या. माझे हार्दिक आशीर्वाद आहेत तुम्हांला. परस्पराची प्रशंसा करीत बसायला या अल्प जीवनांत सवडच नाही मुळी. आपलें कार्य पूर्ण झालें की मग आपण एकमेकांच्या कामांचा आढावा घेऊं व एकमेकांची यथेच्छ प्रशंसा करूं. आता मात्र बोलायची गरजच नाही; आता एकच ध्यास––काम, काम, काम ! तुम्ही हिंदुस्थानांत स्थायी स्वरूपाचें कांही कार्य केल्याचें तर मला दिसत नाही. तुम्हीं स्थापन केलेलें एखादें केंद्र वा तुम्हीं बांधलेलें एखादें मंदिर वा सभागृह मला दिसत नाही. तसेंच तुम्हांला सहकार्य द्यायला कुणी आलेलेंहि मला दिसत नाही. लंब्याचवड्या गोष्टीच काय त्या मला ऐकूं येतात. 'आम्ही मोठे' 'आम्ही मोठे' हाच एक धोशा ! माझ्या मतें हा तर शुद्ध मूर्खपणा आहे ! आपण आहोंत दुबळे, याखेरीज तर कांही नाही. हें नांवलौकिकामागे धावणें अन् बाकी साऱ्या तसल्याच व्यर्थ गोष्टी––यांना माझ्या दृष्टीने काय किंमत आहे ? काय पर्वा करतों मी त्यांची ? भगवंताकडे शेकडो लोक येताहेत हेंच पाहणें मला अधिक मोलाचें वाटतें ! कुठे आहेत असे लोक ? अशाच लोकांची मला गरज आहे, असेच लोक पाहण्याची इच्छा आहे मला. त्यांना तुम्हीं धुंडून काढा. तुम्ही तर नुसते माझ्या नांवलौकिकाच्या गौरवांतच गुंतलेले दिसतां. तें सारें टाकून देऊन आता कामाला लागा, माझ्या

वीरांनो, कामाला लागा. माझ्या हृदयांत जो अग्नि पेटला आहे त्याच्या स्पर्शाने तुमचीं हृदयें अजून पेटलीं नाहीत. अजूनहि समजूं नाही शकले तुम्ही मला ! आळशीपणाच्या व भोगाच्या जुन्यापुराण्या चाकोरींतूनच अद्याप धांवतां आहांत तुम्ही. सुस्तपणा, ऐहिक वा पारलौकिक भोग, या साऱ्या गोष्टी कटाक्षाने दूर सारा. अग्नींत उडया टाका आणि लोकांना ईश्वराकडे घेऊन या.

माझ्या हृदयांत जो अग्नि धडकत आहे तोच तुमच्या हृदयांत प्रज्वलित होवो, माझ्या जळत्या हृदयाची जाणीव तुम्हांला होवो. तुम्हीं पूर्णपणें निष्कपट व्हावें, तुम्हांला जीवनसमरांत वीरोचित मरण यावें हीच सतत प्रार्थना करणारा--

तुमचा
विवेकानंद

ता. क.--कुणी सोम्या-गोम्या आपल्याबद्दल काय म्हणतो याकडे लक्ष न देतां आपली सारी शक्ति कार्यावर केंद्रित करायला आलासिंगा, किडी, डॉक्टर, बालाजी व अन्य साऱ्यांना सांगा. --विवेकानंद

## (१८)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
१२ जानेवारी १८९५

प्रिय आलासिंगा,

पूर्वी पुष्कळ वेळां मीं तुम्हांला लिहिलें होतें की यापुढे पुस्तिका-बिस्तिका आणि वर्तमानपत्रें माझ्याकडे पाठवूं नका, पण तरीहि तुम्हीं तीं पाठवीतच आहांत हें पाहून मला वाईट वाटतें. तीं वाचायला व त्यांच्याकडे लक्ष द्यायला मला मुळीच सवड नाही. आता तरी कृपा करून तीं पाठवूं नका. मिशनरी किंवा थिऑसफिस्ट माझ्यासंबंधी काय बोलतात याची मी काडीमात्र पर्वा करीत नाहीं. त्यांना जें करावयाचें

असेल तें त्यांना खुशाल करूं द्या. त्यांच्याकडे लक्ष देणें म्हणजेच त्यांना महत्त्व दिल्यासारखें होईल. शिवाय, मिशनरी नुसत्या शिव्याच देतात, तर्कसंगत बोलणें त्यांना ठाऊक नाही, हें तुम्ही जाणतांच.

आता हें सर्वदा जाणून असा की नांवलौकिक वा असल्याच अन्य व्यर्थ गोष्टींची मी काडीचीहि पर्वा करीत नाहीं. लोककल्याणासाठी मला माझ्या कल्पनांचा, माझ्या विचारांचा प्रसार करावयाचा आहे. तुम्हीं आतापावेतो पुष्कळच काम केलें यांत शंका नाही, पण त्यामुळे माझा लौकिक वाढण्यापलीकडे कांहीहि साधलें नाही. जगाकडून केवळ प्रशंसा मिळविण्यापेक्षा माझें जीवन खासच अधिक मोलाचें आहे. असल्या मूर्खपणासाठी मला फुरसत नाही. भारतांत आपल्या कल्पनांचा, आपल्या विचारांचा, आपल्या आदर्शांचा प्रसार करण्याच्या दृष्टीने आणि स्वतः संघटित होण्याच्या दृष्टीने तुम्हीं काय कार्य केलें आहे ? अजीबात कांहीहि नाही.

परस्पर सहकार्य व गुणग्राहकता यांची हिंदूंना शिकवण देईल अशी संघटना होणें अत्यंत आवश्यक आहे. माझ्या येथील कार्याचा गौरव करण्यासाठी कलकत्त्याला भरलेल्या सभेंत पांच हजार लोक हजर होते आणि इतर ठिकाणींहि शेकडोंनी ते हजर होते म्हणतां—ठीक आहे ! पण त्या प्रत्येकाला जर आपल्या कार्यासाठी म्हणून एकेक आणा द्यायला सांगितलें तर देतील का ते ? बालिश परावलंबिता हेंच आहे आपलें राष्ट्रीय चारित्र्य. तोंडाशीं घास आला तर खावा हेंच आपल्याला माहीत; त्यांतहि कांही लोकांची अपेक्षा असते की तो घास कुणी तरी अगदी आपल्या घशांत ढकलून द्यावा ! . . .तुम्ही स्वतःलाच जर मदत करूं शकत नसाल, स्वतःच जर आपल्या पायावर उभे राहूं शकत नसाल तर जगायलाच लायक नाही तुम्ही . . . .

सर्वसामान्य जनतेला शिक्षित करण्याची माझी योजना मीं तूर्त बाजूस ठेविली आहे. ती गोष्ट हळूहळू होईल. अत्यंत ओजस्वी आणि दृढ निश्चयाच्या कांही प्रचारकांचीच सध्या मला जास्त आवश्यकता आहे. जिथे भिन्न भिन्न धर्मांचा तुलनात्मक अभ्यास होईल, जिथे संस्कृत, वेदान्त व वेदान्तांतील विभिन्न मतें, आणि कांही पाश्चात्त्य भाषा शिकविण्याचीहि व्यवस्था राहील असें एक कॉलेज मद्रास येथे स्थापन

करावयास हवें. तसेंच आपल्या हाताशीं एक छापखाना असायला हवा, आणि इंग्रजी व अन्य देशी भाषांतील नियतकालिकेंहि हवींत. हें जर तुम्ही प्रत्यक्षांत उतरवाल तर तुम्हीं कांही केलें असें मी म्हणेन. आपणहि कांही करायला तयार आहोंत असें देशाने दाखवून द्यायला हवें. हिंदुस्थानांत जर तुम्ही हें किंवा असेंच कांही करूं शकत नसाल तर मला माझा मार्ग एकटयानेच चोखाळूं द्या. मला जगाला कांही संदेश द्यायचा आहे, ज्यांना त्याची कदर आहे व जे तो प्रत्यक्षांत उतरविण्यास तयार आहेत अशा लोकांना मला माझा संदेश सांगूं द्या. तो ग्रहण करणारा कोण आहे याची मी कशाला फिकीर करूं? 'जो माझ्या पित्याची इच्छा पूर्ण करतो' ('He who doeth the will of my Father') तोच माझा म्हणायचा....

माझ्या नांवाला प्राधान्य देण्याची गरज नाही; माझ्या कल्पना, माझे विचार प्रत्यक्षांत उतरण्याशींच माझें काम. साऱ्या महापुरुषांच्या शिष्यांनी गुरूचे 'उपदेश' व गुरु ही 'व्यक्ति' यांची गल्लत केलेली आढळते. येवढेंच नव्हे तर अखेर त्यांनी 'व्यक्ती'साठी तिचे उपदेश नष्ट करून टाकले. ही गोष्ट घडूं नये म्हणून श्रीरामकृष्णांच्या शिष्यांनी खूप खबरदारी घ्यावयास हवी. विचारांसाठी, आदर्शासाठी कार्य करा, कुणा व्यक्तीसाठी म्हणून नव्हे. तुम्हांला ईश्वराचे आशीर्वाद लाभोत.

तुमचा
विवेकानंद

## (१९)*

( स्वामी त्रिगुणातीतानंद यांना )

२२८ डब्ल्यू., ३९, न्यूयॉर्क,
१७ जानेवारी १८९५

प्रिय सारदा,

तुमचीं दोन पत्रें व त्याबरोबरच रामदयालबाबूंचींहि दोन पत्रें

आताच मिळालीं. सामान सोडवून घेण्याची पावती मला मिळाली, पण सामान येऊन पोहोचावयास मात्र बराच अवधि लागेल. सामान लवकर पोहोचण्यासाठी विशेष व्यवस्था केली नाही तर सामान यायला सहा महिने देखील लागतात. रुद्राक्षमाळा व कुशासनें पाठविल्याचें हर-मोहनने कळवायला चार महिन्यांच्यावर काळ लोटला आहे तरी अजून त्या सामानाचा मात्र कांही अद्याप कुठे पत्ता नाही. पाठविलेलें सामान इंग्लंडला येऊन पोहोचलें की येथील कंपनीचा एजंट मला तशी खबर देतो आणि त्यानंतर एक महिन्याने तें सामान माझ्या हातीं येतें. तुमची पावती मला मिळायला आता तीन आठवडे होऊन गेले आहेत, पण एजंटाकडून यायच्या खबरीचा अद्याप कुठेच ठावठिकाणा नाही. खेतरीच्या राजेसाहेबांकडून येणारें सामानच तेवढें काय तें लवकर मिळतें. मला तर वाटतें की सामान पाठविण्यासाठी ते खूपच पैसा खर्च करीत असावेत. तें कांहीहि असलें तरी जगाच्या या दुसऱ्या टोकास असलेल्या पाताळलोकीं पाठविलेलें सामान येऊन पोहोचतें हीच मोठी अभिनंदनीय गोष्ट आहे. सामान मिळतांच मी लागलीच तसें तुम्हांला कळवीन. आता निदान तीन महिने तरी स्वस्थ बसा. . . .

तुम्हीं नियतकालिक काढावयाची हीच वेळ आहे. रामदयाल-बाबूंनी सुचविलेला मनुष्य सुयोग्य जरी असला तरी सध्या कुणाला अमेरिकेंत बोलावण्यासारखी माझी परिस्थिति नाही असें त्यांना कळवा. . . .तिबेटसंबंधी लिहिलेल्या तुमच्या लेखाचें काय झालें ? 'मिरर' पत्रांत तो प्रसिद्ध झाल्यावर त्याची एक प्रत मला पाठवा. . . .पुढे व्हा ! तुमच्यासाठी आता एक मोठें काम आहे, नियतकालिक चालू करा. लोकांना तें घ्यावयास लावा. वर्गणीदार करा त्यांना. कांही भ्यायचें काम नाही. अगदी क्षुद्र हृदयें असणाऱ्या माणसांकडून कसली अपेक्षा करतां तुम्ही ? या जगांत तरी असल्या लोकांकडून कांही होण्याची उमेद नाही ! महासागर तरून जायचें असेल तर वज्रासारखी इच्छा-शक्ति हवी असते. पर्वतांना सुद्धा भेदून पलीकडे जाण्याचें बळ तुमच्या ठायीं हवें. मी पुढच्या हिवाळ्यांत तिकडे परत येईन. त्यानंतर सारें जग देऊं पेटवून; ज्यांना आपल्याबरोबर यायचें असेल त्यांना येऊन भाग्य-शाली होऊं द्या, ज्यांना नसेल यायचें त्यांना रखडूं द्या चिरकाल मागे.

मर्जी त्यांची. तुम्ही स्वत: मात्र कंबर कसून तयार राहा. . . .कसलीहि पर्वा करूं नका. तुमच्या जिव्हाग्रीं, कराग्रीं साक्षात् सरस्वती निवास करील, अनंत शक्तिसंपन्न भगवान् तुमच्या हृदयीं विराजमान होतील, तुम्ही अशीं कामें कराल की तीं पाहून सारें जग थक्क होऊन जाईल. सहज सुचलें म्हणून लिहितों, तुमचें हें लांबलचक नांव तुम्हांला थोडें आखूड नाही का करतां येणार बाबा ? काय लांबच्या लांब नांव आहे तुमचें हें ! या एका नांवानेच एखादा प्रचंड ग्रंथराज पार भरून जायचा ! परमेश्वराच्या नांवाला भिऊन यमराज सुद्धा दूर हटतो असें आपण ऐकतों. पण लक्षांत ठेवा की तें भयदायक नांव कांही 'हरि' वगैरें-सारखें साधें नसतें. तीं नांवें म्हणजे 'अघभगनरकविनाशन,' 'त्रिपुर-मदभंजन,' किंवा 'अशेषनि:शेषकल्याणकर' अशीं गहनगंभीर असतात. अन् त्यांना भिऊनच, यमराज आपल्या दलासह जरी आले असले तरी दूर सरतात ! तुम्ही जर तुमच्या नांवाची थोडी काटछाट करून त्याला थोडा साधा रेखीव घाट आणला तर तें सुरेख दिसेल असें नाही का तुम्हांला वाटत ? पण आता असें करायची वेळ बहुधा निघून गेली असावी व तुमच्या या नांवाचा प्रचारहि बहुधा खूप झाला असेल. पण तुमचें हें जबरदस्त नांव जगाला विमोहित करणारें अन् मृत्यूला भिवविणारें खासच आहे यांत मात्र शंका नाही.

सस्नेह,
तुमचा
विवेकानंद

ता. क.—साऱ्या बंगाललाच, नव्हे, तर साऱ्या भारताला जबरदस्त धक्के देऊन जागे करा. जागोजाग आपलीं केंद्रें सुरू करा.

तुम्हीं पाठविलेली भागवताची प्रत मला मिळाली. ही आवृत्ति अत्यंत सुंदर आहे, पण या देशांतील लोकांचा संस्कृतच्या अध्ययनाकडे 'कल' जवळजवळ नाहीच. त्यामुळे ही आवृत्ति इकडे खपण्याची आशा फारशी नाही. इंग्लंडमध्ये मात्र बरेचसे लोक संस्कृतचें अध्ययन आवडीने करीत असल्यामुळे ही आवृत्ति खपण्याची शक्यता थोडीफार तेथे आहे. या आवृत्तीच्या संपादकांना मी त्यांचे खास आभार मानल्याचें कळवा. त्यांचा हा उदात्त प्रयत्न संपूर्ण यशस्वी होईल अशी मला आशा

आहे. या पुस्तकाचा इकडे प्रसार व्हावा म्हणून मी विशेष प्रयत्न करीन. त्यांनी पाठविलेलें सूचिपत्र मीं निरनिराळ्या ठिकाणीं धाडलें आहे. मुगाच्या, तुरीच्या डाळीचा व्यापार इंग्लंड व अमेरिकेंत किफायतशीरपणें चालू शकेल असें रामदयालबाबूंना कळवा. डाळींच्या वरणाचा जर योग्य रीतीने प्रचार झाला तर लोक त्या आवडीने वापरूं लागतील. लहान लहान डब्यांत घालून व त्यावर त्या कशा तयार करायच्या हें छापून जर डाळी घरोघर खपविल्या तर त्यांना खूप मागणी राहील. तसेंच त्या येथे साठवून ठेवण्याचीहि कांही व्यवस्था करायला हवी. त्याचप्रमाणे मुगवड्या वगैरेंसारख्या वस्तु देखील येथे मोठ्या प्रमाणावर खपूं शकतील. साहसयुक्त उद्योगाची आवश्यकता आहे, आळशासारखे घरांत बसून कांही होणें शक्य नाही. कुणी जर एखादी कंपनी काढून येथे व इंग्लंडमधे भारतीय माल पाठवायचें ठरविलें तर छान व्यापार चालूं शकेल. पण आपले लोक पडले साऱ्या मुलखाचे आळशी. . . .

(२०)

( श्री. आलासिगा पेरुमल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
२३ जानेवारी १८९५

प्रिय आलासिगा,

. . .मरेपर्यंत निष्ठेने राहतील, सचोटीने वागतील अशीं माणसें मला हवीं आहेत. यशापयशाची मला पर्वा नाही. . . .माझें कार्य निष्कलंक राहायला हवें, आणि तसें जर होणार नसेल तर कार्याचीच मला आवश्यकता नाही.

तुमचा
विवेकानंद

## (२१)*

( श्री. वैकुंठनाथ सन्याल यांना )

५४ डब्ल्यू., ३३ स्ट्रीट, न्यूयॉर्क,
९ फेब्रुवारी १८९५

प्रिय सन्याल,

. . . श्रीरामकृष्णदेव माझे गुरु होते, आणि त्यांच्या माहात्म्याबद्दल माझी कांहीहि भावना असली तरी साऱ्या जगाने माझ्याप्रमाणे काय म्हणून त्यांना मानावें ? याच मुद्यावर जर तुम्ही फार भर द्याल तर साऱ्याच गोष्टींचा चुथडा करून टाकाल. गुरूची साक्षात् भगवान् म्हणून पूजा करणें ही कल्पना बंगालबाहेर कांही आढळणार नाही आणि हा आदर्श स्वीकारावयाची इतर लोकांची अद्यापहि तयारी नाही. . . .

माताजींसाठी † जमीन विकत घेऊन दिली की मी स्वतःला ऋणमुक्त समजेन. त्यानंतर मला कशाची काळजी उरणार नाही.

या भयंकर हिवाळ्यांत भर मध्यरात्रीं पर्वताडोंगरांत बर्फावरून मीं प्रवास केला आहे आणि लेक्चरें देऊन थोडें धन जमवलें आहे; माताजींसाठी जमीन विकत घेतली की मी एकदाचा निश्चिंत होईन.

वर दिलेल्याच ठिकाणीं मी यापुढे कायम वास्तव्य करून राहणार असल्यामुळे यापुढे तुम्ही सारीं पत्रें त्याच पत्त्यावर पाठवा.

शक्य असल्यास योगवासिष्ठाचें इंग्रजी भाषान्तर मला पाठवा. . . . आधीच मागवलेलीं नारदसूत्रें व शांडिल्यसूत्रें हीं संस्कृत पुस्तकें पाठवायला विसरूं नका मात्र. 'आशा हि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम् ।'—आशा हेंच परम दुःख होय आणि आशेचा परित्याग हेंच परम सुख होय.

तुमचा
नरेंद्र

---

† भगवान् श्रीरामकृष्णांच्या लीलासहधर्मिणी श्रीसारदादेवी

## (२२)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
६ मार्च १८९५

प्रिय आलासिंगा,

मी बराच काळ चूप असल्यामुळे तुमच्या मनांत बहुधा नाना विचार आले असतील. पण बेटा, लिहिण्यासारखें कांही विशेष नव्हतेंच. इकडील खबर म्हटली म्हणजे तीच जुनी गोष्ट—नुसतें काम, काम, काम....हे 'यांकी' (अमेरिकन लोक) धर्म प्रत्यक्ष व्यवहारांत उतरविण्यासाठी तत्पर असतील असा भ्रम क्षणभर देखील होऊं देऊं नका. या बाबतींत प्रत्यक्ष प्रयत्नच जर कुणी करीत असतील तर ते म्हणजे हिंदु. यांकी पैसा कमाविण्याच्या बाबतींत तत्पर असतात. म्हणून सध्या त्यांच्यांत जेवढी धर्मजागृति झाली आहे तेवढी मी येथून निघून जातांच नाहीशी होईल. म्हणून येथून निघण्यापूर्वी माझ्या कार्याची पक्की पायाभरणी करावयाची आहे मला. कोणतेंहि काम अर्धवट न सोडतां पूर्ण केलेलें बरें....श्रीरामकृष्णांच्या नांवाचा प्रचार व्हावा या गोष्टीवर मुळीच भर देऊं नका. लोकांना आदर्शापेक्षा व्यक्तींचेंच माहात्म्य अधिक वाटतें हें मला माहीत असूनहि मी सांगतों की आधी त्यांच्या शिकवणुकीचाच प्रचार करा....सुरवातीलाच भल्या मोठमोठ्या योजना आखून ठेवूं नका, अगदी लहान प्रमाणावर आरंभ करा, पायाखालची जमीन चाचपडून पाय रोवण्याचा प्रयत्न करा आणि मग हळूहळू पुढे चला.

...माझ्या धाडसी मुलांनो, कामाला लागा कंबर कसून. पाहाल, एक ना एक दिवस आपल्याला प्रकाश दिसेलच.

मेळ-मिलाफ व शांति!...साऱ्या गोष्टींची अगदी सावकाश वाढ होऊं द्या. येवढ्या मोठ्या रोम शहराची उभारणी चुटकीसरशी एका दिवसांत कांही झाली नव्हती हें लक्षांत ठेवा. म्हैसूरचे महाराज वारले—आपलें एक फार मोठें आशास्थान नष्ट झालें. असो, प्रभु

महान् आहेत. तेच आपल्याला साहाय्य करणारे अन्य लोक पाठवतील.

जमल्यास कांही कुशासनें पाठवा. तुम्हांला आशीर्वाद.

तुमचा
विवेकानंद

(२३)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका
४ एप्रिल, १८९५

प्रिय आलासिंगा,

तुमचें पत्र आताच मिळालें. कुणी मला कांही अपाय करील अशी भीति बाळगण्याचें कांहीच कारण नाही तुम्हांला. जोंवर ईश्वर माझें रक्षण करतो आहे तोंवर मी अजिक्य आहें. मला हात लावायची ताकद नाही कुणाची. अमेरिकेबद्दलची तुमची कल्पना अगदी अस्पष्ट अशी आहेसें वाटतें. . . .हा एक अवाढव्य, प्रचंड देश आहे आणि येथील बहुसंख्य लोक धर्माची फारशी पर्वा करणारे नाहीत. . . .स्वदेश-प्रीतीच्या स्वरूपांतच ख्रिस्ती धर्म येथे टिकून आहे, आणखी कांही नाही. . . .बेटा, आता धैर्य सोडूं नकोस. . . .वेदान्तसूत्रें व त्यावरील सर्व मतांचीं भाष्यें पाठवा. . . .

मीं आपलें सर्वस्व भगवंताच्या हातीं सोपविलें आहे. हिंदुस्थानांत नुसतें परत येऊन काय लाभ होणार? माझ्या कल्पना हिंदुस्थान कांही पुढे रेटूं शकणार नाही. हा देश ह्या माझ्या कल्पना स्वीकारीत आहे. मला तसा आदेश मिळाला की मी परत येईन. मध्यंतरींच्या काळांत तुम्ही शांतपणें व चिकाटीने आपलें काम चालूं ठेवा. माझ्यावर कुणी आक्रमण केलें तर त्या व्यक्तीचें अस्तित्व देखील विचारांत घेऊं नका. . . .भाष्यांसहित जेथे वेद-वेदान्त शिकविण्यांत येईल अशी एखादी संस्था तुम्हीं काढावी असें मला वाटतें. सध्या तरी याच दृष्टीने

तुम्ही कामाला लागा. . . .लक्षांत ठेवा की जेव्हा जेव्हा तुम्ही दुबळे-पणाने हातपाय गाळाल तेव्हा तेव्हा तुमचीच नव्हे तर तुमच्या कामाचीहि हानि होईल. असीम श्रद्धा व शक्ति यांच्याच बळावर यशस्वी होतां येतें.

खूप आनंदी, उत्साही व्हा. . . .आपल्या ध्येयाला दृढपणें चिकटून राहा. इतर कशाकडेहि लक्ष देऊं नका—सत्याचा जय होईलच होईल. सर्वांत महत्त्वाचें म्हणजे कुणाला मार्गदर्शन करण्याचा, कुणावर शासन करण्याचा किंवा हे 'यांकी' म्हणतात त्याप्रमाणे इतरांवर 'बॉसिंग' करण्याचा ('अधिकार गाजवण्याचा') कधी प्रयत्न करूं नका. साऱ्यां-शींच सेवकभावाने वागा.

तुम्हांला माझा आशीर्वाद.

तुमचा
विवेकानंद

## (२४)*

( स्वामी रामकृष्णानंद यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
११ एप्रिल १८९५

प्रिय शशी,

. . .तुम्ही आजारांतून उठलांत असें तुम्हीं लिहिलें, तरी पण यापुढे तुम्हांला प्रकृतीबाबत खूपच खबरदारी घ्यावयास हवी. उशीरा जेवणें, कुपथ्य करणें व घाण असलेल्या जागीं राहणें यामुळे आजार उलटण्याची भीति आहे, आणि मग मलेरियाच्या तावडींतून सुटणें कठीण आहे. पहिली गोष्ट ही करा की एखादें उद्यानगृह भाड्याने घ्या; ३०–४० रुपयांत तुम्हांला तें सहज मिळेल. दुसरें म्हणजे पिण्याचें व स्वयंपाकाचें सारें पाणी फिल्टर करून (गाळून) घ्या. बांबूचें मोठें फिल्टर केलें की काम भागेल. साऱ्या रोगांचें मूळ म्हणजे दूषित पाणी. पाण्यामुळे रोग होतात तें पाणी घाण आहे की स्वच्छ आहे यामुळे

नाही; रोग होतात ते पाण्यांत असलेल्या रोगांच्या जंतूमुळे. पाणी आधी उकळून मग फिल्टर करून घ्यावें. पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे तुम्हीं साऱ्यांनी आपल्या प्रकृतीची काळजी घ्यायला हवी. सैपाकी, एखादा नोकर, स्वच्छ अंथरुणें, वेळच्या वेळीं जेवणखाण--या साऱ्या गोष्टींची अत्यंत आवश्यकता आहे. या साऱ्या सूचना तंतोतंत पाळा.... तुम्ही हातीं घेतलेल्या कार्याचें यश तुमच्या आपसांतील प्रेमभावनेवरच पूर्णपणें अवलंबून आहे. द्वेष, मत्सर, अहंकार या गोष्टी असेपर्यंत कांही भलें होण्याची आशा नाही....कालीने लिहिलेली पुस्तिका अगदी छान आहे. तिच्यांत कुठल्याहि प्रकारची अतिशयोक्ति नाही. दुसऱ्यांच्या पाठीमागे त्यांची निंदा करणें हें पाप आहे ही गोष्ट ध्यानांत ठेवा. हें तुम्हीं कटाक्षाने टाळायला हवें. मनांत कितीतरी गोष्टी येत असतात, पण त्या जर तशाच व्यक्त केल्या तर उगाच पराचा कावळा होण्याची भीति असते. असल्या गोष्टी वाच्यता न करतां गिळून टाकल्या की संपतात. श्रीरामकृष्णांचा जन्मदिन मोठ्या धडाक्याने साजरा झाला ही फार आनंदाची गोष्ट आहे. पुढल्या वर्षी निदान एक लाख तरी लोक जमतील असे प्रयत्न तुम्हीं करायला हवेत. एक नियतकालिक चालू करण्याच्या योजनेवर तुम्ही आता तुमच्या साऱ्या शक्ति केंद्रित करा. लाजाळूपणाने कांही काम नाही होणार....अपार चिकाटी आणि अदम्य उत्साह असलेला माणूसच यशस्वी होतो. अध्ययनाकडे तुम्हीं विशेष लक्ष द्यायला हवें, आलें ध्यानांत ? गावचे सारे मूर्ख एकत्र जमवून बसण्यांत कांही लाभ नाही. तुम्ही जर कांही मोजकींच पण 'खरीं माणसें' एकत्रित आणूं शकलां तर मला आनंद होईल. तुम्हीं कांही केल्याचें माझ्या कानीं आलें नाही. असें कां ? झालेल्या महोत्सवाच्या वेळीं तुम्हीं लोकांनी मिठाई वांटली, आणि कांही भजनी मंडळींनी--आणि यांतले बहुतेक लोक असणार रिकामटेकडे--पदें म्हटलीं हें सारें ठीक झालें, पण लोकांना कोणता 'आध्यात्मिक प्रसाद' दिलात तुम्हीं ? 'त्यांत काय एवढें' ही वृत्ति जोंवर जात नाही तोंवर कांही होणार नाही तुमच्या हातून; कांही करण्याचें साहसहि नाही होणार तुम्हांला. उठल्याबसल्या लोकांना धमकावणारा माणूस आंतून नेहमीच भेकड असतो.

कुणाचा श्रीरामकृष्णांवर विश्वास असो वा नसो, पण तुम्हीं मात्र सर्वांशींच मोठ्या सहानुभूतीने वागायला हवें. कुणी जर तुमच्याशीं उगाच वाद घालायला आला तर तुम्हीं नम्रपणें बाजूला व्हायला हवें. ...साऱ्या पंथोपपंथाच्या अनुयायांशीं तुम्हीं सहानुभूतिपूर्वक वागलें पाहिजे. हे महान् गुण जेव्हा तुमच्या अंगीं बाणतील तेव्हाच तुम्ही प्रचंड शक्तीने काम करूं शकाल. एरव्ही गुरूंचें नुसतें नांव घोकत राहून कांही होणार नाही. तें सारें कांहीहि असो, यंदाचा उत्सव मात्र खूप यशस्वी झाला. त्यासाठी तुम्हांला खास धन्यवाद द्यायला हवेत. पण तुम्हांला आणखी प्रगति करायला हवी--आलें ध्यानांत ? शरत् सध्या काय करीत आहे ? 'मला काय कळतें' 'मला काय कळतें' असेंच जर सतत म्हणत राहाल तर तुम्हाला खरोखरच कधी कांही कळावयाचें नाही. ...शिकल्या-सवरलेल्यांच्या बुद्धीला रुचेल असें उच्च दर्ज्याचें कांहीतरी हवें. नुसत्या भजनी मंडळ्या जमवून कांही होणार नाही. हा महोत्सव म्हणजे केवळ त्यांची स्मृति नव्हे, तर त्यांनी जीं सत्यें आपल्याला शिकविलीं त्यांच्या व्यापक प्रचाराचें हें मुख्य केंद्र होईल. . . .हळूहळू साऱ्या गोष्टी होतील. पण कधीकधी बांधून ठेवलेल्या शिकारी कुत्र्या-प्रमाणे मी अगदी अधीर होऊन जातों. पुढे चला, पुढे चला, हेंच आहे माझें जुनें ध्येयवाक्य. माझें ठीक चाललें आहे. घाईघाईने हिंदुस्थानांत परत फिरण्यांत कांही अर्थ नाही. साऱ्या शक्ति एकवटून प्राण पणाला लावून तुम्ही कामाला लागा--हीच खरी बहादुरी.

तुमचा

नरेंद्र

## (२५)

( श्रीमती ओलि बुल यांना )

५४ डब्ल्यू., ३३ स्ट्रीट, न्यूयॉर्क,
२५ एप्रिल १८९५

प्रिय श्रीमती बुल,

परवालाच कु. फार्मर यांचें एक पत्र मिळालें व त्याबरोबरच त्यांनी बार्बर हाऊस व्याख्यानमालेबद्दल शंभर डॉलर्सचा एक चेकहि पाठविला. येत्या शनिवारीं त्या न्यूयॉर्कला येत आहेत.

'व्याख्यानांच्या तुमच्या प्रसिद्धिपत्रकांत माझें नांव घालूं नका' असें मी त्यांना सांगणार आहें. या वेळीं 'ग्रीनएकर'ला जाणें अशक्य आहे. 'सहस्रद्वीपोद्यान' (Thousand Island Park) या ठिकाणीं जायचें ठरविलें आहे--मग हें स्थान कुठेहि का असेना. माझ्या शिष्यांपैकी कुमारी डचर यांचें एक लहानसें घर तेथे आहे; त्यांत आम्ही कांही जण विश्रांति घेऊं आणि शांतपणें एकांतवासांत राहूं. वर्गांत येणाऱ्यांपैकी कांहींना मला 'योगी' करायचें आहे, त्यासाठी 'ग्रीनएकर' सारखें धामधुमीचें ठिकाण मुळीच उपयोगाचें नाही. आणि ही दुसरी जागा लोकवस्तीपासून दूर असल्यामुळे, जे लोक केवळ कुतूहलप्रिय आहेत ते तेथे येण्याची भीति नाही.

ज्ञानयोगाच्या वर्गाला येणाऱ्या एकशेतीस लोकांचीं नांवें कुमारी हॅम्लीन यांनी उतरवून घेतलीं हें वाचून आनंद झाला. बुधवारच्या 'योगा'च्या वर्गाला आणखी पन्नास लोक येत व सोमवारच्या वर्गाला ही संख्या आणखी पन्नासने वाढत असे. श्रीयुत लँड्स्बर्ग यांच्याजवळ ती यादी आहे आणि यादी नसली तरी येणारे ते येतीलच... ते नाही आले तर दुसरे येतील आणखी कुणी, आणि हें असेंच चालणार. प्रभो, तुमचा महिमा अपार आहे !

साऱ्यांचीं नांवें नोंदवून घ्यायचीं व त्या साऱ्यांना सूचना पाठवायच्या म्हणजे एक मोठेंच काम आहे आणि म्हणून मी त्या दोघांचा अत्यंत आभारी आहें. पण मी आळसामुळेच दुसऱ्यावर अवलंबून राहिलों,

म्हणून हें अधर्माचरण आहे; आणि आळशीपणांतून वाइटाखेरीज अन्य कांहीच निष्पन्न होत नाही हें मी पुरेपूर समजून चुकलों आहें. तेव्हा आता यापुढे हें सारें काम मींच करायचें ठरविलें आहे. . . .

तें कांहीहि असलें तरी कुमारी हॅम्लीनच्या मतें 'योग्य माणसें' म्हणून समजलीं जाणारीं कुणी मंडळी आली तर त्यांना आनंदाने प्रवेश देईनच, पण दुर्दैवाने तसें कुणी अद्याप तरी आलें नाही. अगदी 'अयोग्य' म्हणून समजल्या जाणाऱ्यांतूनच 'योग्य लोक' निर्माण करायचें हेंच तर मुळी गुरूचें कार्य असतें. कुमारी हॅम्लीन यांनी न्यूयॉर्कनिवासी 'योग्य व्यक्तीं'शीं ओळख करून देण्याविषयी जी आशा दाखविली व जो उत्साह दर्शविला आणि त्यांनी मला जी मदत केली त्याबद्दल मी त्यांचा फार कृतज्ञ असलों तरी यापुढे साऱ्या गोष्टी मीं स्वतःच केल्या तर बरें असें मला वाटतें.

कुमारी हॅम्लीनबद्दल तुमची अशी उच्च धारणा असल्याचें पाहून मला आनंदच वाटतो. तुम्ही त्यांना मदत कराल हें जाणून मला संतोष झाला, कारण तसल्या मदतीची त्यांना गरज आहे. पण माते, श्रीरामकृष्णांच्या कृपेने माणूस पाहतांच मी अगदी सहज त्याचें अंतरंग बहुधा अचूकपणें ओळखूं शकतों; याचा परिणाम हा की, तुम्ही माझ्या बाबतींत कांहीहि करा, कसेंहि वागा, मी कधी तोंडांतून ब्र काढणार नाहीं. कुमारी फार्मर भुताखेतांसंबंधी पुष्कळच बोलत असतात, तरी पण मी त्यांचा सल्ला जरूर घेईन. या भुताखेतांमागे दडलेलें, प्रेमाने ओथंबलेलें, पण सोज्वळ महत्त्वाकांक्षेच्या अगदी पातळ आवरणाखाली दडलेलें त्यांचें हृदय मला स्पष्ट दिसतें, आणि तें आवरणहि थोड्याच काळांत खचितच नाहीसें होईल. लॅंड्सबर्ग यांनी माझ्या कार्यांत मधूनमधून लुडबुड केली तरी हें सारें मी चालवून घेईन. पण बस्, इथपर्यंतच. तुम्हां तिघांखेरीज इतर कुणी जर मला मदत करायला पुढे सरसावला तर मग मात्र माझें धाबें दणाणतें. मला येवढेंच म्हणावयाचें आहे. तुम्हीं मदत केली म्हणून नव्हे, तर सहजबुद्धीने (किंवा जिला मी माझ्या गुरुदेवांनी दिलेली अंतःप्रेरणा म्हणतों तिने) प्रेरित होऊन मी तुम्हांला आई मानतों, आणि तुम्ही सांगाल तसें वागण्याची माझी केव्हाहि तयारी राहील, अर्थात् हें सांगणें तुमचें स्वतःचें असायला हवें आणि तुम्हीं

स्वत:च तें मला सांगायला पाहिजे. जेव्हा तुम्ही कुण्या मध्यस्थाकरवी मला सूचना कराल तेव्हा अर्थातच काय करायचें, कसें वागायचें हें ठरवायला मला मोकळीक मिळावी अशी मी विनंती करतों. आणखी काय लिहूं ?

सोबतच मला आलेलें त्या इंग्रज सद्‌गृहस्थाचें पत्र तुमच्याकडे पाठवीत आहें. त्या पत्रांतील हिंदुस्थानी शब्द स्पष्ट व्हावेत म्हणून मीं बाजूला कांही टीपा दिल्या आहेत.

आपला आज्ञाधारक पुत्र
विवेकानंद

## (२६)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
६ मे १८९५

प्रिय आलासिंगा,

तुमचें पत्र आणि त्यासोबतच असलेला रामानुजाचार्यांच्या भाष्याचा पहिला भाग, हीं दोन्हीं आज सकाळींच मिळालीं. थोडे दिवस आधी तुमचें आणखी एक पत्र मिळालें होतें. श्री. मणी अय्यर यांचेंहि एक पत्र मिळालें. माझी प्रकृति चांगली आहे आणि माझें कार्य पूर्ववत् चालू आहे. श्री. लुण्ड (lund) यांच्या व्याख्यानांबद्दल तुम्हीं लिहिलें आहे. ते कोण आहेत आणि कुठे असतात हें मला ठाऊक नाही. ते कदाचित् चर्चमधे भाषणें देत असतील, कारण जर ते मोठमोठ्या सभांतून व्याख्यानें देत असते तर आम्हीं त्यांचें नांव निश्चितच ऐकलें असतें. कदाचित् ते इकडील कांही वर्तमानपत्रांत स्वत:च्या व्याख्यानांचे अहवाल प्रसिद्ध करून ते हिंदुस्थानांत पाठवीत असतील, आणि तिकडील मिशनरी स्वत:च्या फायद्यासाठी त्यांचा भरपूर उपयोग करून घेत असतील. तुमच्या पत्रावरून मीं हेंच अनुमान काढलें आहे. या

गोष्टीमुळे इकडील लोकांत कांही एवढी खळबळ माजली नाही की त्यांना उत्तर म्हणून आपल्याला स्वतःचें समर्थन करावें लागेल; कारण तसें केल्यास रोजच शेकडो लोकांशीं मला भांडावें लागेल. सध्या हिंदुस्थानचें इकडे खूप नांव झालें आहे आणि डॉ. बॅरोज व इतर सर्व सनातनी लोक त्यावर बोळा फिरविण्यासाठी खूप धडपड करीत आहेत. दुसरी गोष्ट ही की, हिंदुस्थानाविरुद्ध दिल्या जाणाऱ्या सनातनी लोकांच्या या सर्व व्याख्यानांतून माझ्यावर शिव्याशापांचा वर्षाव होणारच. इकडील सनातनी स्त्री-पुरुष माझ्याविरुद्ध ज्या घाणेरड्या अफवा पसरवीत आहेत त्या ऐकून तुम्ही थक्कच होऊन जाल. इकडील मतलबी स्त्री-पुरुष माझ्यावर जे कुत्सित, पाशवी आणि भेकड हल्ले चढवीत आहेत त्यांविरुद्ध माझ्यासारख्या संन्याशाने आपली बाजू सारखी मांडत राहावी असें तुम्हांला म्हणावयाचें आहे काय? इकडे माझे कांही फार वजनदार मित्र आहेत, ते मधूनमधून या लोकांना उत्तरें देऊन चूप करतात. आणि साऱ्या हिंदूंनी जर झोपूनच राहावयाचें ठरविलें असेल तर मी उगाच हिंदुधर्माचें समर्थन करण्याचा आटापिटा कशाला करूं? तेथे असणारे तुम्ही तीस कोट लोक व त्यांतहि स्वतःला विद्वान् समजणारे तुम्ही सारेजण काय करीत आहांत? तुम्ही या भांडणाचा भार आपल्या शिरावर कां घेत नाही आणि मला केवळ प्रचाराच्या व शिकवण्याच्या कार्यासाठी अवसर कां देत नाही? येथे या परक्या देशांत परक्या लोकांत मी रात्रंदिवस उरस्फोड करतों आहें ...काय मदत पाठवतो आहे हिंदुस्थान मला? भारतीय लोकांपेक्षाहि कमी देशाभिमान असलेले लोक जगांत आजवर कुठे झाले असतील काय? युरोप व अमेरिकेंत दहाबाराच सुशिक्षित व दृढ चित्ताचे लोक जर तुम्ही प्रचारासाठी पाठवून त्यांना कांही वर्षे तिकडे ठेवूं शकलांत तर त्यामुळे नैतिक व राजकीय दृष्टीनेहि तुम्ही हिंदुस्थानची अमाप सेवा केल्यासारखें होईल. भारताबद्दल नैतिक सहानुभूति बाळगणारा प्रत्येक माणूस राजकीय बाबतींत देखील भारताचा आपोआप मित्र होतो. नागड्याउघड्या जंगली लोकांनीच भरलेला तुमचा देश असल्याने तुम्हांला फटके लगावूनच सभ्य करायला हवें असें अनेक पाश्चिमात्य लोकांना वाटतें. तें खोटें आहे असें तुमच्या करणीने कां

नाही दाखवून देत तुम्ही त्यांना ? हे भित्र्यांनो ! जर तुम्ही तीस कोटी लोक मिशनऱ्यांना भिऊन स्वस्थ बसून राहाल आणि एक शब्दहि उच्चारण्याचें धाडस करणार नाही तर दूर देशांत मी एकटा माणूस काय करूं शकणार ? तुमच्यासाठी मीं जें केलें आहे तेवढ्यालाहि खरोखर तुम्ही पात्र नाही.

अमेरिकेंतील वर्तमानपत्रांत हिंदुधर्माचें समर्थन करणारे लेख तुम्ही कां नाही पाठवीत ? कोण तुम्हांला नाही म्हणतो ? शारीरिक, नैतिक व आध्यात्मिक—साऱ्याच बाबतींत भित्र्यांची जात तुमची ! पशुतुल्य तुम्ही, तुम्हांला वागणूकहि तशीच मिळते. दोनच गोष्टींकडे तुमचें लक्ष असतें—काम आणि कांचन ! तुम्ही एका संन्याशाला रात्रं-दिवस झगडण्यास जबरदस्तीने पुढे ढकलू पाहतां आणि तुम्हांला स्वतःला मात्र 'साहेब लोकां'ची—एवढेंच काय पण मिशनऱ्यांची सुद्धा भीति वाटते ! आणि तुम्ही मोठमोठीं कामें करणार अं ! तुम्ही कांही-जण मिळून उत्तर म्हणून हिंदुधर्माचें समर्थन करणारे लेख लिहून ते बोस्टन येथील 'अॅरेना पब्लिशिंग कंपनी'कडे कां पाठवीत नाही ? 'अॅरेना' हें पत्र तुमचे लेख आनंदाने प्रसिद्ध करील आणि कदाचित् त्याबद्दल तुम्हांला ते चांगलाच मोबदला सुद्धा देतील. एवढें तुम्हीं केलें की पुरे. जेव्हा तुम्हांला माझ्याजवळ मिशनऱ्यांविरुद्ध फिरून वेडपटा-सारखें रडगाणें गाण्याची इच्छा होईल तेव्हा हें माझें लिहिणें आठवा. लक्षांत असूं द्या की, पाश्चात्य देशांत आजवर आलेल्या कृतघ्न हिंदूंनी नांवासाठी, पैशासाठी आपल्या धर्माची व देशाची येथे निंदा केली आहे. नांवलौकिकासाठी कांही मी इकडे आलों नाहीं हें तुम्हांला माहीत आहे. माझी इच्छा नसतांना देखील तो मला प्राप्त झाला आहे. कशाला परत येऊं मी हिंदुस्थानांत ? तेथे कोण येणार आहे मदतीला धावून माझ्या ? . . . तुम्ही अजून बालकें आहांत. तुम्ही काय बडबडतां तें तुम्हांलाच कळत नाही. धर्मप्रचारासाठी संसार-त्याग करतील असे लोक आहेत कुठे मद्रासमधे ? भोग आणि योग हे दोन्ही कधीच एकत्र राहूं शकत नाहीत. आपल्या देशाच्या समर्थनार्थ बोलण्याचें धैर्य दाखविणारा मीच एकटा निघालों व इकडील लोकांना मीं असे विचार प्रदान केले आहेत की एखाद्या हिंदूकडून ते मिळतील अशी त्यांची कधीच अपेक्षा

नव्हती. मला विरोध करणारे पुष्कळ लोक आहेत. पण मी कधीहि तुमच्यासारखा भेकड होणार नाहीं. या देशांत हजारो लोक माझे मित्र आहेत व शेकडो लोक असे आहेत की जे जिवांत जीव असेपर्यंत माझ्या मागून येतील. दरवर्षी त्यांचीसंख्या वाढेल आणि मीं जर त्यांच्याबरोबर राहून काम केलें तर जीवनाचें आणि धर्माचें माझें ध्येय फलद्रूप होईल, आलें ध्यानांत ?

अमेरिकेंत बांधल्या जाणाऱ्या सार्वजनीन मंदिराबाबत ( Temple Universal बाबत ) आजकाल फारसें कांही माझ्या कानीं येत नाही, तरीहि अमेरिकन जीवनाचें अगदी केंद्र समजल्या जाणाऱ्या न्यूयॉर्क शहरांत माझा पक्का जम बसला असल्याने माझें कार्य चालूंच राहील. योग, ज्ञान, भक्ति याबाबतचें शिक्षण पूर्ण करण्यासाठी म्हणून मी माझ्या बऱ्याचशा शिष्यांना उन्हाळ्यांत राहण्याजोग्या जागीं घेऊन जाणार आहे. त्यांचें शिक्षण पूर्ण झालें की माझें कार्य पुढे चालविण्यास मला ते मदत करूं शकतील. म्हणून वत्सांनो, आता कामाला लागा.

एका महिन्याच्या आंतच मी नियतकालिकासाठी कांही पैसा पाठवूं शकेन. स्वतःच भिकारी असलेल्या हिंदूच्या दारीं पुन्हा तुम्हीं भिकेची झोळी घेऊन जाण्याची कांही गरज नाही. सारें कांही मी माझ्या बुद्धीच्या व मनगटाच्या जोरावर स्वतःच करीन. येथे काय किंवा भारतांत काय, मला कुणाच्याहि मदतीची जरूरी नाही. . . . श्रीरामकृष्णांचें अवतारत्व अट्टाहासाने लोकांपुढे मांडूं नका.

आता मी माझ्या एका नवीन शोधाबद्दल तुम्हांला लिहितों. सगळा धर्म वेदान्तांत अंतर्भूत आहे—अर्थात्, वेदान्तदर्शनाच्या द्वैत, विशिष्टाद्वैत व अद्वैत या तीन स्तरांत वा भूमिकांत तो सामावलेला आहे, आणि या भूमिका एकामागून एक अशा क्रमाने अनुभवास येतात. मनुष्याच्या आध्यात्मिक उन्नतीच्या या तीन पायऱ्या आहेत. यांतील प्रत्येकच आवश्यक आहे. हेंच आहे धर्माचें सार. भारतांतील निरनिराळ्या आचार-व्यवहारांना वा धर्मपंथांना लागू केल्यामुळे वेदान्ताला जें रूप आलें त्यालाच म्हणतात हिंदुधर्म. वेदान्ताची पहिली पायरी, म्हणजेच द्वैत हें युरोपांतील मानववंशांच्या आचार-विचारांना लागू केल्यामुळे त्याला जें रूप आलें तें म्हणजे ख्रिस्ती धर्म. आणि तेंच द्वैत

सेमेटिक जातींना लागू केल्याने त्याला आलेलें रूप म्हणजे मुसलमान धर्म होय. योगानुभूतीच्या स्वरूपांतील अद्वैत म्हणजे बौद्धधर्म, इत्यादि इत्यादि. आता, धर्म म्हणजे वेदान्त; परंतु त्याचा प्रत्यक्ष उपयोग मात्र आवश्यकता, अवस्था आणि परिस्थिति ह्यांच्या भिन्नतेनुसार निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या प्रकारांनीच होणार. तुम्हांला आढळून येईल की, मूळ दार्शनिक तत्त्व अगदी एकच असून देखील शाक्त, शैव वगैरे पंथ तें एकच मूलतत्त्व भिन्न भिन्न रूपांत आपापल्या पंथांत व साधनापद्धतींत अमलांत आणतात. या तिन्ही भूमिका एकामागून एक कशा अनुभवास येतात आणि म्हणून त्यांच्यामधे कशी संगति व समन्वय आहे हें तुम्ही आपल्या नियतकालिकांत लेखामागून लेख लिहून दाखवून द्या--मात्र कर्मकांडात्मक वा अनुष्ठानात्मक भाग सपशेल बाजूला ठेवा. थोडक्यांत म्हणजे तत्त्वज्ञानात्मक, आध्यात्मिक भाग तुम्ही समोर मांडा; मग लोक त्याचा आपापल्या अनुष्ठानपद्धतींमधे वा कर्मादिकांत यथोचित उपयोग करून घेवोत. या विषयावर एक पुस्तक लिहावयाचें असल्याने मला तिन्हीं भाष्यें हवीं होतीं, पण, आतापावेतो रामानुजभाष्याचा पहिला भागच काय तो मला मिळाला आहे.

अमेरिकेंतील थिऑसफिस्टांनी इतर थिऑसफिस्टांशीं संबंध तोडला आहे. आणि आता ते भारताचा तिरस्कार करतात. गरीब बिचारे! भारतांत नुकतेच जाऊन आलेले व तेथे माझे गुरुबंधु शिवानंद यांना भेटलेले इंग्लंडचे श्री. स्टर्डी यांनी पत्राद्वारें मला विचारलें आहे की मी इंग्लंडला केव्हा जाणार आहें. मीं त्यांना एक सुंदर पत्र लिहिलें आहे. बाबू अक्षयकुमार घोष यांची काय खबर? त्यांच्याकडून मला आणखी कांही बातमी मिळाली नाही. मिशनऱ्यांना व इतरांना योग्य उत्तर द्या. आपल्या देशांतील कांही कणखर माणसांना हातीं धरा आणि भारतांतील सध्याच्या धार्मिक पुनरुत्थानासंबंधी एक सुंदर, ओजस्वी पण सुसंस्कृत अभिरुचीचा लेख लिहून तो अमेरिकेंतील एखाद्या नियतकालिकाकडे पाठवून द्या. एकदोन नियतकालिकांच्या व्यवस्थापकांशीं माझा परिचय आहे. मी कांही लेखक नाहीं हें तुम्हांला तर माहीतच आहे. भीक मागत दारोदार हिंडण्याची कांही मला सवय नाही. मी निश्चितपणें बसून साऱ्या गोष्टी आपणहून माझ्याकडे येण्याची वाट पाहतों. . .

माझ्या मुलांनो, मी जर व्यवहारचतुर दांभिक असतों तर येथे साऱ्या गोष्टी सुसंघटित करण्यांत मला अपूर्व यश मिळालें असतें. पैसा + नांवलौकिक = पुरोहित; पैसा + विषयभोग = सामान्य माणूस ! — हाय, एवढाच आहे येथील धर्म ! ज्यांच्या ठायीं ईश्वराबद्दल प्रामाणिक श्रद्धा आहे व जे कोणत्याहि ऐहिक गोष्टींची पर्वा करीत नाहीत अशा लोकांचा एक नवाच वर्ग मला येथे निर्माण करावयाचा आहे. अर्थातच या गोष्टी हळहळू, अगदी हळूहळूच होतील. तोंवर तुम्ही आपलें काम पुढे रेटा, मीहि आपलें तारू सरळ पुढे हाकारतों. नियतकालिक पाचकळ असून उपयोगी नाही, तें असायला हवें गंभीर, स्थिर व उच्च अभिरुचीचें. . . .चिकाटीने व सुरेख लिहिणाऱ्या लेखकांचा एखादा संच हाताशीं ठेवा. . . .संपूर्ण निःस्वार्थ बुद्धीने व चिकाटीने काम पुढे रेटा. आपल्या हातून मोठमोठ्या गोष्टी व्हायच्या आहेत, भिऊं नका. असा एक नियमच असूं द्या की नियतकालिकाच्या प्रत्येक अंकांत पूर्वोक्त तीन भाष्यांमधील एखाद्या ना एखाद्याचा थोडातरी अनुवाद आला पाहिजे. आणखी एक मुद्दा. कुणावरहि अगदी एवढासा देखील अधिकार गाजवण्याचा चुकूनहि प्रयत्न करूं नका—साऱ्यांचे व्हा सेवक. नाहीतर मत्सर निर्माण होऊन साऱ्या कामाचें वाटोळें करून टाकील. . . .पुढे व्हा. आतापावेतोचें तुमचें कार्य अद्भुतच आहे. आपण मदतीसाठी वाट पाहणार नाहीं. आपणच साऱ्या गोष्टी करूं. आत्मविश्वास, श्रद्धा, धीर असूं द्या. माझ्या अन्य मित्रांशीं कुठलाहि विरोध येऊं देऊं नका. साऱ्यांशींच मिळून मिसळून राहा. सर्वांना माझा प्रेमपूर्वक आशीर्वाद.

तुमचा
विवेकानंद

ता. क.—तुम्हीं नेतेपणाचा आव आणला की कुणीहि तुमच्या साहाय्याला यावयाचा नाही. . . .यशच जर हवें असेल तर आधी स्वार्थाचा, 'अहं'चा समूळ नायनाट करा.

(२७)

( श्रीमती ओलि बुल यांना )

५४ डब्ल्यू., ३३ स्ट्रीट, न्यूयॉर्क,
७ मे १८९५

प्रिय श्रीमती बुल,

...हिंदी लोकांनी केलेल्या आभारप्रदर्शनाला डॉ. बॅरोज यांनी दिलेलें संक्षिप्त उत्तर ज्यांत प्रसिद्ध झालें आहे अशा एका वर्तमान-पत्राचा अंक हिंदुस्थानांतून माझ्याकडे आला आहे. कु. थर्सबी ह्या तो अंक तुमच्याकडे धाडतील. मद्रासमध्ये अभिनंदनासाठी भरलेल्या सभेच्या अध्यक्षांचेंहि एक पत्र मला काल भारतांतून आलें. त्यांत त्यांनी अमेरिकेंतील लोकांना धन्यवाद दिले आहेत आणि मलाहि एक अभि-नंदन-पत्र पाठविलें आहे....हे सद्‌गृहस्थ मद्रासमधील एक प्रमुख नागरिक असून सुप्रीम कोर्टाचे एक न्यायाधीश आहेत. हिंदुस्थानांत हें पद फार मोठें समजलें जातें.

न्यूयॉर्कमधील मॉट्म मेमोरियल बिल्डिंगच्या वरच्या मजल्या-वरील सभागृहांत मी आणखी दोन व्याख्यानें देणार आहें. त्यांपैकी एक 'Science of Religion' (धर्मविज्ञान) या विषयावर येत्या सोमवारीं होईल. व्याख्यानाचा दुसरा विषय राहील 'Rationale of Yoga' (योगाचें तर्कसंगत विवरण)....भारताच्या आर्थिक परि-स्थितीबद्दलचें पुस्तक कु. हॅम्लिनने तुमच्याकडे पाठविलें काय ? तुमच्या भावाने तें वाचून भारतांतील इंग्रजी राज्य म्हणजे काय हें स्वतःच समजून घ्यावें अशी माझी इच्छा आहे.

आपला चिरकृतज्ञ पुत्र
विवेकानंद

(२८)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

न्यूयॉर्क,
१४ मे १८९५

प्रिय आलासिंगा,

पुस्तकें सारीं सुखरूप पोहोचलीं. त्याबद्दल खूप धन्यवाद.... न्यूयॉर्क आता माझ्या काबूंत आलें आहे. मी या देशांतून निघून गेल्यावर माझें कार्य पुढे चालू ठेवतील असे कांही कार्यकर्ते कायमचे मला येऊन मिळतील अशी मला आशा वाटते. वर्तमानपत्रांतील ह्या गाजावाजाला कांही अर्थ नाही हें ध्यानांत आलें का वत्सा? येथून जाण्यापूर्वी माझ्या कार्याचा पक्का ठसा उमटवून ठेवणें मला जमलें पाहिजे. परमेश्वराच्या कृपेने हें लवकरच शक्य होईल....जगांतल्या साऱ्या संपत्तीपेक्षा 'माणसें'च अधिक मोलाचीं असतात.

माझ्याबद्दल चिंता करण्याचें कांहीच कारण नाही. परमेश्वर सदैव माझ्या पाठीशीं उभा आहे. या देशीं माझें येणें व माझें येथील कार्य व्यर्थ जातां उपयोगी नाही.

माझें अनिष्ट करण्याचा कसून प्रयत्न करणारे बरेच लोक असले तरी शेवटपर्यंत मला मदत करतील असेहि माझे अनेक मित्र आहेत. परमेश्वराची दया अगाध आहे हेंच खरें. चांगल्या कार्यातील यशाचें रहस्य अनंत धीर, अनंत पावित्र्य व अनंत चिकाटी हेंच आहे.

तुम्हांला आशीर्वाद.

सदैव तुमचा
विवेकानंद

(२९)

( श्रीमती ओलि बुल यांना )

५४ डब्ल्यू., ३३ स्ट्रीट, न्यूयॉर्क,
गुरुवार, मे १८९५.

प्रिय श्रीमती बुल,

वर्ग ठीकच चालले आहेत. पण उपस्थितांची संख्याहि जरी मोठी असते तरी भाड्यापुरतेहि पैसे मिळत नाहीत. या आठवड्यांत मी आणखी प्रयत्न करीन आणि मग वर्ग बंद करीन.

माझ्या शिष्यांपैकी कु. डचर हिच्याकडे सहस्र द्वीपोद्यान (Thousand Island Park) या ठिकाणीं मी ह्या उन्हाळ्यांत जाणार आहें. वेदान्तावरील वेगवेगळीं पुस्तकें भारतांतून माझ्याकडे आता पाठविण्यांत येत आहेत. 'सहस्र द्वीपोद्यान' येथे वेदान्त तत्त्वज्ञानाच्या द्वैतादि तीन अवस्थांवर एक पुस्तक लिहिण्याचा माझा विचार आहे. त्यानंतरच मी 'ग्रीनएकर'ला जाईन. या उन्हाळ्यांत मीं तेथे व्याख्यानें द्यावीत अशी कु. फार्मर यांची इच्छा आहे.

Press Association साठी कबूल केलेला 'Immortality' (अमरत्व) हा लेख लिहिण्यांत सध्या मी गुंतलों आहें.

आपला
विवेकानंद

(३०)

( श्री. सिंगरावेलु मुदलियार यांना )

१९ डब्ल्यू., ३८ स्ट्रीट, न्यूयॉर्क,
२२ जून १८९५

प्रिय किडी,

एकाच ओळीऐवजी मी तुम्हांला पूर्ण पत्रच लिहीत आहें. तुमची

प्रगति होत असल्याचें पाहून मला आनंद होतो. मी भारताला परत-णारच नाहीं हें तुमचें वाटणें चुकीचें आहे; लवकरच मी परत येत आहें. अपयश पाहण्यासाठी कांही माझा जन्म नाही. मीं येथे असें बीजारोपण केलें आहे की त्याची वाढ वृक्षांत होईल, नव्हे ती झालीच पाहिजे. मीं जर घाईमुळे त्या वाढीकडे दुर्लक्ष केलें तर कदाचित् ती खुंटून जाईल एवढीच मला भीति वाटते. तुमचें नियतकालिक लवकर सुरू करा. माझ्या इथल्या लोकांशीं तुमचा संबंध आणून दिला की मी भारतांत येईन, आणखी काय ?

वत्सा ! आता कंबर कसून कामाला लाग. रोमची उभारणी कांही एका दिवसांत झाली नाही. परमेश्वर माझें मार्गदर्शन करीत आहे, म्हणून अखेर साऱ्या गोष्टी व्यवस्थित होतीलच होतील.

माझा तुम्हांला सदैव प्रेमपूर्वक आशीर्वाद.

तुमचा
विवेकानंद

## (३१)*

( स्वामी रामकृष्णानंद यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
१८९५

प्रिय शशी,

तुमच्या पत्रावरून तिकडील बरीच हकीकत कळली. तरी पण तुम्ही सर्वांविषयी सविस्तर लिहिलें नाही. मध्यंतरीं निरंजनचें एक पत्र मिळालें, त्यावरून तो सिलोनला जात आहे हें कळलें. सारदा करीत असलेल्या कामाशीं मी पूर्ण सहमत आहें, परंतु लक्षांत येवढेंच ठेवायला हवें की, श्रीरामकृष्ण अवतार आहेत वगैरे गोष्टींचा प्रचार करावयाची कांही गरज नाही. ते आले होते जगाच्या कल्याणासाठी, स्वतःच्या नांवाचा गाजावाजा करण्यासाठी नव्हे, हें तुम्ही पक्कें ध्यानांत ठेवा.

शिष्यलोक आपल्या गुरूंच्या नांवालाच फक्त धरून बसतात, पण ज्या गोष्टींची शिकवण देण्यासाठी ते आलेले असतात त्यांचा ते त्याग करतात. संकुचित पंथाची निर्मिति आणि त्याविषयीचा अंध अभिमान हाच असतो या साऱ्या करणीचा परिणाम. आलासिंगाने चारूबाबत बरेंच लिहिलें आहे, पण तो कोण हें कांही मला आता आठवत नाही. त्याच्या-बद्दल सविस्तर लिहा व मी त्याचा आभारी असल्याचें त्याला कळवा. सगळयांबद्दल अगदी तपशीलवार कळवीत जा—उगाच बाजारगप्पांत दवडायला मला वेळ नाही. कुणाशीं थट्टामस्करी करीत बसण्यापेक्षा, मला वाटतें, कितीतरी मोठीं कामें मला आयुष्यांत करावयाचीं आहेत. कर्मकांडाचें फुकट अवडंबर टाकून देण्याचा प्रयत्न करा; त्या साऱ्या भानगडी संन्याशांसाठी नाहीत, आणि ज्ञान होईपावेतोच काय तें प्रत्येकाने कर्म करायला हवें असतें. . . .इतर कांहीहि असलें तरी संकुचित पंथा-भिमानाशीं, दल उभारण्याशीं वा कूपमंडूक वृत्तीशीं माझा कसलाहि संबंध नाही, त्यांच्याशीं मला कांहीहि करावयाचें नाही. . . .श्रीराम-कृष्णांच्या उदार व उदात्त विचारांचा प्रसार करणें आणि संकुचित पंथांची स्थापना करणें या दोन्ही गोष्टी एकाच वेळीं शक्य नाहीत. . . . मला फक्त एकाच प्रकारचें कार्य कळतें आणि तें म्हणजे दुसऱ्याचें हित करणें, याव्यतिरिक्त होणारें अन्य सारें कर्म म्हणजे दुष्कर्मच होय. म्हणूनच मी बुद्धदेवांच्या चरणीं नतमस्तक आहें. . . .मी वेदान्ती आहें, सच्चिदानंदच माझा ईश्वर आहे, माझ्या महान् आत्म्याखेरीज अन्य ईश्वर मला दिसत नाही. . . .ब्रह्मादिस्तंबपर्यंत—ब्रह्मचापासून तो गव-ताच्या क्षुद्र पात्यापर्यंत—साऱ्यांनाच यथासमय जीवन्मुक्ति लाभणार आहे. साऱ्यांना या अवस्थेपर्यंत पोहोचावयास मदत करणें हेंच आपलें कर्तव्य होय. ही मदत म्हणजेच धर्म, बाकी सारा अधर्म. ही मदत म्हणजेच कर्म, बाकी सारें कुकर्म. याशिवाय या गोष्टींचा अन्य अर्थ मला आढळत नाही. याखेरीज अन्य वैदिक वा तांत्रिक कर्मांद्वारेंहि कांही फल लाभूं शकतें, पण त्यांचा आश्रय घेणें म्हणजे वेळेचा शुद्ध अपव्यय करणेंच होय, कारण कर्माचें फल जी पवित्रता ती केवळ परोपकारानेच लाभत असते. यज्ञादि कर्मांद्वारा विविध भोग मिळतील पण त्यामुळे एखाद्याला आत्म्याचें पावित्र्य मिळणें मात्र सर्वथैव अशक्य आहे. . . .

प्राणीमात्राच्या आत्म्याचे ठायीं सर्वकांही विद्यमान असतें. मी मुक्त आहें असें जो ठासून म्हणेल तो निश्चितच मुक्त होईल, आणि मी बद्ध आहें असें जो म्हणेल तो बद्धच राहणार. आपण हीनदीन आहोंत असल्या प्रकारचे आत्मनिर्भर्त्सनेचे विचार म्हणजेच माझ्या मतें पाप होय, अज्ञान होय. 'नायमात्मा बलहीनेन लभ्य:'—'बलहीनाला आत्मलाभ सर्वथैव अशक्य.' 'अस्ति ब्रह्म वदसि चेत्, अस्ति भविष्यसि; नास्ति ब्रह्म वदसि चेत्, नास्त्येव भविष्यसि'—'जर म्हणाल की ब्रह्म —आत्मा—आहे तर अस्तिस्वरूप होऊन जाल आणि जर म्हणाल की ब्रह्म—आत्मा—नाही, तर नास्तिस्वरूप होऊन जाल. जो सदासर्वकाळ स्वत:ला दीन-दुबळा समजतो तो बलवान होणें कधीहि शक्य नाही. याउलट 'मी ब्रह्मसिंह आहें' असें जो जाणतो तो—'निर्गच्छति जगज्जालात् पिंजरादिव केसरी'—'पिंजरा तोडून बाहेर पडणाऱ्या सिंहाप्रमाणे या जगज्जालांतून मुक्त होतो.' दुसरी गोष्ट ही की श्रीरामकृष्ण हे कोणत्याहि नवीन सत्याचा प्रचार करण्यासाठी आविर्भूत झाले नव्हते. त्यांच्या आगमनामुळे पुरातन सत्येंच प्रकाशांत आलीं. हेंच अन्य तऱ्हेने म्हणावयाचें झाल्यास—He was the embodiment of all the past religious thought of India. His life alone made me understand what the Shastras really meant, and the whole plan and scope of the old Shastras—ते म्हणजे भारताच्या सर्वच प्राचीन धार्मिक आदर्शांचें साकार रूप होते. प्राचीन शास्त्रांचा खरा अर्थ काय आहे, त्यांची रचना कोणत्या योजनेनुसार आणि कोणत्या उद्देशाने झाली या साऱ्या गोष्टी त्यांच्या जीवनांतूनच मला अवगत झाल्या.

येथील मिशनरीबिशनरी माझें फारसें कांही वाकडें करूं शकले नाहीत. परमेश्वराच्या कृपेने माझ्यावर येथील लोकांचें खूप प्रेम आहे, व ते कुणाच्याहि मतामुळे बिथरतील हें शक्य नाही. माझे देशबांधवाहि समजूं शकणार नाहीत इतक्या चांगल्या रीतीने ते माझे विचार समजून घेतात आणि परत ते नि:स्वार्थी आहेत. माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की प्रत्यक्ष कामाची वेळ येतांच क्षुद्र मत्सर वा 'मीच मोठा' ही भावना ते टाकून देतात. कामाच्या वेळीं ते सारे एकमताने सुयोग्य माणसाच्या

मार्गदर्शनाखाली काम करतात. त्यांच्या थोरवीचें रहस्य यांतच आहे. पण त्यांचा देश आहे धनोपासकांचा. सर्वारंभीं इथे विचार होतो तो पैशाचा. आपल्याकडले लोक पैशाच्या बाबतींत उघड्या मुठीचे असतात, इथल्या लोकांचें तसें नाही. घरोघरीं कवडीचुंबक आहेत. कवडीचुंबकपणा हा जणु इथला धर्मच आहे. हातून कांही पाप घडलें की मग मात्र हे लोक धर्मोपदेशकांच्या तावडींत सापडतात आणि मग धन देऊन स्वर्गप्राप्ति करून घेतात ! पुरोहितगिरीच्या या असल्या गोष्टी सर्व देशांत अगदी सारख्याच आढळतात. हिंदुस्थानांत मी परतेन किंवा नाहीं वा केव्हा परतेन याबाबत मी सध्या कांहीच सांगू शकत नाहीं. येथल्याप्रमाणे तेथेहि मला भ्रमन्तीचेंच जीवन अंगिकारावें लागणार आहे. फरक एवढाच की येथे हजारो लोक माझीं व्याख्यानें ऐकावयास जमतात, त्यांना तीं समजतात आणि त्यांचा त्यांपासून फायदाहि होतो. पण हीच गोष्ट हिंदुस्थानांतील लोकांबाबत म्हणू शकाल का ? . . . सारदा जें करतो आहे त्याच्याशीं मी पूर्णपणें सहमत आहें. शतशः धन्यवाद देतों मी त्याला . . . असो, माझ्या मनाप्रमाणे असणारे अनेक लोक मद्रास व मुंबईमधे आहेत. ते विद्वान् असून साऱ्या गोष्टी त्यांना समजतात. त्यांतहि अंतःकरणाने ते दयाळू असल्याने लोकहिताची भावना ते नीट समजू शकतात. . . . पुस्तकें वगैरे मीं कांही छापलीं नाहीत, मी आपला फक्त व्याख्यानें देत फिरत असतों . . . मी माझ्या गतजीवनाचें जेव्हा सिंहावलोकन करतों तेव्हा उदास वा खिन्न होण्याचें कांही कारण मला दिसत नाही. अल्पस्वल्पच का होईना, देशोदेशीं मी लोकांना शिकवीत फिरलों आहें आणि त्याच्या बदल्यांत त्यांनी मला अन्न दिलें. कांहीहि काम न करतां लोकांना मीं नुसतें ठकविलें आहे असें जर मला आढळतें तर मी एव्हाना आत्महत्या करून मोकळा झालों असतों. आपण लोकांना शिकविण्यास अयोग्य आहोंत असें ज्यांना वाटतें ते लोक उपदेशकाचा पोशाख घालून आणि दुसऱ्यांना फसवून आपलें पोट कां भरतात ? असें करणें हें घोर पाप नाही काय ? . . .

तुमचा

विवेकानंद

(३२)

( श्री. आलासिंगा पेरुमल यांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
१ जुलै १८९५

प्रिय आलासिंगा,

...मी तुम्हांला स्पष्ट सांगतों आलासिंगा, की तुमचें तुम्हींच समर्थन केलें पाहिजे. तुम्ही दुधखुळ्या पोरांसारखे वागतांच काय म्हणून ? कुणी जर तुमच्या धर्माची निंदानालस्ती केली तर तुम्ही आपली बाजू मांडायला पुढे कां येत नाही, आणि त्यांच्या तोंडावर त्यांना उत्तर कां देऊं शकत नाही ? माझ्या बाबतींत तुम्ही चिंता करायचें कारण नाही. शत्रूंपेक्षा मला मित्रच अधिक आहेत इथे; त्यांतहि या देशांत एकूण एकतृतीयांश लोकच काय ते ख्रिस्ती आहेत व शिकलेल्या लोकांपैकी फारच थोडे जण मिशनरी काय म्हणतात त्याकडे लक्ष देतात. तसेंच, मिशनरी एखाद्या गोष्टीविरुद्ध आहेत येवढ्याच कारणाने ती गोष्ट सुशिक्षित लोकांना आवडूं लागते. येथे त्यांचा प्रभाव पुष्कळच घटला आहे आणि दिवसेंदिवस तो घटत आहे. त्यांनी केलेल्या हल्ल्यामुळे तुम्हांला जर दुःख होत असेल तर एखाद्या रडक्या पोरा-प्रमाणे त्या गोष्टीची भुणभुण माझ्यामागे कशाला लावतां ? . . . भित्रेपणा हा कांही सद्‌गुण नव्हे.

येथील चांगले चांगले लोक अनुयायी म्हणून मला लाभले आहेत. पुढल्या वर्षी त्यांना मी कार्याच्या दृष्टीने सुसंघटित करीन. अशाने माझें कार्य सुरळितपणें चालूं राहील. माझे येथे असे मित्र आहेत की जे, मी भारतांत आल्यावर तेथेहि मला मदत करतील, व माझ्या येथेहि चालूं असलेल्या कार्याला हातभार लावतील. तेव्हा त्या बाबतींत तुम्हीं काळजी करण्याचें कारण नाही. मिशनऱ्यांनी चालविलेल्या कारवायांचा प्रतिकार न करतां जोंवर तुम्ही केवळ आरडाओरडा करीत बसाल तोंवर मला तुमचें हसूंच येणार--तुम्ही नुसत्या बाहुल्या आहांत बाहुल्या. . तुमच्यासारख्या वयस्क बालकांसाठी स्वामीजी

तरी काय करूं शकणार ! !

वत्सा ! मला स्वत: तेथे येऊन तुमच्यांतूनच माणसें घडवावीं लागतील याची मला जाणीव आहे. हिंदुस्थान म्हणजे बायांनी व नपुंसकांनी भरलेला देश आहे हें मी जाणून आहें. म्हणून नाराज होण्याचें वा रागावण्याचें कांही कारण नाही. येथील कामासाठी सारें साहित्य मलाच जमवावें लागेल. निर्बुद्ध माणसांच्या हातीं मी पडूं इच्छीत नाहीं. तुम्ही काळजी करण्याचें कांही कारण नाही,हातून जेवढें होण्यासारखें असेल तेवढें करा. सुरवातीपासून शेवटपर्यंत साऱ्या गोष्टी मला एकटयालाच कराव्या लागणार आहेत. . . . 'नायमात्मा बलहीनेन लभ्य:'—दुर्ब-लांना आत्मलाभ होणें शक्य नाही.' माझी फिकीर सोडा तुम्ही. भगवान माझा पाठीराखा आहे. तुम्ही स्वत:चें रक्षण करूं शकतां हें मला दाखवा, म्हणजे तेवढयानेच मी संतुष्ट होईन. माझ्याबद्दल कोण काय बोलला हें सांगून पुढे आता मला पुन्हा फुकट त्रास देऊं नका. मूर्ख लोक माझ्या-बद्दल काय म्हणतात तें ऐकल्यावांचून माझें कांहीहि खोळंबलें नाही. लहान पोरांनो ! मोठमोठीं कार्यें साधतात तीं दृढ निश्चय, असीम धैर्य व पराकाष्ठेचे प्रयत्न यांच्याच बळावर. . . .किडीचें मन मथूनमथून कोलांटउडया घेत आहेसें मला वाटतें. . . .

वीर लोकच मोठमोठालीं कामें उरकतात, भित्रटांकडून कांहीहि होणें शक्य नाही. हे श्रद्धाहीनांनो, भगवान मला हात धरून चालवीत आहेत ही गोष्ट नेहमी लक्षांत ठेवा. जोंवर मी पवित्र आहें, भगवंतांचा अनन्य दास म्हणून जोंवर काम करतों आहें तोंवर माझ्या केसालादेखील धक्का लावण्याची कुणाची हिंमत नाही. . . . देशाच्या भल्यासाठी कांही कराल तर सारा देश तुम्हांला मदत करील, सारा देश तुमच्या पाठीशीं उभा राहील. . . .धाडसी व्हा, धाडसी व्हा, माणसाला मृत्यु येत असतो फक्त एकदाच. माझ्या अनुयायांत कुणी भेकड असतां उपयोगी नाही.

सदैव तुमचाच

विवेकानंद

## (३३)

( खेतरीच्या राजेसाहेबांना )

संयुक्त संस्थानें, अमेरिका,
९ जुलै १८९५

. . .भारतांत माझ्या परत येण्याबद्दल म्हणत असाल तर सध्या परिस्थिति अशी आहे. मी अगदी पक्कया चिकाटीचा माणूस आहें ही गोष्ट महाराज जाणतातच. मी या देशांत पेरलेल्या बीजाचें आताच रोपटें झालें आहे, थोड्या कालांत त्याची वृक्षांत वाढ व्हावी अशी माझी अपेक्षा आहे. इथे माझे शेकडो अनुयायी आहेत. कांही लोकांना संन्यासदीक्षा देऊन त्यांच्या हातीं माझें कार्य सोपविल्यानंतरच मी भारतांत परत येईन. ख्रिस्ती पाद्री जितक्या अधिक प्रमाणांत मला विरोध करताहेत तितक्याच अधिक प्रमाणांत माझी स्थायी छाप या त्यांच्या देशावर बसविण्याचा माझा निश्चय दृढ झाला आहे. . . . लंडनमधेहि माझे कांही मित्र आहेत. या ऑगस्टअखेर मी बहुतेक तेथे जाईन. . . .येता हिवाळा मला कांही काळ लंडन व कांही काळ न्यूयॉर्क येथे घालविणें भाग आहे. नंतरच मी हिंदुस्थानांत परत यायला मोकळा होईन. ईश्वरकृपेने या हिवाळ्याअखेर येथील काम हातीं घेणारे बरेच लोक निघतील. उपहास, विरोध व अखेर स्वीकार या तीन अवस्थांतून प्रत्येकच कार्याला आपली वाट काढावी लागते. आपल्या कालाच्या पुढे जाऊन विचार करणाऱ्या प्रत्येक माणसाबद्दल खात्रीने गैरसमज उत्पन्न होत असतात. तेव्हा विरोधाला आणि छळणुकीला माझी आनंदाने तयारी आहे. मीं स्थिर आणि पवित्र असायला हवें, भगवंतावर माझा दृढ विश्वास असायला हवा म्हणजे मग या साऱ्या अडचणी कुठल्या कुठे नाहीशा होऊन जातील. . . .

विवेकानंद

# सूचि